# पाश्चिमात्य शिक्षणपद्धती

डॉ. गजानन श्री. खैर

एम्, ए, पीएच्.

पुणें अ. वि. गृह १८ वें प्रकाशन

# पाश्चिमात्य शिक्षणपद्धती

अमेरिका, रशिया व यूरोपमधील शिक्षणाची
हिंदी दृष्टीनें
तात्त्विक व व्यावहारिक माहिती

लेखक
डॉ. गजानन श्रीपत खैर
एम. ए. पीएच्. डी.
जगांतील समाजक्रांति व हिंदुस्थान, संसारकी समाजक्रांति और हिंदुस्थान
यांचे लेखक

शके १८५८ ] किंमत ३ रुपये [ सन १९३७

जनन्यै स्वाहा । इदं न मम ॥

स्वतःच्या हाडाचीं काडें करून गरीबींतही
मुलांच्या शिक्षणाकरितां
देहानें व मनानें झिजणाऱ्या

माझ्या आईस

व

अशाच रीतीनें वागणाऱ्या सर्व गरीब राष्ट्रमातांना

**प्रेमपूर्वक अर्पण**

—गजानन

# अनुक्रमणिका

## विभाग चौथा

## जर्मनी, इटली, व फरान्स — संस्कृतिप्रधान शिक्षण



## विभाग पांचवा

## जग व हिंदुस्थान -- हिंदी दृष्टीनें निरीक्षण



## शिक्षणपद्धतींचे आलेख

# ग्रंथ-प्रयोजन

हिंदुस्थानांत सध्यां शिक्षणसुधारणेचा प्रभातकाल आहे. मेकॉलेनें हिंदी शिक्षणपद्धतींत आमूलाग्र क्रांति केली, त्याला एक शतक होऊन गेलें. आतां आपल्या शिक्षणांत दुसरी क्रांति करण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झालेली आहे.

विद्यमान शिक्षणपद्धतीविषयीं आज सर्वत्र असंतोष आहे. 'वेड्यांच्या नंदनवनांत' मनानें वावरणाऱ्या कांहीं अपवादात्मक व्यक्ती सोडून दिल्यास शिक्षणतज्ज्ञ, समाजशास्त्रज्ञ, मुत्सद्दी, आणि सामान्य लोक या सर्वांनाच शिक्षणांत सुधारणा पाहिजे आहे. सर्वांचे ठिकाणीं एक प्रकारचा असंतोष आहे. या अस्वस्थतेंतून नवीन विचार व योजना यांचा जन्म होत आहे.

आज सामान्य पालकापासून तों विद्यापीठाच्या कुलगुरूपर्यंत सर्वांचेपुढें शिक्षणाचे अनेक प्रश्न उभे आहेत. कांहीं प्रश्न अगदीं सामान्य आणि व्यावहारिक आहेत, तर कांहीं तात्त्विक आणि धोरणाचे दृष्टीनें आत्यंतिक महत्त्वाचे आहेत. या प्रत्येक प्रश्नावर अनेकांना अनेक उत्तरें सुचतात. शाळेची वेळ कोणती असावी, घरीं शिकवणी ठेवावी कीं नाहीं, वर्गांत मुलें किती असावींत इत्यादि अगदीं साधे प्रश्न रोज आपल्यापुढें उभे राहतात. त्याचप्रमाणें औद्योगिक शिक्षणाला कोठें प्रारंभ करावा, बेकारीवर शैक्षणिक इलाज काय, हिंदी शिक्षणाचें ध्येय काय असावें, सरकारनें खर्चाची जबाबदारी किती घ्यावी व जनतेवर किती लादावी इत्यादि तात्त्विक व धोरणात्मक असेही अनेक प्रश्न शिक्षणतज्ज्ञ आणि अधिकारी यांचेपुढें वारंवार उपस्थित होतात.

या प्रत्येक प्रश्नाचा विचार करतांना स्वाभाविकपणेंच अशी कल्पना येते कीं, इतर देशांत हे प्रश्न कसे सोडविले जातात. इतर देशांचा अनुभव जमेस धरून, त्यांत आपल्या विचारांची भर घालून स्वतःची योजना करावी असें आपणांला वाटतें. आज राजकारण व समाजकारण या क्षेत्रांतील पाश्चिमात्य माहिती आपल्याकडे भरपूर आहे. परंतु शिक्षणाच्या क्षेत्रांत जगामध्यें गेल्या व चालू पिढींत झालेल्या घडामोडींची तितकीशी माहिती नाहीं. केवळ जिज्ञासा म्हणून नव्हे, तर आपले प्रश्न सोडविण्याकरितां

आवश्यक साधन, या दृष्टीनें पाश्चिमात्य शिक्षणाची हिंदी दृष्टीनें मिळविलेली माहिती असणें आवश्यक आहे.

आपले शैक्षणिक प्रश्न कांहीं अगदींच अलौकिक नाहींत. इतर राष्ट्रें ज्या अवस्थांमधून गेलीं त्यांतूनच आपणही जात आहों. फरक फक्त काळाचा आहे. त्यामुळें इतर देशांच्या व आपल्या शैक्षणिक परिस्थितींत अनेक दृष्टींनीं साम्य आढळून येतें. इतर देशांनीं आपले प्रश्न किती विविध मार्गांनीं सोडविले हें लक्षांत आलें म्हणजे आपल्या विचाराला चालना मिळून एकादा नवीन मार्ग सुचण्याचा संभव असतो. केवळ अंध अनुकरण करण्याकरितां पाश्चिमात्य शिक्षणाचा अभ्यास करावयाचा नाहीं. विचाराला चालना मिळण्याचे दृष्टीनें, व पूर्वअनुभवांचा फायदा घेण्याचे दृष्टीनें त्याचा उपयोग केला पाहिजे. जगांतील इतर देशांच्या अनुभवावर आपलाही हक्क आहे. आज उपलब्ध असलेले हे अनुभव जमेस न धरतां आंधळ्याप्रमाणें आपण चाललों तर पाश्चिमात्य चुकांचीच पुनरावृत्ति येथेंही होण्याचा संभव आहे. शैक्षणिक अनुभवाचा आपण उपयोग केला तर वेळ, श्रम, द्रव्य आणि मनुष्यबळ या दृष्टीनें काटकसर होईल.

वरील भूमिका मनांत ठेवून लेखकानें पाश्चिमात्य देशांत प्रवास व निवास करून तेथील शिक्षणपद्धतींचें प्रत्यक्ष निरीक्षण केलें. हें निरीक्षण करितांना त्याचा हिंदी शिक्षणाला बोध काय आहे याचा प्रत्येक ठिकाणीं विचार झालेला दिसून येईल. सारांश, या ग्रंथांतील पाश्चिमात्य शिक्षणाविषयींची चर्चात्मक माहिती हिंदी दृष्टीनें दिलेली आहे.

आपल्या शिक्षणाच्या पुनर्घटनेंत या माहितीचा उपयोग कसा करावयाचा हें प्रत्येकाच्या विचारसरणीवर व दृष्टीवर अवलंबून राहील. स्थूल रूपरेषा व सामान्य दिशा या ग्रंथानें सुचविलेली आहेच.

हिंदी शिक्षणाच्या दृष्टीनें व अलीकडील शैक्षणिक घडामोडींचे दृष्टीनें महत्त्वाच्या अशाच देशांची उपयुक्त व चर्चात्मक माहिती देण्याचा प्रयत्न केलेला आहे. राजकारणाच्या नव्या मन्वंत ज्यांचे हातीं शिक्षणाचीं सूत्रें येतील त्या सर्वांना हें लेखन मार्गदर्शक होईल असा विश्वास आहे.

पुणें, कार्तिक शु.॥ १, १८५८ गजानन श्री. खैर

# प्रस्तावना

पुणें अनाथ विद्यार्थी गृह येथील एक चालक डॉ. गजानन श्रीपत खैर ह्यांनीं लिहिलेलें "पाश्चिमात्य शिक्षणपद्धती" हें पुस्तक वाचण्याचा मला प्रसंग आला ह्याबद्दल आनंद वाटतो. शिक्षणाव्यतिरिक्त अनेक राजकीय व इतर घडामोडींत सतत गुरफटून गेलेल्या माझ्यासारख्या माणसास शिक्षणासंबंधीं इतकें उत्कृष्ट पुस्तक वाचण्याचा प्रसंग क्वचितच येतो; व या दृष्टीनें डॉ. खैर यांनीं मीं एक लहानशी प्रस्तावना या पुस्तकास अवश्य जोडावी असा जर आग्रह धरला नसता तर हें पुस्तक वाचून त्यांतील विधानांवर विचार करण्याची संधि मला मिळाली नसती; व म्हणूनच डॉ. खैर यांच्या या अभिनिवेशाबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

शिक्षणव्यवसाय सोडून मला जवळजवळ तीस वर्षें झालीं. इतक्या अवधींत इतर देशांत शिक्षणविषयक गोष्टींत पुष्कळच फरक झालेला आहे. अशा एखाद्या स्वतंत्र देशांत मी जन्मलों असतों तर डॉ. खैर यांच्या या आधुनिक पुस्तकास प्रस्तावना लिहिण्याचें धाडस मीं केलें नसतें. पण परावलंबी अशा हिंदुस्थान देशांत आपण सर्व वावरत आहों हें लक्षांत घेऊनच मी हें धाष्टर्य करीत आहें. ह्या तीस वर्षांत कदाचित् शाळांची फी वाढली असेल, शिक्षणक्रमांतील एकादें पुस्तक जाऊन त्या जागीं दुसरें आलें असेल, दादोबांचें व्याकरण जाऊन त्या जागीं रा. रा. भि. जोशी यांचें व्याकरण प्रचलित असेल, डॉ. भांडारकर यांची 'प्रवेशिका' जाऊन तिचें स्थान रा. गोळे किंवा त्याहूनहि अधिक नवीन अशा क्रमिक पुस्तकानें घेतलें असेल, बेकन व बर्क यांच्या जागीं दुसरे ग्रंथकार आले असतील, इतकेंच. पण इतक्या अवधींत आपल्या इकडल्या शिक्षणपद्धतींत एकादा क्रांतिकारक फरक झाल्याचें दिसून येत नाहीं. वास्तविक तीस वर्षें म्हणजे शिक्षणाच्या बाबतींत कोणत्याहि जिवंत देशाच्या इतिहासांत बराच मोठा काल गणला जाईल, व त्या अवधींत जर शिक्षणसंस्था सजीव व सतेज माणसांच्या हातांत असतील तर तितक्या कालांतच जनतेच्या शिक्षण-

विषयक आचारविचारांत युगांतर घडून आलें पाहिजे. पण असें होण्यास जी परिस्थिति लागते ती या देशांत उत्पन्न झाली नसल्यामुळें व कांहीं कालपर्यंत तरी उत्पन्न होण्याचा संभव नसल्यामुळें शिक्षणाची जलद उत्क्रांति होण्याचीं चिन्हें फार दूर आहेत.

शाळा म्हणजे कोंडवाडा ही स्थिति अजूनहि आहे. कदाचित् ह्या कोंडवाडयाच्या खिडक्या मोठया व शोभिवंत झाल्या असतील, मातीच्या जमिनी जाऊन त्या जागीं फरशी आली असेल, छप्पर सपाट नसून घुमटाच्या आकृतीचें झालें असेल, इतकेंच. पण ज्या मनःस्थितीनें "कोंडवाडयाचा राजवाडा" होईल अशी क्रांति शिक्षण देणाऱ्या व शिक्षण घेणाऱ्या माणसांत झाल्याचीं चिन्हें दिसत नाहींत. शिक्षणाच्या बाबतींत स्वायत्तता प्रांतिक दिवाणांच्या हातीं येऊन जवळजवळ पंधरा वर्षे झालीं. ह्या अवधींत लोकनियुक्त मन्त्र्यांच्या हातीं शिक्षणाचीं सूत्रें होतीं. निरनिराळया सामाजिक दर्जाचे, जातीचे व राजकीय पंथांचे शिक्षणमंत्री आपण पाहिले. बुद्धिमान्, स्वावलंबी व जात्यंधतेपासून अलिप्त अशीं कांहीं माणसें शिक्षणमंत्री होऊन गेलीं, व कांहीं त्यांच्या अगदीं उलट अशीही माणसें आपण पाहिलीं; पण ह्या सर्वांच्या अमदानींत 'कोंडवाडया' पासून 'राजवाडया' कडे फारशी प्रगति झाल्याचें दिसत नाहीं.

याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे राजकीय कारणामुळें व त्यामुळें झालेल्या इतर व्यवस्थेमुळें, लोकांची व तसेंच राज्यकर्त्यांची खऱ्या शिक्षणावर श्रद्धा नाहीं. हेंच खरें कारण, व तें आपण स्पष्टपणें कबूल केलें पाहिजे. अलीकडील राज्यशासनपद्धतींत शिक्षणमंत्र्यांच्या हातांत द्रव्य किंवा सत्ता नाहीं ही सबब निव्वळ खोटी ; व ती फक्त आपल्या मनाच्या समाधानासाठीं आपण खरी मानतों. तसेंच शिक्षणविषयक गोष्टींत शिक्षणमंत्री किंवा त्याचे अधिकारी अज्ञानी असतात असेंहि म्हणतां येणार नाहीं; कारण जगांतील सजीव राष्ट्रांत जे नवीन नवीन शिक्षणविषयक प्रयोग वेळोवेळीं होतात त्यासंबंधीं उपयुक्त पुस्तकें हिंदुस्थानांत सहज उपलब्ध होण्यासारखीं आहेत. बरें, हिंदुस्थानांतील मुलांची बुद्धि हीन दर्जाची आहे असेंहि म्हणतां येणार नाहीं. कारण हींच मुलें युरोपीय शिक्षणपरिस्थितींत गेलीं म्हणजे त्यांच्या बुद्धीस पैलू पडून, त्यांचें तेज झळकतें. तसेंच पैशाचे अभावीं

सार्वत्रिक प्रयोग जरी शक्य नसले तरी नियमित संस्थांत आणि नियमित प्रमाणांत असे प्रयोग करणें अशक्य नाहीं. पण असा एकादा अलौकिक, अद्‌भुत व क्रांतिकारक प्रयोग हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या प्रान्तांतील एकाद्या तेजस्वी शिक्षणमंत्र्यानें केलेला आपल्या ऐकिवांत नाहीं.

लॉर्ड मेकॉले ह्यानें जें ध्येय व रचना शिक्षणाच्या बाबतींत प्रचलित केली तिचा हेतु कांहीं असला तरी तिचा परिणाम जनतेवर व अधिकाऱ्यांवर असा झाला कीं, परकीयांचे ज्ञान नटून सजवून आमच्या देशांत कसें खपवावें व त्याप्रमाणेंच इंग्रज लोकांच्या राज्यशासनपद्धतींत अवश्य असणारे खालच्या दर्जाचे अधिकारी कसे उत्पन्न करावे हाच शिक्षणाचा मुख्य हेतु होऊन बसला. मेकॉलेनें म्हटल्याप्रमाणें आम्ही 'Interpreters' म्हणजे दुभाषी बनलों. अर्थात् मेकॉलेची याबद्दलची कल्पना फार वेगळी होती, पण ती कालांतरानें आम्हीं विसरलों व परकीयांचें ज्ञान जसेंच्या तसें आमच्या भाषेंत व व्यवहारांत कसें उतरवावें ह्या प्रश्नाकडेच आमचें लक्ष लागलें. परकीयांच्या ज्ञानाचे व संस्कृतीचे आम्ही फक्त पोषक किंवा अनुवादक बनलों व त्यामुळें परकीयांना आपला राज्यशकट हांकणें सोपें झालें. नियमित महत्त्वाकांक्षा व मानसिक परावलंबन हीं दोन चिन्हें मुख्यतेनें आमच्या शिक्षणक्रमांत दिसूं लागलीं. शिक्षणाचें काम सरकारचें, त्याचा लोकशाहीशीं कांहीं संबंध नाहीं, त्यांत धर्माचा संबंध नको अगर आपल्या प्राचीन संस्कृतीचाहि संबंध नको, फावड्यानें पैसा ओढण्याचें शिक्षण एक 'साधन'; व तें शक्य नसलें तरी नियमित पगारांत, छोटासा् संसार थाटण्याचें उत्तम साधन अशी कल्पना रूढ झाली. शिक्षण म्हणज व्यक्तिस्वातंत्र्याचा विकास करण्याचें मुख्य साधन, त्याचें ध्येय राष्ट्रनिष्ठा' त्याचें मुख्य क्षेत्र लोकशाही व त्याचें अंतिम साध्य पूर्ण स्वायत्तता ही शिक्षणाची खरी कल्पना नष्ट झाली, अशा प्रकारच्या शिक्षणावरून लोकांचा विश्वास उडाला व तो विश्वास परत आणणें हेंच आपल्या शिक्षणपद्धतीचें पुढील ध्येय असलें पाहिजे. हें ध्येय अगोदर लोकांच्या विचारांत आलें पाहिजे; त्याशिवाय वैयक्तिक प्रयत्नास यश येणें कठिण. शिक्षण म्हणजे सरकारचें मुख्य काम, ही कल्पना हिंदुस्थानच्या लोकांत रूढ व्हावयाला अनेक प्रकारची परिस्थिति कारण झाली. त्यापैकीं

सरकारचें राजकीय भीरुत्व व लोकांची परावलंबना हीं दोन मुख्य कारणें आहेत, हें कबूल करावें लागेल. राजकीय साशंकतेमुळें सरकारनें कित्येक वर्षेपर्यंत प्राथमिक, दुय्यम व वरिष्ठ शिक्षणक्रम आपल्या हातांत लोकांवर जरब बसवून ठेवला. तसेंच स्वतंत्र धंद्यांचा अभाव व वरिष्ठ दर्जाच्या जागांस मज्जाव, यामुळें जनतेला देखील गुजरणासाठीं सरकारी शिक्षण-पद्धतीवर अवलंबून राहावें लागलें. कांहीं विद्वान व स्वार्थत्यागी लोकांनीं या कचाटयांतून शिक्षणास सोडविण्याचा प्रयत्न केला; परंतु धंद्याच्या व चरितार्थाच्या बाबतींत इतर मार्ग मोकळे नसल्यानें त्या विद्वान लोकांचें कार्य हळूहळू स्वयंस्फूर्तीनें न वाढतां सरकारच्या शिक्षणपद्धतींतच गुरफटून गेलें. हा दोष त्या कार्यकर्त्यांचा नसून इंग्रजी अंमलाखाली निगडित झालेल्या राजकीय व सामाजिक व्यवस्थेचा आहे. ही व्यवस्था निदान राजकीय कारणांत तरी एकदम उलथून पाडणें शक्य दिसत नाहीं; कारण ह्या राज्यव्यवस्थेचीं पाळेंमुळें आपल्या जीवनक्रमांत फार खोल गेलेली आहेत. सरकारी शाळा व कॉलेजें ह्यांवर बहिष्कार घाला, हा महात्मा गांधींचा मंत्र पुष्कळ लोकांनीं मनांत पुटपुटला व जाहीर रीतीनें लोकांपुढें आक्रोश करून मांडला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. ह्याचें मुख्य कारण लोकांचा या मंत्रांतील बीजावर विश्वासच नव्हता. मंत्रांतील "ऋषि" गांधी ह्यांच्यावर शाब्दिक विश्वास खरा, पण मंत्रांतील बीजावर जनतेचा मुळींच विश्वास नव्हता. ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं ऱ्हः हे शब्द नसते म्हणून जशी सिद्धि मिळत नाहीं, तशी नुसत्या राजकीय शाळा काढून, मुलें व शिक्षक या दोघांच्याहि मनांत आमूलाग्र क्रांति झाल्याशिवाय या शाळा किंवा हीं कॉलेजें सफल होणें अशक्य आहे. जर कांहीं चमत्कारानें आधुनिक राजकीय परतंत्रता एकदम झुगारून देणें आपणांस शक्य झालें, तर त्या परायत्ततेंत गुंतून गेलेले शिक्षणासंबंधीं धागेदोरेहि तोडून टाकतां येतील. पण १९२० व १९३०-३१ च्या अनुभवानें आतां असें सिद्ध झालें आहे कीं आपली सध्यांची राजकीय परिस्थिति व त्यायोगें रूढ झालेली शिक्षणपद्धति सौम्य उपायांनीं एकदम झुगारून देणें शक्य नाहीं व म्हणूनच महात्मा गांधीं-सारख्या अधिकारयुक्त तपस्व्याचे प्रयत्न देखील जनतेचा विश्वास नसल्या-

कारणानें विफल झाले. म्हणूनच या बाबतींत विचारक्रान्ति करण्याचा मार्ग आपल्याला अन्यत्र शोधावा लागेल.

अशा प्रयत्नांत डॉ. खैर यांचें "पाश्चिमात्य शिक्षणपद्धती" हें पुस्तक फार उपयोगी पडणारें आहे. स्वतः गरीबींत व प्रिय मातोश्रींच्या प्रयत्नामुळें शिक्षण संपादून त्यांनीं गरीब जनतेच्या शिक्षणाचें खरें रहस्य ओळखलें व नंतर अमेरिकेसारख्या स्वतंत्र देशांत राहून आपला अनुभव व आपलें ज्ञान परिपक्व केलें. स्वतंत्र देशांतील शिक्षणपद्धति म्हणजे "सागरः सागरोपमः" या न्यायानें स्वातंत्र्य अनुभवणाऱ्या लोकांनाच योग्य व परिचित असते. इतर परिस्थितींतील लोकांस तिचा आस्वाद घ्यावयाचा असल्यास एक तर त्यांनीं आपलें राजकीय पारतंत्र्य झुगारून दिलें पाहिजे व तें शक्य नसल्यास ज्या कल्पनाहीनत्वामुळें परराष्ट्राची आयत्तता त्यांच्यावर टिकूं शकते, तें मानसिक दौर्बल्य फेंकून दिलें पाहिजे.

डॉ खैर यांच्या पुस्तकांत त्यांनीं आपला अनुभव फार स्पष्टपणें लोकांपुढें मांडला आहे. आधुनिक स्वतंत्र राष्ट्राची शिक्षणपद्धति कशी असते, तिची सामाजिक भूमिका व धोरण व तिच्या बडाशीं प्रच्छन्न असलेलीं राजकीय तत्त्वें यांची मीमांसा करणें हा डॉ. खैर यांच्या पुस्तकाचा मुख्य हेतु आहे. डॉ. खैरांनीं विशद केलेलीं शिक्षणविषयक तत्त्वें व ध्येयें अमलांत आणणें आज जरी हिंदुस्थानांत शक्य नसलें तरी त्या मार्गानें अधिकारी माणसांनीं थोडाबहुत प्रयत्न केल्यास हळूहळू शिक्षणाचे बाबतींत नवीन जागृति झालेली दिसून येईल. एका वर्षाच्या अवधींतच शिक्षणविषयक बाबतींत प्रान्तिक स्वातंत्र्य आपणांस मिळणार आहे असें म्हणतात. तसेंच शिक्षणमंत्र्याच्या पदावर कांहीं तेजस्वी, बुद्धिमान व देशाभिमानी लोक येण्याचा संभव आहे असेंही ऐकण्यांत येतें. डॉ. खैरांनीं चारशेंतीस पानांच्या लहानशा पुस्तकांत एकत्रित केलेलें ज्ञान व अनुभव अशा शिक्षणमंत्र्यांच्या अवलोकनांत आलें तर त्यांना डॉ. खैरांनीं केलेल्या सूचना अंशतः तरी "यावत्तैलं तावदाख्यानम्" या म्हणीप्रमाणें अमलांत आणतां येतील. मोठ्या परिश्रमानें डॉ. खैरांनीं उपयुक्त माहिती व आपला स्वतःचा अनुभव एकत्र करून तो पुस्तकरूपानें जनतेपुढें मांडला आहे. पुस्तक अतिशय उत्कृष्ट झालें आहे, व त्यांचे मननीय विचार स्वानुभवाच्या अमूल्य कोंदणांत बसविले गेले असल्यानें त्यांची प्रभा

फार वाढली आहे. ह्या प्रभेच्या साहाय्यानें हिंदी जनतेच्या व अधिकाऱ्यांच्या पुढील मार्गावर थोडाबहुत उजेड पडेल अशी त्यांना उमेद आहे. तसें झालें तर डॉ. खैरांचा प्रयत्न सफल झाला असें म्हणतां येईल. तो तसा सफल होईल अशी मला आशा वाटते. निदान त्यांच्या या प्रयत्नाबद्दल मी त्यांचें मन.पूर्वक अभिनंदन करतों.

पुस्तक लोकादरास पात्र होईल ह्याबद्दल मला बिलकूल संदेह वाटत नाहीं; पण तें तसेंच लोकाश्रयासहि पात्र होईल अशी आशा आहे.

'आश्रम' मलबार हिल,
मुंबई
१७-१-१९३७

मुकुन्द रा. जयकर

# पाश्चिमात्य शिक्षणपद्धती

## विभाग पहिला

## अमेरिका—लोकशाहींतील शिक्षणपद्धति

### प्रकरण पहिलें

### सामाजिक भूमिका व धोरण

**शाळा म्हणजे राजवाडा!**

'शाळा म्हणजे कोंडवाडा' अशी जुनी व्याख्या होती पण अमेरिकेंत 'शाळा म्हणजे राजवाडा' अशी आज स्थिति आहे. न्यूयॉर्कपासून दोन अडीचशें मैलांवर अंदाजें एक लाख वस्तीचें एक शहर आहे. तेथील शाळेची इमारत पाहिल्याबरोबर आपल्याकडील एकाद्या राजवाड्याची आठवण कोणालाही होईल अशी ती आहे. अमेरिकन शाळेंत साहित्यसामुग्री भरपूर असते. बाहेर पाऊस व बर्फ पडत असला तरी मुलांना इमारतींतही खेळतां येईल अशा प्रकारच्या मोठ्या व्यायामशाळा; वातावरणांत पाणी गोठण्यासारखी थंडी असली तरी प्रत्येक वर्गांत गरम हवा राहील अशी सर्वत्र योजना; साठ पाऊणशें विद्यार्थ्यांना एकदम पोहण्याचा व्यायाम घेतां येईल अशा प्रकारचे इमारतींतच असलेले शुद्ध व कोमट पाण्याचे तलाव; व्यायामानंतर स्नान करण्याकरितां गरम व गार पाण्याचे फवारे (शॉवर्स); मधल्या वेळीं मुलांच्या भोजनाकरितां शास्त्रोक्त व स्वच्छ आहार देणारें शाळेचें उपाहारगृह; उत्कृष्ट प्रयोगशाळा, मुक्तद्वार ग्रंथसंग्रह, भव्य सभागृह,

रंगभूमि आणि चित्रकलागृह यांची योजना; शुद्ध हवा व प्रकाश असलेल्या वर्गाच्या जागा; चित्रानें सुशोभित केलेल्या भिंती; किल्ली दाबल्याबरोबर उडणारीं पिण्याच्या थंड पाण्याचीं लहान कारंजीं; औद्योगिक शिक्षणाकरितां विविध कारखाने; या सर्व सोयी पाहिल्यानंतर कोणाला हेवा वाटणार नाही? पुन: लहान होऊन शाळेंत जाऊन शिकावें असेंच प्रत्येकाला वाटेल.

## शिक्षणावर पूर्ण श्रद्धा

वर वर्णन केलेलें चित्र एकाच शाळेचें नाहीं. अशा हजारो शाळा देशांत सर्वत्र पसरलेल्या आहेत. मूठभर श्रीमंत लोकांनीं आपल्या लाडक्या मलांकरितां त्या बांधलेल्या नसून गांवकऱ्यांनी गरीब व श्रीमंत अशा सर्वांच्याच मुलांकरितां बांधलेल्या आहेत. या शाळेंत जाणाऱ्या मुलांना पुस्तके देखील शाळेकडून पुरविली जातात ही गोष्ट विशेष आहे ! या सर्व सोयी करण्याकरितां अमेरिकेनें आपल्या शिक्षणावर पाण्यासारखा पैसा खर्च केला आहे. रशियाखेरीज इतर कोणत्याही राष्ट्रानें शिक्षणाचे बाबतींत इतका उदारपणा दाखविलेला नाहीं.

याचें कारण असें आहे कीं, अमेरिकन लोकांचा शिक्षणावर एक प्रकारचा अंधविश्वास आहे. समाजानें शक्य तितका पैसा शिक्षणावर खर्च केला पाहिजे, त्याचा मोबदला सुसंस्कृत नागरिकांचे स्वरूपांत मिळेल ; प्रत्येक व्यक्तीला तिच्या मगदुराप्रमाणें जास्तींत जास्त शिक्षण घेण्याची सोय केली पाहिजे ; व्यक्तीचा फायदा तोच समाजाचा फायदा; अशा प्रकारची लोकांची विचारसरणी आहे. आपल्या स्वत:च्या गांवांतील, तालुक्यांतील व जिल्ह्यांतील शिक्षणसोयी इतरांच्यापेक्षां अधिक उत्कृष्ट झाल्या पाहिजेत अशी सात्त्विक स्पर्धा समाजांत असलेली सर्वत्र दिसून येते. कंजूषपणा नाहीं ; शिक्षणाकडे तुच्छतेनें पाहण्याची दृष्टि नाहीं ; यामुळें देशांत शिक्षणाची अमर्याद वाढ झालेली आहे. राष्ट्र या दृष्टीनें अमेरिकेला जगांत वरचा दर्जा प्राप्त करून देण्याचें श्रेय समाजांतील या शिक्षणप्रेमाला आहे.

## लोकांनींच पुढाकार घेतला

एक गोष्ट विशेष लक्षांत ठेविली पाहिजे कीं अमेरिकेंतील ही सारी शिक्षणवाढ सरकारनें लोकांवर लादून केलेली नाहीं. समाजानें आपणहून

स्वप्रयत्नानें ती केलेली आहे. आपल्या देशांत शिक्षणाच्या गंगा सर्वत्र मुक्त-प्रवाह पसराव्यात अशी इच्छा प्रथम जनतेच्या मनांत उत्पन्न झाली. समाजांत पुढारी निर्माण झाले, त्यांनीं लोकांना सार्वत्रिक शिक्षणाचें महत्त्व पटवून दिलें. त्यामुळें लोकांनीं स्वतः आपापल्या संघटना केल्या ; विचारविनिमय केले ; कायदे करून घेतले ; स्वतःवर स्वतःच शिक्षण लादून घेतलें. सर्वसामान्य जनतेंत शिक्षणाबद्दल आस्था व जागृति उत्पन्न झालेली असल्यामुळें या शिक्षणप्रसाराला मदत झाली. शिक्षण कशा प्रकारचें पाहिजे याचा प्रथमपासूनच समाजानें विचार केल्यामुळें त्याचा विस्तार समाजाला पोषक झाला, मारक झाला नाहीं. हिंदुस्थानांत अशी स्थिति आहे कीं बहुजन समाजाला शिक्षणाविषयीं अनास्था व उदासीनता वाटते. आणि त्यांतूनही सक्ति करून त्यांच्यावर जें शिक्षण लादावें तें समाजपोषक न होतां समाजशोषक होतें. दोन देशांतील हा विरोध लक्षांत घेण्यासारखा आहे. हा विरोध नाहींसा करावयाचा असेल तर दोन गोष्टी करणें आवश्यक आहे. शिक्षणतज्ञांनीं समाजाला पोषक असा शिक्षणक्रम आंखला पाहिजे. त्याचबरोबर बहुजन समाजांत शिक्षणाविषयीं आस्था उत्पन्न करून त्यालाही विचार करावयास लावणें जरूर आहे. आस्थेशिवाय सक्तीचा उपयोग होणार नाहीं.

अमेरिकन लोकांचें शिक्षणप्रेम शाब्दिक व तात्त्विक नव्हतें. त्याकरितां त्यांनीं झीज सोसली, द्रव्य खर्च केलें; स्वतःवर कर लादून घेतले. पांढरपेशा समाजांतील गरीब कुटुंब पोटाला चिमटा घेऊनही मुलांचें शिक्षण करतें त्याप्रमाणें अमेरिकेनें केलें. देशांतील गरीब व श्रीमंत सर्व लोकांच्या मुलांना शिक्षण मिळावें, आर्थिक स्थिति कोणाच्याही शिक्षणाचे मार्गांत येऊं नये याकरितां सर्व शिक्षण क्रमाक्रमानें मोफत केलें गेलें. आज त्या देशांत प्राथमिक शिक्षणच काय, पण दुय्यम व कॉलेजशिक्षण हें देखील सर्वत्रांना मोफत आहे ! या सर्व शिक्षणाचा खर्च भागण्याकरितां स्वतःवर कर लादून घेण्याची तयारी जनतेनें दाखविली. अमेरिकेंत शिक्षणाकरितां स्वतंत्र कर जमा केला जातो. स्वतःचीं मुलें शिक्षण घेणारीं नसलीं तरी हा कर प्रत्येक नागरिकाला द्यावा लागतो.

## शिक्षणाचें काम सरकारचें

शिक्षणदानाचें कर्तव्य सरकारचें कीं जनतेचें हा प्रश्न प्रत्येक देशांत उपस्थित होतो. या बाबतींत अमेरिका व इंग्लंड या देशांचीं धोरणें अगदीं विरोधी आहेत. अमेरिकेनें आपल्या देशाचा व समाजाचा विचार करून असें ठरविलें की, सार्वत्रिक शिक्षणदान हें सरकारचें कर्तव्य आहे. इंग्लंडचें प्रथमपासूनच धोरण असें कीं शिक्षणाची व्यवस्था प्रत्येक व्यक्तीनें व समाजानें आपापली करावी. अगदीं आवश्यक तेवढ्याच गोष्टी सरकार करील. आपण इंग्लंडच्या तत्त्वानें चालल्यामुळें आपली शिक्षणप्रगति फार थोडी झाली. उलट फिलिपाईन्स् देशांतील समाज अमेरिकन तत्त्वाप्रमाणें वागल्यामुळें त्याची शैक्षणिक प्रगति झपाट्यानें झाली. आज तो स्वातंत्र्याच्या मार्गाला लागलेला आहे. इंग्लंड व हिंदुस्थान यांमधील शिक्षणाची वाढ यदृच्छेनें झालेली आहे. अमेरिकेंतील शिक्षणवाढ लोकनियुक्त सरकारच्या कर्तव्यबुद्धीमुळें व नियंत्रणामुळें झालेली आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला सुशिक्षित व सुसंस्कृत होण्याची पूर्ण संधि सरकारनें दिली पाहिजे, शिक्षणाच्या सर्व सोयी कराच्या पैशांतून सरकारनें केल्या पाहिजेत, हें तत्त्व अमेरिकेंत मान्य झालेलें आहे. त्यामुळें थोड्या अवधींत शिक्षणाचा अफाट विस्तार झालेला दिसून येतो. ज्या ज्या देशांत शिक्षणाचें काम सरकारनें (State) आपल्या शिरावर घेतलें त्या त्या देशांत शिक्षणाची व समाजाची प्रगति झपाट्यानें झालेली आहे. ज्या देशांत ही बाब यदृच्छेवर सोंपवून दिलेली आहे तेथें बहुजनसमाजाच्या शिक्षणाची हेळसांड होऊन तो समाज मागें राहिलेला आहे.

## राज्यक्रांतीबरोबर शिक्षणक्रांति

समाजांत ज्या वेळीं राजकीय किंवा सामाजिक क्रांति होते त्या वेळीं शिक्षणांतही क्रांति होते. नवीन राजवटीला अनुरूप अशी शिक्षणपद्धति स्थापन करणें जरूर असतें. अमेरिकेच्या इतिहासांत हीच गोष्ट घडून आली. अगदीं अलीकडे रशिया, जर्मनी व इटली या देशांतही राज्यक्रांतीनंतर अशीच शिक्षणक्रांति घडून आली. इंग्लंडमधील लोक प्रथम अमेरिकेंत आले व त्यांनीं तेथें वसाहतीस प्रारंभ केला. या लोकांनीं आपल्याबरोबर मातृ-भूमींतील चालीरीती, परंपरा व समाजसंस्था यांच्याच समवेत जुनी शिक्षण-

पद्धतीही अमेरिकेंत आणली. ती तेथें कांहीं काळ वाढीसही लागली. परंतु इंग्लंड आणि तिची वसाहत अमेरिका यांच्या हितसंबंधांत विरोध उत्पन्न होऊन अमेरिकेनें इंग्लंडविरुद्ध बंड पुकारून राज्यक्रांति केली व स्वतंत्र राज्य-पद्धति स्थापन करून इंग्लंडचें वर्चस्व झुगारून दिलें. इंग्लंडच्या गुलामगिरी-बरोबरच इंग्लिश विचार व परंपरा यांचाही अमेरिकेनें त्याग केला. राजकीय, सामाजिक आणि शैक्षणिक क्षेत्रांत स्वतःचें नवें ध्येय, नवीन धोरण व नवीन विचार प्रस्थापित करण्यास अमेरिकेनें प्रारंभ केला. राजकीय क्रांतीबरोबर विचारांचीही क्रांति झाली. त्यामुळें इंग्लंड व अमेरिका यांच्या शिक्षण-पद्धतींचा मूळ उगम जरी एकच असला तरी ध्येयभेदामुळें आज दोन्ही देशांच्या शिक्षणामध्यें फार मोठा फरक पडलेला आहे.

## शिक्षण असलें तर लोकशाही

इंग्लिश राजाच्या जुलमाला कंटाळलेल्या अमेरिकेनें असें ठरविलें कीं आपल्या देशांत एकतंत्री राजसत्ता कोणत्याच स्वरूपांत नसावी. सर्व राजकीय सत्ता जनतेच्या हातांत ठेवून पूर्ण लोकशाही व लोकसत्ताक राज्य-पद्धति निर्माण करावी. सर्व समाजाचा कारभार लोकांच्या तंत्रानें लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्या मार्फत चालला पाहिजे. परंतु अशा रीतीनें लोकांच्या हातांत राजकीय सत्ता देतांना त्याचबरोबर त्यांना शिक्षणही दिलें पाहिजे हा लोकशाहीतत्त्वाचा उपसिद्धांतही अमेरिकन पुढाऱ्यांनीं त्वरित ओळखला. अज्ञानी व अशिक्षित जनतेला शिक्षण नसलें तर स्वार्थी व धूर्त पुढारी तेव्हांच फसवितील. निरक्षर लोकांच्या हातांत सत्ता आली तरी या सत्तेचा उपयोग स्वतःचे व समाजाचे हिताकडे त्यांना करून घेतां येणार नाहीं. राजकीय सत्ता आणि शिक्षण यांची सांगड घातली तरच सत्तेचा उपयोग लोकांना होईल. लोकशाहीला शिक्षणाचें अधिष्ठान पाहिजे. अशा प्रकारची विचारसरणी अमेरिकेंत दोन शतकांपूर्वीं प्रसृत झाली, त्यामुळें आज शिक्षणाची इतकी वाढ झालेली आहे. हिंदुस्थानांत लोकशाही पद्ध-तीचा अवलंब केला जात आहे. अशा स्थितींत जनतेमध्यें शिक्षणाचा प्रसार झाला नाहीं तर लोकशाहीच्या नांवाखालीं अज्ञानी निरक्षर जनतेला स्वार्थी पुढारी फसवतील. खरे लोकहितदक्ष पुढारी निवडून देण्याची विवेचक

बुद्धि सामान्य मतदारवर्गांत राहणार नाहीं ; आणि त्यामुळें लोकशाहीच्या नांवाखालीं जनतेला कितीही राजकीय सत्ता दिली तरी शिक्षणाचे अभावीं तिचा उपयोग होणार नाहीं. समाजाला पुष्कळ शिक्षण देऊनही लोकशाहीचा प्रयोग पूर्णपणें यशस्वी होत नाहीं असें पाश्चात्य देशांनाही वाटूं लागलें आहे. यावरून निरक्षर समाजांत लोकशाहीचा प्रयोग किती जपून आणि सावधगिरीनें केला पाहिजे याची कल्पना येईल. लोकशाहीला शिक्षणाची जोड असल्याशिवाय ती यशस्वी होणार नाहीं, म्हणून अमेरिकेनें शिक्षणाचा प्रसार केला.

## प्रत्येकाला संधि द्या

इंग्लंडपासून फुटून निघाल्यानंतर अमेरिकेनें दुसरेंही एक तत्त्व स्वीकारलें. आपल्या समाजांत प्रत्येक व्यक्तीला पुढें येण्याची संधि दिली पाहिजे. श्रीमंत सरदार अमीर उमराव या लोकांनीं नेहमीं समाजांत पुढें यावें व गरीबांनीं कर्तबगारी असूनही मागें राहावें हें जुनें तत्त्व तरुण अमेरिकन लोकांना मान्य नव्हतें, कारण स्वातंत्र्याचा झगडा लढण्यांत सर्व प्रकारच्या लोकांनीं भाग घेतलेला होता. प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं उच्च पदवीला पोंचण्याची पात्रता आहे. सर्वांना सारखीच संधि मिळाली तर सामान्य व्यक्तीलाही समाजांत पुढें येतां येईल. समाजांतील कृत्रिम बंधनें नाहींशीं करून सर्वांना उच्च दर्जाला पोंचण्याची संधि दिली तर प्रत्येक व्यक्ति पुढें येऊं शकेल. याकरितां जन्म, जातगोत, धंदा, इत्यादि क्षुल्लक उपाधींकडे न पाहतां व्यक्तीच्या कर्तबगारीप्रमाणें व गुणांप्रमाणें तिला समाजांत वरचें स्थान मिळवितां यावें. अशा स्वरूपाचा सामाजिक वेदांत अमेरिकेनें रूढ केला. याला Equality of Opportunity 'संधिस्वातंत्र्य' असें ते म्हणूं लागले. समाजांतील व्यक्तींना कृत्रिम बंधनांतून सुटून पुढें येण्याचें मुख्य साधन म्हणजे शिक्षण हें आहे. तें आतापर्यंत केवळ श्रीमंत व पांढरपेशा वर्गाचे हातांमध्यें होतें. इंग्लंड, फरान्स, जर्मनी इत्यादि देशांत या वेळीं शिक्षणाचे बाबतींत जातिभेद होता. गरिबांकरितां व श्रीमंतांकरितां शिक्षण निराळें होतें. गरिबांना उच्च शिक्षण घेण्याची संधि नव्हती. त्यामुळें समाजांतील खालच्या थरांतील व्यक्तीला वरच्या थरांत जाण्याला सुलभ

असें साधन नव्हतें. सामाजिक जीवनांत व्यक्तीला पूर्ण संधि मिळावी म्हणून अमेरिकेनें शिक्षणांतील जातिभेद काढून टाकला आणि तें सर्वांचे आटोक्यांत आणलें. तिनें गरीब आणि श्रीमंत सर्वांनाच शिक्षणाचें मुक्तद्वार घातलें ! जगांत कोणत्याही राष्ट्रानें न केलेली गोष्ट आधीं अमेरिकेनें केली. तिनें बालवर्गापासून कॉलेजपर्यंतचें सर्व शिक्षण सर्वांना मोफत करून टाकलें ! आपल्या गरिबीमुळें किंवा हीन धंद्यामुळें शिक्षण घेऊन समाजांत पुढें येतां आलें नाहीं अशी सबब कोणालाही राहिली नाहीं. समाजांतील वाटेल त्या व्यक्तीनें आपली शिक्षणानें उन्नति करून घेऊन अमेरिकेचा प्रेसिडेंट होण्याचीही महत्त्वाकांक्षा ठेवावी अशी परंपरा देशांत पडली. अमेरिकेच्या शिक्षणाचें व उत्कर्षाचें रहस्य कळण्याकरितां तिच्या या दोन तत्त्वांचें मर्म समजून घेतलें पाहिजे. लोकशाही आणि संधिस्वातंत्र्य या दोन व्यापक तत्त्वांचे जोरावर आज अमेरिकन शिक्षणाचा इतका व्याप वाढला आहे.

## विषमतेवर तोडगा

हिंदुस्थान हा सामाजिक विषमतेचा देश आहे. यांत अनेक समाजवर्ग असे आहेत कीं समाजांत पुढें येण्याची संधि न मिळाल्यामुळें त्यांचे ठिकाणीं असमाधान उत्पन्न झालेलें आहे. तें नाहींसें करून खालच्या वर्गांतील व्यक्तींनाही समाजांत पुढें आणावयाचें असेल तर शिक्षणाचे बाबतींत तरी हें संधिस्वातंत्र्याचें तत्त्व मान्य करणें भाग आहे. समाजानें थोडा त्याग करून शिक्षणक्षेत्रांत सर्व समाजवर्गांना मुक्तद्वार व संधिस्वातंत्र्य ठेविलें तर समाजाच्या खालच्या थरांतील व्यक्तीनाही वर येण्याची संधि मिळेल व त्या योगानें समाजरचनेंतील विषमतेमुळें उत्पन्न होणारें असमाधान नाहींसें होईल.

## राष्ट्रनिष्ठेचें शिक्षण पाहिजे

शिक्षणाचा उपयोग आपल्या राजकीय व सामाजिक ध्येयाकडे कसा करून घ्यावा ही गोष्ट हिंदुस्थाननें अमेरिकेपासून घेण्यासारखी आहे. येथें अठरापगड जाती, अनेक धर्म, अनेक भाषा व अनेक संस्कृती हा प्रश्न आहे, तशीच अमेरिकेचीही स्थिति होती आणि आहे. अमेरिकन समाजपुरुष हा अनेक राष्ट्रांतील व धर्मांतील व्यक्तींच्या समुच्चयानें बनलेला आहे. इंग्लिश, आयरिश, जर्मन, इटालियन, रशियचिन, नी, जपानी इत्यादि भिन्न

राष्ट्रीय परंपरांचे लोक तेथें आहेत. प्रॉटेस्टंट, कॅथॉलिक, ज्यू इत्यादि अनेक धर्मपंथांचे नागरिक तेथें आहेत. नॉर्डिक, स्लाव्ह, सेमिटिक इत्यादि भिन्न मानववंशांचे लोक या समाजांत समाविष्ट झालेले आहेत. कांहीं लोकांच्या अनेक पिढ्या या देशांत गेल्या आहेत तर कांहीं नुकतेच येऊन रहिवासी व नागरिक झालेले आहेत. या सर्व लोकांना अमेरिकानिष्ठ बनविण्याचें कार्य शिक्षणाचें आहे. पूर्वीचा देश व पूर्वीच्या परंपरा यांविषयीं वाटत असलेली निष्ठा अमेरिकेकडे वळविण्याचें मोठें कार्य शिक्षणाकडे सोंपविलेलें आहे. धर्म, जाति, संस्कृति, इत्यादि अनेक विरोधी निष्ठा एका देशनिष्ठे-मध्यें बुडवून कशा टाकाव्यात हा जो हिंदुस्थानचा आजचा प्रश्न तोच कांहीं अंशीं अमेरिकेचा होता. तो सोडविण्याकरितां तिनें शिक्षणाचा चांगला उपयोग करून घेतला. समाजांतील प्रत्येक व्यक्तीवर असे संस्कार झाले पाहिजेत कीं, ‘आपण आतां या देशाचे झालों ; या देशाकरितां जगलें पाहिजे, मेलें पाहिजे ; या देशाचा अभिमान धरला पाहिजे ; या देशांतील बहुजन समाजाचें जें हित तें माझें हित ; या देशाचें जें राजकीय ध्येय तेंच माझें ध्येय ; मी आतां या देशाचा देशनिष्ठ नागरिक आहें.’ अशा स्वरूपाचे संस्कार प्रत्येक व्यक्तीवर करावयाचे झाल्यास ती गोष्ट शाळेमधूनच झाली पाहिजे. समाजांतील विविध वर्गामध्यें देशनिष्ठा उत्पन्न करण्याचें काम अमेरिकेनें आपल्या शिक्षणाकडे दिलेलें आहे. हिंदुस्थाननेंही आपल्या शिक्षणाचा उपयोग विविध समाजवर्गांत देशनिष्ठा उत्पन्न करण्याचे दृष्टीनें करून घेतला पाहिजे. तसें न झाल्यास अनेक पिढ्या गेल्या तरी हिंदुस्थानचे राजकीय प्रश्न सुटणें शक्य दिसत नाहीं. राष्ट्रनिष्ठाशिक्षणाचें एक साधन म्हणून कशा प्रकारचें काव्य मुलांच्या पाठांतरांत आणिलें जातें त्याचा नमुना पुढें दिला आहे. न्यूयॉर्कमधील एका प्रसिद्ध हायस्कूलमध्यें हें राष्ट्रगीत आवश्यक पाठांतरांत आहे.

My Country, 'tis of thee,
Sweet land of liberty
Of thee I sing.
Land where my fathers died!
Land of the pilgrim's pride!

From every mountain side
Let freedom ring!
My native country, thee,
Land of the noble free,
Thy name I love
* * *
Our father's God, to thee,
Author of liberty,
To thee we sing!
Long may our land be bright
With freedom's holy light.
* * *

## शाळेंत धर्म नको

अमेरिकेंतील समाज अनेक धर्मपंथांचा असल्यामुळें राजकारण आणि धर्म यांची तेथें फारकत केलेली आहे. धर्म ही व्यक्तीची बाब आहे. ती राजकारणांत येऊं नये व राजकारणानेंही धर्मांत हात घालूं नये असें तत्त्व आहे. शिक्षण ही सरकारी जबाबदारीची बाब असल्यामुळें स्वाभाविकच शिक्षण व धर्म यांचीही फारकत केलेली आहे. सार्वजनिक शाळांतून विशिष्ट प्रकारचें धर्मशिक्षण देण्याची मनाई आहे. विशिष्ट धर्मपंथांच्या लोकांनीं स्वत: चालविलेल्या खाजगी शाळांतून वाटेल तें धर्मशिक्षण द्यावें. एकाच धर्मपंथाचीं मुलें शाळेंत असतील तर तेथें फक्त बायबल वाचण्याची परवानगी असते. त्यावर भाष्य करण्याची मनाई आहे. सारांश, धार्मिक कलहाचे व मतभेदाचे प्रसंगच येणार नाहींत अशा प्रकारचें शैक्षणिक धोरण अमेरिकेनें ठेविलेलें आहे.

## काळाप्रमाणें शिक्षणही बदलतें

इंग्लंड, जर्मनी, फरान्स, हिंदुस्थान इत्यादि देशांप्रमाणें अनेक शतकांपूर्वीं स्थापन झालेल्या शिक्षणसंस्था किंवा विश्वविद्यालयें अमेरिकेला नाहींत. अनेक शतकांची शैक्षणिक व सांस्कृतिक परंपरा त्या देशाला नाहीं. परंतु

असें असलें तरी अमेरिकन शिक्षणांत एक प्रकारचा जिवंतपणा आहे. याचें कारण सामाजिक तत्त्वांचें प्रतिबिंब देशाच्या शिक्षणांत पडलें आहे हें आहे. शिक्षण आणि समाजाच्या गरजा यांत फारकत झालेली नाहीं. समाजाच्या गरजा जसजशा बदलतात व वाढतात तसतसा शिक्षणांतही विकास होत जातो. अमेरिकन शिक्षणांत एकसारखी घडामोड चालू असते. आपल्या विवक्षित परिस्थितीला अनुरूप असें शिक्षण कसें देतां येईल असा विचार शिक्षण पुढाऱ्यांच्या मनांत एकसारखा चालूं असतो. त्यामुळें अमेरिकन व युरोपियन शिक्षणपद्धतीत फरक वाटतो. पहिली काळाबरोबर चालते, दुसरी काळाचे मागून चालते. अवघ्या तीनशें वर्षांचा नवा देश, नवा समाज व नवीन संस्कृति असतां अमेरिकेनें शिक्षणाचे साहाय्यानें सामाजिक, राजकीय व औद्योगिक प्रगति कशी केली तिचें निरीक्षण हिंदुस्थाननें काळजीपूर्वक करावें व जगाचा अनुभव जमेस धरून आपला कार्यक्रम आंखावा.

---

प्रकरण दुसरें

# शिक्षणपद्धतीची रूपरेषा

## शिक्षणाचें मुक्तद्वार

द्रव्याचे अभावीं पूर्ववयांत शिक्षण घेतां आलें नाहीं म्हणून उत्तरवयांत तळमळणाऱ्या कितीतरी व्यक्ती आपल्या समाजांत दिसतात! यांपैकीं कोणी रात्रीच्या शाळांतून किंवा कोणी खाजगी रीतीनें शिकून आपली शिक्षणाची महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्याचा प्रयत्न करितात. अशा लोकांकरितां अमेरिकेंत शिक्षणाच्या नाना प्रकारच्या सोयी आहेत. शिक्षण घेण्याची इच्छा मात्र पाहिजे. त्या देशांत इतर देशांप्रमाणें दिवसाच्या प्राथमिक, माध्यमिक व उच्च शिक्षणाच्या संस्था आहेतच. त्याशिवाय याच प्रकारचें

शिक्षण रात्रीं घेण्याच्याही सोयी आहेत. आपला नोकरी-धंदा करून हायस्कूल व कॉलेजचें शिक्षण घ्यावयाचें असेल तर रात्रीं नऊदहा वाजेपर्यंत शिक्षण देणाऱ्या संस्था असतात. यांत बौद्धिक शिक्षणाप्रमाणेंच औद्योगिक शिक्षण देणाऱ्याही संस्था आहेत. चित्रकला, एंजिनिअरिंग, व्यापार, विविध धंदे, इत्यादि विषयांचें शिक्षण रात्रींच्या शाळा–कॉलेजांतून दिलें जातें. त्यामुळें शहरांतील नोकरी–धंदा करणारांची सोय झाली आहे. पण या सोयींचा फायदा खेड्यांतील व लहान गांवांतील लोकांना कसा मिळणार? त्यांचे-करितां उन्हाळ्याचे सुटीमध्यें वरील सर्व प्रकारचे अभ्यासक्रम शिकविणाऱ्या संस्था असतात. न्यूयॉर्कसारख्या शहरांत उन्हाळ्याचे सुटींत हजारो स्त्री-पुरुष येऊन आपल्या उत्तरवयांतही विविध शिक्षण घेत असतात. कांहीं कॉलेजमधून तर केस पांढरे झाले आहेत व तोंडावर सुरकुत्या पडल्या आहेत अशीं वृद्ध जोडपीं देखील वर्गांत बसून शिकत असतांना दिसून येतात! ज्या लोकांना सुटीमध्यें शहरांत येऊन शिकतां येत नाहीं त्यांचेकरितां टपालानें अभ्यासक्रम पाठवून शिकविणाऱ्या संस्था (Correspondence Schools) आहेत. या पद्धतीचा मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जातो. कांहीं ठिकाणीं विद्याखात्यांनीं देखील या पद्धतीचा उपयोग करून घेतलेला आहे. ज्यांना लागोपाठ वर्ष दोन वर्षे कॉलेजमध्यें राहून शिक्षण घेतां येत नाहीं त्यांनीं दरवर्षी थोडथोडे अभ्यासक्रम पुरे केले तरी तीनचार वर्षांनीं त्यांना पदवी मिळवितां येते. ज्यांना घर न सोडतां व वाचन वगैरे न करतां शिकावयाचें असेल त्यांना रेडिओवरून निरनिराळे अभ्यासक्रम शिकतां येतात. अर्थात् या मार्गानें पदवी वगैरे मिळत नाहीं, पण माणसाचें ज्ञान वाढतें. राज-कारण, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, वाङ्मय, संगीतकला, मानसशास्त्र इत्यादि विविध विषयांवरील व्याख्यानें ठराविक वेळापत्रकाप्रमाणें रेडियोवर दिलीं जातात. ज्यांना अधिक वाचन करावयाचें असेल त्यांना संदर्भग्रंथांची यादीही पुरविली जाते. सारांश रात्रीच्या, दिवसाच्या, सुटीमध्यें, पत्र-व्यवहारानें, रेडियोवर इत्यादि अनेक मार्गांनीं शिक्षण देणाऱ्या संस्था अमेरिकेंत आहेत. इतकेंच काय पण बोटीवर प्रवास करतां करतां शिक्षण देणारें कॉलेजही न्यूयॉर्क विद्यापीठानें काढलेलें आहे. जगांत प्रवास करीत निरनिराळे देश, समाज व संस्कृती पाहाव्यात आणि त्याचबरोबर

समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राजकारण, इतिहास, भूगोल, ललितवाङ्मय व कला यांचा अभ्यास करावा अशी सोय या तरत्या महाविद्यालयांत केलेली असते.

## व्यक्तिविकासाला पूर्ण संधि

या सर्व सोयींच्या मुळाशीं एक तत्त्व आहे—प्रत्येक व्यक्तीला आपला यथाशक्य उत्कर्ष करून घेण्याची संधि असावी. शिक्षणाचे अभावीं आपली बौद्धिक उन्नति करून घेतां आली नाहीं अशी परिस्थिति समाजांत कोणाही व्यक्तीला राहूं नये. शिक्षण घेणारांना उत्तेजन देणें हा विद्यापीठांचा उद्देश असतो. कृत्रिम साधनांनीं लोक उच्च शिक्षणापासून पराङ्मुख कसे करावेत असा उलटा विचार कोणाच्या मनांत येत नाहीं. विद्यापीठाचा प्रयत्न केवळ पदवी घेणाऱ्या विद्यार्थ्यांकरितांच असतो असें नाहीं. आपल्या विद्येच्य क्षेत्रांत पदवी न घेणारेही अनेक लोक आणण्याची विद्यापीठांची पराकाष्ठा चालू असते. कॉलेजच्या इमारती रात्री दहा वाजेपर्यंत उघड्या असतात व वर्ग चालू असतात. हायस्कूल व कॉलेजमध्यें विषयांची विविधता पुष्कळ असते. त्यामुळें अमुक विषय येत नाहीं म्हणून शिक्षण सोडून द्यावें लागलें असा प्रसंग कोणावर येत नाही. ज्याला जी आवड असते त्या विषयाचें शिक्षण घेतां येतें. सारांश शिक्षणावरील कृत्रिम बंधनें काढून तें प्रत्येक व्यक्तीचे आटोक्यांत येईल, अशी व्यवस्था केलेली आहे. प्राथमिक शाळांमध्यें मुलांना पुस्तकें मोफत पुरविली जातात. गोरगरिबांच्या घरीं अभ्यास करण्याला निवांत जागा नसते म्हणून गृहपाट करण्यासाठीं शाळेंतच जागेची व अभ्यास-पुस्तकांची व्यवस्था केलेली असते. सरकारी शाळा–कॉलेजमध्यें फी नाहींच. खाजगी शाळा व कॉलेजें आहेत तेथें मात्र फी द्यावी लागते.

## बारा वर्षें विद्यार्जन आवश्यक

अमेरिका हा देश एकच असला तरी त्यांत अनेक प्रांत व इलाखे आहेत त्यांना संस्थानें म्हणतात. या प्रत्येक इलाख्याचें सरकार शिक्षणाचे बाबतींत स्वतंत्र आहे. त्यामुळें शिक्षणपद्धतींत प्रांताप्रांतांमध्यें थोडा भेद आहे. अमेरिकेविषयीं केलेलीं विधानें ठोकळ मानानेंच घेतलीं पाहिजेत. हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें प्रत्येक प्रांताप्रांताच्या शिक्षणपद्धतींत थोडाथोडा भेद

आहे, तीच स्थिति अमेरिकेची. तरी पण देश या दृष्टीनें अमेरिकेविषयीं कांहीं सर्वसाधारण विधानें करतां येतात. तेथें साधारणपणें सहा ते चौदा वयापर्यंत सक्तीचें प्राथमिक शिक्षण आहे. या वयांत संपूर्ण काल शिक्षण घेतलें पाहिजे. मोलमजुरीचे कामाकडे मुलांना लावतां येत नाहीं. शिक्षण सांभाळून थोडें काम करतां येतें. कांहीं संस्थानांतून शाळाप्रवेशाची ही मर्यादा सात, आठ किंवा नऊ वयाची आहे. पूर्णकाल सक्तीचें शिक्षण आठ वर्षें झाल्यावर पुढें चार वर्षें आठवड्यांतून कांहीं तास पुरवणी शाळेंत शिकण्याची सक्ति असते ; या शाळांना कंटिन्युएशन किंवा पार्ट टाईम् स्कूल असें नांव आहे. म्हणजे एकूण बारा वर्षें किंवा वयाचे अठराएकोणीस वर्षापर्यंत प्रत्येक व्यक्तीला शाळेंत कांहीं ना कांहीं शिक्षण घ्यावें लागतें. पुरवणी शिक्षणाची सक्ति सर्वच संस्थानांतून नसली तरी बहुसंख्य संस्थानांतून आहे. कांहीं ठिकाणीं पुरवणी शिक्षण ऐच्छिक आहे. याचा अर्थ असा कीं राष्ट्रांतील प्रत्येक शेतकरी, मजूर, धंदेवाला अथवा अन्य कारागीर या सर्वांना निदान बारा वर्षें शिक्षण अवश्य दिलें जातें. याशिवाय इतर व्यक्ती आपल्या हौसेनें यापुढचें शिक्षण घेतात तें निराळेंच. इतकें शिक्षण घेतलेले शेतकरी व कामकरी आपापल्या उद्योगधंद्यांत या शिक्षणाचा उपयोग करून त्या व्यवसायांत एकसारखी प्रगति करीत असतात. आपापल्या धंद्यावरील मासिकें व पुस्तकें वाचण्याची त्यांची तयारी असते. त्यामुळें आपल्या धंद्यांत त्यांना नवीन नवीन ज्ञानाचा उपयोग करतां येतो व जगांत काय चाललें आहे तें समजूं शकतें. अशा या शेतकरी व कामकरी वर्गाच्या बरोबरीनें हिंदी शेतकरी–कामकरी वर्गाला काम करावयाचें आहे. एका देशांत बारा वर्षें शिक्षण ; दुसरीकडे शिक्षणाबद्दल उदासीनता. अशा स्थितींत शेतीची व उद्योगधंद्याची प्रगति कशी होणार ? यदृच्छेनें थोडी झाली तरी ती पुढारलेल्या राष्ट्रांच्या बरोबर केव्हां येणार ? जगांत बहुजन समाजाच्या शिक्षणाचें पाऊल किती वेगानें पडत आहे हें पाहून आपलेकडील बहुजनांना शिक्षण देण्याची गति वाढविल्याखेरीज गत्यंतर नाहीं, हें स्पष्टपणें दिसून येईल.

## शिक्षणसंस्थांची रूपरेषा

अमेरिकन शिक्षण पद्धतीची कल्पना देणें अतिशय सोपें आहे. प्राथमिक

व माध्यमिक शिक्षण मिळून बारा वर्षांचा अभ्यासक्रम आहे. यांत प्राथमिक शाळा कोठें आठ वर्षांची तर कोठें सहा वर्षांची आहे. प्राथमिक शाळा आठ वर्षांची असल्यास हायस्कूल चार वर्षें, व प्राथमिक शाळा सहा वर्षांची असल्यास हायस्कूल सहा वर्षें अशा रीतीनें एकूण बारा वर्षें शिक्षण झालें म्हणजे मग कॉलेजमध्यें जातां येतें. प्राथमिक शाळेंत मुलांना सहावे वर्षी सक्तीनें घालावें लागतें. त्यापूर्वी बालमंदिर व बालोद्यान पद्धतीच्या शाळा आहेत. परंतु यांत मुलांना पाठविलेंच पाहिजे अशी सक्ति नाहीं. या शाळांची सोय सर्वच ठिकाणीं आहे असें नाहीं. मोठ्या शहरांतून ज्या प्राथमिक शाळा आहेत त्यांनाच जोडून एक बालोद्यान वर्ग काढलेला असतो. यांत चार ते सहा वर्षांचीं बालकें जातात. कधी बालोद्यान व पहिली यत्ता हे वर्ग एकत्र केले जातात. बालोद्यान शिक्षण ऐच्छिक आहे. त्या शाळेला योग्य अशा मुलांपैकीं शेंकडा आठ ते दहा मुलें शाळेंत जातात. बाकीचीं मुलें सहावे वर्षी शिक्षण सुरू करतात.

खेडेगांवांतील लहान शाळांत पहिल्या चार यत्ता असतात. वरच्या चार यत्तांकरितां अनेक खेड्यांना मिळून एक मध्यवर्ती शाळा (कन्सॉलिडेटेड् स्कूल) असते. घरापासून शाळा लांब असल्यानें मुलांची सार्वजनिक खर्चानें मोटारीतून नेआण करण्यांत येते.

हायस्कूल जेथें सहा वर्षांचें आहे तेथें त्याचे ज्यूनियर व सीनियर असे तीन तीन वर्षांचे विभाग पाडले आहेत. कांहीं ठिकाणीं ज्यूनियर हायस्कूलचा कारभार अगदीं स्वतंत्र ठेवून त्याची निराळी शिक्षणपद्धति निर्माण करण्याचा प्रयत्न चालला आहे. हायस्कूलमध्यें बौद्धिक शिक्षणाबरोबर औद्योगिक शिक्षणाचीही सोय असते. त्यामुळें मुलाची प्रवृत्ति कोणत्याही विषयाकडे असली तरी त्याला हायस्कूलमध्यें वाव मिळतो. त्यांतून कांहीं मुलांना संपूर्ण धंदेशिक्षण घेणें असेल तर त्यांचेकरितां हायस्कूलला समांतर अशा धंदेशिक्षणाच्या शाळा आहेत. हायस्कूलचें शिक्षण पूर्ण झाल्यानंतर शाळेकडूनच शिक्षण पूर्ण झाल्याबद्दलचें प्रशस्तिपत्रक दिलें जातें. परंतु ज्या विद्यार्थ्यांना पुढें उच्च शिक्षणाकडे जावयाचें असेल त्यांना मात्र विश्वविद्यालयाचे विशिष्ट परीक्षांना बसावें लागतें. ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, या विद्यापीठाचे परीक्षेला सर्वच विद्यार्थी बसत नाहींत. ज्यांना

कॉलेजमध्यें जायचें आहे तेवढेच बसतात. बाकिच्यांची परीक्षा हायस्कूलकडूनच घेतली जाते. कांहीं संस्थानांत मात्र सर्व विद्यार्थ्यांकरितां एक अंत्य परीक्षा असते. परंतु सामान्यपणें एकाच परीक्षेंतून सर्व विद्यार्थ्यांना भरडून काढण्याची पद्धति अमेरिकेंत नाहीं. कॉलेजमध्यें विद्यार्थी दाखल करून घेण्याकरितां अनेक पद्धती आहेत. कांहीं कॉलेजें स्वतःच परीक्षा घेतात. कांहीं विद्यापीठें एकत्र होऊन सर्वसामान्य परीक्षा एकदम घेतात. कांहीं विद्यापीठें निवडक शाळांना मान्यता देऊन त्यांचीं शिफारसपत्रें मान्य करितात, निराळी परीक्षा घेत नाहीत. दुय्यम शाळांवर विद्यापीठांचें नियंत्रण होतें व अद्यापिही आहे. परंतु ऐच्छिक विषयांची वाढती संख्या, परीक्षेबरोबर विद्यार्थ्यांची शाळेंतील एकंदर प्रगति पाहण्याची पद्धति आणि बौद्धिक कसोटचा यांच्या साहाय्यानें या परीक्षांचे दुष्परिणाम कमी झालेले आहेत. हायस्कूलमध्यें अभ्यासक्रमाचे दृष्टीनें स्वातंत्र्य असावें आणि अनेक प्रयोग करण्यास सवलत राहावी या दृष्टीनें विद्यापीठांच्या प्रवेशपरीक्षांचें नियंत्रण सैल करण्याची चळवळ चाललेली आहे. अशा प्रकारें कांहीं शाळांना सवलत देऊन शिक्षणप्रयोग करण्याची परवानगी विद्यापीठांकडून मिळूं लागली आहे.

## प्रौढांचें शिक्षण

प्रौढ शिक्षणाची वाढ अमेरिकेंत अगदीं अलीकडील आहे, याचें कारण आहे. इतर देशांत ही चळवळ कामगार वर्गाच्या उत्साहामुळें पुढें आलेली आहे. अमेरिकेंतील कामगारवर्ग हा परदेशांतून आलेल्या व नुकताच नागरिक झालेल्या लोकांचा असल्यामुळें त्यांना स्थाइकपणामुळें येणारी परंपरा व संघटना नाहीं. परंतु अलीकडे या शिक्षणाला चालना मिळालेली आहे. प्रौढ माणसांची अध्ययनाची शक्ति कमी न होतां कायम असते असें अमेरिकन मानसशास्त्रज्ञांनीं सिद्ध केल्यामुळें या शिक्षणाकडे लोकांचें लक्ष अधिक वळलें आहे. थॉर्नडाईक् या मानसशास्त्रज्ञाचा असा सिद्धांत आहे कीं, वयाच्या दहापासून वीसपर्यंत आपली शिकण्याची जी बौद्धिक ताकद असते तितकीच वयाच्या तीसपासून पन्नासपर्यंत कायम राहाते. वयाच्या वीसपासून पंचवीस किंवा तीसपर्यंत मात्र शिकण्याची पात्रता उत्कृष्ट असते

प्रौढ शिक्षणाकरितां कामगार वस्तींत सेट्लमेंट हौसेस् संस्था आहेत. अमेरिकन असोसिएशन ऑफ अॅडल्ट एज्युकेशन सारख्या अनेक संस्थांनीं हें काम चालविलें आहे. विद्यापीठांना जोडून प्रौढांकरितां अनेक विषय शिकण्याचे वर्ग असतात.

## बौद्धिक व औद्योगिक उच्च शिक्षण

प्राथमिक सहा व दुय्यम आठ किंवा प्राथमिक आठ व दुय्यम चार असें बारा वर्षे शिक्षण झाल्यानंतर कॉलेजमध्यें प्रवेश मिळतो. येथें पदवी मिळण्यास चार वर्षांचा शिक्षणक्रम आहे. कॉलेजांत वाङ्मयात्मक व औद्योगिक दोन्ही प्रकारच्या शिक्षणाची सोय आहे. विशेषतः एंजिनियरिंग, वैद्यकी, शेतकी, शिक्षणशास्त्र, व्यापार इत्यादि विषयांच्या संस्था चांगल्या आहेत व शिक्षण उच्च दर्जाचें आहे. शेतकी, शिक्षणशास्त्र आणि एंजिनिअरिंग या विषयांकरितां परदेशांतूनही अनेक विद्यार्थी अमेरिकेंत येतात. कॉलेजमध्यें न जाणारे विद्यार्थी टेकनिकल् इन्स्टिटयूट्स्मध्यें औद्योगिक शिक्षणार्थ जातात.

कॉलेजमध्यें चार वर्षांनीं ए. बी., आणखी एक वर्षानें ए. एम्., व आणखी दोन वर्षांनीं पीएच्. डी. अशा पदव्या घेतां येतात. कॉलेजमधील पहिली दोन वर्षे स्वतंत्र करून तीं ज्यूनियर कॉलेज या नांवानें काढण्याचा प्रयोग सध्यां चालू आहे. कांहीं ठिकाणीं हीं ज्यूनिअर कॉलेजें हायस्कूलला जोडलीं जातात. त्यामुळें हायस्कूलला आठ वर्षें मिळतात. सध्यां सहा वर्षांच्या हायस्कूलचे ज्यूनियर व सीनियर हायस्कूल असे त्रिवार्षिक विभाग आहेत. कॉलेजचीं दोन वर्षें मिळाल्यामुळें आतां हे विभाग चतुर्वार्षिक करण्याचे प्रयोग चालू आहेत. या पद्धतीनें हायस्कूलमध्यें इंटरमीजिएट-पर्यंतचें शिक्षण होईल. अशी पद्धति यूरोपमध्यें आहे.

कॉलेजच्या पहिल्या चार वर्षांनंतरचें म्हणजे पहिल्या पदवीनंतरचें काम हें विद्यापीठांचें, असें समजलें जातें. एम्. ए. चा व पीएच्. डी. चा अभ्यास अनेक विद्यापीठांतून चालतो. याशिवाय तेथें उच्च दर्जाचें संशोधनही चाललेलें आहे. विद्यापीठांत कांहीं सरकारी व कांहीं खाजगी अशीं आहेत. कोलंबिया, हार्वर्ड, व येलसारखीं कांहीं जुनीं खाजगी विद्यापीठें चांगल्या दर्जाचीं आहेत.

# अमेरिकन शिक्षणपद्धति

( शाळांचे पुढें दिलेले आंकडे शिक्षणक्रमाचीं वर्षे दर्शवितात. )

प्रौढ शिक्षण

संशोधनात्मक शिक्षण

वय

मुदत

२२ — १६
२१ — १५
२० — १४
१९ — १३
१८ — १२
१७ — ११
१६ — १०
१५ — ९
१४ — ८
१३ — ७
१२ — ६
६ — १

टेक्निकल इन्स्टिटयूट

नॉर्मल स्कूल–टीचर्स कॉ.

कॉलेज व विद्यापीठ

कॉन्टिन्युएशन स्कूल ४

ट्रेड हायस्कूल ४

हायस्कूल ४

ज्युनियर–सीनियर हायस्कूल ३+३

वय ६ ते १४
प्राथमिक शाळा ६

वय ६ ते १२ प्राथमिक शाळा ८

२–५ बालोद्यान किंवा गृह

## दुर्बलांचें शिक्षण

इंग्लिश शिक्षणाचें तत्त्व Survival of the fittest आहे तर अमेरिकेचें तत्त्व Fitting every one for survival असें आहे. 'समर्थांनीं जगावें व दुर्बलांनीं मरावें' या तत्त्वापेक्षां 'दुर्बलांनाही जगण्याकरितां समर्थ करावें' या प्रवृत्तीचा अनुभव अमेरिकन शिक्षणांत येतो. किंबहुना या पद्धतींतील गुण आणि दोष वरील तत्त्वाच्या स्वीकारामुळेंच उत्पन्न झाले आहेत.

शरीरानें व मनानें दुर्बल अशा सर्व प्रकारच्या मुलांकरितां शिक्षणाच्या सोयी आहेत. सार्वजनिक शाळांमध्यें एक 'खास वर्ग' (स्पेशल क्लास) असतो. तेथें बुद्धीनें मंद अशा मुलांना त्यांच्या गतीनें व प्रात्यक्षिक साधनांनीं प्राथमिक शिक्षण दिलें जातें. अशा मुलांना सुधारण्याचा मार्ग दाखविण्याकरितां "बालक मार्गदर्शक संस्था" (चाइल्ड गायडन्स् क्लिनिक्) शहरांत आहेत. शरीरानें जीं मुलें दुर्बल, लुलीं, पांगळीं व अन्य रीतीनें सदोष आहेत त्यांचेकरितां विशिष्ट साहित्यसामुग्रीनें युक्त व अशा मुलांच्या संचाराला सोयीच्या इमारती असलेल्या शाळा आहेत. शिकागोमध्यें अशी एक उत्कृष्ट शाळा आहे. गुन्हेगारीची किंचित् प्रवृत्ति असलेल्या मुलांकरितां न्यूयॉर्कमध्यें एक औद्योगिक हायस्कूल आहे. तेथें एक खास मानसशास्त्रज्ञाची योजना झालेली असते. मुलांची नोंद फार काळजीपूर्वक ठेविली जाते. गुन्हे करून दोषी ठरलेल्या मुलांकरितां सुधारणा शाळा ( रेफर्मेटरी ) आहेत. या शाळेच्या आवारांत गेल्यानंतर मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था चांगल्या प्रकारची असल्याचें दिसून येतें. प्रौढांचे करितांही तुरुंगांत शाळा आहेत.

## इतर शिक्षणसंस्था

याव्यतिरिक्त अनेक प्रकारच्या शिक्षणसंस्था देशांत आहेत. औद्योगिक शिक्षणसंस्थांचे प्रकार अनेक आहेत. त्यांत कारखानदारांनीं आपल्या कारखान्यांना जोडून काढलेल्या कांही धंदेशाळा चालल्या आहेत. फोर्डचे कारखान्याला जोडून मेकॅनिकल्–इलेक्ट्रिकल् एंजिनियरिंगची एक उत्कृष्ट शाळा आहे. याशिवाय मोठमोठीं वस्तुभांडारें (डिपार्टमेंट स्टोअर्स), हॉटेल्स् (उतरण्याचीं व भोजनाचीं) इत्यादींना जोडून लहान लहान धंदेशाळा

असतात. विशिष्ट प्रकारच्या कामाला लागणारीं माणसें येथें तयार करून घेतलीं जातात.

## शिक्षणाचा कारभार

हिंदुस्थानांत अनेक प्रांत आहेत त्याप्रमाणें अमेरिकेंत अठ्ठेचाळीस संस्थानें (स्टेट्स्) आहेत. या प्रत्येकाचें एकेक प्रांतिक सरकार असून, सर्वांचें मिळून संयुक्त सरकार (फेडरल् गव्हर्नमेंट) आहे. यांत शिक्षणाचा अधिकार प्रांतिक सरकारचा आहे, त्यामुळें प्रत्येक प्रांतांतल्या किंवा संस्थानांतल्या शिक्षणपद्धतींत थोडाफार फरक आहे. शिक्षणाचा कारभार कांहीं अंशीं इकडील शिक्षणखात्यासारखा असतो. तरी पण उत्कृष्ट कारभाराची पद्धति शोधून काढण्याचे दृष्टीनें एकसारखे प्रयोग निरनिराळ्या प्रांतांतून चालू आहेत. शिक्षणाचा कारभार या एकाच विषयावर अमेरिकेंत प्रचंड वाङमय प्रसिद्ध झालेलें आहे. या विषयाचा अभ्यास करण्याकरितां विद्यापीठांतून स्वतंत्र खातीं निर्माण झालेलीं आहेत.

शिक्षणावर प्रांतिक सरकारचें मुख्य नियंत्रण असलें तरी प्रत्यक्ष कारभार जिल्हा (कौंटी) व तालुका (डिस्ट्रिक्ट) यांच्या शिक्षणमंडळांमार्फतच केला जातो. प्रांत, जिल्हा व तालुका या प्रत्येकाचें एकेक शिक्षणमंडळ (बोर्ड) असतें. कांहीं संस्थानांतून हें लोकनियुक्त असतें तर कांहीं ठिकाणीं तें प्रांताचे गव्हर्नरनें नेमलेलें असतें. कारभाराचीं प्रत्यक्ष कामें करण्याकरितां इकडील अॅडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसरप्रमाणें एक अधिकारी ( सुपरिंटेंडेंट ) असतो. कांहीं ठिकाणीं हा बोर्डानें निवडलेला असतो तर कोठें तो स्थानिक सरकारनें नेमलेला असतो. जिल्हा, तालुका व शहरें यांतील स्थानिक विद्याखातीं आपापल्या भागांतील प्राथमिक, दुय्यम, औद्योगिक इत्यादि सर्व प्रकारच्या शिक्षणाची व्यवस्था पाहतात.

## राजकीय पक्षभेदापासून अलिप्त

कारभाराचे दृष्टीनें शिक्षण आणि राजकारण हीं शक्य तितकीं अलिप्त राहावींत असा प्रयत्न अमेरिकेंत केला जातो. पक्षभेदात्मक राजकारणापासून शिक्षण अलिप्त असावें अशा प्रकारची शिक्षणकारभाराची व्यवस्था निर्माण करण्याकडे अधिकाधिक प्रवृत्ति आहे. त्याकरितां कांहीं विशिष्ट

नियम पाळले जातात. स्कूलबोर्डाच्या निवडणुकी या इतर राजकीय निवडणुकीपासून स्वतंत्र असतात. राजकीय कारभारासारखाच शिक्षणाचा कारभार कांहीं प्रमाणांत स्वतंत्र आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. शैक्षणिक निवडणुकींत बोर्डाचे सभासद सरसकट मतदार संघांतून निवडले जातात. निवडणुकीकरितां उभे राहणारे उमेदवार पक्षभेदातीत असावेत, निदान विशिष्ट पक्षाचे नांवावर शिक्षणमंडळाच्या निवडणुकी होऊं नयेत असा प्रघात आहे. कायदेमंडळें एकदम बरखास्त होतात व नंतर नवीन निवडणुकींत नवीनच राजकीय पक्ष अधिकारांत येतो, तशी स्थिति शिक्षणमंडळांत होऊं नये अशी काळजी घेतली जाते. या मंडळाचे सगळेच सभासद एकाच वर्षी निवडले जात नाहीत. दरवर्षी थोडथोडे निवडले जातात. त्यामुळें शिक्षणकारभार एका विशिष्ट पक्षाचे हातांत जाण्याची भीति राहात नाहीं. राजकीय निवडणुकींत यशस्वी झालेल्या पक्षाचे सरकारनें शिक्षणमंडळ नेमलें किंवा निवडलें तर तें विशिष्ट राजकीय पक्षाचें बाहुलें होण्याची भीति असते. म्हणून राजकीय निवडणुकी व शिक्षणाच्या निवडणुकी आणि त्यांचे कारभार हे अगदी अलिप्त ठेविले पाहिजेत, असें प्रबल लोकमत अमेरिकेंत तयार होत असून त्याप्रमाणें अनेक प्रांतांत सुधारणा झालेली आहे. हिंदुस्थानांत या पद्धतीचा विशेष उपयोग आहे असें विचारांतीं दिसून येईल. सर्व राजकारण जेथें जातिभेदाचें व पक्षभेदाचें झालेलें आहे, तेथें शिक्षणही या कलहास बळीं पडेल असें पूर्वानुभवावरून स्पष्ट दिसत आहे. अशा परिस्थितींत जर शिक्षणाचा कारभार बाजूला काढून तो राजकीय पक्षभेदापासून अलिप्त ठेवितां आला तर शिक्षणामध्यें पुष्कळ प्रगति होऊं शकेल. नाहीं तर अधिकारांत येणाऱ्या पक्षानें आपापला फायदा करून घेऊन पुढें चालावें, मागल्यानेंही तसेंच करावें, हीच परंपरा पुढें चालू राहील.

## शिक्षणखर्चाची व्यवस्था

अमेरिकेंत सर्व शिक्षण मोफत असल्यानें त्याचा सर्व खर्च सार्वजनिक तिजोरींतून भागविला जातो. त्याकरितां कांहीं ठिकाणीं शिक्षणाकरितां असे स्वतंत्र कर बसविलेले आहेत. खर्चाचा मुख्य भार स्थानिक स्वराज्य संस्थांनाच सोसावा लागतो. शेंकडा सत्तरपाऊणशें टक्के खर्च स्थानिक

स्वराज्याच्या उत्पन्नांतून व बाकीचा प्रांतिक सरकारच्या मदतीनें भागविला जातो. मध्यवर्ती सरकारकडून औद्योगिक शिक्षणाला निम्मानिम मदत होत असते. स्थानिक स्वराज्य संस्थांना शिक्षणाकरितां स्वतंत्र कर बसविण्याचा अधिकार आहे. शिक्षणमंडळांना कांहीं ठिकाणीं पूर्ण आर्थिक स्वातंत्र्य असतें. त्यांचें उत्पन्न ठराविक असतें. स्वत:चें अंदाजपत्रक तयार करून त्याप्रमाणें खर्च करण्याची, कर्ज काढण्याची वगैरे त्यांना मोकळीक असते. कांहीं ठिकाणीं शिक्षणाचे खर्चाकरितां मध्यवर्ती सरकारनें जमिनी दिलेल्या होत्या. या जमिनींतून निरनिराळ्या मार्गांनीं येणारें उत्पन्न हें शिक्षणाकडे लाविलें जातें. सारांश, या देशांत शिक्षणाकरितां उत्पन्नाच्या अनेक बाबी असून या खात्यावर पाण्यासारखा पैसा ओतला जातो. कारण अमेरिकन लोकांची शिक्षणावर श्रद्धा आहे, व त्याप्रीत्यर्थ जरूर ती आर्थिक झीज सोसण्याची त्यांची तयारी आहे.

सार्वजनिक करांतून चाललेल्या शाळांव्यतिरिक्त कांहीं खाजगी शिक्षणसंस्था आहेत. या संस्थांना कोणत्याही प्रकारची सरकारी मदत मिळत नाहीं. ग्रँट एडेड शाळा अमेरिकेंत नाहींत. खाजगी शाळांतील हजेरीचें दप्तर शिक्षणाधिकाऱ्याला कायदेशीर रीतीनें पाहतां येतें. बहुतेक खाजगी शाळा या कॅथॉलिक् पंथीय धर्मसंस्थेच्या आहेत. इतर कांहीं शाळा शिक्षणप्रयोगार्थ चालविलेल्या आहेत. एकंदर विद्यार्थीवर्गापैकीं शेंकडा दहा विद्यार्थी या खाजगी शाळांतून आहेत.

## मोफत शिक्षणतत्त्वाचा प्रसार

विद्यादान ही पवित्र गोष्ट आहे, ती शक्य तितकी विनामूल्य दिली पाहिजे, ही कल्पना प्राचीन भारतीय शिक्षणामध्यें होती. थोडी निराळ्या स्वरूपांत हीच कल्पना अमेरिकेनें मोठ्या प्रमाणावर व पद्धतशीर रीतीनें वाढविलेली आहे. शाळा या मोफत असल्या पाहिजेत ही कल्पना प्रथम सतराव्या शतकाचे प्रारंभीं निघाली. त्यानंतर वाढत वाढत १८६० चे सुमारास ती कायदेशीर रीतीनें प्रस्थापित झाली. समाजानें कररूपानें दिलेल्या उत्पन्नांतून शिक्षणाचा खर्च भागला पाहिजे ही कल्पना थोड्याफार प्रमाणांत सर्वच देशांत प्रचलित असली तरी अमेरिकेनें ती पूर्णत्वाला नेलेली आहे.

इतर देश हळुहळू आतां अमेरिकेच्या मार्गावर येऊं लागले आहेत. आज यूरोपांतील देशांत प्राथमिक शिक्षण मोफत व माध्यमिक शिक्षण विकत अशी स्थिति आहे. परंतु अलीकडे मोफत शिक्षणाचें तत्त्व माध्यमिक शिक्षणांतही शिरूं लागलें आहे. १९३३ सालीं फरान्समध्यें सर्व दुय्यम शाळांची फी कमी करण्यांत आली. इंग्लंडमध्यें शेंकडा पन्नाससाठ इतक्या विद्यार्थ्यांना हायस्कूलचे शिक्षणांत नादारी मिळू शकते. राज्यकारभारांत सामान्य लोक, शेतकरी व कामगार यांना जसजसा अधिकाधिक अधिकार मिळेल तसतसें मोफत शिक्षणाचें तत्त्व उच्च शिक्षणांतही शिरूं लागेल असें निश्चित समजावें. कारण शिक्षणाच्या खर्चाची खरी अडचण गरिबांनाच असते. हा वर्ग ज्या वेळीं अधिकारांत येतो त्या वेळीं तो आपल्या मुलाबाळांकरितां शिक्षणाचें द्वार उघडण्याचा अवश्य प्रयत्न करतो.

## सामाजिक असंतोषावर मात्रा

विद्येचें महाद्वार सर्वांना खुलें पाहिजे या तत्त्वाचा पुरस्कार अमेरिकेनें केल्यामुळें समाजावर त्याचा चांगला परिणाम झालेला आहे. प्राथमिक शिक्षणापासून कॉलेजपर्यंतचें सर्व शिक्षण सामान्य जनांच्या आटोक्यांत आलेलें आहे. एकाद्या मजूराचा किंवा शेतकऱ्याचा मुलगा देखील एंजिनियर, डॉक्टर, प्रोफेसर, संशोधक किंवा सरकारी अधिकारी होऊं शकतो. आपणाला समाजाच्या वरच्या थरांत जाण्याला मज्जाव आहे असें देशांतील कोणत्याच वर्गाला वाटत नाही. व्यक्तीच्या ठिकाणीं कर्तबगारीच नसेल तर तिनें मागें राहावें. मग समाजपद्धतीलाही दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. परंतु उच्चनीच जातिभेद, गरीबी श्रीमंती, किंवा असाच एकादा कृत्रिम समाजभेद, यांमुळें व्यक्तीच्या विकासाला वाव मिळाला नाहीं अशी परिस्थिति राहिलेली नाहीं. अशा प्रकारें प्रत्येक व्यक्तीच्या प्रगतीला ज्या समाजांत पूर्ण मोकळीक असते तेथें समाधान राहातें. जेथें कर्तबगार व्यक्तींना समाजाचे वरच्या थरांत जाण्याला साधन नसतें तेथें समाजांतील खालच्या वर्गांत असंतोष वाढत जातो. ज्या देशांतील समाजांत जात, धर्म, आर्थिक परिस्थिति इत्यादि कारणांमुळें अनेक तटबंदिस्त वर्ग पडलेले आहेत व त्यामुळें समाजांत असंतोष, मत्सर, हेवा, गैरविश्वास इत्यादि भावना पर-

स्परांचे मनांत उत्पन्न झालेल्या आहेत, त्या देशांनीं या गोष्टींचा विशेष विचार केला पाहिजे. कनिष्ठ मानलेल्या वर्गांना समाजांत वर येण्याला शिक्षणासारखें साधन सुलभ होईल तर त्यांच्यांतील असंतोषाचें कारण नष्ट होऊन समाजांत समाधान नांदेल.

## सार्वत्रिक शिक्षणाचा उद्योगधंद्यावर परिणाम

सार्वत्रिक शिक्षणामुळें सुशिक्षित आणि अशिक्षित अशी तटबंदी समाजांत राहिलेली नाहीं. समाजांत बहुसंख्य लोक सुशिक्षित असल्यामुळें अमुक धंदे सुशिक्षितांचे आणि अमुक धंदे अशिक्षितांचे असा भेद नाहीं. शिक्षण आणि विशिष्ट धंदा यांचा समन्वय अमेरिकेंत राहिलेला नाहीं. शिकलेला मनुष्य वाटेल तो धंदा करण्यास तयार होतो. शिक्षितांनीं फक्त पांढरपेशा व पोषाखी व्यवसाय करावा असा समज या देशांतून नष्ट झाला आहे. त्यामुळें हे शिकलेले लोक सर्व धंद्यांमधून पसरलेले आहेत. पदवीधर मनुष्य हलक्या धंद्यांना हलके मानीत नाहीं. त्यामुळें उद्योगधंद्यांना शिकलेले लोक लाभलेले आहेत. अशिक्षितांनीं केलेले उद्योगधंदे आणि सुशिक्षितनीं केलेले उद्योगधंदे यांत केव्हांही फरक राहणारच. त्यामुळें आज जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत अमेरिकेची प्रगति झालेली दिसून येते. साधा स्वयंपाकाचा धंदा घेतला तरी त्यांत सुशिक्षित स्त्री–पुरुष पडलेले असल्यामुळें त्यांनीं स्वयंपाकाचें पद्धतशीर शास्त्र निर्माण केलें आहे. प्रत्येक मोठ्या हॉटेलांत किंवा शिक्षणसंस्थांच्या स्वयंपाकगृहामध्यें अन्नशास्त्रांत पारंगत असलेला तज्ज्ञ असून त्याच्या देखरेखीखालीं मुदपाकखान्यांतील काम चालतें. दिसण्यांत ही बाब हांसण्यासारखी क्षुल्लक दिसेल ; पण राष्ट्राच्या आरोग्यावर तिचा किती मोठा परिणाम होतो याची कल्पना करणारांना वरील तत्त्वाचें महत्त्व पटेल. हिंदुस्थानांत आज सर्व उद्योगधंदे अशिक्षितांच्या हातांत आहेत. त्यांना शिक्षण तरी दिलें पाहिजे किंवा त्यांच्या हातांतील उद्योगधंदे शिक्षितांच्या हातांत तरी गेले पाहिजेत. तसें झालें नाहीं तोंपर्यंत हिंदी उद्योगधंद्यांना उर्जितावस्था येणें शक्य नाहीं. केवळ पाश्चात्य यंत्रसामुग्री व तज्ज्ञ आणून उद्योगधंद्यांची प्रगति होत नाहीं. धंदा करणारी प्रत्येक व्यक्ति जेव्हां आपल्या शिक्षणाचा आणि ज्ञानाचा उपयोग धंदा सुधारण्याकडे करिते, तेव्हां

अशा लाखो लोकांकडून उद्योगधंदे वाढत असतात. यावरून शिक्षण आणि समाज यांचा किती निगडित संबंध आहे ही गोष्ट वाचकांचे सहज ध्यानांत येईल.

---

## प्रकरण तिसरें

# अभ्यासक्रम व अध्यापन

### बौद्धिक इच्छाभोजन

अमेरिकेंतील अभ्यासक्रम म्हणजे एक प्रकारचें बौद्धिक इच्छाभोजनच आहे! अन्नभांडारांत गेल्यानंतर प्रत्येकाला आपल्या रुचिवैचित्र्याप्रमाणें व जठरशक्तीप्रमाणें खाद्य पदार्थ निवडतां येतात तशीच अमेरिकन हाय-स्कुलांची स्थिति आहे. तेथें अनेक प्रकारचे अनेक अभ्यासक्रम शिकविले जातात. त्यांतून प्रत्येक विद्यार्थ्यानें स्वतःची मनःप्रवृत्ति, आवड व आयुष्यांतील भावी गरज या दृष्टीनें वाटेल ते विषय (कोर्सेस्) निवडावेत. अमुक विषय आवडत नाहीं किंवा कठिण जातो म्हणून जन्मभर अशिक्षित राहण्याचा प्रसंग कोणाही व्यक्तीवर येत नाही. ज्याला जें चांगलें येत असेल त्यानें तें चांगलें शिकावें. एका विवक्षित अभ्यासक्रमाचे सांच्यांतून सर्व विद्यार्थी ठराविक घडणाचे निघाले पाहिजेत ही गिरणीची कल्पना तेथें नाहीं. जी हायस्कूलची स्थिति तीच कॉलेजची. येथेंही प्रत्येकाला आपले आवडीप्रमाणें विषयांची व विषयसंख्येची निवड करतां येते. इतिहासासारखा एकच विषय घेणारे पांच विद्यार्थी त्याच विषयाचे निरनिराळे पोटविभाग घेऊं शकतील. त्यामुळें पदवीकरितांच अभ्यास न करतां आपल्या हौसेकरितां अभ्यास करणारे विद्यार्थी पुष्कळ असतात. उन्हाळ्याच्या सुटींत भरणारे विद्यापीठाचे वर्ग पाहिले तर त्यांत पुष्कळ वृद्ध व वयस्क विद्यार्थीही दिसतात.

हे तेथें पदवीकरितां येत नसून आपल्या आवडीचे विषय शिकण्याकरितां आलेले असतात. अमुक विषयच शिकल्यानें सुसंस्कृतता येते व मानसोन्नति होते ही आकुंचित कल्पना तेथें नाहीं. कोणत्याही विषयाचा बौद्धिक दृष्टीनें वरच्या दर्जाचा अभ्यास केला तर शिक्षणाचे मानसिक फायदे मिळून आयुष्यांत त्या शिक्षणाचा उपयोग होतो अशी मूलभूत कल्पना आहे.

## हिंदी बुद्धीची कुचंबणा

वरील पद्धतीची आपल्या हिंदी व विशेपतः मुंबई इलाख्यांतील पद्धतींशी तुलना केली म्हणजे तिचें महत्त्व अधिक पटेल. ऐच्छिक विषयांचें महत्त्व आपल्या विद्यापीठांनी व शाळांनीं अद्याप मान्य केलेलें नाहीं. अगदीं उच्च शिक्षणाकडे जाईपर्यंत सर्वांना एकाच सांच्यांतून जावें लागतें. त्यामुळें किती तरी जीवांच्या शैक्षणिक महत्त्वाकांक्षा अपुऱ्या राहिल्या आहेत. केवळ संस्कृत विषय अवघड जातो म्हणून एकदोन पिढींतील कित्येक बुद्धिमान् कर्तबगार व्यक्तींना कॉलेजचा उंबरठा देखील दृष्टीस पडूं शकला नाहीं ! वाङ्मय व ललितकला इत्यादि विषयांत विशेष बुद्धि असलेले कित्येक विद्यार्थी गणित विषय येत नाहीं म्हणून जन्मभर " मॅट्रिक नापास "चा शिक्का कपाळीं घेऊन व तो अपमान निमूटपणें गिळूनही कलेची सेवा करीत बसलेले आहेत. प्रत्येकाच्या स्नेहीमंडळींत असे कित्येक लोक सांपडतील. ऐच्छिक विषयांची पद्धति दुय्यम शाळांतून मोठ्या प्रमाणावर सुरू झाली तरच आपल्या समाजांतील अनेक व्यक्तीना पुढें येण्याची संधि मिळेल.

## शाळेंत बुद्धींची विविधता आली

अमेरिकेची व आपली परिस्थिति निराळी आहे असें कांही पंडित म्हणतील. जगांतील शैक्षणिक इतिहासाकडे नजर टाकली म्हणजे असें दिसून येतें कीं प्रत्येक समाज पुढेंमागें अशा थोड्या कालावधीनें त्याच परिस्थितींतून जात आहे. अमेरिकेला ऐच्छिक विषयांची इतकी विविधता कां ठेवावी लागली याचा समाजशास्त्रदृष्टीनें थोडा विचार केला पाहिजे. लोकशाही चिरंजीवी करण्याकरितां सार्वत्रिक मोफत शिक्षण अस्तित्वांत आलें. तें झाल्याबरोबर आजपर्यंत अज्ञानी, अडाणी, अशिक्षित राहिलेल्या कामकरी शेतकरी व श्रमजीवी लोकांचीं मुलेंबाळें शाळेमध्यें आलीं. या बिचाऱ्यांना

घरीं फारसे बौद्धिक संस्कार नव्हते. शाळेंत जें कांहीं कानांवर पडेल तेंच शिक्षण. यापूर्वीं जो विद्यार्थीवर्ग शाळेंत होता तो सुशिक्षित पांढरपेशा वर्गापैकीं होता. त्याचेवर घरीं बौद्धिक संस्कार झालेले होते. अशा रीतीनें अगदीं दोन निरनिराळ्या प्रकारचे विद्यार्थीवर्गाची भरती एकाच शाळेंत एकाच वर्गांत एकाच विपयाकरितां झाली. त्यामुळें या सर्वांचे बौद्धिक दर्जामध्यें अत्यंत विविधता उत्पन्न झाली. पूर्वी जो एकजिनशी पांढरपेशा विद्यार्थीवर्ग होता तो राहिला नाहीं. बहुजनसमाजाचीं बहुविध प्रवृत्तींचीं व अभिरुचीचीं मुलें आतां शाळेंत आलीं. अगदीं अशाच प्रकारची परिस्थिति आज आपल्याही देशांत झालेली आहे हें कोणाच्याही लक्षांत येईल.

## ' व्यक्ती तितक्या प्रकृती 'चें मानसशास्त्र

सामाजिक गरज आणि शास्त्रांची वाढ यांचा मेळ बसला तर समाजाची प्रगति लौकर होते. विविध मनोवृत्तींच्या विद्यार्थ्यांना काय शिकवावें हा प्रश्न अमेरिकन शाळांपुढें होता. त्यांचे मदतीस मानसशास्त्रज्ञ आले. त्यांनी आपल्या प्रयोगशाळेंत निरीक्षण केलें व अनेक प्रयोग करून पाहिले. व्यक्ती–व्यक्तींमध्यें फरक किती असतो याचें संशोधन त्यांनीं चालविलें. बौद्धिक, मानसिक, शारीरिक इत्यादि अनेक दृष्टींनीं निरीक्षण करून त्यांनी एक गोष्ट समाजाच्या व शिक्षणशास्त्रज्ञांच्या विशेष नजरेस आणली. व्यक्ती-व्यक्तींमध्यें अनेक प्रकृती असतात. व्यक्ती तितक्या प्रकृती. त्या अर्थीं त्या सर्वांना शिक्षणाचे दृष्टीनें एकाच सांच्यांत घालणें हें शास्त्रविरुद्ध आहे. प्रत्येक व्यक्तीचा स्वतंत्र दृष्टीनें विचार केला पाहिजे. शिक्षण देतांना त्या व्यक्तीची बुद्धिमत्ता, आवड व आयुष्यांतील भावी गरज या गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. सारांश, शिक्षणक्षेत्रांत मुख्य महत्त्व विषय, अभ्यासक्रम आणि विद्याखात्याचे व शाळांचे नियम यांना न देतां व्यक्तीला, विद्यार्थ्याला व बालकाला दिलें पाहिजे, हा सिद्धांत अमेरिकन शिक्षणांत दृढमूल झालेला आहे. तो लक्षांत घेऊन या शिक्षणपद्धतीकडे पाहिलें म्हणजे सर्व प्रश्नांचीं उत्तरें आपोआप मिळतात.

बहुजनसमाजाचीं मुलें शाळेंत आलीं. त्या कारणानें बुद्धीचे दृष्टीनें विविधता वाढली. या सर्व मुलांना शाळेंत ठेवावयाचें असेल तर विषयांची

विविधता असली पाहिजे. याकरितां अमेरिकन शाळांतून क्रमाक्रमानें अनेक विषयांचा प्रवेश झाला, व त्यांना शिक्षणांत सन्मान्य स्थान मिळालें. प्रारंभीं फक्त वाङ्मयप्रधान असे विषय शाळांतून असत. त्यांचे भरीला हळुहळू हस्तव्यवसायप्रधान विषयांची जोड दिली गेली. त्यामुळें श्रमजीवी वर्गाच्या विद्यार्थ्यांना दुय्यम शिक्षण सुलभ झालें. त्याचप्रमाणें ललितकलाप्रधान विषयांचाही समावेश दुय्यम व उच्च शिक्षणसंस्थांमधून केला गेला. अशा रीतीनें जीवनांत उपयोगी पडणारे अनेक विषय शिक्षणक्रमांत प्रविष्ट झाले. त्यामुळें प्रत्येक व्यक्तीला स्वतःचे व्यक्तित्वाचा विकास होईल असें शिक्षण घेण्याची शक्यता उत्पन्न झाली.

आज आपल्या देशांतही हाच प्रश्न आहे. समाजांतील मागासलेल्या वर्गाचीं मुलेंबाळें शाळेंत यावींत हा एकीकडे आग्रह; पण त्यामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितीप्रमाणें शिक्षणक्रमांत फेरबदल करण्यास मात्र नाखुषी. त्यामुळें शाळेंत प्रविष्ट झालेल्या विविध मनोवृत्तींच्या विद्यार्थ्यांची अत्यंत कुचंबणा होत आहे. त्यांची कांहीं सोय केली नाहीं तर वाया गेलेल्या त्यांच्या आयुष्याचें खापर ते वयस्क पिढीवर व आजच्या शिक्षणधुरीणांवर फोडल्याशिवाय राहणार नाहींत.

## वैयक्तिक गतीला वाव

वैयक्तिक दृष्टीनें बुद्धीमध्यें फरक असतो तसा बुद्धीच्या गतीमध्येंही फरक असतो. एकच विषय शिकणाऱ्या पांच व्यक्तींना तो विषय ठराविक काळांत शिकतां येणार नाहीं. निरनिराळा वेळ लागेल. हा जो मानसिक गतीमध्यें फरक आहे त्याला अनुलक्षून अमेरिकन शिक्षणांत योजना केलेली आहे. विषयांची संख्या सर्वच विद्यार्थ्यांना सारखी न ठेवतां प्रत्येकाचे इच्छेवर ठेविलेली असते. अर्थात् सामान्य बुद्धीला झेंपणारी किमान संख्या सर्वांना आवश्यक असते. कॉलेजमध्यें आठवड्याचे बारा तास सर्वांना आवश्यक असले तरी कोणी बारा, कोणी सोळा, कोणी एकोणीस अशी आपल्या मगदुराप्रमाणें निवड करील. त्याचप्रमाणें हायस्कूलमध्यें किमान विषयांची सक्ति असली तरी ऐच्छिक विषयांची संख्या व प्रकार विद्यार्थी आपल्या आवडीप्रमाणें निवडील. दुसरी महत्त्वाची सुधारणा अशी: सर्वच विषयांत

पास झाला तरच विद्यार्थी वरचे वर्गांत घालावयाचा हा नियम नाहीं. विद्यार्थी एकदोन विषयांत नापास असला तर तो त्या विषयांपुरता खालच्या वर्गांत राहील व बाकीच्या विषयांकरितां वरच्या वर्गात जाईल. अशीही स्थिति असेल कीं एका मुलानें सहा विषय घेतलेले असले तर निरनिराळ्या विषयांतील त्याच्या निरनिराळ्या प्रगतीमुळें तो कांहीं विषयांकरितां पांचवींत व कांहीं विषयांकरितां सहावींत असूं शकेल! कोणत्याही कारणाकरितां वैयक्तिक प्रगति थांबवून धरावयाची नाहीं, प्रत्येक व्यक्तीला कमालीची संधि द्यावयाची हें अमेरिकन शिक्षणाचें आद्य तत्त्व आहे. त्याकरितां किती तरी संशोधन, प्रयोग व प्रयत्न चालू असतात. वैयक्तिक विविधतेला धरून शिक्षणाच्या अनेक तपशिलांत किती विविध प्रकारानें सुधारणा करितां येते हें पाहावयाचें झाल्यास अमेरिकन शिक्षणपद्धतीचा तपशीलवार अभ्यास करावा. अशी अनेक तंत्रें निर्माण झालेलीं आहेत कीं ज्यामुळें मंद आणि बुद्धिमान् अशा दोन्ही टोंकांच्या विद्यार्थ्यांना अपयशाचे प्रसंग न येतां शिक्षणक्रम पूर्ण करतां येतात.

## व्यक्तिविकास व समाजधारणा यांचा समन्वय

शिक्षणाचा समाजाशीं अत्यंत निगडित असा संबंध आहे ही जाणीव अमेरिकन शिक्षणांत पदोपदी दिसून येते. व्यक्तिविकासाला शिक्षणाची मदत व्हावी त्याचप्रमाणें समाजधारणेच्या दृष्टीनेंही शिक्षणाची योजना असावी या दोन्ही तत्त्वांची सांगड या शिक्षणांत घातलेली दिसून येईल. जर्मनी–इटली–रशिया इत्यादि देशांत समाजधारणाप्रधान शिक्षण आहे. इंग्लंड–फरान्स सारख्या देशांत व्यक्तिविकासप्रधान शिक्षण आहे. पण हे दोन प्रकारचे देश दोन टोंकांना गेलेले आहेत. अमेरिकन शिक्षणांत या दोहींचा मध्य गांठण्याचा प्रयत्न चालू आहे.

विद्यार्थी, समाज आणि अभ्यासक्रम अशीं शैक्षणिक त्रिकोणाचीं तीन टोंकें किंवा अंगें आहेत. जुन्या शिक्षणपद्धतींत अभ्यासक्रमालाच प्रधान स्थान दिलें जात असे. त्याचे पायीं विद्यार्थी बळी पडला तरी शाळांना पर्वा नसे. नंतर व्यक्तिप्रधान शिक्षणपद्धति अस्तित्वांत येऊन वैयक्तिक विकासाच्या धोरणानें शिक्षणपद्धती आंखण्यांत येऊं लागल्या. परंतु त्यांत समाज-

ध्येयांची हेळसांड होऊं लागली. म्हणून समाजनिष्ठेवर भर देणारी शिक्षण-पद्धति इटली–जर्मनीसारख्या कांहीं देशांत जन्माला आली. या पद्धतींत समाजाचे पायीं व्यक्तीची कुचंबणा होते. म्हणून व्यक्ति व समाज या दोघांच्या गरजा लक्षांत घेऊन त्याप्रमाणें अभ्यासक्रमाची योजना करणारी शिक्षणपद्धति अस्तित्वांत येत आहे. तिचें कांहींसें स्वरूप व विचारसरणी अमेरिकेंत दिसते.

## संस्कारसंक्रमण होतें काय ?

कांहीं ठराविक विषयांचा अभ्यासक्रम पार पडला म्हणजे मन सुसंस्कृत होतें अशी आज आपल्या समाजांत कल्पना आहे तशीच अमेरिकेंत व पाश्चात्य देशांतही होती. संस्कृत, गणित, व्याकरण इत्यादि विषय शिकल्यानें बुद्धीला एक प्रकारची शिस्त लागते व तिचा पुढें आयुष्यांत सर्व गोष्टींत उपयोग होतो या तत्त्वावर आपला अभ्यासक्रम रचलेला असतो. त्याच समजुतीवर अमेरिकेंतही लॅटिन, बीजगणित इत्यादि विषय आवश्यक असत. परंतु सामान्य बुद्धीच्या विद्यार्थ्यांना हे विषय जड पडत व त्यांची कुचंबणा होई. म्हणून खरोखरीच या विषयांचा बुद्धीवर काय परिणाम होतो हें पाहण्या-करितां मानसशास्त्रज्ञांनीं अनेक प्रयोग केले. त्यांत थॉर्नडाईक या मानस-शास्त्रमहर्षीचें नांव लक्षांत ठेवण्यासारखें आहे. लॅटिन, बीजगणित इत्यादि विषयांच्या अभ्यासानें मनावर झालेले संस्कार आयुष्यांतील इतर व्यवहार करितांना त्यांत संक्रमित होतात कीं काय याचे अनेक प्रयोग त्यानें केले. शेवटीं त्यानें असा सिद्धांत बांधला कीं हें संस्कारसंक्रमण (ट्रॅन्स्फर ऑफ् ट्रेनिंग) अतिशय मर्यादित प्रमाणांत होतें ; आपली अपेक्षा व समजूत आहे त्या प्रमाणांत होत नाहीं. किंबहुना केवळ याच संस्कारांकरितां हे विषय शिकवावयाचे असतील, आयुष्यांत इतर बाबतींत त्यांचा उपयोग नसेल तर ते शिकविण्याची आवश्यकता नाहीं. हेच संस्कार घडवून आणणारे परंतु अधिक उपयुक्त असे विषय शिकविले तरी चालतील. हा सिद्धांत प्रस्थापित झाल्यामुळें पूर्वीं आवश्यक समजले गेलेल्या लॅटिन, गणित यांसारख्या आवश्यक विषयांचें आसन डळमळीत झालें. यांपेक्षां अधिक उपयोगी विषय काय आहेत ते शोधण्याकडे शिक्षणशास्त्रज्ञांचें लक्ष लागलें. शिक्षणशास्त्राचा

अभ्यास आपल्याकडे अधिक झाला तर संस्कृत व गणित यांसारख्या विषयांना आज आवश्यक व अढळ स्थान आहे तें ऐच्छिक होईल. मग सामान्य विद्यार्थ्यांची आज जी कुचंबणा होत आहे ती होणार नाहीं.

## नवीन शिक्षणतत्त्वाचा शोध

जुन्या विषयांचें आसन डळमळीत झाल्यावर नवीन विषय काय घ्यावेत याचा विचार होऊं लागला. व्यक्तीला व समाजाला उपयुक्त होईल असें शिक्षण द्यावें हें तत्त्व प्रस्थापित झालें. वैयक्तिक विकास आणि समाजधारणा या दोन्ही दृष्टीनीं प्रयोग करून नवीन शैक्षणिक वेदांत निर्माण करण्याचें श्रेय जॉन् ड्यूई नांवाच्या महर्षीकडे आहे. हा कोलंबिया विद्यापीठांत तत्त्व-ज्ञानाचा अध्यापक होता. तें काम सोडून त्यानें कांहीं वर्षे एका प्राथमिक शाळेंत शिकविण्यांत व प्रयोग करण्यांत घालविलीं, आणि या प्रयोगांतून नवीन विचारप्रणाली निर्माण केली. तिचा परिणाम आज सर्व अमेरिकेच्या व जगाच्या शिक्षणावर झालेला आहे. या विचारपद्धतीला व्यक्तिसमाज–समन्वयवादी शिक्षणपद्धति असें नांव देतां येईल.

## शाळा हाच समाज आहे

शिक्षणांत मुख्य अडचण असते ती अशी : मुलांना खेळणें व क्रियात्मक व्यवसाय यांची हौस असते, प्रस्तुत कालापलीकडे उद्यांच्या गरजा त्यांना दिसत नाहीत. उलट शिक्षकाचा उद्देश उद्यांच्या सामाजिक गरजा काय असतील त्या लक्षांत घेऊन मुलांना शिकविणें हा असतो. यामुळें विद्यार्थी व शिक्षक यांच्यांत एक अखंड झगडा चालू असतो. हा अनादि–अनंत कलह ड्यूईनें नाहींसा केला. शाळा हाच एक समाज आहे असें धरून चाला, या समाजांत चांगल्या तऱ्हेनें कसें राहावें हें विद्यार्थ्यांना शिकवा म्हणजे भावी आयुष्यांत ते मोठ्या समाजांत आपोआपच चांगल्या तऱ्हेनें राहतील. शाळा हा एक समाज आहे या दृष्टीनें तिची संघटना केली म्हणजे या शालेय जीवनांत असे असंख्य प्रसंग येतात कीं ते विद्यार्थ्यांना खेळ म्हणून वाटतात, आणि शिक्षकांना त्यांचे आधारानें जरूर तें शिक्षणही देतां येतें. समाजांत वागतांना जे अनुभव लागतात, जे गुण व ज्या मनोवृत्ती लागतात त्या सर्वांची वाढ या शालेय समाजांत केली म्हणजे तिचा पुढें मोठ्या समाजांत उपयोग

होईल. शाळा ही समाजापासून अलग आहे असें समजूं नका. समाजाची प्रतिकृति शाळेंत निर्माण करा आणि त्यांत विद्यार्थ्यांना प्रसंगोपात्त निरनिराळे व्यवसाय हौसेनें करूं द्या, म्हणजे शाळा व समाज यांतील विरोध नाहींसा होऊन शिक्षण हें समाजधारणेला उपकारक बनेल, आणि बालकांना व विद्यार्थ्यांनाही त्यांच्या नैसर्गिक खेळकर मनोवृत्तींचें संगोपन होतां होतां शिक्षण मिळेल. जॉन् ड्यूईच्या अशा या विचारसरणीनें अमेरिकन शिक्षणाचें लक्ष समाजाकडे वळलें.

## समाजाच्या गरजा व अभ्यासक्रम

अमेरिकेची समाजविषयक कल्पना तिच्या शिक्षणक्रमांत प्रतिबिंबित झालेली आहे. समाज हा गतिमान व प्रगतिप्रवण आहे. त्यांत एकसारखी उत्क्रांति होत असते. समाजाच्या गरजा बदलत असतात तसतशा समाज-संस्थाही बदलतात. हें परिवर्तन एकसारखें चालूं आहे. त्यांत सनातनत्व नसून उत्क्रांतिशीलता आहे. समाजाची आर्थिक घडी बदलत आहे. राज-कीय परिस्थिति बदलत आहे. सामाजिक संस्था बदलत आहेत. हा बदल होतो त्याप्रमाणें समाजाच्या गरजाही बदलत आहेत. अशा या बदलत्या समाजाला अनुरूप असा अभ्यासक्रम आंखावयाचा असेल तर त्या अभ्यासक्रमांतही परिवर्तनशीलता व उत्क्रांतिशक्यता पाहिजे. एकदां आंखलेला अभ्यासक्रम पंचवीस तीस वर्षे चालणें शक्य नाहीं. प्रत्येक पिढीच्या गरजा बदलत असतात त्याप्रमाणें त्या पिढीच्या अभ्यासक्रमांत बदल झाला पाहिजे. एकच अभ्यास-क्रम आजा–बाप–नातू अशा तीन पिढ्यांना चालणें शक्य नाहीं. त्याचा समाजाला उपयोग होणार नाहीं. त्याचप्रमाणें एका विवक्षित समाजाकरितां आंखलेला शिक्षणक्रम दुसऱ्या समाजाला उपयोगी पडेलच असें नाहीं. प्रत्येक समाजानें व पिढीनें आपापल्या गरजा, परिस्थिति व ध्येय ओळखून त्याप्रमाणें आपला शिक्षणक्रम आंखला पाहिजे. या तत्त्वाचा परिणाम अमेरिकन शिक्षणावर फार झालेला आहे. शिक्षणक्रम व अभ्यासक्रम यांच्या योजना व तपशील ठरविण्याकरितां आज त्या देशांत जितकें मनुष्यबळ व द्रव्य खर्च केलें जात आहे तितकें अन्यत्र खर्च होत नाहीं. प्रत्येक प्रांत, शहर, विद्यापीठ व प्रायोगिक शिक्षणसंस्था यांचीं अभ्यासक्रममंडळें स्थापन झालेलीं आहेत.

तीं कायम स्वरूपाचीं आहेत. आपल्या शिक्षणक्रमांत एकसारखी सुधारणा व पुनर्घटना काय पाहिजे या दृष्टीनें त्यांचा विचार व संशोधन चालू असतें. रॉचेस्टर नांवाच्या एका शहरांतील शिक्षण-समितीनें आपल्या शहरांतील शाळांच्या शिक्षणक्रम–पुनर्घटनेकरितां एक मंडळ नेमलें होतें. या मंडळाचे आठदहा ग्रंथ बाहेर पडले असून प्रत्येक ग्रंथ दोनशें ते पांचसहाशें पानांचा आहे. हें सर्व सांगण्याचा उद्देश इतकाच कीं समाज व शिक्षणक्रम यांचा अत्यंत निकट संबंध आहे. प्रत्येक समाजानें आपल्या गरजांना अनुलक्षून शिक्षणक्रमाची पुनर्घटना करावी, ही सुधारणा एकसारखी होत राहावी, व त्याकरितां समाजानें द्रव्यबळ व मनुष्यबळ देण्यास तयार व्हावें. चार तज्ज्ञांनीं शिक्षणक्रम आंखला, आणि विद्याखात्यानें तो शाळांवर लादला तर तो फक्त परीक्षा पास होण्याला उपयोगी पडेल. समाजाला उपयोगी पडणार नाहीं.

शिक्षणाचा, अभ्यासक्रमाचा व इतर तपशिलांचा विचार करतांना अनेक समाजविषयक प्रश्न उभे राहतात व त्यांची छाप शिक्षणावर पडते. या दृष्टीनें अमेरिकन शिक्षणाची सामाजिक व वैचारिक पार्श्वभूमि काय आहे याची कल्पना वाचकांना आलीच असेल. ती लक्षांत घेऊन इतर तपशिलां-कडे पाहिलें म्हणजे त्यांची उपपत्ति कळते व चांगला बोध होतो.

## प्राथमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम

प्राथमिक शाळा पूर्वी आठ वर्षांची असे. अलीकडील पुनर्घटनेप्रमाणें ती सहा वर्षांची झाली असून, वरचीं दोन वर्षें व हायस्कूलच्या चार वर्षांपैकीं एक वर्ष घेऊन तीन वर्षांचें ज्यूनियर हायस्कूल झालेलें आहे. शहरांतील शाळांतून प्रत्येक वर्गाला एक शिक्षक याप्रमाणें योजना आहे. परंतु ग्रामीय शाळा लहान लहान असल्यामुळें एकेका शिक्षकाचे हाताखालीं चार वर्ग असतात. त्यापेक्षां मोठ्या शाळांतून एका शिक्षकाचे हाताखालीं दोन वर्ग असतात. वर्गांत तीस ते चाळीस इतकी मुलांची संख्या असते. हायस्कूलच्या शिक्षणानंतर तीन वर्षें ट्रेनिंग घेतलेल्या किंवा शिक्षणशास्त्र घेऊन पदवीधर झालेल्या शिक्षकांची नेमणूक शाळांवर होते. बहुसंख्य शिक्षक स्त्रिया आहेत. पुरुष फार क्वचित्. शाळेची वेळ सामान्यपणें आठ किंवा नऊपासून दोन किंवा तीनपर्यंत असते.

सर्व विषयांकरितां एकाच शिक्षकाची योजना असते. बहुतेक प्राथमिक शाळांतील आणि विशेषतः खालचे वर्गांतील शिक्षण योजनापद्धतीनें (प्रोजेक्ट मेथड) किंवा या पद्धतीमधील मुख्य तत्त्वांकडे लक्ष ठेवून दिलें जातें. व्यवसाय आणि क्रिया यांचेवर विशेष भर असतो. प्रत्येक विषय स्वतंत्रपणें न शिकवितां त्यांचें प्रसंगोचित मिश्रण केलें जातें. एकाद्या नवीन पद्धतीच्या प्राथमिक शाळेंत प्रवेश केला तर असें दृश्य दिसेल कीं मुलें अनेक व्यवसाय करीत बसलेलीं आहेत. चित्रें रंगविणें, संवादाचें पाठांतर, नाट्यप्रयोगाकरितां कपडे तयार करणें, गायन, गोष्टी सांगणें किंवा ऐकणें, ठोकळ्यांचीं घरें करणें, पोस्ट ऑफिस, सर्कस, दुकानदारी अशा प्रकारचे खेळ खेळणें, प्रयोगशाळा, ग्रंथालय, कारखाना यांतील कामें, इत्यादि अनेक व्यवसाय शाळेंत चाललेले दिसतात. मुलें आपल्या बाकांवर मुकाट्यानें बसलीं आहेत व शिक्षक पाठ देत आहेत असें दृश्य क्वचितच दिसतें. वर्गातील बाकें बाजूला ठेवून मधली जागा मुलांच्या हालचालीकरितां मोकळी ठेविलेली असते. मिळविलेल्या ज्ञानाला संघटित स्वरूप देऊन त्याची उजळणी करण्याकरितां स्वतंत्र तास असतात. कांहीं शाळा जुन्या पद्धतीचें वेळापत्रक व योजनापद्धति या दोहींचें मिश्रण करितात. अध्यापनांत प्रत्यक्ष वस्तूंचा व क्रियेचा अधिक उपयोग केला जातो.

## अभ्यासाचे विषय

प्रत्येक संस्थानांत स्वतंत्र विद्याखातें, आणि प्रत्येक जिल्हा व शहर यांचीं निराळीं शिक्षणाचीं खातीं असल्यामुळें अभ्यासक्रम व वेळापत्रक यांचे बाबत पुष्कळ विविधता आहे. एकच अभ्यासक्रम व वेळापत्रकाची योजना सर्वत्र सांपडत नाहीं. साधारणपणें प्राथमिक शाळांतून पुढील विषय शिकविले जातात--

मातृभाषा, वाचन, शुद्धलेखन व हस्ताक्षर.
गणित व विज्ञान.
इतिहास, भूगोल व नागरिक शास्त्र.
आरोग्यशास्त्र, व शारीरिक शिक्षण.
चित्रकला, हस्तव्यवसाय व संगीत.

वरील विषय सामान्यपणें सर्वच शाळांतून शिकविले जातात. परंतु स्थानिक जरूरी किंवा साधनांची अनुकूलता असल्यास इतरही अनेक विषयांचा यांत समावेश होऊं शकतो. शुद्ध वाणीचें शिक्षण, वाङमय, व्याकरण, समाजविषयक अभ्यास, नागरिक कर्तव्यें, सृष्टिशास्त्र, रंगकला, गृहशास्त्र, विविध हस्तव्यवसाय वगैरे विषयही प्राथमिक अभ्यासक्रमांत येतात.

या सर्व अभ्यासक्रमाच्या शिक्षणामध्यें केवळ विषयावर व ज्ञानावर लक्ष न देतां बालकाच्या मनोविकासाकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे अशा प्रकारची विचारसरणी दिवसेंदिवस वाढत आहे. "चाइल्ड सेंटर्ड स्कूल" व "चाइल्ड सेंटर्ड करिक्युलम्" हे शब्दप्रयोग अमेरिकन शिक्षकाच्या कानांवर एकसारखे आदळत असतात.

## मुलांची वर्गवारी

शाळांमध्यें विद्यार्थ्यांची संख्या मोठी असल्यानें प्रत्येक यत्तेचे अनेक वर्ग असतात, म्हणून मुलांची वर्गविभागणी केली जाते. कांहीं ठिकाणीं ही बौद्धिक दर्जाप्रमाणें (इंटेलिजन्स कोशंट किंवा आय्. क्यू.) केली जाते. या वर्गवारीची जाणीव मुलांना किंवा पालकांना होऊं देत नाहींत. अलीकडे केवळ बुद्धीच्या तत्त्वावर होणारी वर्गवारी शिक्षणतज्ज्ञांना मान्य नाहीं, म्हणून मिश्र वर्ग होऊं लागले आहेत. एकजात सर्वच विषयांकरितां हुषार, मध्यम व मंद अशी वर्गवारी न करतां प्रत्येक विषयाकरितां ही वर्गवारी केली जाते. प्रत्येक मुलगा एकाद्या तरी विषयांत हुषार असतो त्याचा फायदा त्याला मिळतो. सर्वच विषयांत मंद असा शिक्का त्याचे कपाळावर पडत नाहीं.

## दुय्यम शिक्षणाचा अभ्यासक्रम

चार वर्षांचें हायस्कूल व सहा वर्षांचें हायस्कूल असे दोन प्रकार अमेरिकेंत आहेत. सहा वर्षांचे योजनेंत ज्यूनियर व सीनियर असे तीन तीन वर्षांचे विभाग केलेले असतात. ही विभागणी केवळ कारभाराच्या सोयीकरितां नाहीं. मानसशास्त्र व शिक्षणशास्त्र यांचे तत्त्वावर ती आधारलेली आहे. तेरा ते पंधरा वर्षांचीं मुलें हीं वय, आरोग्य, आणि मानसिक, बौद्धिक व शारीरिक वाढ इत्यादि दृष्टींनीं लहान व मोठया मुलांमुलींपेक्षां थोडीं निराळीं

असतात. या वेळीं त्यांच्या मानसिक व शारीरिक वाढींत फरक होत असतो. प्राथमिक शाळेंतून हायस्कूलच्या नवीन वातावरणांत ते आलेले असतात. अशा वेळीं त्यांच्या नैसर्गिक वाढीला व प्रवृत्तींना पोषक असें वातावरण असणें जरूर आहे. म्हणून ज्यूनियर हायस्कूलची योजना झालेली आहे. सीनियरपेक्षां ज्यूनियर हायस्कूलमध्यें हस्तव्यवसाय, कला, अभ्यासेतर चळवळी, शिक्षकांशीं निकट संबंध, बौद्धिक व औद्योगिक मार्गदर्शनाची व्यवस्था, विषयांची विविधता या गोष्टी विशेष असतात. सीनियर हायस्कूलमध्यें गेल्यानंतर विद्यार्थी कॉलेजची, औद्योगिक शिक्षणाची, किंवा उद्योगधंद्यांत पडण्याची तयारी अधिक निश्चितपणानें करीत असतो. त्याला इतर गोष्टींकडे लक्ष देण्यास फारशी सवड नसते. वयानेंही तो प्रौढ झालेला असतो. म्हणून हायस्कूलमध्यें दोन विभाग पाडले जातात.

## शिक्षणाचीं ध्येयें

शिक्षणाचीं ध्येयें काय असावींत या दृष्टीनें शिक्षणतज्ज्ञांनीं पुष्कळ विचार केला आहे. दुय्यम शिक्षणाचे दृष्टीनें ध्येयांची निश्चिति करण्याकरितां ‘ राष्ट्रीय शिक्षण सभेनें ’ (नॅशनल एज्युकेशन् असोसिएशन्) एक मंडळ नेमलें होतें. ‘ दुय्यम शिक्षण पुनर्घटना मंडळ ’ (कमिटी ऑन् दि रीऑर्गनायझेशन ऑफ सेकंडरी एज्युकेशन) असें त्याचें नांव होतें. या मंडळानें १९१८ सालीं आपला अहवाल तयार करून दुय्यम शिक्षणाच्या ध्येयांना निश्चित स्वरूप दिलें. या ध्येयप्रणालीचा परिणाम अमेरिकन हायस्कूलच्या शिक्षणक्रमावर पुष्कळ झालेला आहे. प्रत्येक विषयाचा किंवा ज्ञानाचा शिक्षणक्रमांत समावेश करतांना या ध्येयांची कसोटी उपयोगांत आणतां येते. “ दुय्यम शिक्षणाचीं आद्य तत्त्वें ” (कार्डिनल प्रिन्सिपल्स ऑफ सेकंडरी एज्युकेशन) या नांवानें हीं ध्येयें प्रसिद्ध आहेत :

(१) आरोग्य ; (२) आवश्यक ज्ञान व कलासंग्रह ; (३) सात्त्विक कौटुंबिक जीवन ; (४) उद्योगधंद्याचें ज्ञान ; (५) नागरिकत्वाची जाणीव ; (६) स्वतंत्र वेळेचा योग्य उपयोग करण्याची पात्रता व (७) नीति व चारित्र्य.

अभ्यास व शिक्षणक्रम तयार करण्याचें एक पद्धतशीर शास्त्रच अमेरिकेनें निर्माण केलेलें आहे. ज्या समाजांत शाळा आहे त्या समाजाची जरूरी,

ज्या व्यक्तींना शिक्षण द्यावयाचें त्यांची जरूरी व पात्रता, आणि शैक्षणिक तत्त्वज्ञान या तिन्ही गोष्टी जमेस धरून अभ्यासक्रमाचे तपशील आंखले जातात. विषयांचीं नांवें वरवर एकसारखींच दिसलीं तरी त्यांतील तपशिलाची मांडणी प्रत्येक संस्थानांत निराळ्या प्रकारानें केलेली असते.

## आवश्यक व ऐच्छिक विषय

अभ्यासक्रमाचे विषयांत आवश्यक व ऐच्छिक असे दोन भाग असतात. विद्याखात्यानें कांही विषय आवश्यक ठेविलेले असतात. हे प्रत्येक संस्थानांत निराळे आहेत. साधारणपणें इंग्लिश, अमेरिकन इतिहास व शारीरिक शिक्षण हे तीन विषय सर्वत्र आवश्यक ठेवितात. ऐच्छिक विषय हे शाळेच्या साधनांवर व विद्यार्थ्यांच्या भावी उद्देशांवर अवलंबून असतात. साधारणपणें वाङमयात्मक, व्यापारी, औद्योगिक, शेतकीविषयक आणि कलाविषयक असे शिक्षणक्रमांचे स्थूल विभाग करतां येतील. विद्यार्थ्यानें आपल्या भावी शिक्षणाचे किंवा उद्योगधंद्याचे दृष्टीनें यांतील कोणताही विभाग निवडावा, किंवा अनेक ऐच्छिक विषय असतात त्यांतून स्वतःला उपयोगी अशा विषयांचा शिक्षणक्रम तयार करून घ्यावा. शहरांतील शाळा अनेक विषयांची सोय करूं शकतात. खेड्यांतील शाळेंत थोडे विषय असतात.

## अभ्यासक्रमाचा नमुना

सेंट लुईस हें मध्यम आकाराचें शहर आहे. तेथील विद्याखात्यानें आपल्या शाळांचा शिक्षणक्रम आंखतांना त्याचे उद्देश दिले आहेत ते असे—

" सर्व विद्यार्थ्यांना उदार आणि व्यापक शिक्षण देणें हा दुय्यम शाळांचा उद्देश आहे ; शिवाय, ज्यांची इच्छा असेल त्यांना विशिष्ट क्षेत्रांतील शिक्षण देणें, आणि ज्यांना कॉलेजमध्यें जावयाचें असेल त्यांची तिकडे जाण्याची तयारी करणें हाही या शिक्षणाचा उद्देश आहे. "

या शहरांतील शाळांत पुढील विषयांची सोय आहे—

**इंग्लिश**

**समाजशास्त्रें**—नागरिक नीतिशास्त्र, भूगोल, यूरोपचा इतिहास, अमेरिकेचा इतिहास, अर्थशास्त्र, समाजशास्त्र.

**गणित**—बीजगणित ( प्राथमिक व उच्च ), भूमिति, त्रिकोणमिति.

**परदेशी भाषा**—फरेंच, जर्मन, ग्रीक, लॅटिन, स्पॅनिश, हीब्रू.

**भौतिक शास्त्रें**—सामान्य विज्ञान, जीवनशास्त्र, रसायन, फिजिक्स्, प्राकृतिक भूगोल.

**ललित आणि औद्योगिक कलाः**—चित्रकला, गृहजीवनशास्त्र, हस्त-व्यवसाय (सुतार व लोहकाम), यंत्रशास्त्राची रेखाकला, संगीत.

**व्यापारी विषय**—प्राथमिक व्यापारी शिक्षण, जमाखर्चपद्धति, लघुलिपीलेखन, मुद्रालेखन, व्यापारी कायदा, अर्थशास्त्र.

वरील अभ्यासक्रमांतील सर्व विषयांची संख्या तीस ते पसतीस इतकी भरेल. यांपैकीं इंग्लिश, इतिहास (अमेरिका व यूरोप), भौतिक शास्त्रां-पैकीं एक विषय आणि शारीरिक शिक्षण हे विषय सर्वांना आवश्यक असून बाकीचे विषय विद्यार्थ्यांनीं आपल्या जरूरीप्रमाणें घ्यावयाचे असतात. यांत विद्यार्थ्यांचे चार गट पडतात. कॉलेजकडे जाणारे, उच्च औद्योगिक किंवा व्यापारी शिक्षण घेऊं इच्छिणारे, शिक्षण संपल्यानंतर उद्योगधंद्यांत पडणारे, किंवा सर्वसामान्य संस्कारांचे दृष्टीनें शिक्षण घेणारे. आपापल्या सोयीप्रमाण ते ऐच्छिक विषय निवडतात.

शहरांतील मोठ्या शाळांत ऐच्छिक विषयांची संख्या अधिक असते, आणि ग्रामीय किंवा लहान शहरांतील शाळांत विषयांची संख्या थोडी असते. कितीही लहान शाळा असली तरी तींत अभ्यासक्रमाचे किमान चारपांच प्रकार जरूर असतात—कॉलेजप्रवेश, व्यापारी, औद्योगिक, कलात्मक आणि शेतकीविषयक. खेड्यांतील हायस्कूलमध्यें शेतकीचे विषय व तदंगभूत शास्त्रें शिकविलीं जातात. कांहीं विषय शिकविण्याकरितां शिक्षक मिळणें शक्य नसतें तेथें अनेक गांवांना मिळून एक फिरता शिक्षक असतो. तो आठवड्यांतून एक तास घेऊन बाकीचा अभ्यास नेमून देतो. अशा परिस्थितींत टपालद्वारें अभ्यासक्रमांचा (कॉरस्पॉडन्स कोर्सेस्) प्रचारही बराच होत आहे.

## प्रवेशपरीक्षांचे विषय

गेल्या दोन पिढ्यांमध्यें जुने विषय मागें पडून नवीन विषय अधिक लोकप्रिय होऊं लागले आहेत असें दिसून येतें. १९२२ सालीं या दृष्टीनें पाहणी झाली तींत असें दिसून आलें कीं गणित आणि प्राचीन भाषा घेणारांचें प्रमाण

कमी झालें ; परंतु भौतिक शास्त्रें, समाजविषयक अभ्यास, आणि ललित व औद्योगिक कला हे विषय घेणारांचें प्रमाण पुष्कळ वाढलें.

कॉलेजच्या प्रवेशपरीक्षेकरितां प्रत्येक विद्यापीठाचे निरनिराळे विषय असतात. कांहीं प्रसिद्ध विद्यापीठांच्या प्रवेशपरीक्षांचे विषय पुढें दिले आहेत—

कोलंबिया—इंग्लिश, परदेशी भाषा, गणित, इतिहास, विज्ञान.

हारवर्ड—इंग्लिश, लॅटिन, दुसरी भाषा, गणित, इतिहास, विज्ञान.

डार्टमथ—इंग्लिश, गणित, इतिहास, परदेशी भाषा.

येल—इंग्शिल, लॅटिन, परदेशी भाषा, गणित इ.

कॉर्नेल—इंग्लिश, दोन परदेशी भाषा, गणित, इतिहास.

कांहीं विद्यापीठें वाङमयात्मक व विज्ञानात्मक अभ्यासक्रम घेणारांकरितां प्रवेशपरीक्षेला निरनिराळे विषय ठेवितात. टेक्नॉलॉजिकल इन्स्टिटयूटस् या विज्ञान व गणितावर विशेष भर देतात. ज्या विद्यार्थ्यांना विद्यापीठशिक्षणाकडे जावयाचें नाही त्यांना शाळेकडून शिक्षणक्रम पूर्ण झाल्याचें शिफारसपत्र दिलें जातें. त्यामुळें व्यापारी किंवा कलात्मक व्यवसायाकडे जाणारांना लॅटिन व गणित यांसारखे विषय न घेतांही दुय्यम शिक्षण पूर्ण करतां येतें.

## वर्गसंक्रमणपद्धति

अमेरिकन शाळांत वर्गसंक्रमण दर सहा महिन्यांनीं होतें. कांहीं शहरांतून तें दर तिमाहीला देखील होतें. त्यामुळें ज्यांचा अभ्यास झालेला आहे तीं मुलें वर जातात. ज्यांचा झालेला नाहीं त्यांना पुनः एक वर्षभर त्याच विषयाचा अभ्यास करावा लागत नाही; सहा महिन्यांनीं पुनः परीक्षा देतां येते.

## अभ्यासक्रमांतील सूत्रबद्धता

अमेरिकन शाळांतील अभ्यासक्रमाचें स्थूल स्वरूप दिलेलें आहे त्यावरून वैयक्तिक अभिरुचीला त्यांत किती वाव ठेविलेला आहे तें लक्षांत येईल. या सर्व विषयांच्या गर्दींत विद्यार्थी आपला शिक्षणक्रम कसा निवडूं शकेल असा प्रश्न उत्पन्न होतो. या प्रश्नाचें उत्तर म्हणूनच शैक्षणिक मार्गदर्शनाची पद्धति अमेरिकेंत प्रसार पावत आहे. विद्यार्थ्याला सल्लामसलत देण्याकरितां एक शिक्षक नेमला जातो त्याला विचारून मुलगा आपला अभ्यासक्रम

सुसूत्रपणें आंखूं शकतो. प्रत्येक हायस्कूलचें एक लहान अभ्यासपत्रक असतें. आपल्या जरूरीप्रमाणें कोणते विषय निवडावेत याची माहिती त्यांत विद्यार्थ्यां-करितां दिलेली असते. इतकी सर्व योजना असली तरी अमेरिकन अभ्यास-क्रमांत विस्कळितपणा फार येतो असा आक्षेप त्यावर घेतला जातो व त्यांत थोडें तथ्यही आहे. विषयांची संख्या वाढविण्याच्या भरांत अभ्यासक्रमांत एकसूत्रता आणि अखंडता राहात आहे कीं नाहीं इकडे शिक्षणाधिकाऱ्यांचें लक्ष आजपर्यंत गेलें नव्हतें. आतां हा दोष दूर करण्याचे दृष्टीनें त्यांचे प्रयत्न चालूं आहेत.

## अध्यापनपद्धति

प्रसंग–पद्धति (प्रोजेक्ट मेथड) व स्वाध्याय–पद्धति (डाल्टन मेथड) या शिक्षणक्षेत्रांतील सर्वमान्य व प्रमुख अशा अध्यापन–पद्धती आहेत. या दोहींचाही जन्म अमेरिकेंतच झालेला आहे. यांखेरीज इतर अनेक पद्धतींचीं नांवें ऐकूं येतात. परंतु थोड्याफार फरकानें त्या सर्वांच्या मुळांशीं असलेलीं तत्त्वें सारखींच आहेत. या तत्त्वांचा एकदां बोध झाला म्हणजे पद्धतीच्या नांवांत कांहीं विशेष नाहीं हें समजून येईल. आपल्याकडील शिक्षणक्षेत्रां-तील कार्यकर्त्यांनीं या नांवांचे मागें फारसें लागूं नये, व त्या पद्धती मूळ स्वरूपांत येथें आणण्याचाही प्रयत्न करूं नये. कारण दोहींकडील परिस्थिति अगदीं निराळी आहे. उपलब्ध साहित्यसामुग्री, शिक्षकाची तयारी इत्यादि दृष्टींनीं आपल्या व त्या देशांत फार फरक आहे. एकाद्या श्रीमंत शाळेंत चार सुखवस्तू पालकांच्या मुलांकरितां त्या पद्धतींचा मूळ स्वरूपांत उपयोग होऊं शकेल. परंतु बहुजनसमाजाचे असंख्य विद्यार्थ्यांना शिक्षण देणाऱ्या गरीब सार्वजनिक शाळांनीं या शिक्षणपद्धतींच्या फक्त तत्त्वांचें अनुकरण करावें; तपशील येथील परिस्थिति व उपलब्ध साहित्यसामुग्री ध्यानांत धरून ठरवावा.

## अध्यापनांतील मुख्य तत्त्वें

लहान मुलांची व विद्यार्थ्यांची प्रवृत्ति क्रियाप्रधान व खेळकर असते. त्यांना हालचाल व कांहीं तरी व्यवसाय केल्याशिवाय स्वस्थ बसवत नाहीं किंबहुना प्रत्येक जीवाची ही प्रवृत्ति असते ती आपण कृत्रिम शिक्षणानें मारतों

न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः॥

हा गीतेंतील सिद्धांत शिक्षणशास्त्रांतही सत्य आहे. "देवासारखें स्वस्थ बसा" असें मुलांना सांगणें म्हणजे त्यांच्या नैसर्गिक प्रवृत्तीच्या विरुद्ध जाण्यासारखें आहे. म्हणून अध्यापनपद्धतींत क्रिया व हस्तव्यवसाय यांना स्थान असावें. हे व्यवसाय करतां करतां शिक्षण व्हावें. असे व्यवसाय क्रियात्मक असतील किंवा बौद्धिक स्वरूपाचेही असतील. मुलांच्या विकासाला व प्रवृत्तीला धरून ते असावेत. निरीक्षण, श्रवण, संवाद, हस्तव्यवसाय इत्यादि इंद्रियांनीं करण्याच्या यथाशक्य क्रियांचा उपयोग या नवीन शिक्षणपद्धतींत केला जातो. जुन्या शिक्षणपद्धतीत फक्त वाचन, लेखन व श्रवण याच गोष्टींचा उपयोग होत असे. उलट क्रियाप्रधानता हा या नवीन शिक्षणपद्धतीचा विशेष भाग आहे.

ज्ञानाचा उगम व्यक्तीच्या ठिकाणी, तिच्या स्वतःच्या अनुभवांत व प्रयत्नांत आहे, हें दुसरें तत्त्व या पद्धतीच्या मुळाशीं आहे.

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विदन्ति॥

कर्माचा अनुभव घेतां घेतां व्यक्तीच्या ठिकाणीच ज्ञान निर्माण होतें. त्यामुळें वाचन, लेखन, निरीक्षण, विचार, प्रयोग इत्यादि जबाबदारी मुख्यतः विद्यार्थ्यावर असते. शिक्षकानें फक्त मार्गदर्शनाचें काम करावयाचें असतें. जुन्या पद्धतीत शिक्षकानें ज्ञान द्यावें आणि विद्यार्थ्यानें तें घ्यावें अशी कल्पना असे. नवीन अध्यापनपद्धतीत विद्यार्थी स्वतःच ज्ञान मिळवीत असतात.

ज्ञानार्जनाची गति प्रत्येक व्यक्तीची निरनिराळी असते. सर्वांची बुद्धि सारखी नसते. सैन्यांतील शिपाई 'राइट लेफ्ट' करीत एका ओळींत पावलें टाकून 'मार्च' करीत असतात त्याप्रमाणें वर्गांत विषय शिकतांना विद्यार्थ्यांना बौद्धिक 'मार्च' करणें शक्य नाही. प्रत्येकाच्या आकलन, धारणा, स्मरण इत्यादि मानसिक शक्तींचें प्रमाण निरनिराळें असतें. म्हणून प्रत्येकाला आपापल्या गतीनें जाऊं द्यावें. सर्वांनीं एकाच गतीनें गेलें पाहिजे अशी सक्ति करूं नये. हुषार विद्यार्थ्यांनीं जलद जावें, मंद विद्यार्थ्यांनीं मंद जावें. प्रत्येकानें

आपापल्या गतीची पराकाष्ठा करावी. हें तिसरें तत्त्व या नवीन अध्यापन-पद्धतींच्या मुळांशीं आहे.

## स्वाध्याय-तत्त्वाचा प्रसार

या नवीन शिक्षणपद्धतींचा प्रसार प्राथमिक शिक्षणापासून कॉलिज-शिक्षणापर्यंत थोड्याफार प्रमाणांत झालेला आहे. प्राथमिक शाळांतून 'प्रसंग पद्धति' (प्रोजेक्ट मेथड) ही आतां सर्वमान्य झालेली आहे. दुय्यम शिक्षणांत 'स्वाध्याय पद्धति' (डाल्टन् मेथड) सर्वत्र प्रचारांत नसली तरी तिच्या मुळाशीं असलेल्या तत्त्वांचा उपयोग पुष्कळ ठिकाणीं केला जातो. कॉलेजमध्यें व्याख्यानपद्धति कमी कमी होत चालली आहे. विद्यार्थी व अध्यापक यांच्यांत चर्चा, विद्यार्थ्यांनीच स्वतः तयारी करून विषय मांडणें, निबंध वाचणें, प्रत्यक्ष समाजांत किंवा वर्गाबाहेर इतरत्र जाऊन निरीक्षण, संवाद व अनुभव या मार्गांनीं माहिती मिळविणें इत्यादि पद्धतींचा उपयोग केला जातो. अध्यापकांनीं स्वतः नोट्सचीं पुस्तकें वाचून विद्यार्थ्यांना वर्गांत 'नोट्स्' टिपून द्यावयाच्या आणि त्या विद्यार्थ्यांनीं घोकून परीक्षेंत पास व्हावयाचें ही पद्धति तिकडे फारशी दिसत नाहीं. विद्यार्थ्याला स्वतःला बराचसा अभ्यास करावा लागतो. नवीन दिशा दाखविणें, विचार सुचविणें, संदर्भ-ग्रंथांची यादी देणें, स्वतः शोधून काढलेले सिद्धांत मांडणें इत्यादि कामें अध्यापक करीत असतात. त्यामुळें पदवी घेऊन बाहेर पडलेल्या विद्यार्थ्याला स्वतंत्र विद्याव्यासंगाची आवड व संवय लागलेली असते. आपल्या कॉलेज-मधील अध्यापनपद्धतींत या दृष्टीनें सुधारणा होणें जरूर आहे. केवळ व्याख्यान पद्धतीनें किंवा नोट्स् टिपून देऊन शिकविण्याची पद्धति थांबविली पाहिजे, आणि वाचन, चर्चा, विचार, व निरीक्षण यांची अधिक जबाबदारी विद्यार्थी-वर्गावर टाकली पाहिजे. अध्यापकांनीं स्वतंत्र अभ्यास करून नवीन नवीन सिद्धांत विद्यार्थ्यांपुढें मांडले पाहिजेत. असें झालें तर खरे सुशिक्षित पदवीधर कॉलेजमधून बाहेर पडतील.

## अभ्यासेतर चळवळी

शाळा म्हणजे केवळ बौद्धिक शिक्षणाचें स्थान अशी अमेरिकन शिक्षणाची कल्पना नाहीं. विद्यार्थ्यांची सार्वांगिक वाढ होऊन समाजांत राहण्याला

तो अष्टपैलू असा तयार झाला पाहिजे, या गोष्टीवर विशेष भर आहे. त्याकरितां प्रत्येक संस्थेंत अभ्यासाव्यतिरिक्त विद्यार्थ्यांच्या चळवळी पुष्कळ चालू असतात आणि त्यांना अधिकाऱ्यांकडून उत्तेजन दिलें जातें. प्रत्येक विद्यार्थ्याचे ठिकाणीं कांहीं तरी विशिष्ट गुण सुप्तावस्थेंत असतो. तो कोणता आहे तें शोधून काढण्याची संधि त्याला शाळेनें दिली पाहिजे. कांहीं विद्यार्थ्यांचें तेज बौद्धिक क्षेत्रांत पडेल, तर कांहींचें तेज कलांच्या क्षेत्रांत पडेल. कांहीं विद्यार्थी हस्तव्यवसायांत पुढें येतील तर कांहीं विद्यार्थी व्यावहारिक बुद्धीचे असतील. या सर्वांना आपापले बुद्धीप्रमाणें कार्य करितां येईल इतक्या विविध चळवळी शाळेमध्यें चाललेल्या असतात. विद्यार्थ्यांचीं मंडळें, संघ, सभा इत्यादि विविध संघटना किती निरनिराळ्या विषयांकरितां असूं शकतात व त्यांचा शिक्षणाचे दृष्टीनें किंवा भावी व्यवसायाचे दृष्टीनें कसा उपयोग करून घेतला जातो तें पाहण्यासारखें आहे.

अमेरिकेंत अभ्यासाइतकेंच महत्त्व या अभ्यासाबाहेरच्या चळवळींना दिलें जातें. एका मोठ्या हायस्कूलमधील विद्यार्थ्यांच्या संघटनांची योजना पुढीलप्रमाणें होती—

१ साठ मुलांचा ऑर्केस्ट्रा, २ कोरस, ३ चेंबर म्यूझिक ग्रूप, ४ रसायनशास्त्रमंडळ, ५ विज्ञान मंडळ, ६ प्रचलित इतिहास मंडळ, ७ नाट्यमंडळ, ८ परदेशी भाषा मंडळें, ९ प्राचीन संस्कृति मंडळ (ग्रीक, व रोमन), १० व्यायाम मंडळ, ११ चारित्र्य आणि स्वयंसेवा मंडळ, १२ तरुण वकील मंडळ, १३ गणित मंडळ, १४ बीजगणित मंडळ, १५ इतिहाससंशोधन मंडळ, १६ वैद्यक मंडळ, १७ भूगोल मंडळ, १८ निसर्ग अभ्यासमंडळ, १९ चित्रकार मंडळ, २० जाहिरात चित्रकला मंडळ, २१ रेडिओ मंडळ, २२ सहविचार मंडळ, २३ लघुकथा मंडळ, २४ मुद्रणकला मंडळ इत्यादि.

या प्रत्येक मंडळाला मार्गदर्शन करण्याला एका किंवा अनेक शिक्षकांची योजना असते. मंडळाची सभा भरविण्याची जागा व वेळ शाळेनें नेमून दिलेली असते. शाळेंतील जें काम मंडळाचे कामाशीं अधिक संबद्ध असेल त्याला विद्यार्थी मदत करितात. कांहीं संघांचें सभासदत्व मिळविण्याकरितां अभ्यासांत चांगला वरचा दर्जा असावा लागतो. संघांतील कामांत उत्कृष्ट

गुण दाखविणारांना शिष्यवृत्त्याही मिळतात. या शाळेचा असा अनुभव आहे कीं संघांत एकाद्या विषयाची गोडी लागलेला विद्यार्थी पुढें त्याच व्यवसायांत पडतो. विषय बदलण्याची परवानगी असते. या सर्व चळवळी ऐच्छिक आहेत.

अमेरिकन शिक्षणधुरीणांना असें वाटूं लागलें आहे कीं सध्यां या अभ्यासेतर चळवळींवर फारच जोर दिला गेला आहे तो कमी करून बौद्धिक अभ्यासावर लक्ष अधिक केंद्रीभूत करावें. अतिरेकाची बाजू सोडून दिल्यास भावी आयुष्याची तयारी या दृष्टीनें विद्यार्थ्यांना या चळवळींचा चांगला उपयोग होत आहे. न्यूयॉर्कमध्यें क्लिटन हायस्कूल नांवाची मोठी शाळा आहे. त्या शाळेचा अनुभव असा आहे कीं पुष्कळ विद्यार्थ्यांना या अभ्यासेतर चळवळींवरून आपल्या भावी व्यवसायांची कल्पना येते व शाळेंत ज्या चळवळींत ते भाग घेतात तोच व्यवसाय पुढें चालवून स्वतःच्या चरितार्थाचा प्रश्न सोडवितात. सुशिक्षित बेकारीच्या प्रश्नावर प्रतिबंधक इलाज या दृष्टीनें अभ्यासेतर चळवळींचा उपयोग कसा करून घेतां येईल याचा विचार आपणही करणें जरूर आहे.

## शाळेचा अभिमान

प्रत्येक विद्यार्थ्याला आपल्या शाळेचा किंवा विद्यापीठाचा अभिमान वाटावा या दृष्टीनें चालकांचा प्रयत्न असतो. शाळेला कांहीं परंपरा उत्पन्न करून त्या विद्यार्थ्यांनीं पाळाव्यात असा आग्रह धरला जातो. अर्थात् मुख्य अध्यापकांवर या गोष्टी अवलंबून असतात. सगुण भक्तीचें तत्त्व येथेंही व्यवहारांत आणलें जातें. प्रत्येक शाळेचीं ठराविक बाह्यचिन्हें व प्रतीकें असतात. विवक्षित प्रकारचीं निशाणें, विशिष्ट पोषाख आणि निरनिराळ्या वेळीं म्हणावयाचीं ठराविक गाणीं असतात. सामन्याच्या वेळीं खेळाडूंना प्रोत्साहन देण्याकरितां ठराविक गजर ( Yell ) असतात. मन्रो हायस्कूल नांवाच्या एका शाळेचें गाणें पुढें दिलें आहे.

### Loyalty Song

We're loyal to you, Monroe High ;
We're loyal and true, Monroe High ;

We'll back you to stand,
'Gainst the best in the land,
For we know you have sand, Monroe High!
Rah! Rah!
So break up their plays, Monroe High;
Go rushing ahead Monroe High;
Our team is our fame protector—
On, boys, for we expect a victory from you,
Monroe High!

### शिक्षणांत माणुसकी

अमेरिकेंतील शिक्षण, अभ्यासक्रम व अभ्यासपद्धति इत्यादि गोष्टी पाहून एक गोष्ट विशेष लक्षांत येते, कीं शिक्षणांत मुख्य भर व्यक्तीवर आहे. विद्यार्थी व बालक हें शिक्षणविचारांचें मुख्य केंद्र आहे. त्याचा यथाशक्य विकास व त्याचें कल्याण साध्य करण्याचे दृष्टीनें सर्व शिक्षणपद्धतीची आंखणी केली जाते. ही व्यक्ति पुढें समाजजीवनांत पडणार आहे, या दृष्टीनें तिची शैक्षणिक तयारी केली जाते. केवळ ठराविक विषय हे आहेत, या चाकोरींतून सर्वांनीं गेलेंच पाहिजे, अशी हडेलहप्पी तेथें नाही. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शिक्षणांत माणुसकी आहे, नुसतीच पांडित्यप्रतिष्ठा नाहीं.

---

प्रकरण चौथें

# औद्योगिक शिक्षण व भौतिक उत्कर्ष

### भौतिक उत्कर्षाचें बीज

परदेशांत निरीक्षण करतांना विचारी हिंदी प्रवाशाची मुख्य दृष्टि अशी असते कीं इतर देशांच्या उत्कर्षाचें मर्म काय आहे तें समजून घ्यावें.

महायुद्धापूर्वीं उद्योगधंद्यांत सामान्य प्रतीचा असलेला अमेरिका आज जगांत पहिल्या प्रतीचा आहे. अमेरिकेला विपुल भूमि आणि खनिज संपत्ति आहे एवढ्याच एका कारणानें तिचा औद्योगिक उत्कर्ष झाला असें म्हणणें योग्य नाहीं. आज अमेरिकन लोकांचे हातांत असलेली सर्व नैसर्गिक संपत्ति रेड इंडियन लोकांचे ताब्यांत होती. पण भौतिक सुधारणेच्या दृष्टीनें ते फारसे पुढें आलेले नाहींत. अमेरिका खंड हातांत आल्यानंतर दोनअडीच शतकें अमेरिकन लोकही उद्योगधंद्यांत फारसे पुढारलेले नव्हते ; परंतु औद्योगिक उत्कर्षाचें बीज मात्र त्यांनीं लावून ठेविलें होतें. त्यांच्या औद्योगिक प्रगतीचा उत्कर्ष अलीकडील वीसपंचवीस वर्षांत झाला, परंतु त्याचा पाया त्यांनीं एक शतकापूर्वी घातलेला आहे.

औद्योगिक दृष्टीनें पुढें गेलेल्या सर्व राष्ट्रांची गुरुकिल्ली त्याच्या शिक्षणपद्धतींतच सांपडते. महायुद्धापूर्वी जर्मनीनें शास्त्रीय आणि औद्योगिक शिक्षणाची प्रगति चांगली केलेली होती. ही शिक्षणपद्धति पाहण्याकरितां इतर देशांतील प्रतिनिधी येत असत. एकोणिसाव्या शतकांत औद्योगिक शिक्षणाच्या रूपानें जर्मनीनें आपल्या उत्कर्षाचा पाया घातला आणि त्याच्या जोरावर देश उद्योगधंद्यांत पुढें आणला. अमेरिकेनेंही १८६२ सालापासून औद्योगिक शिक्षणाकडे विशेष लक्ष दिलें. त्या वेळेपासून आतांपर्यंत उच्च, माध्यमिक आणि प्राथमिक धंदेशिक्षणाच्या संस्थांची एकसारखी वाढ होत आलेली आहे. औद्योगिक प्रगति आणि धंदेशिक्षणाची प्रगति या दोन गोष्टी अगदीं समांतर चालतात. तशीच अमेरिकेच्याही धंदेशिक्षणाची व औद्योगिक प्रगतीची परिस्थिति आहे.

## उमेदवारी पद्धतीचा अस्त

अमेरिकेंत आणि यूरोपमध्येंही उच्च औद्योगिक शिक्षणाच्या संस्थांची वाढ प्रथम झालेली दिसून येते ; त्यानंतर माध्यमिक आणि प्राथमिक दर्जाच्या धंदेशिक्षणाचा प्रसार झालेला आहे. याचें एक कारण असें आहे कीं उद्योगधंद्यांतील खालचीं कामें जोंपर्यंत साधींसुधीं होतीं, तोंपर्यंत तीं उमेदवारी पद्धतीनें शिकणें व शिकविणें शक्य होतें. परंतु यांत्रिक सुधारणेची जसजशी प्रगति झाली तसतशी हीं खालचीं कामेंही अधिक तांत्रिक स्वरूपाचीं झालीं.

विवक्षित शिक्षण घेतल्याशिवाय केवळ उमेदवारीनें तीं कामें करणें अशक्य होऊं लागलें. अशी स्थिति ज्या वेळीं झाली त्या वेळीं संघटित अशा धंदेशिक्षणाच्या शाळांची मागणी होऊं लागली. म्हणून उच्च औद्योगिक शिक्षणसंस्था एक शतकापूर्वीं निघालेल्या असल्या तरी खालच्या धंदेशिक्षणसंस्थांची वाढ सर्वच देशांत अगदीं अलीकडील एकदोन पिढ्यांमध्यें झालेली आहे. इंग्लंडमधील धंदेशिक्षणसंस्था १९०२ नंतर वाढल्या आणि अमेरिकेंतील संस्थांची वाढ १९१७ नंतर झालेली आहे. अर्थात् त्यापूर्वी थोड्या प्रमाणांत इतस्ततः संस्था होत्या, परंतु राष्ट्रीय स्वरूपाची औद्योगिक शिक्षणपद्धति अस्तित्वांत आलेली नव्हती.

## शिक्षणसंस्थांचा कर्मठपणा

औद्योगिक शिक्षणाचे इतिहासांत दुसरीही एक प्रवृत्ति आढळून येते. शिक्षणसंस्थांना प्रारंभ झाला तो प्रथम बौद्धिक शिक्षणानें झाला. पहिल्या शिक्षणसंस्था या धर्मशास्त्र व वाङमय शिकविणाऱ्या होत्या. पुढें हळुहळू त्यांनीं कायदा व वैद्यक अशा प्रकारच्या विषयांचा समावेश केला. परंतु प्रत्यक्ष उद्योगधंद्यांशीं संलग्न अशा विषयांचा समावेश करतांना मात्र विरोध दाखविण्याची प्रवृत्ति बौद्धिक शिक्षणसंस्थांमध्यें दिसून येते. शिक्षणाचा दर्जा कमी होईल अशा प्रकारचें कारण प्रत्येक वेळीं दाखविण्यांत येतें. असें जरी असलें तरीही निरनिराळ्या उद्योगधंद्यांनीं विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांत प्रवेश केलेला आहेच. जी प्रवृत्ति विद्यापीठांची तीच हायस्कूल संस्थांचीही दिसून येते. प्रारंभी त्यांनी साध्या हस्तव्यवसाय शिक्षणालाही विरोध केला. परंतु हळुहळू निरनिराळे उद्योगधंदे व शेतकी या विषयांचा समावेश आतां हायस्कूलचे शिक्षणांत होऊं लागलेला आहे. अमेरिका व रशिया या देशांतील हायस्कूल शिक्षणानें या बाबतींत अधिक उदार असें धोरण ठेविलेलें आहे. इतर देशांतील हायस्कूलांनीं केवळ हस्तव्यवसाय शिक्षणाला थोडेंसें स्थान दिलेलें आहे.

## उच्च औद्योगिक शिक्षणाचा पाया

अमेरिकेंत उच्च औद्योगिक शिक्षणाचा प्रसार एकोणिसाव्या शतकांतच झालेला आहे. १८२५ पासून पुढच्या काळांत निरनिराळया ठिकाणीं पॉलि-

टेक्निक् इन्स्टिटयूट्स् स्थापन झाल्या. प्रारंभीं यांत प्राथमिक यांत्रिक शास्त्राचें शिक्षण देत. पुढें या संस्थांचें एंजिनियरिंग कॉलेजमध्यें रूपांतर झालें. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत खाजगी व स्थानिक स्वरूपाच्या अनेक संस्था इतस्ततः पसरलेल्या होत्या. १८६२ पासून अशा संस्थांचें जाळें सर्व देशभर पसरण्यांत आलें. या वर्षी मॉरील ॲक्ट नांवाचा कायदा होऊन मध्यवर्ती (फेडरल्) सरकारनें प्रांतिक सरकारांना जमिनीच्या व कायम-निधीच्या स्वरूपांत मदत देऊन शेतकी आणि यांत्रिक शिक्षणाच्या उच्च शिक्षणसंस्था काढण्यास प्रोत्साहन दिलें. त्यामुळें प्रत्येक संस्थानांत किंवा प्रांतांत शेतकी आणि यंत्रशास्त्र या विषयांच्या उच्च शिक्षणाची चांगली सोय झाली. यांपैकीं कांहीं संस्था आज चांगल्या पुढें आलेल्या असून त्या उच्च प्रकारचें संशोधनकार्यही करीत आहेत. कॉर्नेल विद्यापीठाचें शेतकी महाविद्यालय या दृष्टीनें प्रसिद्ध असून अनेक देशांतील विद्यार्थी तेथें शिक्षणाकरितां जातात.

## माध्यमिक धंदेशिक्षणाची वाढ

उच्च औद्योगिक शिक्षणाची व्यवस्था सरकारी मदतीनें झाली तशी माध्यमिक दर्जाच्या शिक्षणाची लौकर झाली नाहीं. तरी पण खाजगी प्रयत्नानें व स्थानिक सरकारच्या मदतीनें मॅन्युअल ट्रेनिंग स्कूल्स् कांहीं ठिकाणीं स्थापन झालीं. यांत्रिक उद्योगधंद्यांना लागणारें सामान्य शिक्षण अशा संस्थांतून दिलें जात असे. कालांतरानें या शिक्षणाचा समावेश हायस्कूलच्या अभ्यास-क्रमांतही झाला. हस्तव्यवसायाचें शिक्षण हा सर्वसामान्य सांस्कृतिक शिक्षणाचाच एक भाग आहे, ही कल्पना बौद्धिक शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांनीं या शाळांपासून स्वीकारली.

एकोणिसाव्या शतकाअखेर माध्यमिक व प्राथमिक धंदेशिक्षणाचा फारसा प्रसार झालेला नव्हता. उमेदवारी पद्धतीच प्रचारांत होती. कांहीं खाजगी शिक्षणसंस्था मात्र हळूहळू निघत होत्या. किंबहुना या क्षेत्रामध्यें खाजगी संस्थांनींच पुढाकार घेतला आणि नंतर सरकारनें अनु-करण केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. धंदेशिक्षण देणें हें सरकारचें कर्तव्य आहे हें पटवून देण्याकरितां जनतेनें बरीच चळवळ केली. सरकारकडूनही

तिला सहानुभूतिपूर्वक सहकारिता मिळाली. १९०६ सालीं ‘ उद्योगशिक्षण-प्रसाराची राष्ट्रीय सभा ’ (नॅशनल् सोसायटी फॉर दी प्रमोशन् ऑफ इंड-स्ट्रिअल एज्युकेशन्) नांवाची एक संस्था निघाली. औद्योगिक, शैक्षणिक आणि राजकीय क्षेत्रांतील लोक या संस्थेचे सभासद होते. या संस्थेनें आठदहा वर्षे चळवळ करून धंदेशिक्षणाला सरकारी मदत मिळावी या प्रश्नाची चौकशी करण्याकरितां १९१४ मध्यें एक चौकशीमंडळ (कमिशन) नेमून घेतलें. याच सुमारास यूरोपमध्यें महायुद्ध पेटलें होतें. या मंडळानें केलेल्या सूचना सरकारला मान्य होऊन त्यांचें कायद्यांत रूपांतर झालें. वूड्रो विल्सन् या वेळी अमेरिकेचे अध्यक्ष होते. त्यांनींच या स्मिथ् ह्यूजेस् कायद्यावर १९१७ मध्यें सही केली. या कायद्यामुळें धंदेशिक्षण संस्थांना पुष्कळ उत्तेजन मिळालें. गेल्या वीस वर्षांत अमेरिकेंत धंदेशिक्षणाची वाढ बेसुमार झालेली आहे. स्मिथ् ह्यूजेस कायद्याचा आशय असा होता की मध्यवर्ती सरकारनें धंदेशिक्षणाच्या प्रसाराकरितां प्रांतिक सरकारांना निम्मानिम खर्च द्यावयाचा. अशा रीतीनें औद्योगिक शिक्षणाची जबाबदारी मध्यवर्ती सरकारनें मान्य केली. मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांच्या सहकारितेनें देशांत सर्वत्र औद्योगिक शिक्षणसंस्थांचें जाळें पसरलें. ही सर्व वाढ महायुद्धानंतरची आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

## सरकारची जबाबदारी, जनतेचें सहकार्य

औद्योगिक व धंदेशिक्षणाची मुख्य जबाबदारी सरकारनें घेतलेली असली तरी इतर अनेक संस्थांकडून या शिक्षणाच्या संस्था चालविल्या जात आहेत. शहराच्या किंवा तालुका–जिल्ह्याच्या सभांनीं आपापल्या हद्दींतील उद्योगधंद्यांना उपकारक अशा स्वरूपाच्या धंदेशाळा काढलेल्या आहेत. त्यांना प्रांतिक सरकारकडून मदत मिळते. कांहीं संस्था कारखानदारांनीं आपापल्या कारखान्यांना जोडून काढलेल्या आहेत. अशा स्वरूपाचा पहिला उपक्रम १८७२ सालीं ‘ हो अँड कंपनी ’नें केला. आज सर्व मोठ्या कार-खान्यांच्या धंदेशाळा आहेत. वेस्टर्न इलेक्ट्रिक, गुड ईयर टायर्स, फोर्ड कंपनी, लायनोटाईप कंपनी, कार्नेगी स्टील कंपनी इत्यादि अनेक कारखान्यांच्या धंदेशाळा चांगल्या प्रतीच्या आहेत.

कांहीं संस्था खाजगी व्यक्तींनीं किंवा संस्थांनीं चालविलेल्या आहेत. व्यापारी शिक्षणाच्या अनेक संस्था खाजगी स्वरूपाच्या आहेत. कांहीं खाजगी विद्यापीठांनींही औद्योगिक शिक्षणाच्या अनेक शाखा चालविलेल्या आहेत. स्थानिक गांवसभा, कारखानदार व कामगारसंघ या तिघांच्या सहकारितेनें कांहीं धंदेशाळा चालविल्या जातात. न्यूयॉर्कमध्यें एक उत्कृष्ट मुद्रणशाळा अशा रीतीनें चालविलेली आहे.

सारांश अमेरिकन धंदेशिक्षण केवळ सरकारवर किंवा केवळ जनतेवर अवलंबून नाहीं. मुख्य जबाबदारी मध्यवर्ती प्रांतिक सरकारनें अंगावर घेतलेली आहे. तरी पण स्थानिक गांवसभा, जिल्हा–तालुका सभा, कारखानदार, कामगारसंघ, विद्यापीठें आणि खाजगी संस्था किंवा व्यक्ती या सर्वांनीं आपापल्या परीनें हें शिक्षण चालविलें आहे.

## औद्योगिक संस्थांचें वर्गीकरण

औद्योगिक शिक्षणसंस्थांची वर्गवारी दोन तत्त्वांवर करितां येईल. वेळेच्या दृष्टीनें विचार करितां पूर्णकाल, अर्धकाल किंवा अंशकाल धंदे-शिक्षण देणाऱ्या संस्था अशी वर्गवारी करितां येईल. शिक्षणाचा दर्जा लक्षांत घेतला तर उच्च, माध्यमिक आणि प्राथमिक अशा प्रकारें दुसरी एक वर्गवारी करितां येते.

बौद्धिक शिक्षणाप्रमाणें औद्योगिक शिक्षणाच्याही तीन दर्जांच्या शिक्षणसंस्था आहेत. विद्यार्थ्यांची बुद्धिमत्ता आणि शिक्षण दीर्घकाल चालू ठेवण्याची त्यांची तयारी या गोष्टी जमेस धरून हे तीन प्रकार झालेले आहेत. आठ वर्षांचें प्राथमिक शिक्षण चौदा वयापर्यंत घेतल्यानंतर ज्या विद्यार्थ्यांना लगेच धनार्जन करावयाचें असेल त्यांचेकरितां प्राथमिक दर्जाचें शिक्षण आहे. ज्यांना सक्तीच्या शिक्षणानंतर आणखी चारपांच वर्षें शिक्षण घेण्याची इच्छा असेल त्यांचेकरितां हायस्कूलच्या दर्जाचें माध्यमिक धंदेशिक्षण आहे. बौद्धिक किंवा औद्योगिक हायस्कूलचें शिक्षण पूर्ण करून नंतर ज्यांना धंदेशिक्षण घ्यावयाचें असेल त्यांना विद्यापीठांत किंवा टेक्नॉलॉजिकल् इन्स्टिटयूट-मध्यें उच्च प्रकारचें औद्योगिक शिक्षण घेतां येतें. त्याप्रमाणें बुद्धिमत्ताही

वरच्या दर्जाची लागते हें सांगणें नकोच. अशा रीतीनें प्रत्येक वयाच्या व बौद्धिक दर्जाच्या नागरिकाला धंदेशिक्षणाच्या सोयी उपलब्ध झालेल्या आहेत.

लढाईंत किंवा यांत्रिक कामें करितांना शरीराचा अवयव जाऊन पूर्वीचा उद्योगधंदा करण्यास एकादा इसम असमर्थ झाला असेल तर त्याला त्याच्या शक्तीप्रमाणें व लायकीप्रमाणें दुसरा एकादा उद्योगधंदा शिकविण्याची जबाबदारी सरकारनें आपले अंगावर घेतलेली आहे. १९२० सालीं झालेल्या 'सिव्हिलियन् व्होकेशनल् रीहॅबिलिटेशन अॅक्ट' प्रमाणें अशा शिक्षणसंस्थांची सोय करण्यांत आलेली आहे.

## विद्यापीठांचें संग्राहक धोरण

अमेरिकन विद्यापीठांत कायदा, वैद्यक, एंजिनियरिंग, शेतकी इत्यादि नेहमींच्या व्यवसायाव्यतिरिक्त इतर अनेक व्यवसायांचा प्रवेश झालेला आहे. केवळ बौद्धिक विषय न शिकवितां समाजाला आवश्यक अशा औद्योगिक विषयांचा समावेश करून घेण्याचें धोरण अमेरिकन विद्यापीठांनीं प्रथमपासूनच बुद्धिपूर्वक स्वीकारलें. यामुळें यूरोपमधील विद्यापीठांकडून त्यांची हेटाळणी देखील केली जाते, व तिचेच पडसाद आपल्याही देशामध्यें उठतात. प्रत्येक देशाचा शिक्षणाकडे पाहण्याचा कांहीं विशिष्ट दृष्टिकोण असतो त्या दृष्टीनें त्या त्या देशाकडे पाहिलें पाहिजे. अमेरिकन विद्यापीठें हीं जनतेच्या कराच्या पैशांतून चाललेलीं आहेत तर त्यांचा उपयोग जनतेला झाला पाहिजे; उच्च शिक्षणानें सामाजिक जीवनांत सुधारणा झाली पाहिजे व बहुजन समाजाची संस्कृति वाढली पाहिजे असें अमेरिकन शिक्षणाचें धोरण आहे. 'इलिनॉइस्' विद्यापीठाचे कुलगुरु अँड्र्यू स्लोन ड्रेपर यांनीं १९०४ मध्यें स्पष्ट शब्दांत हें धोरण सांगितलें— "जगांतील इतर विद्यापीठांचें अनुकरण न करतां, अमेरिकन विद्यापीठांनीं समाजाचें जीवन आणि उद्योगधंदे यांचेकडे लक्ष दिलें पाहिजे. सर्व व्यवसाय आणि सर्व उद्योगधंदे यांना विद्यापीठांनीं मदत केली पाहिजे. शास्त्रीय संशोधनाचीं फळें प्रत्येक झोंपडींत नेण्याचें काम विद्यापीठांचें आहे. सामाजिक जीवनांत शास्त्रीय तत्त्वांचा उपयोग करून आरोग्यशीर घरें, सुंदर रस्ते, संपन्न शेतें, सुरक्षित वाहनें, व काटकसरीनें आणि सुखांत राहणारीं शहरें निर्माण करणें हें अमेरिकन विद्यापीठांचें काम आहे." या तत्त्वाला

धरून अमेरिकन विद्यापीठांचें कार्य चाललेलें आहे. खरोखरीच समाजाचें जीवन अधिक सुखी करण्याचे दृष्टीनें विद्यापीठांची मदत झालेली आहे. वाङ्मय, कायदा, वैद्यक, भौतिक शास्त्रें वगैरे इतर विद्यापीठांत शिकविले जाणारे विषय अमेरिकेंतही शिकविले जातात. परंतु त्यांव्यतिरिक्त इतरही अनेक औद्योगिक शाखांचें शिक्षण तेथें दिलें जातें. न्यूयॉर्कमध्यें असलेल्या कोलंबिया व न्यूयॉर्क विद्यापीठांतून वाङमय, कायदा, वैद्यक इत्यादि नेहमींच्या विषयांव्यतिरिक्त शिकविल्या जाणाऱ्या कांहीं अभ्यासक्रमांवरून या विधानाची स्पष्ट कल्पना येईल.

कोलंबिया विद्यापीठ—वास्तुशिल्पकला, व्यापार, वृत्तपत्रसंपादन, ग्रंथालयशास्त्र, औषधिशास्त्र, दंतवैद्यक, सार्वजनिक आरोग्य, औद्योगिक शिक्षणशास्त्र, आरोग्य–शिक्षणशास्त्र इत्यादि.

न्यूयॉर्क विद्यापीठ—चित्रकला, मूर्तिकला, व्यापार, वृत्तपत्रसंपादन, रीअल एस्टेट् इत्यादि.

## माध्यमिक शिक्षणाच्या संस्था

विद्यापीठाचे व टेक्निकल् इन्स्टिटयूटचे खालोखाल मध्यम दर्जाचें पूर्ण-काल शिक्षण देणाऱ्या संस्था आहेत. १९१७ नंतर स्थापन झालेलीं औद्योगिक विद्यालयें या वर्गांत येतात. यांना "संपूर्णकाल धंदेशिक्षण देणाऱ्या संस्था" (ऑल डे व्होकेशनल् स्कूल्स्) असें नांव आहे. विशिष्ट व्यवसायाप्रमाणें त्यांना शेतकी विद्यालय, व्यापारी विद्यालय किंवा औद्योगिक विद्यालय अशीं निरनिराळीं नांवें दिलीं जातात. माध्यमिक व प्राथमिक सर्व विद्यालयांचे विषयवारीप्रमाणें चार विभाग पडतात—शेतकी, व्यापार, गृहजीवन शास्त्र आणि औद्योगिक ; यांत अनेक पोटविभाग आहेत.

पूर्णकाल शिक्षण देणाऱ्या शाळांचा अभ्यासक्रम चार वर्षांचा असतो. पूर्ण शिक्षण आठ वर्षें झाल्यानंतर चौदावे वर्षी मुलामुलींना यांत प्रवेश मिळतो. तात्त्विक व प्रात्यक्षिक शिक्षण शाळेंतच मिळतें. ज्यांना हें शिक्षण झाल्यावर त्याच विषयाच्या कॉलेजशिक्षणाकडे जाण्याची इच्छा असेल त्यांना थोडे अधिक विषय घ्यावे लागतात. शेतकी विद्यालयांतून शेतकी कॉलेजांत, व्यापारी विद्यालयांतून व्यापारी कॉलेजांत आणि मेकॅनिकल् स्कूलमधून एंजिनियरिंग

कॉलेजमध्यें जातां येतें. औद्योगिक विद्यालयाकडे जाणारांनाही कॉलेजचा रस्ता मोकळा आहे ही गोष्ट येथें विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. महत्त्वाकांक्षी विद्यार्थी माध्यमिक धंदेशिक्षणांतून उच्च औद्योगिक शिक्षणाकडे जाऊं शकतो.

## अर्धकाल धंदेशिक्षण संस्था

औद्योगिक विद्यालयांचा तिसरा प्रकार " अर्धकाल धंदेशिक्षण शाळां "चा (पार्ट टाईम व्होकेशनल् स्कूल्स्) किंवा " सहकारी धंदेशिक्षण शाळां "चा (कोऑपरेटिव्ह व्होकेशनल् स्कूल्स्) आहे. अशा शाळांमध्यें अर्धा दिवस शाळेंत व अर्धा दिवस कारखान्यांत घालवावा लागतो. शाळेंत जे विषय चालू असतील त्यांचेंच व्यावहारिक शिक्षण कारखान्यांमध्यें दिलें जातें. शाळेंत तात्त्विक व शास्त्रीय भाग करून घेतला जातो. अशा रीतीनें ज्ञान व अनुभव यांची एकदमच सांगड घातली जाते. शिक्षण झाल्यानंतर पुन: अनुभव घेण्याची जरूरी पडत नाहीं. शाळेलाही फारशी साधनसामुग्री ठेवावी लागत नाहीं.

कारखान्यांत मालक विद्यार्थ्यांना शिक्षण न देतां नुसतेंच राबवून घेतील, याकरितां शिक्षणावर देखरेख करणाऱ्या अधिकाऱ्यांची योजना असते. मुलाचें शिक्षण होत नाहीं असें वाटल्यास ते कारखान्यांतून त्याला बदलूं शकतात. त्याचप्रमाणें उद्योगधंदे व शिक्षणक्रम यांच्यांत समन्वय राहावा म्हणून शाळाधिकारी आणि कारखान्याचे मालक यांच्या प्रतिनिधींचें एक सल्लागार मंडळ असतें, तें अशा शाळांवर देखरेख ठेवितें. स्थानिक सरकार या शाळांच्या पाठीशीं असल्याकारणानें ही शिक्षणपद्धति यशस्वी रीतीनें चालूं शकते. विद्यार्थ्यांना त्यांच्या कामाबद्दल अल्प मोबदलाही मिळतो.

अशा प्रकारच्या अनेक सोयी असल्याकारणानें या अर्धकाल धंदेशिक्षण संस्था अमेरिकेंत अधिक लोकप्रिय होऊं लागल्या आहेत. पूर्णकाल धंदेशिक्षण संस्थांपेक्षांही यांची संख्या वाढत आहे. उद्योगधंदे व शिक्षणखातें यांच्यांत चांगली सहकारिता असली म्हणजे अशा संस्था चांगल्या चालू शकतील.

## औद्योगिक हायस्कूल

माध्यमिक दर्जाचें औद्योगिक शिक्षण देणाऱ्या संस्थांचा तिसरा प्रकार

म्हणजे हायस्कूल्स्मधून दिलें जाणारें धंदेशिक्षण होय. अमेरिकन हायस्कूलमध्यें बौद्धिक शिक्षणक्रमाबरोबरच व्यापारी, शेतकीविषयक, गृह-शास्त्रविषयक आणि यांत्रिक व्यवसायांचे असे इतरही शिक्षणक्रम शिकविले जातात. बौद्धिक शिक्षणाचे आवश्यक विषय घेऊन ऐच्छिक विषयांमध्यें या औद्योगिक विषयांचा समावेश करतां येतो. हायस्कूल–शिक्षण पूर्ण झाल्यानंतर पुढें एंजिनियरिंग, शेतकी, व्यापार किंवा अन्य विषयाच्या कॉलेजमध्यें जातां येतें. शहरांतून इंडस्ट्रियल् व कमर्शिअल हायस्कल्स् आणि खेड्यांतून अॅग्रिकल्चरल् हायस्कूल्स् पसरलेलीं आहेत. या प्रकारच्या शाळांतून असंख्य विद्यार्थी बौद्धिक आणि औद्योगिक दोन्ही प्रकारच्या शिक्षणाचा लाभ घेत आहेत. बहुतेक शाळांतून मोटर वर्कशॉप, सुतारकाम, यांत्रिक कामें, मुद्रणकला, व्यापारशास्त्र, गृहजीवनशास्त्र, व्यापारी चित्रकला अशा प्रकारचे विषय शिकविले जातात. इंग्लिश, इतिहास, विज्ञान व शारीरिक शिक्षण हे विषय आवश्यक असतात, आणि औद्योगिक शाखेचे विषय ऐच्छिक म्हणून घेतां येतात.

## पुरवणी शाळा व रातशाळा

याखेरीज धंदेशिक्षण संस्थांचे दोन प्रकार आहेत. त्यांत दिवसा किंवा रात्रीं थोडा वेळ धंदेशिक्षण मिळतें, बाकीचा वेळ दिवसभर विद्यार्थी कारखान्यांत किंवा अन्यत्र काम करून पैसे मिळवीत असतो.

चौदा वर्षांनंतर शिक्षण न घेतां नोकरींत पडणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां "पुरवणी शाळा" (कंटिन्युएशन् स्कूल्स्) आहेत. सोळा किंवा अठरा वर्षे पुरीं होईपर्यंत अशा शाळेंत साप्ताहिक चार ते नऊ तास जाणें हें कायद्यानें आवश्यक केलेलें आहे. विद्यार्थी बाहेर जो धंदा करीत असेल त्याला पोषक किंवा सामान्य ज्ञान देणारा असा अभ्यासक्रम या शाळांमध्यें असतो. अठ्ठेचाळिसांपैकी सत्तावीस संस्थानांमध्यें या शिक्षणाची सक्ति आहे.

दुसरा प्रकार "रातशाळां"चा (ईव्हनिंग स्कूल्स्) आहे. या प्रौढ कामगारांकरितां आहेत. कामगार लोक दिवसा ज्या धंद्यांत कामें करितात त्याच धंद्यांचें उच्च शिक्षण घेण्याकरितां ते अशा रातशाळांमध्यें येतात. दिवसा प्रात्यक्षिक कामाचा अनुभव मिळत असल्यामुळें या रात्रींच्या शाळेंत

शास्त्रीय व तात्त्विक ज्ञानावर विशेष भर दिला जातो. हें शिक्षण ऐच्छिक आहे.

पुरवणी शाळा किंवा रातशाळा यांचे वर्ग इतर धंदेशिक्षणाच्या ज्या संस्था आहेत तेथेंच रात्रीच्या वेळीं भरविले जातात. कांहीं शाळांना स्वतंत्र इमारतीही असतात. परंतु सामान्यपणें औद्योगिक शाळांचा उपयोग दिवसा आणि रात्रीं दोन्ही वेळ शिक्षण देण्याकडे केला जातो. त्यामुळें साहित्यसामुग्रीचा जास्तींत जास्त उपयोग होतो.

याव्यतिरिक्त इतरही अनेक मार्गांनीं धंदेशिक्षण दिलें जातें. टपाल-मार्गानें अभ्यासक्रम पाठवून, रेडियोवरून, व्याख्यानद्वारां किंवा फिरते शिक्षक ठेवून अशा अनेक मार्गांनीं धंदेशिक्षणाचे अभ्यासक्रम सर्वसामान्य व्यक्तीच्या आटोक्यांत येतील अशा योजना केलेल्या आहेत.

## शेतीचें शिक्षण

औद्योगिक शिक्षणाचीं मुख्य चार क्षेत्रें केलेलीं आहेत. अमेरिका हा देश शेतीप्रधान असल्यामुळें शेतकीशास्त्राला प्राधान्य देण्यांत आलेलें आहे. उच्च, माध्यमिक आणि प्राथमिक अशा तिन्ही दर्जांचें शेतकीशिक्षण अमेरिकेंत दिलें जातें. या शिक्षणाची दहा वर्षातील प्रगति पुढील आंकड्यांवरून कळेल.

| सन | १९१८ | १९२९ |
|---|---|---|
| शाळा | ६०९ | ६,५३३ |
| विद्यार्थी | १५,४५० | १,६८,१४४ |

शेतकी विद्यालयांत अर्धा दिवस काम व अर्धा दिवस शाळा असा कार्यक्रम असतो. क्रमिक पुस्तकांपेक्षां प्रत्यक्ष प्रयोग व अनुभव यांवर विशेष भर दिला जातो.

## यांत्रिक शिक्षण

यांत्रिककला शिक्षणाच्या क्षेत्रामध्यें अनेक विषय येऊं शकतात. यंत्रसाहाय्यानें होणारे सर्व लहानसहान धंद्यांचा या क्षेत्रांत समावेश होतो. बहुतेक हायस्कुलांतून या विषयाचे शिक्षणाची सोय असते. त्याव्यतिरिक्त स्वतंत्र धंदेशाळा आहेतच. १९१७ च्या कायद्यानें सरकारी मदत मिळूं लागल्या-

पासून या शाळांची व विद्यार्थ्यांची झपाट्यानें वाढ झाली. १९१८ सालीं या संस्थांतून दीड लाख विद्यार्थी होते ते दहा वर्षांचे अवधींत सहा लाखांचे वर वाढले.

## गृहजीवनशास्त्राचें शिक्षण

शेतकी व उद्योगधंदे यांकडे अमेरिकेचें जितकें लक्ष आहे तितकेंच गृहजीवनविषयक उद्योगांकडेही आहे ही गोष्ट विशेष दिसून येते. या शिक्षणाचा उद्देश दुहेरी आहे. स्वतःचे घरीं कामें करणाऱ्या बहुसंख्य स्त्रियांना प्रपंचविषयक शास्त्रीय शिक्षण देऊन अमेरिकन गृहजीवनाची सुधारणा करणें हा एक उद्देश आहे. त्याचबरोबर निर्वाहाचें साधन म्हणून घरगुती किंवा व्यापारी संस्थांमधील कामें करणाऱ्या स्त्रियांना शास्त्रोक्त शिक्षण देणें हाही दुसरा उद्देश आहे. स्वयंपाक करणें, वाढणें, स्वयंपाकविषयक यंत्रसामुग्री वापरणें, अन्नांतील पोषक द्रव्यांचें प्रमाण, गृहशोभा इत्यादि अनेक विषय या शिक्षणामध्यें येतात. हा विषय शाळा—कॉलेजांत येण्यापूर्वी त्याला बौद्धिक शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांकडून पुष्कळ विरोध झाला. म्हणून प्रथम या विषयाच्या खाजगी संस्था निघाल्या. १८७४ मध्यें ज्युलिएट कार्सन नांवाच्या बाईनें न्यूयॉर्कमध्यें पहिलें ' स्वयंपाकशास्त्र विद्यालय ' (कुकिंग स्कूल) काढलें. त्यानंतर इलिनॉईस् व कॅन्सस् संस्थानांतील विद्यापीठांनीं गृहजीवनशास्त्राचे (डोमेस्टिक सायन्स्) अभ्यासक्रम सुरू केले. १९१७ नंतर या विषयाचा पुष्कळ प्रसार झाला. बहुतेक हायस्कूल्समधून हा विषय शिकविला जातो. अमेरिकन गृहजीवन सुखी करण्याचें मुख्य श्रेय या शिक्षणाला दिलें पाहिजे.

## चुलीपाशीं भौतिक सुधारणा

अमेरिकेंतील भौतिक सुधारणा ही कारखान्यांत आणि स्वयंपाकघरांत दोन्ही ठिकाणीं दिसते. याचें कारण शास्त्रीय माहितीचा उपयोग गृहजीवनांत करण्याची प्रवृत्ति शिक्षणानें लाविली. याचे उलट स्थिति हिंदुस्थानांत आहे. आपल्याकडे एकाद्या कारखान्यांत किंवा प्रयोगशाळेंत अगदीं अद्ययावत् यंत्रसामुग्री असेल ; पण आपलें गृहजीवन पाहिलें तर आपण अश्मयुगांतच (स्टोन एज्) आहोंत कीं काय असें घरांतील पाटावरवंटा

आणि चुली इत्यादि साधनसामुग्रीवरून वाटूं लागेल. याचें कारण आपल्या शिक्षणानें जीवनविषयक गोष्टींची हेळसांड केलेली आहे. अमेरिका दुसऱ्या टोंकास गेली आहे. सर्व अनुभव जमेस धरून बौद्धिक आणि व्यावहारिक जीवन यांचा समन्वय घालण्याचें काम आपलें आहे.

## व्यापारी शिक्षण

औद्योगिक शिक्षणांतील चौथें क्षेत्र व्यापारी शिक्षणाचें आहे. या शिक्षणाचा प्रसार गेल्या शतकाच्या उत्तरार्धापासून पुष्कळ झालेला आहे. सरकारी मदतीची अपेक्षा न करतां खाजगी व्यक्तींनीं व संस्थांनीं व्यापारी शिक्षणाच्या अनेक संस्था काढल्या. १८५० ते १८९० पर्यंत खाजगी व्यापारी शिक्षणाच्या संस्थांनीं चांगलें काम केलें. नंतर या शिक्षणाचा प्रवेश विद्यापीठें व हायस्कूल यांतून झाला. शिक्षणसंस्था नेहमीं पुराणमतवादी असतात याचें हें एक उदाहरण आहे. खाजगी संस्थांनीं पुढाकार घेऊन एकाद्या विषयाला शिक्षणदृष्टीनें संघटित स्वरूप दिल्यानंतर मग विद्यापीठें त्याचा स्वीकार करितात ; स्वतः नवीन विषयांत पुढाकार घेत नाहीत.१९०० सालीं व्यापारी शिक्षणाचीं हायस्कुलें निघालीं आणि १९०८ सालीं हार्वर्ड विद्यापीठानें या विषयाचा समावेश आपले शिक्षणक्रमांत केला. आज अमेरिकन शिक्षणांत व्यापारी शिक्षणक्रम ही अगदीं लोकप्रिय शाखा आहे. एकंदर हायस्कूलच्या विद्यार्थ्यांपैकी शेंकडा तीस ते पसतीस विद्यार्थी हाच अभ्यासक्रम घेतात असें आढळून आलें आहे. कांहीं ठिकाणीं हें प्रमाण साठपर्यंतही जातें.

प्राथमिक, माध्यमिक, आणि उच्च अशा तिन्ही दर्जांचीं व्यापारी विद्यालयें आहेत. त्यांत साधनसामुग्रीची व्यवस्था चांगली असते. शक्य तर व्यापाराच्या भागांतच या विद्यालयांची जागा असते. ऑफिसकामाला लागणारी सर्व यंत्रसामुग्री या शाळांतून ठेविली जाते. हिशेब करणें, लिहिणें, (डिक्टाफोननें) बोलणें व ऐकणें, नोंद ठेवणें, नक्कल करणें इत्यादि प्रत्येक कामाकरितां अमेरिकेंत यंत्रांचा उपयोग केला जातो. तीं वापरण्याचें शिक्षण असल्याखेरीज केवळ व्यवहारज्ञानानें काम करितां येणें शक्य नाहीं. म्हणून व्यापारी शिक्षणाचा इतका प्रसार झाला आहे.

## शाळेमार्फत कामधंद्याची सोय

उद्योगशाळेंत शिक्षण पूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना कामधंदा व नोकरी पाहून देण्याकरितां शाळेंतच एका खात्याची (फॉलोअप् अँड प्लेसमेंट) व्यवस्था केलेली असते. या खात्याचा अनेक कारखानदारांशीं संबंध असतो व त्याचेजवळ शिक्षण पूर्ण करून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांची नोंद असते. त्यामुळें विद्यार्थ्याला योग्य अशी नोकरी पाहून देण्याचे कामी शाळा मदत करूं शकते. त्यानंतरही कांहीं वर्षे त्या विद्यार्थ्याचें कर्म चाललें आहे इकडे शाळेचें लक्ष असतें. विद्यार्थ्याचें शिक्षण पूर्ण करणें आणि शक्य तर योग्य कामधंदा पाहून त्याला समाजांत सुस्थित करणें असें आपलें दुहेरी कर्तव्य आहे अशा प्रकारचें शाळांचें धोरण असतें. त्या कारणानें आपल्या विद्यार्थ्यांना किती मागणी आहे व त्यांच्या शिक्षणांत काय कमीअधिक सुधारणा केली पाहिजे, हें शाळेला कळतें. त्याप्रमाणें शिक्षणामध्यें योग्य ते फेरबदल करितां येतात. अशा रीतीनें समाजाची मागणी व शाळेंतील शिक्षण यांत समन्वय घातला जातो.

## औद्योगिक शिक्षणाचीं तत्त्वें व धोरणें

अमेरिकन धंदेशिक्षणाच्या मुळाशीं कांहीं विशिष्ट तत्त्वें आहेत. त्यांचें आकलन झालें म्हणजे औद्योगिक शिक्षणपद्धतीचें रहस्य समजतें.

देशांतील प्रत्येक नागरिकाला चांगल्या रीतीनें स्वतःचा चरितार्थ चालविण्याकरितां लागणारें धंदेशिक्षण देणें हें सरकारचें कर्तव्य आहे हें तत्त्व अमेरिकेंत जवळ जवळ मान्य झालेलें आहे. सरकारनें बौद्धिक शिक्षण देण्याची जबाबदारी जशी पतकरली आहे तशीच धंदेशिक्षणाचीही जबाबदारी अलीकडे घेतलेली आहे. ही बाब केवळ प्रांतिक सरकारवर न सोंपवितां मध्यवर्ती सरकारनें त्याकरितां पन्नास टक्के खर्च सोसण्याचें कबूल केलें. प्रांतिक सरकारनें तर या शिक्षणाकरितां कबूल केलेल्या रकमेपेक्षांही अधिक खर्च करून औद्योगिक शिक्षणाच्या शाळा चालविलेल्या आहेत.

समाजांतील कोणाही माणसाची किंमत कमी नाहीं हें जसें लोकशाहीचें तत्त्व आहे, तसेंच शिक्षणांत कोणताही विषय कमी दर्जाचा नाहीं हें अमेरिकन शिक्षणपद्धतीचें तत्त्व आतां व्यवहारानें मान्य झालेलें आहे. प्रारंभीं विद्या-

पीठांचा व हायस्कुलांचा औद्योगिक शिक्षणाला विरोध झालेला असला तरी आतां तो नाहींसा झाला आहे. आतां कोणत्याही विषयाचा माध्यमिक किंवा उच्च दर्जाचा अभ्यास हायस्कूलमध्यें किंवा कॉलेजांत होऊं शकतो. अमेरिकेनें शिक्षणाचे क्षेत्रांत विद्या आणि कला हीं दोन्ही एकाच दर्जावर आणून ठेविलेलीं आहेत. त्यामुळें विशिष्ट विषय शिकणाऱ्या व्यक्ती श्रेष्ठ आणि इतर विषय शिकणाऱ्या व्यक्ती कनिष्ठ हा समज नाहींसा होत चालला आहे. औद्योगिक शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांना त्याकरितां एकसारखी चळवळ करावी लागली आहे.

एकाद्या व्यक्तीला विशिष्ट शिक्षणांत किंवा धंद्यांत डांबून ठेवून तिची प्रगति खुंटविणें हें अमेरिकन वृत्तीला पसंत नाहीं. यूरोपियन शिक्षणपद्धतींत अशा समांतर शाळा आहेत कीं एकींतून दुसरीकडे संक्रमण करितां येत नाहीं. त्यांतील अंतर कायम राहतें व तें तोडण्याला वरून पूल नाहीं. उलट अमेरिकेंतील औद्योगिक शिक्षणाच्या हायस्कूलची गांठ त्याच विषयांच्या कॉलेजशीं घालून दिलेली आहे. केवळ औद्योगिक शिक्षण घेतलें म्हणून विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाकडे प्रतिबंध केलेला नाहीं. उच्च शिक्षणाचींही दारें त्याला खुलीं असतात. औद्योगिक शिक्षण देतांनाही ज्यांत व्यक्तीची प्रगति एकसारखी होत राहील अशीं क्षेत्रें दाखवून देण्याकडे शाळांची विशेष प्रवृत्ति असते. मर्यादित व संकुचित व्यवसायांपेक्षां (ब्लाइंड ॲली जॉब्स्) वाढीच्या व्यवसायांकडे मुलांनीं जावें असा प्रयत्न करण्यांत येतो.

शिक्षणाचा दर्जा आणि व्यवसाय यांतील कृत्रिम संबंध अमेरिकेंत नष्ट झालेला आहे. सुशिक्षित माणसांनी पोपाखीच व्यवसाय केले पाहिजेत अशी जी इतर देशांत कल्पना आहे ती अमेरिकेंतील शिक्षणप्रसारामुळें नाहींशी झाली आहे. कितीही शिकलेली व्यक्ति असली तरी ती कोणताही व्यवसाय करणें कमीपणाचें मानीत नाहीं. त्या कारणानें बौद्धिक व शारीरिक व्यवसाय एका दर्जावर येऊन बसले आहेत. औद्योगिक शिक्षणाला जो कमीपणा येतो तो हळूहळू नाहींसा होत चालला आहे. औद्योगिक शाळाही स्वाभिमानी होऊं लागल्या आहेत. बौद्धिक शिक्षणांत नालायक ठरलेले विद्यार्थी धंदेशिक्षणाकडे घालण्याच्या धोरणाविरुद्ध त्यांची प्रतिक्रिया चालू आहे. धंद्याकडेही बुद्धिमान् माणसें लागतात असा त्यांचा आग्रह आहे. त्याप्रमाणें हुषार मुलांनाच शाळेंत प्रवेश द्यावा असें धोरण ठेवणाऱ्या अनेक शाळा आहेत.

## बौद्धिक व औद्योगिक शिक्षणाचे संबंध

औद्योगिक शिक्षणाचा व्यापक अर्थ केला तर तसें शिक्षण अमेरिकेंत केवळ धंदेशिक्षणाच्याच शाळेंत दिलें जात नसून प्रत्येक शाळेंत दिलें जातें असें म्हणावें लागेल. विवक्षित धंदा येण्यावर व्यक्तीची औद्योगिक कर्तबगारी अवलंबून नसते. औद्योगिक प्रगति होण्याला व्यक्तीच्या व समाजाच्या अंगीं कांहीं विशिष्ट गुण लागतात. अमेरिकेच्या शालेय शिक्षणाचें असें वैशिष्टय आहे कीं व्यक्तीच्या अंगीं या गुणांची वाढ होते आणि ती व्यक्ति औद्योगिक जीवनास अधिक लायक बनते. शारीरिक श्रमाची आवड, हातानें काम करण्याविषयीं उत्साह, नेहमीं नवे नवे प्रयोग करण्याची प्रवृत्ति आणि यांत्रिक व्यवसायांची आवड हे गुण अमेरिकन शिक्षणानें विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं येतात आणि त्यांचा अप्रत्यक्षपणें देशाच्या औद्योगिक प्रगतीकडे उपयोग होतो. सुशिक्षित अमेरिकनही शारीरिक कष्ट कमी दर्जाचे मानीत नाहीं.

विवक्षित धंदेशिक्षणाव्यतिरिक्त केवळ सांस्कृतिक अथवा बौद्धिक शिक्षणाचा अमेरिकन शिक्षणक्रम पाहिला तर असें दिसून येतें कीं त्याच्या योगानें व्यक्तीची नैसर्गिक क्रियाप्रवृत्ति नष्ट न होतां ती वाढीस लागते. वर्गांत केवळ स्वस्थ बसून श्रवणभक्ति न करितां व्यवसायात्मक पद्धतीनें ज्ञान मिळविणें, त्याकरतां जरूर ती हालचाल करणें, हत्यारें व उपकरणें यांचा उपयोग करणें, माती–लाकूड–पत्रा यांच्या वस्तू बनविणें, चित्र-कलेचीं कामें करणें, निसर्गसृष्टीचें संशोधन करणें, हौसेखातर प्रयोगशाळेंत प्रयोग करीत बसणें, वर्कशॉपमध्यें आपल्या आवडीचीं कामें करणें इत्यादि गोष्टींची मुलांना स्वाभाविक हौस असते. तिला शालेय शिक्षणानें उत्तेजन मिळतें व तिची वाढ केली जाते ; खच्ची केली जात नाहीं. या सर्व व्यवसायांची बौद्धिक शिक्षणाशींही सांगड घातलेली असते. त्यामुळें हातानें काम करतां करतां बुद्धि वाढते आणि विकास पावलेल्या बुद्धीनें कामाला पूर्णत्व येतें असें अमेरिकन शिक्षणपद्धतीचें तत्त्व आहे.

प्रत्येक हायस्कूलमध्यें निरनिराळे संघ व मंडळें असतात. त्यांत औद्योगिक प्रवृत्तीला प्रोत्साहन देणारे अनेक संघ आहेत. रेडिओ, विज्ञान, मुद्रण-कला, सृष्टिनिरीक्षण, व्यापार, यंत्रशास्त्र, चित्रकला इत्यादि अनेक संघ

(क्लब्ज्)शाळेमध्यें असतात. त्यांना जागा व साहित्य यांची मदत शाळा करिते. प्रयोगशाळेंतील संशोधन, रेडियो, मोटार, विद्युत् इत्यादिविषयक निरनिराळे प्रयोग करणें, शाळेंतील मासिकाची छपाई करणें, चित्रकलायुक्त जाहिराती (पोस्टर्स) काढणें इत्यादि मुलांच्या अनेक चळवळी शाळेंत चालू असतात. त्यामुळें मुलांची क्रियावृत्ति आणि प्रयोगप्रवृत्ति जागृत राहते. मुलगा कोणत्याही व्यवसायांत पडला तरी त्याला या गुणांची मदत होते. सारांश बौद्धिक शिक्षणानें देखील औद्योगिक प्रगतीला लागणारे गुण विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं आपोआप रुजतात.

औद्योगिक शाळा प्रत्यक्ष धंदेशिक्षण देतात व बौद्धिक शिक्षणाच्या शाळा औद्योगिक युगाला लागणाऱ्या गुणांचें संवर्धन करितात. अशा रीतीनें बौद्धिक व औद्योगिक शिक्षणांत विरोध नसून सहकारिता व परस्परोपकारिता आहे. आम्ही फक्त संस्कृतीचेंच शिक्षण देणार असा आकुंचित हट्ट बौद्धिक शिक्षणाच्या संस्थांनी धरलेला नाही. कारण जीवनांतही बौद्धिक आणि औद्योगिक अशा रेखीव मर्यादा नाहीत.

---

प्रकरण पांचवें

# नवीन प्रयोग व उपक्रम

## शैक्षणिक चळवळींचा व्याप

शिक्षणशास्त्राचा अभ्यास करण्याकरितां जगांतील सर्व देशांतील शिक्षणतज्ज्ञ अमेरिकेंत येतात यांतील रहस्य काय आहे ? यूरोपमधील इतर पुढारलेल्या देशांतीलही शिक्षणपद्धती पाहण्यासारख्या आहेत. पण अमेरिकेंत सर्व प्रकारच्या शिक्षणप्रयोगांची व उपक्रमांची जी विविधता आढळते ती इतर देशांत तितक्या प्रमाणांत दिसत नाहीं. अमेरिकन राष्ट्रीय घडामोडींत

शिक्षण हें एक प्रमुख अंग आहे. प्रत्येक शहरांत, प्रांतांत, विद्यापीठांत व शिक्षणसंस्थेंत कांहीं ना कांहीं नवीन उपक्रम चालू असतो. इंग्लंडमधून अमेरिकेंत येणाऱ्या हिंदी माणसाला या दोन देशांतील फरक एकदम दिसून येतो. सर्व देशभर शिक्षणाच्या घडामोडी व विचार विस्तृत प्रमाणावर चालू आहेत.

प्रत्येक विद्यापीठांत शिक्षणशास्त्र शिकविण्याची सोय केलेली आहे. त्याकरितां जे अध्यापक नेमलेले असतात त्यांचे स्वतःचे स्वतंत्र प्रयोग व विचार चालू असतात. निरनिराळ्या प्रांतांतील विद्यार्थी या अध्यापकांचे सन्निध आले म्हणजे नवीन विचार व कल्पना घेऊन जातात व त्यांचा प्रसार करितात. खुद्द विद्याखात्यांचें वजन नाही इतकें या अध्यापकांचें वजन अमेरिकन शिक्षणावर पडलेलें आहे. विद्यापीठाच्या शिक्षक–महाविद्यालयांत आज जी विचारसरणी चालू असेल तिचा परिणाम अमेरिकेच्या पुढील पिढीच्या शिक्षणावर होतो. या अध्यापकांत कांहीं विद्वान् सर्व राष्ट्रांत प्रसिद्ध असे आहेत. ड्यूई, थॉर्नडाईक् व किलपॅट्रिक या अध्यापकांचीं नांवें आज सर्व शैक्षणिक जगाला परिचित आहेत. प्रत्येक विद्यापीठाला जोडून बहुधा एक शिक्षणप्रयोगाची प्राथमिक व दुय्यम शाळा असते. या ठिकाणीं अभ्यासक्रम, अध्यापनपद्धति इत्यादि गोष्टींविषयीं निरनिराळे प्रयोग केले जातात. शैक्षणिक मानसशास्त्राचे प्रयोग करण्याकरितां प्रयोगशाळा असतात, तेथें बालमनाचें निरीक्षण केलें जातें. शैक्षणिक मानसशास्त्रा-विषयीं निरनिराळे प्रयोग याच ठिकाणीं होत असतात.

शिक्षण सुधारणेचे दृष्टीनें खाजगी रीतीनें प्रयत्न करणाऱ्या अनेक प्रयोगसंस्था असतात. विद्याखात्याचें आणि विद्यापीठाचें कमींत कमी व अगदीं आवश्यक असें बंधन स्वीकारून आदर्श शिक्षणाचे दृष्टीनें विविध प्रयोग करण्याचें काम या प्रायोगिक शिक्षणसंस्थांमधून चालू असतें. या शाळांतून यशस्वी झालेल्या उपक्रमांचा परिणाम इतर शाळांवर होतो व त्या ठिकाणीं त्यांचें अनुकरण केलें जातें. याशिवाय खाजगी देणग्यांतून व निधींतून शिक्षणशास्त्राला उपकारक अशीं निरनिराळीं कामें अनेक संस्थांमार्फत चालू असतात. मार्गदर्शक बालकालय (चाईल्ड गाइडन्स् क्लिनिक), प्रौढांचें शिक्षण (अॅडल्ट एज्युकेशन), व्यवसाय मार्गदर्शन (व्होकेशनल् गाइडन्स)

इत्यादि विविध प्रकारचे शिक्षणप्रयोग व उपक्रम सर्व देशभर चालू आहेत.

शिक्षणसंघ, शैक्षणिक मासिकें व इतर वाङमय यांचेंही जाळें सर्व देशभर पसरलेलें आहे. अमेरिकेंत शिक्षणविषयावर जितकीं मासिकें निघतात तितकीं इतरत्र क्वचितच आढळून येतील. प्रत्येक शिक्षकाजवळ स्वतःचीं अशीं दोनतीन शैक्षणिक मासिकें तरी सहज सांपडतील. या मासिकांत कांहीं सामान्य माहिती देणारी आहेत व कांहीं शिक्षणात्मक संशोधनाची माहिती देणारी अशीं आहेत. यांतून निरनिराळ्या प्रयोगांपासून निष्पन्न झालेलीं अनुमानें शिक्षणक्षेत्रांतील कार्यकर्त्यांना निवेदन केलीं जातात. कांहीं शिक्षणात्मक संघटना देशभर पसरलेल्या आहेत, त्यांचें वजनही चांगलें आहे. नॅशनल् एज्युकेशन ॲसोसिएशन ही संस्था सर्व देशभर पसरली आहे. तिचे सभासद ६०,००,००० पेक्षां अधिक आहेत ! या संस्थेचीं निरनिराळीं खातीं असून तीं शिक्षणशास्त्राची आवड असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला उपयुक्त असें वाङमय प्रसिद्ध करीत असतात. या संस्थेचीं दोन अधिवेशनें भरतात. त्या वेळीं देशांत चालू असलेल्या सर्व शैक्षणिक चळवळींचा आढावा घेतला जातो व नवीन विचार मांडले जातात. या संस्थेमार्फत शैक्षणिक संशोधन-कार्यही चालू असतें.

अमेरिकेंत देशभर चालू असलेल्या शैक्षणिक चळवळींचें अगदीं त्रोटक विहंगमावलोकन या ठिकाणीं केलेलें आहे. त्या सर्वांच्या मुळाशीं दोन प्रवृत्ती दिसून येतात—विद्यमान परिस्थितीविषयीं असमाधान व सुधारणेची तळमळ ; आणि प्रयोग करून निरनिराळे मार्ग काढण्याविषयीं उत्सुकता. इतर कांहीं राष्ट्रांत दिसून येणारी आत्मसंतुष्टता आणि अहंकार अमेरिकेंत दिसत नाहीं. स्वतःवर टीका करण्यास व करून घेण्यास लोक तयार असतात. त्यामुळें सुधारणेला वाव मिळूं शकतो.

अमेरिकन शिक्षणांत चालूं असलेल्या कांहीं प्रयोगांची व उपक्रमांची ओझरती ओळख असणें जरूर आहे. आज ना उद्यां आपल्याही शिक्षणांत काय गोष्टी आणाव्या लागतील यांचें पूर्वदर्शन या दृष्टीनें त्यांचा उपयोग होईल.

## शैक्षणिक मार्गदर्शन

अमेरिकन शिक्षणांत बालकाच्या व्यक्तित्वाला अधिक प्राधान्य दिलें

जातें. प्रत्येक व्यक्तीला तिच्या प्रवृत्तीला व अभिरुचीला अनुरूप असा शिक्षणक्रम घेतां यावा या गोष्टीवर शिक्षणतज्ज्ञांचा विशेष कटाक्ष आहे. बालकाची विशेष प्रवृत्ति काय आहे हें शोधून काढणें व त्या विशिष्ट क्षेत्राकडे त्याला वळविणें हें शिक्षणाचें काम आहे. ही जबाबदारी शाळेवर आहे याची जाणीव शिक्षणपुढाऱ्यांना झालेली आहे. • तत्त्व या दृष्टीनें आजपर्यंत ही गोष्ट सर्वांना मान्य होती. परंतु अनुरूप तंत्र या दृष्टीनें अद्याप फारसा प्रयत्न झालेला नाहीं. तो अमेरिकेंत चाललेला दिसून येतो.

शाळेमध्यें मर्यादित विषय शिकविण्याची सोय असेल तर तेथें विद्यार्थ्यांची नैसर्गिक प्रवृत्ति दिसून येण्याला किंवा ती वाढीस लागण्याला वाव नसतो. त्याचप्रमाणें अनेक प्रकारचे विषय शाळेमध्यें असले तरी प्रत्येकाचा थोडासा तरी अनुभव घेतल्याशिवाय आपला तिकडे कल आहे कीं नाहीं हें मुलांना कळणें शक्य नाहीं. याकरितां दुय्यम शिक्षणसंस्थांमध्यें संशोधनात्मक अभ्यासक्रमाचीं एकदोन वर्षे असतात. वरच्या वर्गांत जे विषय ऐच्छिक असतात त्या विषयांचा प्राथमिक अभ्यास करून त्यांचें एकंदर स्वरूप काय आहे, तो विषय आपणाला आवडतो कीं नाहीं, झेपेल कीं नाहीं, पुढें उपयोगी पडण्याचा किती संभव आहे इत्यादि गोष्टी पाहण्याची संधि विद्यार्थ्याला दिली जाते. वरच्या हायस्कूलमध्यें लॅटिन्, गणित, विज्ञान, हस्तव्यवसाय व ललितकला हे विषय ऐच्छिक असले, तर यांतील एकाद्या विषयाची निवड करण्यापूर्वी त्यांचें स्वरूप काय आहे हें कळण्याकरितां प्राथमिक व संशोधनात्मक (Exploratory) अभ्यासक्रमाची योजना केलेली असते. त्यामुळें एकादा विषय घेतल्यानंतर स्वतःला त्याची आवड नसली तरी तो पूर्ण करण्याचा प्रसंग विद्यार्थ्यांवर येत नाहीं. भावी अभ्यासक्रमासंबंधीं मार्ग-दर्शन करण्याचें हें तत्त्व अमेरिकेच्या सर्व शिक्षणांत हळुहळू पसरत आहे.

कॉलेजमध्यें गेल्यानंतर विद्यार्थ्यांना विषयांची निवड करणें अवघड जातें. त्यांचेकरितां प्रत्येक अध्यापक प्राथमिक दोनतीन व्याख्यानें ठेवितो. त्यांमध्यें आपल्या विषयाचा व्याप किती आहे व विद्यार्थ्यांना त्याचा काय उपयोग होईल इत्यादि गोष्टींचें दिग्दर्शन तो करितो. कॉलेजमधील अभ्यासक्रम निवडण्याचे पूर्वी अध्यापकांचा सल्ला विद्यार्थ्यांना मिळावा अशी योजना असते. कॉलेज सुरू होण्यापूर्वीच्या आठवड्यांत सर्व अध्यापक आपापल्या

विषयानुक्रमानें एका हॉलमध्यें अथवा आपापल्या कार्यालयामध्यें बसतात. अभ्यासक्रमांची व विषयांची निवड करण्यापूर्वी ज्या अध्यापकाचे विषय विद्यार्थ्याला घ्यावयाचे असतील त्याला जाऊन तो भेटतो. त्या विषयांचा आपल्या शिक्षणक्रमांत कांहीं उपयोग होईल किंवा नाहीं या दृष्टीनें चर्चा करितो. अध्यापकही विद्यार्थ्याशी चर्चा करून त्याची आवडनिवड व गरज काय आहे तें पाहून त्याला अनुरूप असे अभ्यासक्रम सुचवितो. कॉलेजमध्यें विद्यार्थ्याला मार्गदर्शन करण्याकरितां एकेका अध्यापकाची योजना केलेली असते. सारांश विद्यार्थ्याला त्याच्या भावी अभ्यासक्रमांत, व्यवसायांत व इतर उद्योगांत योग्य मार्ग दाखविणें हें शाळा–कॉलेजचें कर्तव्य समजलें जातें. तें योग्य रीतीनें बजावण्याकरितां निरनिराळ्या साधनांचा उपयोग केला जात आहे व निरनिराळीं साधनें शोधून काढलीं जात आहेत.

## व्यवसायसंशोधन व मार्गदर्शन

व्यवसायसंशोधनाचें किंवा मार्गदर्शनाचें शास्त्रही अमेरिकेंत फार पूर्वी सुरू झालें असून आज चांगलें वाढलें आहे. विद्यार्थ्यानें शिक्षण संपल्यानंतर कोणता उद्योगधंदा करावा किंवा चालू अभ्यासक्रमानंतर कोणत्या व्यवसायाचें शिक्षण घ्यावें या दृष्टीनें त्याला मार्ग दाखविणें हें शाळेचें काम समजलें जातें. त्याकरितां बहुतेक शाळांतून व्यवसायसंशोधन (व्होकेशनल् गायडन्स) अभ्यासक्रमाची व्यवस्था केलेली असते.

प्रथम प्रथम मानसशास्त्रज्ञांचा असा भरंवसा होता कीं व्यक्तीनें कोणता धंदा करावा तें आपण शास्त्रीय परीक्षा करून शोधून काढूं शकूं. त्याकरितां त्यांनीं मनोविज्ञानाच्या आधारानें अनेक कसोट्या ( Tests ) शोधून काढल्या. परंतु शेवटीं त्यांना अनुभव निराळा आला. एकादी व्यक्ति मानसशास्त्रदृष्ट्या विवक्षित व्यवसायाला लायक असली तरी तो व्यवसाय तिला आवडेल, किंवा आवडला तरी मिळेलच असें नाहीं. अमुक एक व्यवसाय कर असें तिऱ्हाइत शास्त्रज्ञानें सांगण्यापेक्षां त्या व्यवसायाची निवड त्या व्यक्तीनेंच स्वतःच्या मनानें, इच्छेनें व आवडीनें केली पाहिजे. त्याकरितां निरनिराळ्या व्यवसायांची माहिती देणें व अनुभव घेण्याची संधि देणें या गोष्टी शाळेला करितां येतील त्या तिनें कराव्यात. आपण पुढें काय व्यवसाय

करावा या दृष्टीनें निरीक्षण करण्याची संशोधनबुद्धि विद्यार्थ्याला द्यावी. जरूर तेथें त्याला मार्गदर्शन करीत असावें. अशा रीतीनें स्वतः विद्यार्थ्यालाच दृष्टि आली तर माहिती मिळवून व अनुभव घेऊन तो आपला व्यवसाय स्वतःच निवडूं शकेल. अशा तऱ्हेनें निवड झाली तर तिच्यांत चूक होण्याची शक्यता कमी.

## शाळेच्या मदतीनें व्यवसायाची निवड

अमेरिकेंत व्यवसायसंशोधनाला प्रारंभ हायस्कूलच्या पहिल्या दोन-तीन वर्षांत, चौदापंधरा वयाचे सुमारास होतो. निरनिराळ्या व्यवसायांचें वाङ्मय शाळेमध्यें ठेविलेलें असतें. विद्यार्थी तें वाचतात. अनेक व्यवसायांतील यशस्वी लोकांचीं व्याख्यानें विद्यार्थ्यांपुढें होतात. विद्यार्थी निरनिराळे उद्योगधंदे व कारखाने यांची प्रत्यक्ष पाहणी करितात. या सर्व माहितीचें पद्धतशीर टांचण प्रत्येक विद्यार्थी करून ठेवितो. माहितीचे दृष्टीनें हा कार्यक्रम झाला. प्रत्यक्ष अनुभवाचे दृष्टीनें कांहीं शाळांच्या कारखान्यांत व्यवस्था केलेली असते. एका वर्कशॉपमध्यें दहाबारा निरनिराळे हस्तव्यवसाय शिकविण्याची सोय करितात. या व्यवसायांचा फक्त प्राथमिक अनुभव विद्यार्थ्यांना दिला जातो. तो किंवा त्या प्रकारचा व्यवसाय आपणांस आवडतो कीं नाहीं, त्यांत आपली प्रगति होण्याची शक्यता आहे कीं नाहीं हें पाहण्याची संधि विद्यार्थ्याला मिळावी येवढाच या कारखान्यांचा उद्देश असतो. प्रत्येक विद्यार्थी दर दोन महिन्याला एक याप्रमाणें निरनिराळ्या व्यवसायांचा अनुभव घेत असतो. अशा रीतीनें अनेक बाजूंनीं माहिती व अनुभव यांचा फायदा विद्यार्थ्याला मिळतो व त्याचे आधारावर तो आपला व्यवसाय निवडतो. शाळेंत ज्या अभ्यासेतर अवांतर चळवळी चालतात त्यांचाही उपयोग व्यवसायसंशोधनाकडे होऊं शकतो याचा निर्देश पूर्वीं केलेला आहेच.

या पद्धतीचा एक सुपरिणाम असा होतो कीं, विद्यार्थ्यांपुढें कांहीं तरी निश्चित ध्येय राहतें. लाकडाच्या ओंडक्याप्रमाणें तो वाहात जात नाहीं. आपल्याकडे स्थिति अशी आहे कीं सोळा वर्षें शिक्षण घेतलें तरी आपल्याला पुढें काय व्यवसाय करावयाचा आहे याचा विचार विद्यार्थ्यांचे मनांत येत

नाहीं, आणि तो आला तरी निवड करण्याचे बाबतींत त्याला मदत करणें हें आपलें कर्तव्य आहे असें शाळा व कॉलेजचे अधिकारी मानीत नाहींत. मग तरुण पिढीच्या मार्गदर्शनाची जबाबदारी आहे कोणाकडे असा प्रश्न उभा राहतो. व्यवसायसंशोधनाचा हा उपक्रम आपल्याकडे शक्य तितका लौकर करणें जरूर आहे. बेकारीवर त्याचा थोडाबहुत परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं.

## मनःस्वास्थ्यरक्षण—मानसिक आरोग्य

विद्यमान अमेरिकन शिक्षणांत विद्यार्थ्यांच्या मानसिक आरोग्याकडे अधिकाधिक लक्ष देण्याची प्रवृत्ति दिवसेंदिवस वाढत आहे तीही समजून घेणें जरूर आहे. आपल्याकडील शिक्षणाच्या गिरणींत विद्यार्थी ही एक निर्जीव 'वस्तु' समजली जाते. तिला कांहीं मन, भावना, आशा, निराशा, महत्त्वाकांक्षा, दुःख, आनंद इत्यादि विकार आहेत याची जाणीव आपल्या शिक्षणपद्धतीमध्यें बिलकल नाहीं असें खेदानें म्हणावें लागतें. विद्यापीठांची आणि विद्याखात्यांची, शाळा चालकांची आणि शिक्षकांची, परीक्षकांची आणि पालकांची, सर्वांची वृत्ति एकाच सांच्याची आहे. ठराविक विषय, ठराविक सांचे, ठराविक परीक्षा, या सर्वांतून शिरसलामत झुकांडी देऊन बाहेर पडेल तो भाग्यवान्. बाकीचे कोठें जातात आणि काय करितात, लक्ष देतो कोण? विद्यापीठाची परीक्षा झाली कीं त्यांतून लॉटरीप्रमाणें होतील ते पास, बाकीचे नापास. नापासांची पुढें काय सोय याचा विचार करणें जणूं शिक्षणाच्या क्षेत्रांत येत नाहीं. एकादा विद्यार्थी पांचवी पास होऊन सहावींत जाण्याइतका तयार झालेला असला तरी शाळा-प्रवेशाविषयींच्या नियमांचा चुकून कांहीं भंग झाला असेल तर त्याला वर्षभर खालच्या वर्गांत बसावयास पाहिजे. अशा प्रकारची यांत्रिक शिक्षणपद्धति आपल्याकडे निर्माण झाली आहे. अशीच अमेरिकेंतही होती. परंतु तिच्यामध्यें माणुसकी आणण्याचा प्रयत्न मोठ्या प्रमाणावर चाललेला आहे. याचें सर्व श्रेय 'मनःस्वास्थ्य' किंवा 'मानसिक आरोग्य' (मेंटल् हायजीन्) या शास्त्राच्या वाढीकडे आहे.

म नः स्वा स्थ्य शा स्त्रा चा उद्देश प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांतील

स्वास्थ्याला अनुकूल असें वातावरण कायम ठेवणें हा आहे. आनंद, उत्साह, आशा, महत्त्वाकांक्षा इत्यादि विधायक भावनांचा परिपोष व्हावा व एतद्विरुद्ध भावना निर्माण होऊं नयेत किंवा झाल्यास त्यांचा परिहार करावा. शाळेंत शिक्षणाचें कार्य चालू असतां विद्यार्थ्याच्या अंत:करणांत त्याच्या मन:स्वास्थ्याला विघातक अशा भावना शक्य तर निर्मण होऊं नयेत. त्याचा उत्साह व आनंद कायम राहून त्याचें शिक्षण व्हावें. शाळेंतून व शिक्षण-क्रमांतून बाहेर पडणारी व्यक्ति निराश, महत्त्वाकांक्षाविरहित, यशाबद्दल संदेह बाळगणारी, आत्मविश्वासरहित अशी असूं नये. उलट आत्मविश्वास, आशा आणि उत्साह अशा भावनांचा परिपोष शिक्षणाचे योगानें व्हावा असा शैक्षणिक मन:स्वास्थ्यशास्त्राचा उद्देश आहे.

## यशापयशाचे मानसिक परिणाम

प्रत्यक्ष उदाहरण घेऊन सांगावयाचें झाल्यास आपल्याकडील परीक्षा-पद्धतीचें घेतां येईल. सर्व दर्जांचे व बुद्धीचे विद्यार्थी एकाच सांच्यांत घालून अखेर परीक्षेंत त्यांचा निकाल लाविला जातो. नापास झालेल्या विद्यार्थ्यांच्या मन:स्थितीचा विचार या शिक्षणांत व परीक्षापद्धतींत केला जात नाहीं. परीक्षा आणि अभ्यासक्रमाचे विषय यांना जें महत्त्व दिलें जातें तें व्यक्तींना दिलें जात नाहीं. ही परिस्थिति सुधारून, या नापासांचें प्रमाण कमी कसें करितां येईल, नापास होणारे विद्यार्थी दुसऱ्या कोणत्या क्षेत्रांत यशस्वी होऊं शकतील, अपेशीपणाची भावना विद्यार्थ्यांचे मनांत राहूं नये व त्यांचा आत्मविश्वास कमी होऊं नये या दृष्टीनें काय करितां येईल त्याचा विधायक विचार झाला पाहिजे. अमेरिकेंत असे प्रयत्न अनेक मार्गांनीं चालूं आहेत.

सर्व दर्जांचे विद्यार्थी एकाच शिक्षणक्रमांत घालून मग कांहींना नापास करण्यापेक्षां प्रथमपासूनच जो ज्या क्षेत्रांत यशस्वी होईल तिकडे त्याला घालण्याचा प्रयत्न होतो. प्रत्येक विद्यार्थ्यानें आपल्या बुद्धीच्या मगदुरा-प्रमाणें शिक्षणक्षेत्र निवडावें व त्यांत आपली पराकाष्ठा करून यशस्वी व्हावें अशी योजना केली जाते. त्यामुळें अपयश घेण्याचा प्रसंग कमींत कमी विद्यार्थ्यांवर येतो. शिक्षणानें तरुण पिढीचा आत्मविश्वास नाहींसा होत नाहीं.

विषयांचें वैपुल्य, अभ्यासक्रमांची विविधता, व सहानुभूतीपूर्ण मार्गदर्शनाची व्यवस्था इत्यादि योजनांमुळें विद्यार्थ्याचा आनंद व उत्साह कायम राहतो. उलटपक्षीं सालोसाल नापास होण्यानें, वर्षभर वर्गांत शेवटीं राहिल्यामुळें, आणि शिक्षक व पालक यांच्याकडून सतत तुच्छतापूर्वक वागणूक मिळाल्यामुळें विद्यार्थ्यांच्या मनांत एक प्रकारची कनिष्ठत्वाची जाणीव उत्पन्न होत असते. ती वरेच दिवस राहिली म्हणजे पुढें आयुष्यांत जाचक होते.

यशापयशाची अखंड भीति व कनिष्ठत्व-श्रेष्ठत्वाचा मनोगंड या दृष्टींनीं वर विचार केला आहेच. त्याचप्रमाणें जुन्या शिक्षणपद्धतीमुळें मुलांचे मनांत उत्पन्न होणाऱ्या इतर अनिष्ट भावनाही कशा टाळतां येतील या दृष्टीनें अमेरिकन शिक्षणांत विचार चालू आहेत. परीक्षापद्धति, मार्क देण्याची पद्धति, विद्यार्थ्यांच्या वर्गीकरणाची पद्धति इत्यादि सर्व तपशिलांची पुनर्घटना होत आहे. मार्क आणि बक्षिसें वगैरे देऊन विद्यार्थ्यांमध्यें चुरशीची व स्पर्धेची भावना निर्माण करणाची पद्धत हळुहळू बंद पडत चालली आहे. त्याऐवजीं सांघिक रीतीनें कामें करून परस्परांना मदत करण्याची सात्त्विक भावना निर्माण करण्याचा प्रयत्न शिक्षणांत होत आहे. शाळेच्या वेळा, शारीरिक आरोग्य, मंद व हुषार विद्यार्थ्यांची वर्गवारी, विशिष्ट प्रवृत्तींच्या मुलांचें शिक्षण, अभ्यासाच्या पद्धती, गृहशिक्षण व गृहस्थिति इत्यादि सर्व गोष्टींचा विचार विद्यार्थ्यांचें मनःस्वास्थ्य व मानसिक आरोग्य कसें राहील या दृष्टीनें केला जातो. सारांश, अमेरिकन शिक्षणांत विद्यार्थ्यांच्या केवळ बौद्धिक वाढीकडे लक्ष दिलें जात नसून त्यांच्या सार्वांगिक व विशेषतः भावनाविषयक वाढीकडे अधिकाधिक लक्ष दिलें जात आहे. ही अगदीं अलीकडील प्रवृत्ति आहे.

## शिक्षण व राष्ट्राचें ध्येय

अभ्यासक्रमाचे विषय आणि अध्यापन यांकडे पाहिलें तर अमेरिकन शिक्षणांत दोन विषयांवर विशेष भर असलेला दिसून येतो—समाजविषयक शास्त्रें व ललितकला. याच विषयांवर या देशांत विशेष जोर सध्यां कां आहे ही गोष्ट थोडी विचार करण्यासारखी आहे. प्रत्येक समाजाला कांहीं तरी प्राप्तव्य असतें. नसलेली गोष्ट मिळवावयाची असते. कमी असलेला गुण

भरून काढावयाचा असतो. या कार्याकरितां शिक्षणाचा उपयोग करून घेतला जातो. प्रत्येक समाजाला काय विशेष ध्येय साधावयाचें आहे तें त्याच्या शिक्षणपद्धतीवरून दिसून आलें पाहिजे. या नियमाला हिंदुस्थान मात्र अपवाद आहे. कारण येथें राष्ट्राचें प्राप्तव्य व शिक्षण यांच्यांत अद्याप विशेष संबंध दिसून येत नाहीं.

## समाजापुढील प्रश्न

राष्ट्र या दृष्टीनें विचार करतां आज अमेरिकेचे प्रश्न काय आहेत याचा विचार केला म्हणजे असें दिसून येईल कीं, हे प्रश्न मुख्यत: समाजशासन-विषयक आहेत. अमेरिकन समाजपुरुषाची घटना विविध राष्ट्रांतील लोकसंख्या एकत्र होऊन झालेली आहे. हिंदुस्थानमध्यें जसे अनेक वंश, अनेक धर्म, अनेक संस्कृती व तज्जन्य अनेक निष्ठा यांचा प्रश्न आहे, तशीच अमेरिकेची स्थिति आहे. हा समाजविषयक राष्ट्रीय प्रश्न झाला. राज-कारणाचे दृष्टीनें विचार करतां लोकशाही हें ध्येय आहे. परंतु अनियंत्रित लोकशाहीमध्यें जे दुर्गुण संभवतात ते येथेंही निर्माण झालेले असून ते कसे दूर करावेत हाही एक राजकीय प्रश्न आहे. आर्थिक दृष्टीनें विचार करतां औद्योगिक व यांत्रिक दृष्ट्या अमेरिकेला आज जगांत पहिलें स्थान आहे. परंतु याच गुणामुळें देशांत संपत्तीची अत्यंत विषम विभागणी झाली असून कामकरी, श्रमजीवी, व बुद्धिजीवी वर्गाला आर्थिक दृष्ट्या त्यांच्या श्रमाचा न्याय्य मोबदला कसा मिळवून देतां येईल हाही समाजापुढें एक प्रश्न आहे. देशांत नीग्रोंची वस्ती असल्यामुळें दोन भिन्न मानववंशांत कसे संबंध असावेत हाही प्रश्न अनेक वर्षें अमेरिकेपुढें आहे. महायुद्ध होऊन एक पिढीदेखील गेली नाहीं तोंच दुसरें महायुद्ध सुरू होऊं पाहात आहे. त्यांत अमेरिकेचें धोरण काय राहावें असा पेंच राष्ट्रापुढें पडलेला आहे. हे सर्व प्रश्न समाज-शासनविषयक आहेत. त्यांचें प्रतिबिंब अमेरिकेच्या शिक्षणक्रमांत पडलेलें दिसून येतें.

## समाजाचा अभ्यास

प्राथमिक व दुय्यम शाळांतून आपल्याकडे इतिहास शिकवितात. त्याचेऐवजीं ‘ समाज अभ्यास ’ (सोशल् स्टडीज्) किंवा समाजविषयक शास्त्रें

असा व्यापक विषय अमेरिकन शिक्षणक्रमांत ठेविलेला असतो. यांत इतिहास, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, संस्कृतीचा इतिहास, राजकारणशास्त्र, नागरिक-शास्त्र इत्यादि समाजशास्त्रविषयक शाखांचा प्राथमिक स्वरूपाचा अभ्यास होतो. तो चालूं असतां देशांतील व समाजांतील चालू परिस्थितीचा विचार केला जातो. कांहीं पुढारलेल्या अशा प्राथमिक शाळा आहेत, त्यांतील बाल विद्यार्थी देखील समाजांतील महत्त्वाच्या प्रश्नांची चर्चा करूं शकतात. समाजां-तील विविध शासनसंस्थांचें प्रत्यक्ष कार्य कसें चालतें तें पाहण्याकरितां विद्यार्थी शहरांतील संस्था समक्ष जाऊन पाहतात. हायस्कूलच्या विद्यार्थ्यांना 'अमेरिकन लोकशाहीपुढील प्रश्न व अडचणी' (प्रॉब्लेम्स् ऑफ अमेरिकन डेमॉक्रसी) यासारखे अभ्यासक्रम असतात. त्यांचे साहाय्यानें विद्यार्थ्यांपुढें समाजाचे राष्ट्रीय प्रश्न काय आहेत ते मांडले जातात. कॉलेजमध्यें पहिल्या एकदोन वर्षांत जो अभ्यासक्रम असतो त्यांतही नागरिकनीतिशास्त्र व समाज-शास्त्र यांसारख्या विषयांना प्रमुख स्थान असतें. सालोसाल विद्यार्थी जे अभ्यासक्रम घेतात त्यांत कोणते अधिक लोकप्रिय आहेत त्यांची गणना करता असें दिसून आलें कीं कॉलेज व विद्यापीठाचे विद्यार्थ्यांचा समाजविषयक अभ्यासक्रमाकडे विशेष ओढा आहे. नवीन परिस्थितीमुळें कौटुंबिक व्यवस्थाही बदलूं लागली आहे ; तिचें प्रतिबिंब कॉलेजमध्यें अभ्यासक्रमांत पडलेलें आहे. "कुटुंबव्यवस्था व तिचें भवितव्य", "विवाह व वैवाहिक जीवनाचे प्रश्न" अशा स्वरूपाचे ऐच्छिक अभ्यासक्रम कांहीं विद्यापीठांनीं सुरू केले असून ते घेण्याकरितां प्रौढ व वृद्ध विद्यार्थीही नांवें नोंदवितात. सारांश समाजांत व राष्ट्रांत उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांचा पद्धतशीर व निर्विकार मनानें अभ्यास करण्याची जागा म्हणजे शिक्षणसंस्था आहे ही जाणीव दिसून येते. इतर शिक्षणपद्धतींत या प्रश्नांपासून पलायन करण्याची प्रवृत्ति दिसून येते, त्यामुळें शिक्षण आणि समाजप्रश्न यांची कोठें गांठच पडत नाहीं.

## प्रतिभेचा शोध व पुरस्कार

अमेरिकन शिक्षणांत लोकप्रिय झालेलें व पुढारलेल्या शिक्षणसंस्थांमधून प्रामुख्यानें दिसून येणारें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे ललितकलांचा अभ्यास हें होय. विशेषतः शिक्षणप्रयोगार्थ चालविलेल्या संस्थांतून हें वैशिष्ट्य प्रामुख्यानें

दिसून येतें. पुढील पिढीमध्यें या वैशिष्टयाचा प्रसार सामान्य शिक्षणसंस्थांमधूनही होईल. चित्रकला, रंगकला व या क्षेत्रांतील इतर कलांचा उच्च अभ्यास कांहीं प्राथमिक व दुय्यम शाळांतून होतो. एकाद्या हायस्कूलचें मासिक अथवा वार्षिक प्रकाशन पाहिलें असतां विद्यार्थ्यांच्या चित्रकलेचा दर्जा किती वरचा आहे याची कल्पना येते. कांहीं हायस्कूल्समधून मूर्तिकलेचाही अभ्यास केला जातो. चांगल्या प्रतीच्या एकाद्या हायस्कूलमध्यें प्रवेश केल्यास विद्यार्थ्यांनीं भिंतीवर रंगचित्रें काढून त्या विभूषित केलेल्या आहेत असें दिसून येतें. शिक्षणांतील चित्रकला केवळ वहीमध्यें किंवा कागदावर राहात नाहीं. ती रोजच्या व्यवहारांत यावी म्हणून शाळेंतील भिंती चित्रकलेकरितां विद्यार्थ्यांना दिल्या जातात. शाळेंतील नाटचप्रयोग होतात त्या वेळीं लागणारे देखावे करण्याचें काम या चित्रकार विद्यार्थ्यांकडे देण्यांत येतें. संगीतकलेला बहुतेक शाळांतून प्राधान्य देण्यांत येतें. प्रत्येक शाळेचा एक ऑर्केस्ट्रा असतो. विद्यार्थ्यांच्या नाटचकलेला शाळा उत्तेजन देतात. ललित वाङमयांत प्रतिभाशाली विद्यार्थी हुडकून काढण्याकरितां स्वतंत्र लेखनाला प्रोत्साहन दिलें जातें. अशा रीतीनें ललित वाङमय व ललितकला यांच्या अभ्यासाला शाळांच्या शिक्षणक्रमांतून हळुहळू प्रमुख स्थान मिळूं लागलें आहे. किंबहुना या अभ्यासाची विशेष सोय असणें हें प्रागतिक शाळेचें एक मुख्य लक्षण समजलें जातें.

## संस्कृतीविषयक महत्त्वाकांक्षा

अमेरिका राष्ट्र अवघे तीन शतकांचें आहे. आजपर्यंतचे त्याचे दिवस निसर्गाशीं झगडण्यांत आणि औद्योगिक व यांत्रिक प्रगति करण्यांत गेले. त्यामुळें भौतिक दृष्टचा राष्ट्र पुढें आलें. परंतु साहित्य–संगीत–कला इत्यादि जीं संस्कृतीचीं अंगें समजली जातात त्या क्षेत्रांत विशेष प्रगति करण्याला राष्ट्राला वेळ मिळाला नाहीं. त्या बाबतींत आपण यूरोपियन राष्ट्रांचे मागें आहोंत, म्हणून अमेरिकेची अशी विशिष्ट कला व संस्कृति वाढविली पाहिजे, असें अमेरिकन लोकांना वाटतें. या उत्कट भावनेचें प्रतिबिंब शाळांतील अभ्यासक्रमांत दिसून येतें. राष्ट्रीय आकांक्षा आणि शिक्षण यांचा किती

निकट संबंध आहे! असलेली संस्कृति जतन करणें आणि कमी पडणारें अंग भरून काढणें हें शिक्षणाचें काम आहे.

एक वेळीं साहित्य आणि कला यांत पुढारलेला हिंदुस्थान आज या गुणांना महाग झाला आहे. भारतीय कलांची व संस्कृतीची पद्धतशीर हेळसांड आपल्या शिक्षणसंस्थांकडून चाललेली आहे. ती थांबवून आपल्या कला व संस्कृति टिकविणें हें शिक्षणाचें काम आहे. त्याचप्रमाणें कमी पडणारा गुण म्हणजे औद्योगिक प्रवृत्ति. अमेरिकन शाळांतून जसे चित्रकलांचे व संगीतांचे वर्ग आहेत तसे आपल्याकडील शाळांतून हस्तव्यवसायाचे व धंदेशिक्षणाचे वर्ग प्रत्येक शाळांतून सुरू झाले पाहिजेत. जी गोष्ट देशांत कमी आहे ती भरून काढण्याचा प्रयत्न आधीं शाळांकडून झाला पाहिजे, हें तत्त्व आपले शिक्षणाधिकारी लौकर ओळखतील तर शिक्षणाचा उपयोग राष्ट्रीय प्रगतीकडे झाल्याखेरीज राहणार नाही.

## शैक्षणिक सामुग्रीचें वैपुल्य

शिक्षणाचें बहिरंग म्हणजे साधनसामुग्री. या बाबतींत अमेरिकेची श्रीमंती पुरेपूर दिसून येते. द्रव्याची अनुकूलता आणि शिक्षणावर श्रद्धा या दोन गोष्टींचा संगम झाल्यामुळें अमेरिकेंतील शाळांची साधनसामुग्री उत्कृष्ट दर्जाची झालेली आहे असें युरोपियन लोकही कबूल करितात. या साधनसामुग्रीचा परिणाम शिक्षणावर अनुकूल होतो हें सांगणें नकोच. प्रत्येक शाळेंत, विशेषत: हायस्कूलमध्यें एक चांगला मुक्तद्वार ग्रंथसंग्रह (ओपन शेल्फ् लायब्ररी) असतो. या ठिकाणीं विद्यार्थी शांतपणें येऊन वाटेल तें पुस्तक घेऊन वाचीत अथवा अभ्यास करीत बसतात. असे ग्रंथसंग्रह चांगल्या प्रकारच्या जर्मन हायस्कूलमध्येंही दिसले नाहींत. भौतिकशास्त्रें शिकविण्या-करितां उत्कृष्ट प्रयोगशाळा असतात. कांहीं ठिकाणीं विद्यार्थी स्वत: रेडियो करितात. अन्यत्र विद्यार्थ्यांनीं तयार केलेलीं प्रदर्शनें व वस्तूसंग्रह (म्यूझियम्स्) असतात. हस्तव्यवसाय शिकण्याकरितां एक वर्कशॉप्, ऑटोमोबील शॉप व छापखाना हीं खातीं बहुतेक हायस्कूलांतून असतातच. मुलींच्या गृहशिक्षणा-करितां आधुनिक चुली व इतर साधनसामुग्रीनें सज्ज केलेलीं नमुना-घरें ठेवितात. चित्रकला शिक्षणाकरितां चांगले स्टूडिओज् साधनसामुग्रीनें सज्ज

असतात. प्रत्येक शाळेचें एक मोठें थिएटरवजा सभागृह असतें. शैक्षणिक चित्रपटांचा उपयोग पुष्कळ प्रमाणांत केला जातो. त्याचप्रमाणें रेडिओचाही उपयोग शालेय शिक्षणाकडे करून घेण्याचे दृष्टीनें पुष्कळ प्रगति झालेली आहे. अमेरिकन क्रमिक पुस्तकें हीं छपाई, चित्रें व अद्ययावत् माहिती इत्यादि गुणांनीं युक्त अशीं असतात. विद्यार्थ्यांच्या प्रगतीची नोंद ठेवण्याची पद्धति अगदीं सुधारलेली आहे. दहा हजार विद्यार्थ्यांचें हायस्कूल असलें तरी एकाद्या विद्यार्थ्याविषयीं तपशीलवार माहिती अगदीं थोडचा वेळांत मिळू शकते. प्रत्येक शाळेला जोडून एक रुग्णपरिचारिका (नर्स) असते. शारीरिक शिक्षणाची साधनसामुग्रीही बराच खर्च करून जमविलेली असते. व्यायामा-करितां मोठीं मंदिरें व पोहण्याचे तलाव या गोष्टी प्रत्येक शाळेमध्यें विशेष रीतीनें दिसून येतात. सारांश, साहित्यसामुग्रीवर अमेरिकन लोकांनीं मुक्तहस्तानें खर्च केला आहे ही गोष्ट त्यांना भूषणावह आहे. केवळ देखावा म्हणून पाहणारालाही अमेरिकन शाळा 'प्रेक्षणीय' अशा आहेत. या शाळा एकेकदां ज्यांनीं पाहिल्या आहेत त्यांना ही आनंदाची स्मृति जन्मभर राहील. अमेरिकेनें पुष्कळ संपत्ति मिळविली व ती पाण्यासारखी खर्च केली. अनेक प्रकारचे विलास भोगले. तरी पण शिक्षणावर आपण काटकसर केली नाहीं एवढी गोष्ट तरी त्यांना भावी पिढीला अभिमानानें सांगतां येईल.

प्रयोगांची विविधता, विचारांचें नाविन्य, शिक्षणसंस्थांचा प्रसार, विद्यार्थ्यांच्या सूक्ष्म मनोरचनेचा अभ्यास, समाज आणि संस्कृति यांना अनुरूप असें शिक्षण आणि शिक्षणाची आधुनिक साहित्यसामुग्री इत्यादि अनेक वैशिष्टचांमुळें अमेरिका हें शिक्षणशास्त्र जिज्ञासूंचें काशीक्षेत्रच झालेलें आहे.

## प्रकरण सहावें

# अमेरिकन शिक्षणांतील गुणदोष

### निरीक्षकाची भूमिका

पूर्ण निर्दोषत्व हें परमेश्वराचे ठिकाणीं देखील संभवत नाहीं, मग एकाद्या व्यक्तींत अथवा देशांत तें कसें येणार ? पुन: दोष हे देखील पाहणाऱ्याच्या दृष्टीवर अवलंबून आहेत. हिंदुस्थाननें इतर देशांकडे पाहतांना स्वत:चा चष्मा लावावा. पुष्कळ वेळां स्थिति अशी होते कीं युरोपियन दृष्टीनें पाहिलेला अमेरिका आपणांस माहीत असतो. तीच आपली दृष्टि आहे अशा अहंकारानें आपण बोलत असतों. यूरोप—अमेरिकेचे आर्थिक व राजकीय संबंध परस्परांकडे नि:पक्षपाती व निर्विकार दृष्टीनें पाहण्याइतके सरळ नाहींत, म्हणून यूरोपच्या चष्म्यांतून अमेरिका पाहण्यापूर्वी आपली त्रयस्थ भूमिका स्थिर करून मग या देशाकडे पाहावें, म्हणजे केवळ दोष न दिसतां त्या देशाकडून आपणांस काय घेण्यासारखें आहे तें आपण पाहूं. त्याचबरोबर निर्विकार मनानें त्याचे दोषही सहानुभूतिपूर्वक पाहून ते टाळण्याचा प्रयत्न करूं. या हिंदी भूमिकेवरून—यूरोपियन भूमिकेवरून नव्हे—अमेरिकन शिक्षणाचें गुणदोषपरीक्षण करणें जरूर आहे.

### आध्यात्मिक तत्त्वज्ञानाला स्थान नाहीं

हिंदी भूमिकेवरून निरीक्षण करणाऱ्या प्रेक्षकाला अमेरिकन शिक्षणांत एक मोठा दोष दिसतो तो म्हणजे आध्यात्मिक शिक्षणाचा अभाव. ‘आध्यात्मिक’ हे शब्द हल्लीं आपल्याकडे तिरस्काराला व उपहासाला पात्र झालेले आहेत हें दुर्दैव आहे. वैयक्तिक व सामाजिक जीवनाच्या मुळाशीं अंतिम तत्त्वें काय आहेत याचा विचार झाल्याशिवाय व त्या दृष्टीनें व्यक्तीची कांहीं तत्त्वनिश्चिति झाल्याशिवाय बाह्यत: आचरणांत आणलेले सामाजिक अथवा वैयक्तिक गुण अगदीं तात्पुरते व अस्थिर असे होतील. जग, व्यक्ति व समाज यांमधील संबंध काय आहेत याविषयीं प्रत्येक व्यक्तीच्या तत्त्वज्ञानाची निश्चिति झाल्याशिवाय वैयक्तिक सदाचाराला शाश्वति नाहीं. कोणत्याही आदर्श

शिक्षणपद्धतीमध्यें या दृष्टीनें उच्च भूमिकेवरील, पंथभेदातीत, व्यापक स्वरूपाच्या अशा आध्यात्मिक शिक्षणाची सोय होणें जरूर आहे. याचा अर्थ संकुचित स्वरूपाचें धार्मिक शिक्षण द्यावयाचें असा नाहीं. स्थल–काल–समाजपरत्वें बदलणाऱ्या धर्मांच्या मुळाशीं तत्त्वज्ञानाचीं जीं शाश्वत स्वरूपाचीं तत्त्वें असतील त्यांचें ज्ञान सुसंस्कृत म्हणविणाऱ्या व्यक्तीला होणें जरूर आहे. अशा शिक्षणाची सोय अमेरिकेंतच काय परंतु यूरोपमधील इतर कोणत्याच देशानें केलेली नाहीं.

अमेरिकन कायदा व राज्यघटना यांच्या दृष्टीनें अमेरिकन राज्यपद्धति व तदंतर्गत शिक्षण यांना धर्माचें वावडें आहे. अनेक पंथ, अनेक धर्म असलेल्या देशांत ही गोष्ट स्वाभाविक आहे. आज हिंदुस्थानचीही तीच स्थिति आहे. धर्मशिक्षण दिलें तर पुराणमताभिमानी व एककल्ली शिक्षकांच्या संकुचित मतांना विद्यार्थी बळी पडण्याचा संभव असतो. न दिलें तर जगांतील एका महत्त्वाच्या व आयुष्याशीं निगडित अशा विषयापासून मुलांना अलिप्त ठेवल्याचा दोष पदरीं येतो. अशा स्थितीमध्यें संकुचित धर्माचे प्रदेश टाळून उच्च भूमिकेवरील आध्यात्मिक शिक्षणाचा कार्यक्रम आंखण्याचा प्रयत्न शिक्षण-तज्ज्ञांचे कडून झाला पाहिजे. आध्यात्मिकतेमुळें उत्पन्न होणाऱ्या वैयक्तिक व सामाजिक सद्‌गुणांवर अमेरिकेचा भर आहे. पण या गुणांना आधारभूत असें तत्त्वज्ञान व्यक्तीजवळ नसेल तर सदाचाराला टिकाऊपणा येणार नाहीं.

## निश्चित ध्येयवादाचा अभाव

शैक्षणिक तत्त्वज्ञान, अध्यापनपद्धति, शालेय साहित्यसामुग्री इत्यादि सर्व पाहून मनाला समाधान वाटतें. परंतु प्रत्यक्ष तरुण पिढीच्या सन्निध जाऊन त्यांचे ठिकाणीं काय ध्येयवाद आहे असें बारीक निरीक्षण करणाराची थोडी निराशाच होते. ही गोष्ट लेखकानें अमेरिकन स्नेह्यांच्या व विद्यार्थ्यांच्याही दृष्टीला आणली असून ती त्यांना मान्य झालेली आहे. १९३० नंतरच्या काळांत मात्र विद्यार्थ्यांत जागृति झाली असून त्यांचे ठिकाणीं एक सामाजिक ध्येयवाद निर्माण झालेला आहे. त्याचा प्रसार बहुसंख्य विद्यार्थ्यांत होण्यास थोडा वेळ लागेल. परंतु शिक्षणाचा असा निश्चित ठसा विद्यार्थ्यांवर उठलेला नाहीं याचें एक महत्त्वाचें कारण आहे. अमेरिकन समाजपुरुषाचे अंतःकरणांत एक

प्रकारचा अंतःकलह व भावना–विरोध चालू आहे. आतांपर्यंत अमेरिकन राष्ट्रीयत्व व लोकशाही यांचा प्रसार शिक्षणानें केला. परंतु गेल्या पिढींतील महायुद्ध आणि अनिरुद्ध लोकशाहीनें निर्माण झालेले सामाजिक अन्याय पाहून सुशिक्षित, विचारी, विद्वान् अशा शिक्षकांच्या व शिक्षणपुढाऱ्यांच्या अंतःकरणांत पूर्वध्येयांबद्दल साशंकता उत्पन्न झालेली आहे. अमेरिकन राष्ट्रीयत्व, लोकशाही, आंतरराष्ट्रीयत्व व समाजिक न्याय या सर्वांचा मेळ कसा घालावा या विचारानें त्यांच्या अंतःकरणांत खळबळ माजलेली आहे. ती शांत होऊन त्यांतून एकादें ध्येयवादाचें रत्न बाहेर पडल्याशिवाय अमेरिकन शिक्षणांत व तरुण पिढींत निश्चित असा ध्येयवाद येणार नाहीं. रशिया, जर्मनी व इटली यांसारख्या देशांतील शिक्षणपद्धतींत जी ध्येय-निश्चितता आहे ती अमेरिकेंत नाहीं. त्याला अमेरिकेची मिश्र व विविध निष्ठेची लोकसंख्या हें एक मुख्य कारण आहे.

## तत्वज्ञान व व्यवहार यांतील अंतर

शिक्षणशास्त्राच्या तात्त्विक अभ्यासाला व शिक्षणप्रयोगांची विविधता पाहण्याला अमेरिका हा देश इतर देशांचे मानानें चांगला आहे ही गोष्ट खरी. परंतु शिक्षणशास्त्रांत अमेरिकन तज्ज्ञांनी प्रतिपादिलेल्या सर्वच तत्त्वांचें व्यावहारिक स्वरूप अमेरिकन शिक्षणांत सार्वत्रिक दिसेल अशी अपेक्षा केल्यास ती चूक ठरेल. ठिकठिकाणीं शिक्षणशास्त्राचीं अनेक महाविद्यालयें आहेत. शिक्षणाचें अध्ययन–अध्यापनाला ज्यांनीं आपला जन्म वाहिला आहे असे अनेक अध्यापक त्या ठिकाणीं अहर्निश विचार करीत व शिकवीत आहेत. त्यांचेकडून तत्त्वांची व विचारांची निर्मिति जितक्या लौकर होते तितक्या लौकर त्यांची अंमलबजावणी प्रत्यक्ष शिक्षणपद्धतींत होणें शक्य नाहीं. कारण पुराण विचार आणि नवे विचार यांच्यांतील झगडा हा कोठेंही चालू असतोच. त्याला अमेरिका अपवाद नाहीं. तुलनात्मक शिक्षणपद्धतीचे दृष्टीनें पाहतां अमेरिकेंत सुधारलेल्या शिक्षणपद्धतीच्या अनेक शाळा आहेत. परंतु तात्त्विक विचारांच्या वाढीशीं तुलना करिता प्रत्यक्ष शिक्षणसुधारणा अद्याप बरीच मागें आहे. तत्त्व व व्यवहार यांत अद्याप महदंतर आहे. याचा अर्थ इतकाच कीं तत्त्वांचा पुरस्कार कांहीं प्रयोगार्थ निघालेल्या शाळांनीं

केलेला आहे. सार्वत्रिक शिक्षणपद्धतींत त्यांचा शिरकाव सावकाश होत आहे.

## शिक्षणाचा दर्जा

अमेरिकन शिक्षणाचा व्याप वाढलेला आहे त्या मानानें त्याची सखोलता अद्याप वाढलेली नाहीं. मोफत व सार्वत्रिक शिक्षणाचे तत्त्वास एकनिष्ठ राहिल्यामुळें आतांपर्यंत पुढाऱ्यांची शक्ति शिक्षणाचा प्रसार करण्यांत व त्यामुळें उत्पन्न होणारे अनेक प्रश्न सोडवण्यांत गेली. 'प्रत्येक नागरिकाच्या प्रत्येक मुलाला' शाळेंत आणूं ही महत्त्वाकांक्षा. तो तेथें न कंटाळतां व सोडून न जातां कसा राहील ही चिंता. त्याकरितां अनेक तंत्रांचा शोध करण्यांत या लोकांचा वेळ गेला. सामान्य बुद्धीच्या बहुसंख्य विद्यार्थ्यांना शिकविण्यांत अमेरिकेचा आजपर्यंतचा काळ गेला. एकदोन हजारापासून दहा हजार विद्यार्थ्यांपर्यंतच्या मोठमोठ्या शाळा. या शाळांचा नुसता कारभार पाहण्यांत किती वेळ जात असेल याची कल्पना करावी. इतक्या मोठ्या शाळा रशिया-व्यतिरिक्त यूरोपमधील अन्य कोणत्याच देशांत नाहींत. बहुसंख्यांक विद्यार्थ्यांची सोय पाहण्यांत वेळ गेल्यामुळें असामान्य व अलौकिक बुद्धीच्या अल्पसंख्य मुलांची हेळसांड झाली. या दोषाची जाणीव पुढाऱ्यांना आतां झाली असून तिकडे त्यांनीं लक्ष देण्यास प्रारंभ केला आहे.

दुय्यम व उच्च शिक्षणाचा संख्येच्या दृष्टीनें पुष्कळ प्रसार झाला असला तरी सर्वच पदवीधर सारख्याच दर्जाचे असतील असें नाहीं. खोल ज्ञान व विद्वत्ता या दृष्टीनें यांतील थोडे विद्यार्थी वरच्या दर्जाचे उच्च प्रतीचे असतात. बाकीचे सरसकट उच्च शिक्षणाचे संस्कारांमधून जातात इतकेंच. कॉलेजचे बाहेर अशिक्षित राहण्यापेक्षां कॉलेजमध्यें राहून ते अधिक सुसंस्कृत होतात ; विद्वान् होतातच असें नाहीं. निवडक विद्यार्थी घेणाऱ्या जर्मन व फरेंच विद्यापीठांतील पदवीधरांच्या मानानें सामान्य अमेरिकन पदवीधर सारख्या प्रतीचा ठरेलच असें नाहीं. परंतु संख्येच्या दृष्टीनें विचार केला तर अमेरिकन पद्धतींत समाजाचा फायदा आहे. या पद्धतीमुळें उत्कृष्ट व पहिल्या दर्जाचे पदवीधर संख्येच्या दृष्टीनें युरोपियन पदवीधराइतकेच श्रेष्ठ निघतात, आणि त्यांचे भरीला सामान्य दर्जाचे व चांगले शिक्षणसंस्कार झालेलेही अनेक पदवीधर समाजाला मिळतात. म्हणजे समाजांतील वरचा व खालचा थर यांत जमीनअस्मानाचें अंतर राहात नाहीं. उलट यूरोपियन पद्धतींतून

बाहेर पडणारे निवडक पदवीधर सोडून दिल्यास बाकीच्या बहुसंख्य समाजाला उच्च शिक्षणसंस्कारांचा कांहीं फायदा होत नाहीं. समाजांतील दोन थरांत फार अंतर राहतें. विद्वत्तेची व सामाजिक अशा दोन्ही दृष्टी ठेविल्यास अमेरिकन पद्धति चांगली. आर्थिक व काटकसरीचे दृष्टीनें यूरोपियन पद्धति चांगली.

## घेण्यासारखे कांहीं गुण

अमेरिकन शिक्षणांत जसे दोष आहेत तसे गुणही पुष्कळ आहेत. त्या सर्वांचा निर्देश पूर्वीं आलेलाच आहे. त्याव्यतिरिक्त आणखी कांहीं गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत.

अमेरिकन शिक्षणपुढाऱ्यांत एक प्रकारची आत्मनिरीक्षक वृत्ति दिसून येते. आपल्यांत काय चुकतें व इतरांपासून काय घेतलें पाहिजे हा विचार त्यांचे डोक्यांत सदैव असतो. याचें उलट यूरोपियन शिक्षण पुढाऱ्यांची निराळी वृत्ति दिसते. आपलें आहे तेंच बरोबर आहे असा अतिरिक्त आत्मविश्वास त्यांचे ठिकाणीं दिसून येतो. अंतर्मुख दृष्टीनें स्वतःकडे पाहण्याची अमेरिकन शिक्षणाची प्रवृत्ति असल्यामुळें त्यांत नेहमीं नवीन नवीन विचार व सुधारणा यांची भर पडत जाते. देशाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत फिरणाराला शिक्षण सुधारणेचें वातावरण आढळल्याशिवाय राहणार नाहीं.

अमेरिकन शाळा आकारानें मोठ्या आहेत हा एके परीनें दोष आहे, तरी त्याचें गुणांत रूपांतर झालेलें आहे. मोठी शाळा असल्यानें लहान शाळेंत ज्या गोष्टी शक्य होत नाहींत त्या मोठ्या शाळेला करितां येतात. निरनिराळ्या विषयाचे तज्ज्ञ अशा ठिकाणीं ठेवणें परवडतें. शैक्षणिक मानसशास्त्रज्ञ, शारीरिक शिक्षणाचा तज्ज्ञ, डॉक्टर व नर्स, व्यवसायसंशोधनाकरितां मार्गदर्शक तज्ज्ञ, अशा प्रकारचीं माणसें मोठ्या शाळेला ठेवितां येतात.

अमेरिकन शाळा—कॉलेजांतील विद्यार्थी व अध्यापक यांचे संबंध अगदीं मोकळेपणाचे असल्यासारखे दिसतात. असे संबंध राहावेत याकरितां बुद्धिपुरःसर प्रयत्न केला जातो. शिक्षक हा मुलांचा प्रेमळ व सहानुभूतीचा मार्गदर्शक आहे, प्रत्येक बाबतींत त्याची मदत विद्यार्थ्यांना झाली पाहिजे, या तत्त्वाचा प्रसार तिकडे विशेष होत आहे. शाळांचा आकार मोठा झाल्या-

मुळें विद्यार्थी–अध्यापकांमधील संबंधांस ढिलेपणा न येतां ते अधिक निकट व सहानुभूतीचे यावेत याकरितां अनेक योजना केल्या जातात. त्यामुळें प्रत्येक विद्यार्थ्याचा एकदोन अध्यापकांशीं चांगला संबंध येतो व अडीअडचणींत त्याला सल्ला–मसलत आणि उपदेश मिळतो.

यूरोपियन शाळांचे मानानें पाहतां अमेरिकन शाळांत माणुसकीचें वातावरण अधिक दिसतें. त्रयस्थ माणसाला तरी तें अधिक पसंत पडतें. यूरोपमध्यें शाळा पाहणें झाल्यास आधीं सरकारी परवानगी काढावी लागते. नंतर त्या शाळेच्या मुख्याध्यापकाशीं वेळ ठरवून मग जावें लागतें. अमेरिकन शाळेंत सरळ जावें आणि मुख्य अध्यापकांशीं हस्तांदोलन करून आपणांस काय पाहिजे तें सांगावें. तो सर्व व्यवस्था करितो. मधली वेळ झाली कीं तुम्हांला आपल्याबरोबर भोजनास बोलावितो, सहानुभूतीनें तुमची, तुमच्या देशाची, व समाजाची विचारपूस करितो. या गोष्टी युरोपमध्यें अनुभवास येत नाहींत. शाळाधिकाऱ्यांचे स्वभावाचा शाळेच्या वातावरणावर परिणाम होतो या दृष्टीनें वरील अनुभवाचें महत्त्व आहे.

सुशिक्षित पालकांचें वजन शाळांवर व विद्याखात्यांवर असतें. त्यामुळें शिक्षणसुधारणेला मदत होते व विद्याधिकाऱ्यांवर वचक राहतो. एक शिक्षणाधिकारी आपल्या नागरिक पालकवर्गाला निर्देशून म्हणाला—" आम्हांलाच शिक्षणांत सर्व कळतें असें म्हणून आम्ही पालकांना कांहीं फसवूं शकत नाहीं. त्यांनाही शिक्षणशास्त्राची माहिती आहे."

शिक्षण हें पक्षभेदात्मक राजकारणापासून शक्य तितकें अलिप्त ठेवण्याचा अमेरिकेचा प्रयत्न आहे. अर्थात् हा उद्देश नेहमीं साधतोच असें नाहीं. पण एक अनुकरणीय बाजू या दृष्टीनें ती लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

शिक्षणाचा व्याप, प्रयोगांची विविधता, नवे नवे विचार, संशोधन, मुक्तहस्तानें व उदारपणें खर्च करण्याची तयारी, शिक्षणावरील श्रद्धा, सामान्य जनांच्या शिक्षणाविषयीं आस्था, समाजविषयक विषयांवर विशेष भर, स्वतःची अशी नवीन संस्कृति उभारण्याची महत्त्वाकांक्षा, आणि माणुसकीचें वातावरण इत्यादि सर्व अंगें लक्षांत घेतां अमेरिकन शिक्षणपद्धति अभ्यासनीय आहे, यांत शंका नाहीं.

## अमेरिकन व युरोपियन शिक्षणांतील भेद

इंग्लंडपासून फुटून बाहेर पडल्यापासून अमेरिकेनें आपला शिक्षण-मार्ग अगदीं स्वतंत्रपणें आंखला. गेल्या दीडदोन शतकांतील अमेरिकन व यूरोपियन शिक्षणाची वाढ दोन अगदीं निरनिराळ्या तत्त्वांवर झालेली आहे. इंग्लंडचें आणि इतर यूरोपियन देशांचें धोरण निवडक व बुद्धिमान व्यक्तींनाच शिक्षण देण्याचें होते व आहे. अमेरिकेचें धोरण सरसकट सर्व समाजाला शिक्षण देऊन वरच्या दर्जाला न्यावें असें आहे. त्यामुळें शिक्षणांत व शिक्षणसंस्थांमध्यें दोन देशांत भेद दिसून येतो. अमेरिकेंतील शाळेंत बौद्धिक व हस्तव्यवसायाचे असे सर्व विषय दिसून येतील, तर इंग्लंडमध्यें बौद्धिक आणि हस्तव्यवसायांच्या शाळा अगदीं स्वतंत्र असलेल्या दिसतील. अमेरिकन हायस्कूलमध्यें "प्रत्येक नागरिकाचें प्रत्येक बालक" आणण्याचा आग्रह राहील, तर इंग्लंडमध्यें निवडक नागरिकांचीं निवडक बालकें आणण्याचा प्रयत्न राहील. अमेरिकेंत सर्वत्रांना मोफत शिक्षण देण्याची प्रवृत्ति, तर इंग्लंडमध्यें दुय्यम व उच्च शिक्षण फक्त फी देणाऱ्यांच्याच पुरतें मर्यादित ठेवण्याची प्रवृत्ति आहे. सारांश अमेरिका सार्वत्रिक शिक्षणाची व मुक्तद्वार तत्त्वाची भोक्ती आहे. इंग्लंड हें निवडक, मर्यादित आणि विकतच्या शिक्षणाचें आग्रही आहे.

असें जरी आहे तरी हळुहळू सामाजिक व आर्थिक परिस्थितीचा परिणाम दोन्हीही राष्ट्रांवर होत आहे. त्यामुळें परस्परांच्या तत्त्वांत थोडी देवघेव चालू आहे. सामान्य जनांमध्यें जागृति झालेली असल्यानें दुय्यम व उच्च शिक्षण फी घेऊन विकत देण्याचें धोरण इंग्लंड व फरान्स या देशांना सोडून द्यावें लागत आहे. फरान्समध्यें नुकतेंच १९३३ पासून हायस्कूल शिक्षण मोफत करण्यांत आलें. इंग्लंडमध्यें हायस्कूल विद्यार्थ्यांत शेंकडा पन्नाससाठ इतक्यांना नादारी असते. इकडे अमेरिकन कॉलेजांतही निवडक विद्यार्थी घेण्याची प्रथा पडूं लागलेली आहे. हें तत्त्व त्यांनीं युरोपपासून उचललें आहे. सारांश, दुय्यम शिक्षण मोफत असावें हें तत्त्व यूरोपनें अमेरिकेपासून घेतलें तर उच्च शिक्षण निवडक विद्यार्थ्यांना असावें हें तत्त्व अमेरिका यूरोपपासून घेऊं लागला आहे.

## परस्परांवरील आक्षेपांची उपपत्ति

अमेरिकन शिक्षणाचा मुख्य भर बालक आणि विद्यार्थी यांवर आहे. यूरोपच्या शिक्षणाचा मुख्य भर अभ्यासाचे विषयांवर अधिक आहे. एका पद्धतींत मुलाची नैसर्गिक प्रवृत्ति पाहून ती वाढविण्याकडे लक्ष आहे. दुसऱ्या पद्धतींत शाळेचे ठराविक विषय विद्यार्थ्यांकडून चांगल्या रीतीनें तयार करून घेऊन त्यांना विद्वान् व पंडित करण्याचा प्रयत्न आहे.

यूरोपियन लोक अमेरिकन शिक्षणाला तें उपयुक्ततावादी आहे असा दोष लावितात, तर यूरोपियन शिक्षण फार बुद्धिनिष्ठ आहे असा अमेरिकन लोकांचा यूरोपवर आक्षेप आहे. दोन्ही शिक्षणपद्धती पाहतां वस्तुस्थिति अशी दिसून येते कीं अमेरिकन शिक्षणावर समाजपरिस्थितीचा अधिक परिणाम झालेला आहे, व यूरोपच्या शिक्षणावर परंपरागत अभ्यासक्रमांचा परिणाम झालेला आहे. आपल्या आजच्या समाजाच्या दृष्टीनें उपयुक्त काय आहे तें अमेरिकन शिक्षण पाहतें, परंपरागत अभ्यासक्रमाला तें जुमानीत नाहीं. उलट शेंकडों वर्षे शाळांत जे विषय शिकविले जात आहेत ते कसे कमी करावेत या अडचणीमुळें परंपरागत व कांहीं ठिकाणीं आजच्या समाजाला तात्कालिक जरूरी नसलेले विषय ठेवणें यूरोपला भाग पडत आहे. आपलें हिंदुस्थानांतील शिक्षण हें यूरोपियन परंपरेशीं अधिक निगडित झालें आहे, ही अत्यंत मोठी अडचण आहे.

अमेरिकन शाळांतील विद्यार्थ्यांचीं कामें पाहिलीं म्हणजे त्यांत एक प्रकारचा सजीवपणा, उत्साह, नैसर्गिकपणा व व्यक्तिमत्त्व इत्यादि गुण दिसून येतात. इंग्लंड, जर्मनी इत्यादि देशांतील विद्यार्थ्यांचीं कामें पाहिलीं म्हणजे त्यांत एक प्रकारची शिस्त, रेखीवपणा, टापटीप, पद्धत इत्यादि गुण दिसतात ; परंतु त्यांत व्यक्तित्व आणि जिवंतपणा हे गुण तितक्या प्रमाणांत दिसत नाहींत. कांहीं तरी दडपणाखालीं मुलांचा नैसर्गिक मोकळेपणा दडपला गेला आहे असें वाटतें. दोन शाळांतील फरक हा दोन समाजांतील प्रवृत्तींचा निदर्शक आहे. एक समाज स्वातंत्र्याचा व व्यक्तित्वाचा भोक्ता आहे, दुसरा समाज हा शिस्तीचा आणि नियंत्रणाचा भोक्ता आहे. दोन्ही समाजांची राजकीय परिस्थिति व परंपरा या प्रवृत्तींचे मुळाशीं आहेत.

### आपणांस ग्राह्याग्राह्य काय आहे ?

वाचकांचे पुढें प्रश्न असा उभा राहात असेल कीं या सर्वांतून हिंदुस्थानला घेण्यासारखें काय आहे ? लंकेंत सोन्याच्या विटा. अमेरिकेची संपत्ति, तिचें स्वातंत्र्य व तेथील समाज यांची हिंदुस्थानशीं बरोबरी नाहीं. तेथील शिक्षण-पद्धतीपासून आपणाला काय शिकण्यासारखें आहे ?

अमेरिकन देश व समाज यांची परिस्थिति निराळी असली तरी कांहीं बाबतींत त्याच्या व आपल्या समाजांत साम्य आहे. शिवाय दोन देशांची परिस्थिति अगदीं तंतोतंत एकसारखी नसली तरी तत्त्व व अनुभव या दृष्टीनें परस्परांना एकमेकांपासून पुष्कळ गोष्टी घेण्यासारख्या असतात. तपशिलाचा प्रश्न ज्यानें त्यानें आपापल्या मार्गानें सोडवावयाचा असतो. तत्त्वाचें अनुकरण करितां येतें, तपशील ज्याचा त्याला ठरवावा लागतो.

अमेरिकेचा समाज मिश्र आहे. अनेक देश, धर्म, संस्कृति, परंपरा, भाषा व यांमुळें उत्पन्न होणाऱ्या विविध आणि विरोधी निष्ठा यांची सांगड घालण्याचा प्रश्न अमेरिकेपुढें आहे. या सर्वांतून एकराष्ट्रीयत्व व एकनिष्ठात्मक समाज कसा निर्माण करितां येईल हा अमेरिकन शिक्षणाचा सामाजिक व राजकीय प्रश्न आहे. या बाबतींत हिंदुस्थानचें व अमेरिकेचें साम्य आहे. एकनिष्ठात्मक समाज निर्माण करण्याचे दृष्टीनें अमेरिकेनें आपल्या शिक्षणांत ज्या ज्या तंत्रांचा उपयोग करून घेतलेला आहे त्यांचा उपयोग हिंदुस्थानलाही करून घेतां येईल. निदानपक्षीं शिक्षणाला कांहीं सामाजिक ध्येय असावयास पाहिजे एवढी जाणीव तरी शिक्षणक्षेत्रांतील कार्यकर्त्यांना होईल.

हिंदी समाजांत आज कनिष्ठ व वरिष्ठ असे विभाग पडलेले आहेत. कनिष्ठ समाजाचा वर येण्याचा प्रयत्न चाललेला आहे. मागासलेल्या जातींना पुढें येण्याला एक मार्ग म्हणजे शिक्षण हें आहे. कर्तबगार व्यक्तींना शिक्षणाची संधि मिळाली तर त्याही पुढें येऊं शकतात. अशा रीतीनें आपल्या कर्तबगारीला समाजांत वाव आहे अशी जाणीव जनतेंत असली तर समाजांत समाधानवृत्ति राहते. अमेरिकेनें मोफत व सार्वत्रिक शिक्षणाची व्यवस्था करून सामान्य जनांना समाजांत पुढें येण्याचा मार्ग मोकळा करून दिला. सर्वांना समान संधि (Equality of Opportunity ) दिली. त्याकरितां आर्थिक दृष्टीनें जरूर तो स्वार्थत्याग समाजानें केला व अधिक करण्याची

स्थानची प्रगतीची दिशा अद्याप निश्चित व्हावयाची आहे. हिंदी शिक्षणाची पुनर्घटना करावयाची असेल तर प्रथम हिंदी समाजाचीं ध्येयें निश्चित करून त्यांना सुसंगत आणि पोषक अशीं शिक्षणाचीं तत्त्वें आणि तंत्रें यांची योजना झाली पाहिजे. त्याकरितां समाजाचा साकल्यानें आणि पुढील पांचपन्नास वर्षांचे दृष्टीनें विचार करणें आवश्यक आहे. सध्यांच्या शिक्षणपद्धतीला ठिगळें लावून किंवा तिच्यांतील एकाददुसरा विषय कमी अधिक करून ती सुधारणार नाहीं. समाजाचीं आत्यंतिक आणि सद्य:कालीन ध्येयें निश्चित करून त्यांच्या पायावर शिक्षणाची पुनर्घटना झाली पाहिजे.

---

## प्रकरण आठवें

# साक्षरतेची यशस्वी मोहीम

### विसाव्या शतकांतील आश्चर्य

शैक्षणिक विश्वांतील एक अलौकिक आश्चर्य असें आहे कीं, रशियानें अवघ्या पंधरा वर्षांत चौदा कोटी लोकसंख्येच्या समाजांतील निरक्षरता धुऊन टाकली. १९१७ सालीं जेथें शेंकडा चौसष्ट लोक निरक्षर होते तेथें आज जवळजवळ सर्व समाज साक्षर झाला आहे. निरक्षर राहिलेल्या थोड्या निरक्षर लोकांत अतिशय वृद्ध झालेले, दूर प्रांतांत असलेले, आणि शाळेंत येण्यास असमर्थ असे लोक आहेत. साक्षरतेचा प्रसार रशियानें अतिशय प्रतिकूल परिस्थितीमध्यें केला आहे. तिजोरींत पैसा नाहीं, नवीन स्थापन झालेल्या राज्यपद्धतीस इतर राष्ट्रांची मान्यता नाहीं, कोणी कर्ज देण्यास तयार नाहीं, अशा बिकट परिस्थितींतही त्यानें वाट काढलेली आहे. हिंदुस्थानमध्यें दोनशें वर्षांच्या अमदानींत जी गोष्ट होऊं शकली नाहीं ती रशियानें केवळ पंधरा वर्षांत करून दाखविली ही गोष्ट खरोखर भूषणावह आहे.

रशियांत जागजागीं रात्रींच्या शाळा भरतात आणि त्यांत कामकरी वर्गाच्या पोषाखांतील स्त्री-पुरुष एकत्र बसून कांहीं तरी लिहीत, वाचीत किंवा चर्चा करीत असतात. त्यांचा शिक्षक तरी कोण आहे म्हणून पाहावें तर काय दिसतें ? फळयावर लिहिण्याला हात पोंचत नाहीं म्हणून पायां-खालीं लांकडी खुर्ची घेऊन एक चौदा वर्षांची मुलगी फळयावर अक्षरें काढून दाखवीत आहे ! ही या वर्गाची शिक्षक. निरक्षरतेविरुद्ध चालविलेल्या या प्रचंड मोहिमेंत आबालवृद्ध सर्व सामील झाले. पांच वर्षांचें प्राथमिक शिक्षण होऊन इतरांना मुळाक्षरें आणि वाचन शिकविण्याची ज्यांना ज्यांना पात्रता आली असेल असे लोक, मुलें आणि मोटीं माणसें, या चळवळींत सामील झालीं आहेत. साक्षरताप्रसाराची संघटना रशियानें कशी केली तो वृत्तांत हिंदुस्थानसारख्या निरक्षरताप्रधान देशाला अतिशय बोधप्रद होईल.

## ज्ञानसंपादनावर कटाक्ष

लेनिननें एकदां असें लिहिलें की, "जगांतील मानवानें वाढविलेलें सर्व ज्ञान हस्तगत केल्याशिवाय मनुष्य खरा कम्यूनिस्ट होऊं शकत नाहीं." लेनिनचे शब्द वेदासमान मानून त्याप्रमाणें वागणाऱ्या रशियन पुढाऱ्यांनीं शिक्षण, साक्षरता आणि ज्ञान यांवर आपला भर दिलेला आहे. समाजांतील सामान्य जनांची सर्व दृष्टींनीं अधिकाधिक उन्नति करावी हें नवीन राज्य-पद्धतीचें आत्यंतिक ध्येय आहे. प्रत्येक व्यक्तीस तिचे यथाशक्य विकासास संधि द्यावयाची असेल तर त्याला शिक्षण हें मुख्य साधन आहे. मानवी इतिहासांत असें दिसून येतें कीं आजपर्यंत ज्या समाजपद्धती अस्तित्वांत आल्या त्यांत उच्च सांस्कृतिक शिक्षण आणि मनोविकासाची संधि या गोष्टी फक्त संपत्तिमान् लक्ष्मीपुत्रांना अथवा समाजांतील एखाददुसऱ्या श्रेष्ठ वर्गालाच लाभल्या होत्या. सामान्य जनांच्या अटोक्यांत त्या आणण्याकरितां गेलीं दोन शतकें समाजांत प्रयत्न चालले आहेत. जी गोष्ट इतर समाजांत सावकाशीनें आणि वरिष्ठ वर्गांच्या कलाकलानें चालली आहे ती रशियन पुढाऱ्यांनीं एका घावासरशी करून टाकली.

## राजकीय क्रांति व शिक्षणक्रांति

शिक्षणाचा प्रसार करण्यांत रशियाचें दुसरेंही एक तत्त्व आहे.

कोणत्याही समाजांत राजकीय क्रांति झाली कीं त्या देशांतील शिक्षणपद्धतीही हटकून बदलते. अमेरिका, जर्मनी आणि इटली यांच्या उदाहरणांवरून हें तत्त्व स्पष्ट होतें. रशियानें राज्यक्रांति केली त्याबरोबर शिक्षणक्रांतीही केली, परंतु इतर देशांपेक्षां आपल्या शैक्षणिक कार्यक्रमाचा पाया त्यानें अधिक लांबरुंद घातला. ज्या नवीन सामाजिक, राजकीय आणि आर्थिक तत्त्वांवर क्रांति होते त्या तत्त्वांचें शिक्षण जर समाजांतील प्रत्येक व्यक्तीला दिलें नाहीं, तर कालांतरानें या क्रांतीचीं तत्त्वें पुसून जातात आणि तिच्यावरचें फोल मात्र कायम राहतें. फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाली तिचीं तत्त्वें—स्वातंत्र्य, समता, बंधुता—हीं अत्यंत उदात्त होतीं ; परंतु सामान्य जनांचें त्या दृष्टीनें शिक्षण झालेलें नसल्यामुळें राज्यक्रांतीनंतर लगेच नेपोलियनची बादशाही सत्ता तेथें स्थापन झाली. ही चूक रशियन पुढाऱ्यांना टाळावयाची आहे. जगांतील सर्व राज्यक्रांत्यांचें सूक्ष्म निरीक्षण आणि अभ्यास करून त्यांत झालेल्या चुका आपल्याला कशा टाळतां येतील या दृष्टीनें रशियन नेत्यांनीं प्रथमपासून काळजी घेतली आहे. १९१७ सालीं झालेली राज्यक्रांति चिरस्थायी करण्याकरितां लोक शिक्षित झाले पाहिजेत. लोकशिक्षणाचें मुख्य साधन साक्षरतेचा प्रसार. म्हणून साक्षरताप्रसारावर रशियानें प्रथम आपली सर्व शक्ति एकवटली आहे.

## स्वयंसेवक संघटना

लक्षांत ठेवण्यासारखी विशेष गोष्ट अशी आहे कीं, ही साक्षरतेची चळवळ निव्वळ जनतेच्या स्फूर्तीनें, पुढाकारानें आणि द्रव्यानें चाललेली आहे. विद्यमान सरकारनें ती हातांत घेऊन आपल्या सत्तेच्या मदतीनें चालविलेली नाहीं. स्वयंसेवा हा या चळवळीचा आत्मा आहे. मात्र सरकारची तिला पूर्ण सहानुभूति आणि उत्तेजन आहे. चळवळीकरितां १९२४ सालीं एक मध्यवर्ती सार्वजनिक संस्था स्थापन झाली. त्या संस्थेचें नांव अर्थदर्शक आहे—'निरक्षरतेचें दिवाळें काढणारी संस्था' (लिक्विडेशन ऑफ इल्लिटरसी सोसायटी). या संस्थेनें प्रथम लोकमत तयार करण्याकरितां देशभर उपशाखा काढल्या. कारखान्यांतून, शेतांवर, खेडेगांवांत व शहरांतील

पेठांतून प्रत्येक ठिकाणीं शाखा काढून त्यांच्या मार्फत निरक्षर–साक्षर लोकांची खानेसुमारी केली. या कामीं अशिक्षित–सुशिक्षित सर्व लोकांनीं एकत्र काम चालविलें.

ठिकठिकाणचे कामगारसंघ, हायस्कूल व कॉलेजमधील विद्यार्थी, कम्यूनिस्ट पक्षाचे सभासद इत्यादि मिळून तीन कोटी लोकांची संघटना या कामाकरितां तयार झाली. त्यांनीं ' शिक्षणाची मोहीम ' (कल्चर कँपेन्) काढली. या मोहिमेंत जे जे लोक कार्य करण्याकरितां सामील झाले त्यांना " संस्कृतीचे सैनिक " असें नांव ठेविलें गेलें. या सगळ्या चळवळीचा उद्देश असा होता कीं, शतकानुशतकें रेंगाळलेली निरक्षरता एकदम उठाव करून नाहींशी करून टाकावी. पिढ्यान्‌पिढ्या समाज साक्षर होण्याची वाट पाहात बसण्यापेक्षां दहाबारा वर्षात याच देहीं याच डोळां हें काम करून टाकावें. प्रत्यक्ष अनुभवही असा आला कीं अपेक्षेप्रमाणें असें कार्य होऊं शकतें. शिक्षणाच्या इतिहासांत ही गोष्ट अभूतपूर्व अशी आहे.

प्रत्यक्ष कामाकरितां एक पद्धतशीर संघटना तयार केली गेली. सर्व देशाचें एक साक्षरतेचें मध्यवर्ति–मंडळ (सुप्रीम कौन्सिल) स्थापून त्याचे खालीं प्रांतिक मंडळें, जिल्हा मंडळें आणि स्थानिक मंडळें अशीं निघाली. प्रत्येक मंडळानें नेमून दिलेल्या भागांत साक्षरतेचें कार्य चालविलें. मध्यवर्ति मंडळांचीं आणि जिल्हा मंडळांचीं पोटखातीं व कार्यें पुढीलप्रमाणें होतीं—

(१) शाळांची स्थापना करणें, (२) शिक्षणक्रमाची आणि शिक्षण देण्याची व्यवस्था करणें, (३) शैक्षणिक प्रवासासारखे सांघिक कार्यक्रम आंखणें, (४) आर्थिक बाजूनें सर्व व्यवस्था पाहणें, वर्गण्या जमवून त्यांचा जमाखर्च ठेवणें, (५) नवीन योजना आणि कार्यक्रम आंखणें.

## संस्कृतीचें सैन्य

या चळवळीला आर्थिक साहाय्य सार्वजनिक देणग्यांतून आणि वर्गणींतून झालें. प्रत्येक सभासदाची नियमित वर्गणी येत असे, शिवाय कारखान्यांतील कामगारसंघ एकदम पैसे आणि वर्गण्या जमवून देत असत. सर्व शिक्षक स्वयंसेवकच असत. त्यामुळें या द्रव्याचा उपयोग विशेषतः शिक्षणाचीं उपकरणें विकत घेण्याकडे आणि संस्थेचे कामाचा प्रचार करण्याकडे होई.

या कामाकरितां जे स्वयंसेवक शिक्षक मदत करीत त्यांना " संस्कृतीचें सैन्य " (कल्चरल् आर्मी) असें नांव मिळालें, त्यावरून कामाचें ध्येय आणि जोम हीं उत्कृष्ट रीतीनें व्यक्त होतात. शिक्षक कोणत्याही वयाचा असला तरी चालतो. कमींत कमी चार वर्षांचा स्वतःचा अभ्यासक्रम पुरा झालेला शिक्षक असला तर त्याला प्रथम वर्गाला शिकवितां येतें, आणि सात वर्षांचा अभ्यासक्रम झालेला असला तर दुसऱ्या वर्गाला तो शिकवूं शकतो. शिक्षकांनीं स्वयंसेवेकरितां नांवें नोंदविल्यानंतर त्यांना थोडें शिक्षणशास्त्र आणि अध्यापनपद्धति यांचा अभ्यासक्रम दिला जातो आणि नंतर ते शाळेंत शिकवावयास जातात. साधारणपणें हायस्कूलमधील आणि कॉलेजमधील विद्यार्थी व विद्यार्थिनी हे स्वयंसेवक शिक्षकांचें काम करीत असतात. स्वतःचें शिक्षण घेत असलेल्या या तरुण पिढीकडूनच रशियांत साक्षरतेचा प्रसार झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. या कामाकरितां हे तरुण लोक दिवसा आपापला अभ्यास करून रात्रीचा वेळ शिकविण्यांत खर्च करतात. रात्रीच्या वेळीं रस्त्यांतून भटकत, नाटकें सिनेमा पाहात किंवा दिव्यापुढें पुस्तकांत डोकें खुपसून परीक्षेकरितां घोकंपट्टी करीत जीं मुलें असावयाचीं, तीं समाजांतील जिवंत प्रश्न आपल्या हातीं घेऊन त्यांत व्यग्र असलेलीं अशीं पाहिलीं म्हणजे आपण एका नवीन चैतन्यपूर्ण समाजांत वावरत आहोंत असें तिऱ्हाइताला वाटल्यावाचून राहात नाहीं. या तरुणांच्या उत्साहाकडे पाहिलें म्हणजे रशियाच्या निरक्षरतेचें " दिवाळें " अवघ्या पंधरा वर्षांत कसें निघालें त्याचें उत्तर आपोआप मिळतें.

शिक्षकाचें काम करण्याकरितां विद्यार्थ्यांचा उपयोग झाला तसाच साक्षर कामगारांचाही झाला. दुसऱ्याला साक्षर करण्याइतकें शिक्षण ज्यांचें झालें होतें अशा अनेक स्वयंसेवकांनीं या कामीं मदत केली.

## पन्नाशींतील विद्यार्थी

साक्षरतेच्या शाळेंत येणारे लोक सोळा वर्षांपासून पन्नास वर्षांपर्यंतचे असतात. त्यांना फी द्यावी लागत नाहीं किंवा पाटीपुस्तकाचे पैसेही द्यावे लागत नाहींत. साधारणपणें शहरांत पंचवीसतीस जणांचा एकेक वर्ग असतो. परंतु कांहीं वेळां शेतांवर अथवा खेडेगांवांतून वर्गांत दोनतीन विद्यार्थी

असले तरी स्वयंसेवक शिक्षक दिला जातो. ज्या स्त्रियांना अथवा आयांना मुलेंबाळें सोडून घराबाहेर जातां येत नसेल त्यांचेकरितां स्त्रीशिक्षक घरीं पाठविण्यांत येतात. शाळेंत जातांना प्रारंभीं लोकांच्या मनांत शंका असते कीं, " आपलें एवढें वय झालेलें, आतां कसलें लिहितांवाचतां येणार ! करून पाहूं एवढेंच. " पण पहिल्या दोन आठवड्यांतच त्यांना आशा वाटूं लागते, आणि अधिक शिकण्याला उत्साह येतो.

लहान मुलें दोन वर्षांत जें शिकतात तें वयस्क माणसें नऊ महिन्यांतच पूर्ण करतात, आणि लहान मुलांचा चार वर्षांचा अभ्यास हीं माणसें दीड वर्षांत पूर्ण करूं शकतात. निरक्षर लोकांप्रमाणेंच अर्धवट साक्षर लोकांनाही शिकवावें लागतें. साधारणपणें आठवड्यांतून सहा ते अकरा तास याप्रमाणें वर्ग चालतात. नऊ महिन्यांत पहिली परीक्षा व अठरा महिन्यांनीं दुसरी परीक्षा होते. मूळाक्षरांपासून प्रारंभ न करतां शब्द आणि वाक्य यांपासूनच सुरुवात करून अक्षरओळख व वाचन यांना एकदमच प्रारंभ केला जातो. पहिल्या परीक्षेचे विषय—सोपें वाचन, तात्पर्य सांगणें आणि सोपें गणित; व दुसऱ्या परीक्षेचे विषय—अस्खलित वाचन, व्याकरण, गणित, भूगोल, इतिहास इत्यादि असतात.

या साक्षरताप्रसाराच्या मोहिमेकरितां प्रौढ कामकरी व शेतकरी यांना उपयुक्त अशीं सोपीं क्रमिक पुस्तकें छापून घेण्यांत आलीं. त्याच-प्रमाणें साक्षरता आल्यानंतर ती टिकविण्याकरितांही योग्य असें वाङ्मय प्रसिद्ध करण्यांत आलें. साक्षर होणाऱ्या लोकांना वृत्तपत्रें वाचणें, पत्रें लिहिणें व वाचणें, ग्रंथालयांत जाऊन ग्रंथ वाचणें, यांसारख्या संवयी लावण्याचा प्रयत्न होतो. उद्देश हा कीं, एकदां मिळालेली साक्षरता उपयोगानें टिकावी, पुसून जाऊं नये.

### सत्य कीं जाहिरात ?

शतकानुशतकें अज्ञानांत आणि निरक्षरतेंत ठेवल्या गेलेल्या चौदा कोटी जनतेच्या शिक्षणाकरितां ही चळवळ इतकी झपाट्यानें चालली कीं तिची कल्पना करतां येत नाहीं. एकट्या मॉस्कोमध्यें एका वर्षांत ५७,००० लोकांना साक्षर करण्यांत आलें. पांच वर्षांत ही साक्षरतेची मोहीम किती

जारीनें चालली याची कल्पना १९२७।२८ व १९३२ सालीं एकूण साक्षर झालेल्या लोकांच्या संख्येवरून कळून येईल.

| | | |
|---|---|---|
| १९२७।२८ सालीं | ७,३२,००० | लोक साक्षर. |
| १९३२ ,, | २,००,००,००० | ,, |

अवघ्या पांच वर्षांत हा आंकडा सात लक्षांवरून दोन कोटींवर गेला. आजच्या घटकेला रशियांतील सर्व लोक साक्षर झालेले आहेत असा विद्या-खात्याचा अंदाज आहे.

हे सर्व आंकडे आणि वरील वृत्तांत वाचला म्हणजे अशी शंका मनांत येते कीं, ही सर्व चळवळ केवळ कागदोपत्रीं आणि जाहिरात म्हणून आहे कीं खरोखर तिच्यांतून कांहीं निष्पन्न होत आहे. मॉस्को–लेनिनग्राडसारख्या शहरांत फिरून रशियन समाज पाहिला तर याचें उत्तर मिळतें. ठिकठिकाणीं रस्त्यावर पुस्तकांचीं दुकानें असून त्या सर्वांतून माणसांची गर्दी लागलेली असते. नुकत्याच साक्षर झालेल्या या लोकांना वाचनाची भूक लागलेली आहे आणि ही भूक भागविण्याकरितां सात्त्विक आणि उपयुक्त वाङ्मयही रशियांत निर्माण होत आहे. वाङ्मयावर सरकारचें नियंत्रण असल्यामुळें छचोर आणि अश्लील प्रकाशन बाजारांत येऊंच शकत नाहीं. बोटीवरचे खलाशी अथवा कारखान्यांतले मजूर कोणीही पाहा, सवडीच्या वेळेंत कांहीं ना कांहीं तरी वाचीत असतात. सारांश, साक्षरतेप्रीत्यर्थ चाललेल्या या चळवळीचा अपेक्षित परिणाम होत आहे यांत शंका नाहीं.

## अडचणींतून मार्ग

हें सर्व काम अत्यंत सुरळीतपणें आणि निर्विघ्नपणें चाललें असें नाहीं. त्यांतही अडचणी आहेतच. मुख्य अडचण म्हणजे दरवर्षी नवीन नवीन शिक्षक येतात, त्यांना शिकवून त्यांची संघटना करावयाची ही होय. कार्यकर्ते बदलले तरी संस्थेची कार्यपरंपरा कायम टिकविण्याच्या दृष्टीनेंही बरीच काळजी घ्यावी लागते. तसेंच केवळ स्वयंसेवेच्या आधारावर उभारलेल्या या अफाट संघटनेची सुव्यवस्था ठेवणें हें कामही फार कठिण जातें. परंतु या सर्वांतूनही पुढाऱ्यांनीं कार्य चालविलेलें आहे. त्यांचे ठिकाणीं महत्त्वाकांक्षा आहे आणि विचारानें व पूर्वानुभवानें आलेली एक प्रकारची श्रद्धा आहे.

प्रोफेसर शाट्स्की नांवाचे रशियन शिक्षणतज्ज्ञ १९३३ सालीं एका संभाषणांत म्हणाले, " पुढील पांच वर्षांत आमचा रशिया सगळ्या जगांतील राष्ट्रांपेक्षां अधिक सुशिक्षित असा देश होईल. "

---

## प्रकरण नववें

# बालशिक्षणाचा नवा मनु

रशियांत लहान मुलांच्या शिक्षणाला प्रारंभ जन्मापूर्वींच सहा आठवड्यांपासून होतो. मुलाच्या जन्मापूर्वीं आणि नंतर त्याच्या मातेला एकंदर तीन महिन्यांची पगारी रजा दिली जाते आणि या अवधींत मुलाच्या आणि स्वतःच्या आरोग्याला आवश्यक असणारी सर्व वैद्यकीय माहिती आणि मदत मिळण्याची तिला सोय असते. शिक्षणाच्या बाबतींत रशियन सरकारनें आपल्या शिरावर इतर यूरोपियन राष्ट्रांपेक्षां अधिक जबाबदारी घेतली आहे. अगदीं जन्मापासून मुलाच्या आरोग्याची आणि मानसिक विकासाची काळजी घेणें हें सरकारचें कर्तव्य समजलें जातें. त्यामुळें बालशिक्षणाच्या संस्थांची विविधता आणि विपुलता या देशांत जितकी आढळते तितकी इतरत्र सांपडत नाही. हें काम पूर्ण करण्यास रशियाला पुरेसा अवधि मिळालेला नाही. पण जो थोडा काळ मिळाला आणि त्यांत त्यानें जें कार्य केलें आहे, त्यावरून पाहतां असें दिसतें कीं, बालशिक्षणाच्या बाबतींत रशियानें आघाडी मारली असून लौकरच या क्षेत्रांत त्याचेकडून आदर्शभूत आणि अनुकरणीय कामगिरी होईल. अमेरिका, इंग्लंड इत्यादि देशांत बालशिक्षणाच्या संस्था आहेत तरी त्यांचें प्रमाण थोडें आहे. अगदीं श्रीमंत किंवा अगदीं गरीब स्थितींतल्या कुटुंबांना त्यांचा फायदा मिळतो. रशियांत सध्यां आठ वर्षांचे आंतील निम्मीअधिक मुलें या संस्थांमधून आहेत. समाजांतील सर्व मुलांची या संस्थांत सोय करून प्राथमिक शाळेंत जाण्यापूर्वींचें

बालोद्यान शिक्षण सार्वत्रिक व आवश्यक करावें अशी रशियाची महत्त्वाकांक्षा आहे. आज ज्या संस्था मॉस्को–लेनिनग्राडसारख्या ठिकाणीं दिसत आहेत, त्या पुढील दहा वर्षांत अखिल रशियाभर पसरतील, आणि या देशांतील प्रत्येक नागरिकाला अगदीं जन्मापासून आरोग्य आणि मनोविकास यांचे दृष्टीनें समाजांतील शक्य त्या उत्कृष्ट साधनांचा लाभ होईल.

## बालगृहांची योजना

एक महिन्यापासून ते तीन वर्षांपर्यंत वयाच्या मुलांना ज्या संस्थेंत ठेवितात, त्यांना 'बालगृहें' (क्रेचेस्) अशी संज्ञा आहे. अशा प्रत्येक गृहांत पन्नास ते शंभरपर्यंत लहान मुलें असतात. त्यांच्यावर देखरेखीला ज्या दाया आणि शिक्षक ठेविलेले असतात, त्यांचें पद्धतशीर शिक्षण झालेलें असतें. लहान मुलांचें आरोग्य, मानसशास्त्र, शिक्षणशास्त्र इत्यादि विषयांची या लोकांना माहिती असते. लेनिनग्राडमध्यें एका बालगृहांत पासष्ट लहान अर्भकें होतीं. त्यांतील फक्त एकदोन मुलें रडत होतीं, बाकीचीं सर्व अगदीं आनंदांत होतीं. वीस वीस मुलें एका वर्गामध्यें खेळतात आणि कोणी रडत नाहीं हें पाहून प्रेक्षकाला आश्चर्य वाटतें. तेथील दाईला विचारलें कीं, "मुलें रडत नाहींत हें कसें ?" ती म्हणाली, "लहान मुलें कारणाशिवाय रडत नाहींत, आणि तें कारणच आम्ही उपस्थित होऊं देत नाहीं. झोंप आली, भूक लागली, व दुखणें आलें तर मुलें रडतात, एरव्हीं रडत नाहींत."

शहराच्या प्रत्येक भागांत अशी बालगृहें पसरलेलीं आहेत. लेनिनग्राड शहरांत अशा प्रकारच्या एकूण एकशेंअठ्ठ्यांशी संस्था आहेत. प्रत्येक कारखान्याला जोडून या संस्था आवश्यक असतातच. कारखान्यांत काम करणाऱ्या आया आपल्या अर्भकांना अशा गृहांतून ठेवितात. दर तीन तासांनीं त्यांना सुटी मिळते, त्या वेळीं त्या आपल्या मुलांना दूध पाजण्याकरितां या बालगृहांत येतात. अशा संस्थांतून केवळ कामकरी स्त्रियांचींच मुलें असतात असें नाहीं, तर मोठे मोठे अधिकारीदेखील स्वतःच्या बालकांना या संस्थांमधून ठेवितात. कारण या ठिकाणी जी आरोग्यानुकूल साधनसामुग्री, शिक्षणाची पद्धत, सुशिक्षित दाया इत्यादि सोयी असतात, त्या कितीही मोठा अधिकारी झाला तरी आपल्या घरीं करूं शकणार नाहीं. बालगृह जेव्हां कारखान्यालाच

जोडून असतें, तेव्हां एकूण खर्चापैकीं तीनचतुर्थांश रक्कम कारखान्यांतून मिळते आणि एकचतुर्थांश खर्च मुलाची आई देते. एकां मुलाचा खर्च साधारणपणें ऐंशी रूबल असतो ; त्यांपैकीं आई वीस रूबल देते. हीं शिशुगृहें इतकीं लोकप्रिय झालीं आहेत कीं, शेंकडा सत्तर कामकरी स्त्रिया आपलीं मुलें या संस्थांमधून ठेवितात. कारखान्याव्यतिरिक्त जीं बालगृहें आहेत तेथें मुलाचा खर्च आईबापांच्या उत्पन्नाच्या प्रमाणांत द्यावा लागतो. शंभरसवाशें रूबल पगार असला तर मुलाकरितां दहा रूबल द्यावेत, व अडीचशें ते हजार रूबल पगार असला तर चाळीस रूबल मुलाकरितां द्यावेत, अशी सोयीची योजना आहे. त्यामुळें गरिबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्वांच्या आटोक्यांत या संस्था आलेल्या आहेत. अमेरिका–इंग्लंडसारख्या देशांत अशा कांहीं संस्था आहेत ; पण सरसकट सर्व समाजाला त्यांचा उपयोग होऊं शकत नाहीं, आणि अशा संस्थांच्या खर्चाची जबाबदारीही सरकार आपल्या अंगावर घेत नाहीं.

## लहान मुलांची राजासारखी सोय

रशियांतील समाजांत दिसणारी गरीबी पाहून नंतर या लहान मुलांच्या संस्थांमधील व्यवस्था, साहित्य, उपकरणी इत्यादींची पूर्णता पाहिली म्हणजे असें वाटतें कीं, सरकारचें लहान मुलांकडे विशेष लक्ष आहे. आर्थिक परिस्थिति अडचणीची असली तरी लहान मुलें आणि सैन्य यांची व्यवस्था अगदीं राजासारखी आहे. शिक्षण आणि सैन्य यांवर रशिया मुळींच काटकसर करीत नाहीं. पूर्वीं सरदार लोक राहात असत ते वाडे सध्यां या बालगृहांच्या उपयोगाकरितां दिलेले आहेत. कांहीं नवीन इमारतीही बांधल्या आहेत. या इमारतींत आधुनिक दृष्टीनीं सर्व प्रकारच्या सोयी केलेल्या आहेत. वैद्यकीय तपासणीची सामुग्री, उघड्या हवेवर राहण्याच्या जागा, प्रकाशाकरितां मोठमोठ्या खिडक्या, खेळण्याकरितां स्वतंत्र जागा, स्नानगृहें (शॉवर रूम्स्), शुभ्र चादरींनीं आच्छादिलेल्या कॉट्स, मुलांच्या खेळण्याची आणि शिक्षणाची विविध प्रकारची सामुग्री अशा सर्व सोयी या बालगृहामध्यें सर्व मुलांकरितां असतात.

बालगृह पाहूं इच्छिणाऱ्या प्रेक्षकानें आंत जाण्यापूर्वीं अंगावर एक

पांढरा शुभ्र अंगरखा घालावयाचा असतो. आपली संस्था पाहण्यास येणाऱ्या पाहुण्यांना रशियन लोक अत्यंत आगत्यानें वागवितात आणि सर्व तपशीलवार माहिती सांगतात. आया आपल्या कामाला जाण्यापूर्वी मुलांना येथें आणून ठेवितात. ज्यांची रातपाळी असते त्या आपल्या मुलांना सायंकाळपासून रात्रभर या बालगृहांत ठेवितात. मूल संस्थेंत आल्याबरोबर त्याचें उष्णतामान पाहून, वजन करून मग त्याला आंतमध्यें घेतात. आजारी असलेल्या मुलांना इतर मुलांत न मिसळतां त्यांची स्वतंत्र व्यवस्था करितात. खाणें, पिणें, निजणें, खेळणें, दाईबरोबर उघड्यावर फिरावयास जाणें, गाणीं ऐकणें, सौम्य व्यायाम करणें, गोष्टी ऐकणें, लहानसहान कामें करणें असे आलटून पालटून विविध प्रकारचे कार्यक्रम असतात. नियमित कार्यक्रमाची संवय होणें, आपल्या भोंवतालच्या लहानग्या समाजांत मिसळून त्याला उपयुक्त अशीं लहानसहान कामें करणें, आणि हळुहळू आरोग्याच्या संवयी लावणें या दृष्टीनें मुलांचें शिक्षण चालू असतें.

## रशियन मातांचें नवीन शिक्षण

येथें लहान मुलांचें शिक्षण होतें, त्याचबरोबर त्यांच्या आयांचेंही शिक्षण होत असतें. त्यांच्याकरितां मुद्दाम व्याख्यानांचे कार्यक्रम ठेवितात ; त्यांत शिशुसंगोपन कसें करावें याविषयीं माहिती देतात. स्वच्छता, आजारी मुलांची निगा, स्पर्शजन्य रोगांपासून मुलांचें संरक्षण, वारंवार डॉक्टरचा सल्ला घेऊन मुलांचें संगोपन करणें इत्यादि गोष्टींची संवय आयांना लागावी अशी व्यवस्था असते, आणि ती यशस्वी होत आहे असें दिसतें. मॉस्कोमध्यें कोणत्याही मोठ्या हॉस्पिटलमध्यें जा. तेथें कांहीं माता आपल्या लहान मुलांना घेऊन डॉक्टरची वाट पाहात बसलेल्या दिसतील. या मुलांना वास्तविक कांहीं होत नसतें. परंतु आपण करतों तें सर्व बरोबर आहे कीं नाहीं, डॉक्टरला कांहीं अधिक सुचवावयाचें आहे कीं काय, याचीच चौकशी करण्याकरितां या स्त्रिया तेथें आलेल्या असतात. लहान मुलांच्या बाबतींत शाळाखातें आणि आरोग्यखातें यांचें पूर्ण सहकार्य असून तरुण पिढीचें कल्याण हें समान ध्येय त्यांचेपुढें आहे. या बालगृहांतून कामाकरितां आणि शिक्षणाकरितां जीं माणसें ठेविलेलीं असतात, त्यांचेंही शिक्षण सतत चालूं राहावें अशी

योजना असते. प्रत्येक बालगृहाचे जोडीला दुसरी एक संस्था देऊन त्या दोघांच्या मध्यें सात्त्विक चढाओढ लावलेली असते. त्यामुळें सतत नवीन नवीन ज्ञान मिळवून आपली संस्था पुढें आणावी, अशी चालक वर्गाच्या ठिकाणीं महत्त्वाकांक्षा उत्पन्न होते आणि त्यांचें ज्ञान सांचलेल्या पाण्याप्रमाणें मर्यादित राहात नाहीं.

## नवीन प्रकारचें बालोद्यान

जन्मापासून तीन वर्षेपर्यंत मुलांना बालगृहसंस्था आहेत त्याचप्रमाणें तीन ते सात वर्षांपर्यंतच्या मुलांना बालोद्यान (किंडरगार्टन) संस्था आहेत. प्रत्येक गिरणीला जोडून आणि त्याशिवाय शहरांत प्रत्येक भागांतून या शाळा आहेत. कारखान्याला जोडून असलेल्या संस्थांत जाणाऱ्या मुलांच्या खर्चा-पैकीं शेंकडा पंचाहत्तर टक्के खर्च कारखान्याकडून मिळतो, बाकी पंचवीस टक्के आईबाप देतात. इतर बालोद्यान संस्थांतून पालकांच्या उत्पन्ना-प्रमाणें फीचें प्रमाण कमीजास्त असतें. पगार जितका अधिक तितकी फी जास्त. आधुनिक पद्धतीच्या इमारती, वैद्यकीचीं उपकरणीं, शिक्षणाची सामुग्री इत्यादि दृष्टींनीं रशियाच्या बालोद्यान संस्था यूरोपमधील संस्थांच्या तोडीच्या आहेत. परंतु त्यांच्या अभ्यासक्रमांत आणि मुलांच्या कार्यक्रमांत कांहीं विशेष गोष्टी आहेत, त्या यूरोपमधील इतर बालोद्यान संस्थांतून आढळत नाहींत. रशियांतील नवीन समाजाची तत्त्वें आणि त्या देशांतील शिक्षणाची तत्त्वें यांची सुसंगत अशी सांगड घातलेली आहे. अगदीं बालशिक्षणापासून शाळेच्या प्रत्येक तपशिलांत आपलें नवीन तत्त्वज्ञान कसें प्रतीत करितां येईल, या गोष्टीकडे रशियन शिक्षणतज्ज्ञांचें बारीक लक्ष असतें.

## बालशिक्षणाचीं रशियन तत्त्वें

समाजांतील प्रत्येक व्यक्ति श्रम करून जगणारी असावी, व्यक्तीनें नेहमी समाजहिताला प्रधान स्थान द्यावें, आणि मानवी जीवन हें भौतिक शास्त्रांवर उभारलेलें असावें, अशा मुख्य तत्त्वांवर एक नवीन समाज निर्माण करण्याचा प्रयत्न रशियानें चालविला आहे. हीं तत्त्वें कांहीं अंशीं पूर्वापार चालत आलेल्या समाजरचनेशीं विरोधी आहेत. म्हणून बालपणापासूनच या तत्त्वांचे वातावरणांत वाढलेली अशी एक भावी पिढी रशियाला तयार करावयाची

आहे. मानसशास्त्राच्या सिद्धांतावरून असें प्रस्थापित झालें आहे कीं, लहान मुलांचीं अगदीं पहिलीं वर्षें हीं चिरकाल संस्कारांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचीं आहेत. या वयांत जे संस्कार मनावर होतात, त्यांमुळें पुढील आयुष्याला वळण मिळतें. [व्यक्तीच्या शिक्षणांत प्रकृति आणि परिस्थिति असे दोन भाग आहेत. त्यांत वैयक्तिक प्रकृतीप्रमाणें मुलाची वाढ होत असली तरी भोंवतालच्या परिस्थितीचा त्याचेवर फार महत्त्वाचा परिणाम होत असतो.) त्यामुळें परिस्थितीला शिक्षणशास्त्रांत फार महत्त्व प्राप्त झालेलें आहे.] विशिष्ट परिस्थितींत, विवक्षित विचारांच्या व आचारांच्या वातावरणांत विद्यार्थ्यांची वाढ झाली तर ते विचार व आचार मुलाच्या ठिकाणीं जन्मभर दृढमूल होऊन जातील. अशा अल्प वयांत मुलांना आपल्या शिक्षणसंस्थांमधून घ्यावें आणि आपल्या नवीन समाजतत्त्वांचा संस्कार त्यांचे मनांवर करावा, म्हणजे पुढची एक पिढीच्या पिढीच नवीन आचारविचाराची होईल, अशी रशियन शिक्षणतज्ज्ञांची अपेक्षा आहे. म्हणून बालगृह आणि बालोद्यान या संस्थांतून लहान मुलांकरितां जो दिनक्रम आणि अभ्यासक्रम आंखला आहे, त्याचीं तंत्रें सांप्रदायिक पद्धतीच्या बालोद्यान पद्धतीपेक्षां जरा निराळीं आहेत.

श्रमाचें तत्त्व लहान मुलाला किती लौकर शिकवितां येईल, आणि श्रमाचें प्रतीक जो हातोडा तो लहान मुलाला कोणत्या वयांत वापरतां येईल याचा शोध रशियन मानसशास्त्रज्ञांनीं आपल्या प्रयोगशाळेंत केला. त्यांनीं असें ठरविलें कीं, तिसऱ्या वर्षापासून मुलाला लांकडी हातोडा देऊन चुका-खिळे मारण्याला शिकविण्यास हरकत नाहीं. पांचसहा वर्षांपासूनच्या मुलांना वर्कशॉप असतें. त्यांत लहान प्रमाणावर लहान हत्यारांनीं लाकूड कांपणें, आणि त्यांपासून खेळांतील आगबोट, विमानें, पुस्तकांची आलमारी इत्यादि गोष्टी करणें मुलांना शिकवितात. यांशिवाय मातीच्या लहान विटा पाडून त्यांचीं घरें बांधणें, बागकाम करणें इत्यादि कामेंही शिकविलीं जातात. मुलांची संशोधक बुद्धि वाढेल असे यांत्रिक खेळ त्यांना खेळावयास देतात. बाहुल्या किंवा कुत्रीं मांजरें देत नाहीत. बालोद्यान शाळांमधील कार्यक्रमाप्रमाणें स्वतःचीं ताटें मांडणें, वाढणें, धुणें हीं कामें मुलें करतातच. सारांश, रशियन बालोद्यानांत मुलें जीं जीं कामें करितात, त्या सर्वांना समाजाच्या दृष्टीनें कांहीं उपयुक्तता आहे. केवळ करमणुकीकरितां

मुलांनीं अर्थहीन अशा कांहीं क्रिया कराव्यात आणि त्यांपासून जातां जातां त्यांचें शिक्षण व्हावें, हा सांप्रदायिक बालोद्यानपद्धतीचा हेतु आहे. त्यांत करमणूक आणि शिक्षण आहे ; पण समाजोपयोगी श्रम हें तत्त्व नाहीं. तें साधण्याचा रशियन शिक्षणपद्धतींत प्रयत्न केलेला आहे.

नवीन समाजध्येयांची जाणीव मुलाला शक्य तितक्या लहान वयापासून व्हावी अशी योजना आहे. म्हणून मुलाला गोष्टी समजूं लागल्याबरोबर त्याला लेनिन, स्टालिन, मार्क्स इत्यादींच्या आयुष्यांतील मनरंजक गोष्टी सांगितल्या जातात. त्यापेक्षां जरा मोठीं मुलें झालीं म्हणजे त्यांना रशियांत सध्यां चालू असलेल्या सामाजिक चळवळीची सोप्या शब्दांत आणि प्रात्यक्षिक रीतीनें माहिती देतात. भोंवतालचे कारखाने, मजूरांच्या चाळी, प्रदर्शनें इत्यादि गोष्टी त्यांना दाखवितात. विद्यमान आणि जिवंत समाज काय आहे, याची मुलांना शक्य तितक्या लहान वयापासून ओळख झाली तर ते त्या समाजाच्या उन्नतीकरितां जन्मभर प्रयत्न करतील. याकरितां लहान मुलांच्या शिक्षणांत नेहमीं सत्य सृष्टीवर भर असतो. त्यांना काल्पनिक आणि स्वप्न सृष्टींतील काऊचिऊच्या आणि परिस्तानांतील यक्षगंधर्वांच्या गोष्टी सांगितल्या जातां कामा नयेत, त्यांचा संबंध नेहमी सत्यसृष्टीशीं आणि डोळ्यांपुढें वाढणाऱ्या समाजाशी ठेवावा, या तत्त्वावर रशियन पुढाऱ्यांचा अत्यंत कटाक्ष आहे. या बाबतींत रूढ बालशिक्षण पद्धतींत त्यांनीं क्रांति केली आहे.

## बालशिक्षणाच्या संस्थांची विविधता

राजकीय आणि आर्थिक अडचणीच्या काळांत आपल्या समाजांतील बालकरूपी संपत्ति वांया जाऊं नये) याकरितां रशियानें दूरदर्शीपणानें काळजी घेतली आहे, आणि लहान मुलांकरितां विविध प्रकारच्या संस्था काढल्या आहेत. शहरांतील राहणीमुळें आणि पोषक अन्न न मिळाल्यामुळें मुलांमध्यें क्षयरोगाचीं चिन्हें दिसूं लागतात. अशा मुलांची ताबडतोब व्यवस्था व्हावी, याकरितां प्रत्येक शहरांत क्षयरोग-आरोग्यभुवनें आहेत. या ठिकाणीं मुलांना दिवसभर ठेवितात आणि रात्रीं घरीं पाठवितात. येथें त्यांचेकरितां पौष्टिक अन्न, डॉक्टरचे उपचार, उघड्या हवेवरील राहणी आणि खेळ, करमणूक,

शिक्षण इत्यादि गोष्टींची व्यवस्था होते. या संस्थेच्या चालकांत शिक्षणतज्ज्ञ आणि डॉक्टर यांची नेमणूक होते.

ज्यांची आई लहानपणींच मृत किंवा आजारी झाली आहे अशा मुलांचे हाल होऊं नयेत म्हणून त्यांचेकरितां बालकगृहें असतात. या ठिकाणची सर्व व्यवस्था आणि कार्यक्रम पूर्वी वर्णन केलेल्या बालगृहाप्रमाणेंच असतात. अविवाहित मातांनीं आपल्या मुलांना टाकूं नये म्हणून त्यांची व्यवस्थाही अशा संस्थांमधून करितात. सारांश, आरोग्य आणि शिक्षण या दृष्टीनें रशियांतील बालकें आज अत्यंत भाग्यवान् आहेत.

## गृहशिक्षणाशीं विरोध नाहीं

आर्थिक अडचणीमुळें अद्याप या संस्था सार्वत्रिक आणि सक्तीच्या झालेल्या नाहींत, परंतु त्या लौकरच तशा करण्याचा रशियाचा मानस आहे. जनतेलाही या संस्थांची उपयुक्तता पटलेली आहे, त्यामुळें या योजनेला कोणाचा विरोध होईल, असें वाटत नाहीं. या संस्था गृहशिक्षणाला मारक आहेत असा कांहींचा आक्षेप होता, पण त्यांत तथ्य नाहीं. शाळेंतील सात आठ तास वजा जातां बाकीचा वेळ मुलें पालकांच्या सान्निध्यांत असतात. या शाळेंत मुलांना जें शिक्षण, जी शिक्षणसामुग्री, आणि तज्ज्ञ शिक्षकांची देखरेख मिळूं शकते ती श्रीमंत पालकांनाही आपल्या घरीं देतां येणें शक्य नाहीं. शिवाय आपल्या मुलांना योग्य गृहशिक्षण देण्याइतकें स्वतःचें शिक्षण शेंकडा दहा पालकांचें तरी झालेलें असतें किंवा नाहीं याची शंका आहे.

## नवें युग, नवा समाज, नवीन संस्था

नवीन युगांत नवीन समाज, आणि नवीन समाजांत नवीन संस्था निर्माण होतात. कृषिप्रधान संस्कृति, लहान गांवांतील राहणी आणि सामायिक कुटुंबपद्धति, या गोष्टी ज्या वेळीं समाजांत होत्या त्या वेळीं समाजांतील नैसर्गिक राहणीनेंच लहान मुलांचें शिक्षण आपोआप होत असे. आज समाजाची घडी बदलत चालली आहे. शेतीच्या जोडीला मोठमोठे उद्योगधंदे येऊन बसले आहेत. खेडेगांवाऐवजीं मोठमोठीं शहरें वाढू लागलीं आहेत, आणि सामुदायिक कुटुंबपद्धति मोडून विभक्त कुटुंबपद्धति रूढ होऊं लागली आहे. अशा या संक्रमणाच्या काळांत लहान मुलांचे आरोग्याचे आणि शिक्षण-संस्कारांचे किती हाल होत आहेत, तें शहरांत राहणाऱ्या प्रत्येक कुटुंबवत्सल

माणसाच्या अनुभवाला येतच आहे. मनोविकासाच्या आणि संस्कार-क्षमतेच्या दृष्टीनें हा अत्यंत महत्त्वाचा काळ वांया जाऊं नये म्हणून रशियानें नवीन संस्था स्थापून आपला प्रश्न सोडविला आहे. केवळ चार श्रीमंतांच्या पोराबाळांना या संस्थांची सोय करून दिल्यानें अखिल समाजाचा प्रश्न सुटत नाहीं ही खूणगांठ मनाशीं बांधून, या संस्था गोरगरिबांच्या आटोक्यांत कशा येऊं शकतील या दृष्टीनें रशियन पुढाऱ्यांनीं विचार केला आहे. विशेष गोष्ट म्हणजे बालकांचे शिक्षणालाही विशिष्ट समाज-ध्येयांची जोड दिलेली आहे. सामान्य जनांचें हित आणि निश्चित ध्येयानुसार कार्यपद्धति हीं रशियाचीं दोन महत्त्वाचीं तत्त्वें कोणत्याही समाजाला अनुकरण करण्यासारखीं आहेत.

## प्राथमिक शिक्षणाची नवी दिशा

आठ वर्षापर्यंतचें बालशिक्षण झाल्यानंतर शालेय प्राथमिक शिक्षणाला प्रारंभ होतो. आठ ते बारा वर्षाच्या बालकांकरितां चार वर्षांचा प्राथमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम ३१ ऑगस्ट १९२५ पासून सर्वत्र सुरू झालेला आहे. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा कार्यक्रम खेड्यांतून चार वर्षांचा व शहरांतून सात वर्षाचा असा आहे. याच्या पुढची पायरी म्हणजे खेड्यांतून सात वर्षांचा व शहरांतून दहा वर्षांचा आवश्यक अभ्यासक्रम करावा असा शिक्षणखात्याचा मनोदय आहे.

रशियांतील शाळा या केवळ श्रीगणेशापासून प्लेटो ॲरिस्टॉटल्पर्यंत साधे विषय सरळ पद्धतीनें शिकवून परीक्षा घेणाऱ्या संस्था नाहींत ; त्या समाजाशीं निगडित झालेल्या आहेत. यावरून प्राथमिक शिक्षणाचा अभ्यास-क्रम काय असेल याचीही कल्पना करितां येईल. भाषा, गणित, लेखन, वाचन इत्यादि विषय शिकविले जातात, परंतु ते मुख्य विषयांच्या अनुषंगानें घेतले जातात. मुख्य विषय पूर्वीं निर्देश केलेले तीन आहेत—श्रम, समाज, व निसर्ग यांचा अभ्यास. खेड्यांत अथवा शहरांत ज्या ठिकाणीं शाळा असेल तिच्या भोंवतालचा समाज, आर्थिक घडामोडी, आणि नैसर्गिक परिस्थिति यांना अनुलक्षून विषयांची मांडणी केलेली असते. तिसऱ्या यत्तेच्या अभ्यास-

क्रमाची रूपरेषा पुढें दिलेली आहे त्यावरून प्राथमिक शाळेंतील शिक्षणाची थोडी कल्पना येईल.

**शहरांतील शाळांकरितां अभ्यासक्रम—३ री यत्ता**

१. **शहर**—शहर आणि भोंवतालची परिस्थिति, शहरांतील अर्थोत्पादक व्यवहार, व्यापार, सांस्कृतिक जीवन.

२. **खेडेंगांव**—शेतीचीं कामें, खतें, पेरणी, फळांचे हंगाम.

३. **वसंत-ग्रीष्म ऋतूंतील सांघिक कामें**—शाळेच्या बागेंत व शेतांवर कामें, नद्या व सरोवरें, अरण्यें व चराऊ रानें.

**खेडेंगांवांतील शाळांकरितां अभ्यासक्रम—३ री यत्ता**

१. **खेडेंगांव**—खेडेंगांव व भोंवतालची परिस्थिति, स्थानिक जीवन, उद्योगधंदे, आणि ग्रामीय संघटना, पीकपाणी व उत्पन्न.

२. **शहर व खेडें**—शहरांतील जीवन, कारखाने व कामें, शहरांतील व खेड्यांतील सांस्कृतिक जीवन.

३. **वसंत ऋतूंतील कामें**—जमिनीची मशागत, नद्या व सरोवरें, गांवरानें, मधमाशा, 'मे दिन' समारंभांतील कामें, वार्षिक कामाचा अहवाल

## अभ्यासाचे विषय

याच पद्धतीनें इतर वर्गांचा अभ्यासक्रम आंखलेला असतो. या अभ्यासक्रमाचे साहाय्यानें शाळा कोणत्याही प्रांतांत असली तरी स्थानिक परिस्थितीला धरून तेथील नैसर्गिक परिस्थिति, अर्थोत्पादक जीवन आणि सामाजिक जीवन यांचा तपशील आंखला जातो. त्यामुळें शिक्षणाचा व भोंवतालच्या परिस्थितीचा संबंध येऊन त्या अभ्यासक्रमांत जिवंतपणा उत्पन्न होतो. शाळेच्या वेळापत्रकाच्या दृष्टीनें विचार केला तर वरील अभ्यासक्रमांत पुढील विषय येतील. प्राथमिक शाळेंतील चौथी यत्ता पूर्ण होतांना कोणते विषय असतात ते व आठवड्यांतील तास पुढें दिलेले आहे. रशियांत सहा दिवसांचा आठवडा असतो.

**प्राथमिक चौथ्या यत्तेचे विषय व तास—वय बारा**

| | | | |
|---|---|---|---|
| मातृभाषा | ५ | हस्तव्यवसाय | ३ |
| गणित | ५ | परदेशी भाषा | २ |
| भौतिक शास्त्रें | ३ | शारीरिक शिक्षण | १ |
| समाजविषक शास्त्रें | २ | कलाशिक्षण | १ |
| भूगोल | २ | संगीत | १ |
| | | एकूण | २५ |

वरील अभ्यासक्रमांत भौतिक शास्त्रें, समाजविषयक अभ्यास आणि हस्तव्यवसाय यांवर विशेष भर आहे. प्रत्येक प्राथमिक शाळेला जोडून एक लहान कारखाना असतो. तेथें हत्यारें व प्राथमिक यांत्रिक सामुग्री कशी वापरावी याचें शिक्षण मुलांना मिळतें. ग्रामीय शाळांतील विद्यार्थ्यांना शेतावरील कामें असतात. रशियांतील शिक्षणामुळें धनोत्पादक शक्ति वाढते. आपल्या देशांत मात्र उलट आहे. शिक्षणाचें पुस्तक हातांत आलें कीं नांगर व हातोडा हातांतून गळतो. रशियन मुलाच्या एका हातांत पुस्तक व एका हातांत नांगर आहे, म्हणून तो विद्वान् शेतकरी होईल.

## अभ्यासेतर कार्यक्रम

शाळेच्या अभ्यासक्रमांतून बौद्धिक व व्यावहारिक शिक्षण होतें, त्याचप्रमाणें मुलांच्या अभ्यासेतर चळवळी असतात त्यांतून संघटनेचें व सामाजिक शिक्षण होतें. प्रत्येक शाळेंत विद्यार्थ्यांचें एक मंडळ असतें, त्यानें मुख्य अध्यापकाचे देखरेखीखालीं शाळेंतील सर्व खात्यांची व्यवस्था पाहावयाची असते. त्याकरितां मुलांचे निरनिराळे संघ स्थापन झालेले असतात. आरोग्य, आर्थिक व्यवस्था, सामानाची काळजी, शिस्त राखणें, स्वच्छता इत्यादि सर्व खात्यांची व्यवस्था अध्यापकांचे मदतीनें विद्यार्थी पाहतात. शाळेला जोडून पालकांचे संघ असतात. शाळेच्या कामांत जी कांहीं शारीरिक श्रमाची अथवा कलाविषयक मदत लागेल ती पालक करितात. सामानाची दुरुस्ती, दिव्यांची दुरुस्ती, रंगसफेती इत्यादि पालकांना शक्य ती मदत ते करितात. अशा रीतीनें पालक, चालक व बालक यांच्या सहकारितेनें शाळा चालते.

रशियन शाळेंत छडीचा उपयोग करण्याची बंदी आहे.

हिंदी शिक्षणाची व अभ्यासक्रमाची पुनर्घटना करितांना रशियाचा प्रयोग लक्षांत घेण्यासारखा आहे. आपल्या शिक्षणांतून बाहेर पडलेला मुलगा समाजांतूनही बाहेरच पडतो. रशियन शिक्षणांतून बाहेर पडलेला विद्यार्थी समाजाच्या आर्थिक, सांस्कृतिक व सांघिक जीवनाशीं एकरूप होतो. दोहोंतील हा फरक फार मोठा आहे.

---

## प्रकरण दहावें

# दुय्यम शिक्षणाची नवीन दिशा

### कामकरी वेषांतील शिक्षक

रशियन शाळेच्या किंवा कॉलेजच्या अध्यापकाकडे पाहिलें तर हा कोणी संस्थेंतील कामकरी आहे असेंच त्याच्या पोषाखावरून तिऱ्हाईत प्रेक्षकाला वाटेल. परंतु बाह्यतः मजूर दिसणाऱ्या या व्यक्तीशीं संभाषणास प्रारंभ केला म्हणजे त्याची विद्वत्ता व त्याच्या डोक्यांत चाललेले गंभीर विचार लक्षांत येतात. मुख्य अध्यापक किंवा शिक्षक हे विद्वत्तेचे व विचारांचे दृष्टीनें सामान्य जनांपेक्षां श्रेष्ठ असले तरी बाह्य उपाधींचे दृष्टीनें ते कामकरी वर्गापैकींच आहेत. या शिक्षकवर्गांत क्रांतीपूर्वींच्या जुन्या आणि क्रांतीनंतरच्या नव्या शिक्षकांचा भरणा आहे. सोव्हिएट राज्यक्रांति झाली त्या वेळीं जुना शिक्षकवर्ग हा नवीन प्रस्थापित झालेल्या राज्यपद्धतीला अनुकूल नव्हता. प्रारंभीं शिक्षकवर्गांनीं विरुद्ध पक्षाला मिळून संप पुकारले व सत्याग्रह केला. परंतु हळुहळू ते नवीन राज्यसत्तेकडे वळले. समाजांत शिक्षणप्रसार करण्याचे कामांत त्यांनीं उत्साहानें भाग घेतला. या जुन्या शिक्षकवर्गाबरोबर कामकरी वर्गांतूनच शिक्षण घेऊन निर्माण झालेला

नवीन शिक्षकवर्ग सध्यां शाळाकॉलेजांमधून आहे. या दोनही शिक्षकवर्गांची दृष्टि समाजवादी आहे. श्रमजीवी कामकरी वर्गाची नवीन संस्कृति उभारण्याकरितां आपण शिक्षण देत आहोंत अशी त्यांची भावना आहे. शिक्षणाचीं निश्चित ध्येयें त्यांच्या दृष्टीपुढें आहेत. म्हणून बाह्यतः कामकरी मजुराच्या पोषाखांत हे अध्यापक दिसत असले तरी ते रशियन सामाजिक व राजकीय पुनर्घटनेचें महत्त्वाचें काम बुद्धिपूर्वक करीत आहेत.

## शिक्षकाची विचारसरणी

या अध्यापकांचे मनांत काय विचार चालतात ते त्यांनीं विचारलेल्या कांहीं प्रश्नांवरून दिसून येतील. "हिंदी अभ्यासक्रमांत शारीरिक श्रम व व्यवसाय यांचा समावेश झाला आहे काय? शालेय विषय आणि अर्थोत्पादक श्रम यांची सांगड घातली जाते काय? विद्यार्थ्यांच्या सामाजिक व राजकीय संघटना काय आहेत? जडवादी तत्त्वज्ञानासंबंधीं हिंदी शिक्षकांचें काय मत आहे? गांधींचा समाजवादाला विरोध कां आहे? कृष्णमूर्तींचें तत्त्वज्ञान काय आहे? हिंदी शिक्षकांत संघटना आहे काय?" यांत्रिक व औद्योगिक शिक्षणसंस्थेच्या एका अध्यापकानें विचारलें, "मानवी जीविताच्या अंतिम ध्येयाविषयीं हिंदू तत्त्वज्ञानाचें काय म्हणणें आहे?"

या शिक्षकवर्गापैकीं विशेषतः भौतिकशास्त्रें, समाजशास्त्रें इत्यादि विषय शिकविणारा वर्ग निरनिराळ्या कारखान्यांतून कामाचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला असा आहे. कम्यूनिस्ट पक्षाचें राजकारण विषयाचें विद्यापीठ आहे; त्यांत शिक्षण घेऊन बाहेर पडलेले शिक्षकही यांत आहेत. या शिक्षक वर्गामुळें शिक्षणसंस्थांमध्यें एका विशिष्ट विचारांचें व मतांचें वातावरण उत्पन्न झालेलें असतें.

यावरून स्वाभाविकच असें अनुमान निघेल कीं, रशियांत शिक्षकांना मतस्वातंत्र्य नाहीं. ही गोष्ट खरी आहे. परंतु रशियन लोकही इतर देशांबद्दल तेंच म्हणतात! राजनिष्ठेची शपथ घेणें, आणि अर्थशास्त्र–राजकारण विषयांत विशिष्ट मतेंच शिकविणें हें कांहीं अध्यापकांचें मतस्वातंत्र्य नाहीं. या सर्वांतून सार हें दिसतें कीं प्रस्थापित सत्तेला ज्या प्रमाणांत आपली शाश्वति वाटते त्या प्रमाणांत शिक्षकवर्गाला मतस्वातंत्र्य असतें. सत्तेला

धोका पोंचण्याचा संभव उत्पन्न झाल्यावर कोणत्याच देशांत शैक्षणिक स्वातंत्र्य मिळत नाहीं.

## स्वातंत्र्यांत शिस्तीचें वातावरण

मुख्य अध्यापक आणि शिक्षक यांचे, तसेंच शिक्षक व विद्यार्थी यांचे संबंध अगदीं मोकळेपणाचे असे आहेत. परदेशचा प्रेक्षक येऊन मुख्य अध्यापकांशीं चर्चा करीत बसला तर इतर शिक्षक मोकळे असल्यास तेथें येऊन बसतील व चर्चा श्रवण करतील. अधिकाऱ्याचे देखत आपण खुर्चीवर कसें बसावें ही भीति त्यांना वाटत नाहीं. आणि अशा प्रसंगीं परदेशीय प्रेक्षकांशीं होणारी चर्चा ऐकणें शिक्षकांच्या ज्ञानाचे दृष्टीनें हितावह आहे असें अधिकाऱ्यांना वाटत असावें. शिक्षकाबरोबर प्रेक्षक शाळा पाहात असतां सुटी असेल तर विद्यार्थी भोंवतालीं मोकळेपणानें जमतात व ऐकतात. त्यांना शिक्षकांची भीति वाटत नाहीं. इतकें मोकळेपणाचें वातावरण कांहींसें अमेरिकन शाळांतून दिसतें. इतरत्र क्वचित्.

## शाळेचें दर्शन

घंटा झाल्याबरोबर सर्व कामें यथापूर्व सुरू होऊन जिकडे तिकडे शिस्तीचें वातावरण निर्माण होतें. वर्गांत शिक्षक प्रश्नोत्तर पद्धतीनें शिकवीत असतात. मोकळे विद्यार्थी अभ्यासमंदिरांत परस्परांना साहाय्य करून अभ्यास करितात. कारखान्यांत कोणी सुतारी, लोहारी इत्यादि कामें करीत असतात. कोणी ग्रंथालयांतून वाचीत बसतात. कोणी मोठ्या गंभीरपणें बुद्धिबळें खेळत बसलेले दिसतात. हा खेळ रशियांत आबालवृद्धांचा आवडता आहे. प्रत्येक शाळेंत एक 'लाल कोंपरा' (रेड कॉर्नर) नांवाचा विभाग असतो. शाळेची अधिष्ठात्री देवता जी लेनिन, तिचें हें मंदिरच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. लेनिनची तसबीर मध्यें ठेविलेली असते. मागें एक मोठें तांबडें निशाण सोडतात. भोंवतालीं झाडांच्या कुंड्या वगैरे ठेवून शोभा आणलेली असते. शाळेंतील महत्त्वाचे समारंभ या जागीं होतात.

## साहित्यसामुग्रीची विपुलता

शहरांतील शाळा आकारानें मोठ्या असतात. हजारदीडहजारा-

पेक्षां अधिक विद्यार्थी तेथें असतात. जुने राजवाडे व सरदार-इनामदारांचे वाडे शाळेकरितां उपयोगिले आहेत. कांहीं ठिकाणीं नवीन इमारती आधुनिक पद्धतीनें बांधलेल्या आहेत, त्या प्रेक्षणीय आहेत. वर्गाच्या जागा ऐसपैस व हवाशीर असून एका बाजूची सर्व भिंतच कांचेची असते. त्यामुळें भरपूर प्रकाश मिळतो. बाहेरचें दारिद्र्य आणि शाळेंतील वैभव पाहून एकदम फरक वाटतो. कारखाना, शास्त्रीय प्रयोगशाळा, व्यायामशाळा, सभागृह, थंड व गरम पाण्याचीं कारंजी असलेलें स्नानगृह, इत्यादि आधुनिक सोयी शाळेच्या इमारतींत असतात. सिनेमा दाखविण्याकरितां स्वतंत्र मंदिर असतें, तेथें प्रत्येक मेजावर लहान दिवा असतो. चित्रें चालू असतांना माहितीचीं टिपणें लिहून घेतां यावीत हा उद्देश. शाळेंत एका ठिकाणीं रेडिओचा ध्वनिग्राहक (मायक्रोफोन) असतो व प्रत्येक वर्गात ध्वनिक्षेपक यंत्रें असतात. अध्यापकाला एका ठिकाणीं बसून शाळेंतील सर्व वर्गांशी बोलतां येतें. याचा उपयोग शारीरिक कवायतीकरितां होतो. एका ठिकाणाहून सोडलेले हुकूम रेडिओनें सर्व वर्गात ऐकूं जातात व प्रत्येक वर्गांत कवायत सुरू होते. ही साहित्यसामुग्री हळुहळू सर्व शाळांतून पुरविण्याचा उपक्रम चाललेला आहे.

क्रमिक पुस्तकें मुलांना दरवर्षी घ्यावीं लागत नाहींत. ठराविक रक्कम विद्यार्थ्यांनी शाळेला एकदां द्यावयाची असते. मग शाळेकडून सर्वांना वापरण्याकरितां पुस्तकें मिळतात व सालोसाल त्याच पुस्तकांचा उपयोग केला जातो. त्यामुळें काटकसर होते. पुस्तकें काळजीपूर्वक वापरलीं जावींत म्हणून देखरेखीचें काम विद्यार्थीसंघ करितात.

मधल्या वेळचें भोजन शाळेंतच मिळतें. देशांत जरी दुष्काळ व अडचण असली तरी तरुण पिढीला त्याची झळ लागूं नये, व तिच्या आरोग्यावर अनिष्ट परिणाम होऊं नये म्हणून शाळा पौष्टिक अन्नाची व्यवस्था करिते. मुलांच्या पालकांचें तीस रूबलपेक्षां कमी उत्पन्न असेल तर मोफत, पन्नास रूबलपेक्षां कमी उत्पन्न असल्यास निम्मा खर्च, व अधिक उत्पन्न असल्यास पूर्ण खर्च, अशी वर्गवारीची योजना अन्नखर्च व फी यांचेबाबत केलेली आहे.

## शिक्षणांतील समाजतत्त्वें

रशियाच्या सामाजिक तत्त्वज्ञानाचें प्रतिबिंब शिक्षणाच्या प्रत्येक

तपशिलांत कसें पडतें तें पाहण्यासारखें आहे. हजार दोन हजार विद्यार्थ्यांच्या मोठ्या शाळा असल्यामुळें प्रत्येक यत्तेच्या अनेक तुकड्या असतात. पण या तुकड्या हुषारी किंवा बुद्धीच्या तत्त्वावर पाडीत नाहींत. हुषार, मध्यम, आणि मंद असे विद्यार्थ्यांचे प्रकार प्रत्येक वर्गांत असतात. फार हुषार व फार मंद मुलें एकत्र येऊं नयेत अशी काळजी घेतली जाते. हुषार विद्यार्थ्यांनीं व्यक्तिशः पुढें न जातां इतरांना, आपल्या मित्रांना, घेऊन पुढें जावयाचें. व्यक्तीच्या प्रगतीपेक्षां समूहाच्या प्रगतीला महत्त्व अधिक द्यावयाचें. हुषार आणि मंद विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमाला मुदत सारखीच असते. पण हुषार विद्यार्थ्यांना अवांतर वाचन व जादा अभ्यास दिला जातो. अभ्यासाचे प्रगतीकरितां वर्गांत स्पर्धा असते. परंतु ती व्यक्तीव्यक्तींमध्यें नसते. वैयक्तिक स्पर्धेच्या ऐवजीं 'समाजवादी स्पर्धा' अशी नवीन पद्धति त्यांनीं सुरू केली आहे. शाळेंत, कारखान्यांत, व अन्यत्र जेथें चुरशीनें काम व्हावयाचें असतें तेथें दोन अथवा अधिक समान गटांत स्पर्धा लावण्यांत येते. यश किंवा अपयश मिळेल तें व्यक्तीचें नसून समूहाचें. बक्षिसें वगैरे सहसा व्यक्तींना मिळत नाहींत, समूहांना मिळतात. याला कांहीं अपवाद आहेत. जुन्या शिक्षणपद्धतींत वैयक्तिक स्पर्धेचें बाळकडू विद्यार्थ्यांना शाळेंतून मिळतें व तेंच समाजांत वाढून व्यक्तिवादापासून उत्पन्न झालेल्या स्वार्थाचीं कडू फळें आर्थिक व सामाजिक क्षेत्रांत समाजाला भोगावीं लागतात. सध्यांचा समाज वैयक्तिक स्पर्धेच्या तत्त्वावर चाललेला आहे. रशियाला तरुण पिढीच्या मनांतून हा व्यक्तिवाद व वैयक्तिक स्पर्धेची कल्पना काढून टाकावयाची आहे. त्या दृष्टीनें वर्गवारी, बक्षिसें इत्यादि शिक्षणाचा तपशील आंखला जातो.

### शिक्षकांचे मताला मान

समाजवादाच्या चौकटींत रशियानें लोकशाहीचें तत्त्व बसविण्याचा प्रयत्न चालविला आहे. बक्षिसें वगैरे कोणास द्यावयाचीं तें शिक्षक किंवा अधिकारी न ठरवितां विद्यार्थीच ठरवितात. अभ्यासक्रम व क्रमिक पुस्तकें नेमलीं जातात त्यांत शिक्षकांना पुष्कळ भाग घेतां येतो. त्याची पद्धत अशी आहे : प्रथम एक हजार शिक्षकांची निवड होऊन त्यांचेकडे अभ्यासक्रम तयार करणें व क्रमिक पुस्तकें लिहिणें हीं कामें दिलीं जातात. अभ्यासक्रम

व पुस्तकें तयार झालीं म्हणजे प्रयोग व अनुभव पाहण्याकरितां त्यांच्या कच्च्या प्रती विद्याधिकारी अनेक शाळांमधून पाठवितात. त्या ठिकाणीं एक वर्षभर या योजनेचा अनुभव पाहिला जातो. नंतर शिक्षक व शाळाचालक आपले अनुभव विद्याखात्याकडे पाठवितात. त्यांचा उपयोग करून मग सुधारलेला अभ्यासक्रम क्रमिक पुस्तकांसह चालू होतो. या पद्धतीमुळें शिक्षकांना एक प्रकारची आत्मीयता वाटत असते. प्रयोग व विचार करण्याला त्यांना प्रोत्साहन मिळतें. जेथें शिक्षकांच्या विचाराला महत्त्व न देतां अभ्यासक्रमाची व पुस्तकांची निवड विद्याखातें, विद्यापीठ. किंवा शाळाचालक यांचेकडून केली जाते तेथें शिक्षकांना कांहीं आपलेपणा वाटत नाहीं. अशा ठिकाणचें काम निर्जीव यंत्राप्रमाणें होतें. जेथें नवीन विचार नाही, प्रयोगाला वाव नाहीं त्या शिक्षणांत जिवंतपणाची काय अपेक्षा करावी !

## दुय्यम शिक्षणाचा अभ्यासक्रम

रशियन हायस्कूल सहा वर्षांचें असून त्यांत प्राथमिक विभाग (फर्स्ट डिव्हिजन) व द्वितीय विभाग (सेकंड डिव्हिजन) असे तीन तीन वर्षांचे दोन भाग केलेले आहेत. त्यांच्या अभ्यासक्रमामध्यें हस्तव्यवसाय, उद्योगशास्त्र, भौतिकशास्त्रें आणि समाजविषयक शास्त्रें यांना विशेष प्रामुख्य दिलें जातें. अर्थात् संस्कार या दृष्टीनें इतर विषयही थोडयाफार प्रमाणांत शिकविले जातातच. हायस्कूलमधील तिसऱ्या यत्तेला काय विषय असतात ते पुढें दिले आहेत. ही यत्ता वर्षांचे दृष्टीनें आपलेकडील व्हर्न्याक्युलर फायनलचे किंवा इंग्रजी तिसरीचे बरोबर येईल. विषयांचे पुढें अभ्यासाचे साप्ताहिक तास दिले आहेत. सहा दिवसांचा आठवडा असतो व त्यांत सहावे दिवशीं सुटी असते.

### हायस्कूल तिसऱ्या यत्तेचे विषय व तास—वय पंधरा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| हस्तव्यवसाय व उद्योग | | ५ | मातृभाषा व वाङ्मय | ४ |
| फिजिक्स् व रसायनशास्त्र | ५ | ७ | परदेशी भाषा (इंग्लिश किंवा जर्मन) | २ |
| जीवशास्त्र | २ | | रेखा व चित्रकला | १ |
| गणित | | ६ | संगीतकला | १ |
| समाजशास्त्रें | | ३ | शारीरिक शिक्षण | १ |
| भूगोल | | १ | | |
| | | | एकूण | ३१ |

हा तीन वर्षांचा दुय्यम शिक्षणाचा प्राथमिक विभाग पूर्ण झाल्यावर बहुसंख्य विद्यार्थी धंदेशिक्षणाकरितां कारखान्यांत उमेदवारीला किंवा उद्योगधंद्याच्या शाळेंत जातात. राहिलेले शेंकडा पंधरावीस विद्यार्थी दुय्यम शिक्षणाच्या द्वितीय विभागाकडे जातात. तेथें तीन वर्षें पूर्ण झाल्यावर हे विद्यार्थी आपलेकडील मॅट्रिकबरोबर येतात. त्यांना जे अभ्यासक्रम असतात त्यांत तीन शाखा केलेल्या आहेत---(१) शेतकीविषयक, (२) राज्यकारभारविषयक आणि (३) शिक्षणशास्त्रविषयक. एकंदर वेळेपैकीं तीनचतुर्थांश वेळ सामान्य शिक्षणांत जातो व एकचतुर्थांश वेळ या विशेष व्यवसायात्मक शिक्षणाकडे दिला जातो. त्यामुळें हायस्कूल शिक्षण पूर्ण करणाऱ्या विद्यार्थ्यांचें सर्वसामान्य शिक्षण होऊन व्यवसायात्मक शिक्षणाचीही त्याला जोड मिळते. सर्वसामान्य शिक्षणाचें स्वरूप काय आहे तें पुढील विषय व त्यांना दिलेले साप्ताहिक तास यांवरून समजेल.

**हायस्कूल सहाव्या यत्तेचे विषय व तास---वय सतरा**

| | तास | | तास |
|---|---|---|---|
| समाजशास्त्रें | ४ ते ५ | परदेशीय भाषा | १ |
| गणित | ४ | चित्रकला | १ ते २ |
| भौतिक शास्त्रें | ८ | गायन व संगीत | १ ते २ |
| रशियन भाषा व वाङ्मय | ४ | शारीरिक शिक्षण | १ ते २ |
| | | एकूण | २५ ते २८ |
| | | विशिष्ट शाखेचे विषय | ७ ते १३ |

सातपासून तेरापर्यंत तास वर निर्दिष्ट केलेले शेतकी, शिक्षणशास्त्र व राज्यकारभार हे जे विशिष्ट व्यवसायांचे अभ्यासक्रम आहेत त्यांना दिले जातात.

इकडील अभ्यासक्रमाशीं तुलना करतां केवळ भाषा आणि वाङ्मय यांपेक्षां भौतिक शास्त्रें, समाजशास्त्रें, व विशिष्ट व्यवसाय यांवर रशियन हायस्कूलचा भर विशेष दिसतो. या शिक्षणाला विशिष्ट हेतु आहे, त्यामुळें विद्यार्थ्यांपुढेंही निश्चित ध्येय राहतें. वयाचे पंधरावे वर्षीं हायस्कूलचे

द्वितीय विभागांत जातांना विद्यार्थ्याला आपला आयुष्यांतील व्यवसाय ठरवावा लागतो व त्या अनुरोधानें त्याचें शिक्षण होतें.

## क्रियायुक्त अध्यापन

अध्यापनामध्यें केवळ क्रमिक पुस्तकांवर भर न देतां समाजांत व कारखान्यांत जाऊन समक्ष निरीक्षण करणें व तेथील कार्यांत प्रत्यक्ष भाग घेणें या पद्धतीचा उपयोग केला जातो. शाळेचे सान्निध्यांत असलेलीं शेती-विषयक कामें, कारखाने, व इतर सामाजिक संस्था यांचा विद्यार्थ्यांना उद्योग व प्रयोग शाळेसारखा उपयोग होतो. त्यामुळें शिक्षणाचा संबंध समाजांतील आर्थिक व सांस्कृतिक जीवनाशी येतो. शिक्षण केवळ शाब्दिक न राहतां क्रियायुक्त होतें.

## नवीन परीक्षापद्धति

प्राथमिक शाळेंतून दुय्यम शाळेत किंवा तेथून कॉलेजमध्ये जातांना विद्यार्थ्यांना सामुदायिक परीक्षा नाहीत. प्रत्येक शाळा आपापल्या परीक्षा घेते, व मुख्याध्यापक शाळेचें शिफारसपत्र देतात. विद्याखात्याचा एक, व पालकांचा एक, अशा दोन प्रतिनिधींच्या समक्ष वर्गशिक्षक आपल्या विद्यार्थ्यांची परीक्षा घेतो. हजारो विद्यार्थी एका दावणीला बांधून त्यांची परीक्षा घेण्याची पद्धत रशियानें बंद केली आहे.

## औद्योगिक जगाचा अनुभव

अर्थोत्पादक श्रमाच्या शिक्षणाला रशियन पद्धतींत विशेष प्रामुख्य दिलें जातें. व्यवसायात्मक शिक्षणाचें अंग नाहीं अशा शाळा तेथें नाहींत. प्रत्येक हायस्कूलमध्यें सुतारी, लोहारी, यांत्रिक कामें, वैजिक कामें इत्यादींचा कारखाना असतो. तेथें नियमित वेळापत्रकाप्रमाणें कामें होतात. याशिवाय शिक्षणक्रम चालू असतां दरवर्षीं निरनिराळ्या कारखान्यांत विद्यार्थ्यांचें नांव घातलें जातें. वर्षाकांटीं साठ तास तेथें काम झालें पाहिजे. यांपैकीं पंचेचाळीस तास प्रत्यक्ष कामाकडे व पंधरा तास कारखान्याची संघटना व कारभारपद्धति शिकण्याकडे खर्च केले जातात. अशा रीतीनें यांत्रिक, रासायनिक, मुद्रणविषयक, रबर कामाचा अशा अनेक प्रकारच्या कारखान्यांतून

प्रत्यक्ष अनुभव विद्यार्थ्यांना मिळतो. त्यांचेकरितां स्वतंत्र यंत्रसामुग्री असते, व तयार झालेला माल विक्रीकरितां उपयोगिला जातो. कारखान्यांतील कामगार लोक कंटाळा न करतां हौसेनें विद्यार्थ्यांना शिकवितात, कारण आपल्या पोटावर पाय येईल ही भीति त्यांना नसते.

दुय्यम शिक्षणक्रम चालू असतां शाळेंत व कारखान्यांत जें शिक्षण मिळतें त्याचा उद्देश औद्योगिक व यांत्रिक युगांतील आवश्यक क्रियांचें आणि व्यापारांचें ज्ञान सर्व नागरिकांना व्हावें असा आहे. सांस्कृतिक आणि औद्योगिक अशा दोन्ही दृष्टींनीं या शिक्षणाचा उपयोग होतो. ज्या समाजांत आपण राहतों त्यांतील अर्थोत्पादक क्रियांचें व पद्धतींचें ज्ञान प्रत्येक नागरिकाला असणें जरूर आहे.

## शास्त्रोक्त व्यवसायनिवड

प्रत्येक व्यक्तीला कोणता व्यवसाय अधिक योग्य आहे हे ठरविण्या-करितां एक मंडळ नेमलेलें असते. विद्यार्थ्यांची शारीरिक परीक्षा घेऊन मानसिक व बौद्धिक अशा निरनिराळ्या शास्त्रसिद्ध परीक्षा घेतल्या जातात. ही सर्व माहिती आणि शाळेंत अध्यापकांनीं केलेलें निरीक्षण व जमविलेली माहिती यांच्या आधारानें विद्यार्थी समाजांतील कोणत्या कामाला विशेष लायक आहे, तें ठरविलें जातें. त्याप्रमाणें पुढचा शिक्षणक्रम व उद्योगशिक्षण देण्याची व्यवस्था होते.

ही पद्धति सर्वच व्यक्तीच्या बाबतींत यशस्वी होईल की काय तें सांगणें कठिण आहे. विशेष प्रवृत्ति असलेल्या व्यक्तींच्या बाबतींत अन्याय होण्याचाही संभव आहे. झालेल्या रोगाचें अचूक निदान डॉक्टरला करतां येत नाहीं तर त्याहीपेक्षां गूढ अशा वैयक्तिक प्रवृत्तींचें व भवितव्याचें निदान कोणाला कसें करितां येईल ? सर्व प्रकारची माहिती देऊन व मार्ग दाखवून स्वयंनिर्णयाची संधि देणारी अमेरिकन पद्धति यापेक्षां अधिक चांगली दिसते.

## विद्यार्थ्यांची समाजसेवा

समाजाविषयीं आत्मीयत्वाची भावना उत्पन्न करणें हें रशियन शिक्षणाचें वैशिष्ट्य आहे. त्याकरितां केवळ तात्त्विक व बौद्धिक शिक्षणावर अवलंबून न राहतां प्रात्यक्षिक समाजसेवेचें शिक्षण दिलें जातें. हें ऐच्छिक

असलें तरी शेंकडा ऐंशी विद्यार्थी त्यांत भाग घेतात. हायस्कूल व कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं साक्षरतेच्या मोहिमेंत पुढाकार घेतलेला होता. आपली शाळा, भोंवतालचा समाज, व संस्था यांना उपयुक्त अशीं अनेक कामें विद्यार्थी करितात. समाजांत ज्या वेळीं कांहीं उपयुक्त कामें निघतात त्या वेळीं विद्यार्थ्यांची चांगली मदत होते. अशा रीतीनें समाजविषयक भावना प्रत्यक्ष कार्यपद्धतीनें उत्पन्न केली जाते.

## पालकांचें सहकार्य

पालकांना शाळेबद्दल आपलेपणा वाटावा याकरितां त्यांची संघटना केलेली असते. नवीन अभ्यासक्रम आंखतांना पालकांचा अभिप्राय जमेस धरला जातो. पालकांना शाळेच्या कामांत सामील केलें जातें. प्रत्येक पालक स्वतः शाळेकरितां काय करूं शकेल तें लिहून देतो. कोणी सामानदुरुस्ती करितात, कोणी स्वयंपाकावर देखरेख ठेवितात, कोणी मुलांना प्रवासाला घेऊन जातात, कोणी मुलांचे गृहपाठ करून घेतात, तर कोणी चित्रकला–गायनादि कलाविषयक शिक्षणांत शाळेला मदत करितात. सारांश, शाळा ही पालकांची आणि अधिकाऱ्यांची आहे ही भावना नाहीं. आपण अशिक्षित पालकांनीं शाळेंत कसें जावें अशी भीति नाहीं. शाळा ही आपली आहे अशी आत्मीयत्वाची भावना समाजाला वाटते.

## आरोग्य व लैंगिक शिक्षण

आरोग्य व शारीरिक शिक्षण या दृष्टींनी रशियांत अधिक काळजी घेतली जाते. शहरांत मोठमोठीं हॉस्पिटल्स् असतात त्यांचा शाळेला चांगला उपयोग होतो. आरोग्यशास्त्र, जीवनशास्त्र, शरीररचनाशास्त्र इत्यादि विषय प्रथमपासूनच शिकविले जातात. अशा रीतीनें पूर्वतयारी करीत आणल्यानंतर शास्त्रीय पद्धतीनें लैंगिक शिक्षण दिलें जातें. या बाबतींत विद्यार्थ्यांची प्रवृत्ति कशी असते अशी चौकशी करितां एका मोठ्या हायस्कूलच्या मुख्य अध्यापिकेनें आपला अनुभव सांगितला. 'चाळीस विद्यार्थ्यांच्या एका मिश्र वर्गांत हा विषय चालू असतांना विद्यार्थ्यांच्या भावनांचें निरीक्षण करितां असें दिसून आलें कीं त्यांचे ठिकाणीं शास्त्रीय जिज्ञासा उत्पन्न झालेली होती. विकृत भावना दिसली नाहीं.'

या बाबतींत शास्त्रशुद्ध प्रयोगापासून केलेलीं अनुमानें उपलब्ध झाल्याशिवाय कांहीं विधान करणें धोक्याचें आहे. यूरोप—अमेरिकेंत अद्याप या विषयावर एकमत झालेलें नाहीं हें मात्र खरें. हिंदू पद्धतीप्रमाणें ब्रह्मचर्यविषयक शिक्षण द्यावें, व संभवनीय संकटांपासून मुलांना वांचवावे या मर्यादेपर्यंत लोकांची तयारी झालेली आहे. पण हें शिक्षण पालकांनीं द्यावे कीं शाळांनीं याबाबत मतभेद आहे.

## रशियन व यूरोपियन हायस्कूल

यूरोपमधील सांप्रदायिक दुय्यम शिक्षणपद्धति व रशियन पद्धति यांत महत्त्वाचें अंतर आहे. यूरोपचें दुय्यम शिक्षण निवडक मुलांकरितां आहे तर रशियांत तें अमेरिकेप्रमाणें सर्व नागरिकांकरितां आहे. सध्यां तीन वर्षांचें दुय्यम शिक्षण शहरांतील सर्वांना उपलब्ध आहे. कालांतरानें सहा वर्षांचा शिक्षणक्रम सर्वांना आवश्यक करण्याचा विद्याखात्याचा विचार आहे. जुन्या पद्धतीमुळें शिक्षण पूर्ण झाल्यावर विद्यार्थी धनोत्पादक व्यवसायांपासून दुरावतो व पोषाखी बनतो. रशियन पद्धतीमधून बाहेर पडलेला विद्यार्थी समाजाच्या आर्थिक व व्यावसायिक जीवनाशीं समरस होतो. आपण सुशिक्षित आहोंत, खालच्या लोकांत मिसळूं नये असें त्याला वाटत नाहीं. अभ्यासक्रमाचे दृष्टीनें विचार करितां या दोन पद्धतींत बराच फरक दिसून येतो. जुन्या शिक्षणपद्धतीचें लक्ष पुराण विषयांकडे लागलेलें असतें. समाजांतील विद्यमान जीवन उच्च अभ्यासाचे दृष्टीनें कमी लेखलें जातें. रशियन अभ्यासक्रमाचा मूळ पायाच सामाजिक व आर्थिक जीवन आणि भोंवतालची निसर्गस्थिति हा आहे. केवळ बौद्धिक संस्कारांकरितां जुने व समाजाचे प्रस्तुत जीवनाशीं असंबद्ध असे विषय शिकविण्यापेक्षां, समाजाला उपयुक्त असे विषय शिकविण्याकडे रशियन हायस्कूलचा विशेष कल आहे. जुन्या शिक्षणपद्धतींत हस्तव्यवसाय व उद्योगधंदे यांचा समावेश होणें कठिण जातें. रशियांतील दुय्यम शिक्षणांत हस्तव्यवसाय हा आत्मा आहे. सारांश, अनिश्चित अशा ध्येयांकरितां माणसें तयार न करितां आपल्या सामाजिक व आर्थिक ध्येयांच्या पूर्तीकरितां मनुष्यबळ तयार करण्याचें काम रशियन शाळा करीत आहेत.

## गतिप्रियतेंत सुधारणाबीज

या ठिकाणीं अशी शंका येईल कीं, रशियांतील शिक्षण उपयुक्ततेच्या एका टोंकाला गेल्यास केवळ कारखान्यांतील कामगार व राजकीय प्रचारक निर्माण करण्याच्या त्या शाळा होतील. गेल्या पिढींतील रशियन शिक्षणाची प्रवृत्ति पाहतां असें दिसतें कीं त्यांत गतिप्रियता आहे, स्थितिप्रियता नाही. एकेकदां केलेला अभ्यासक्रम वीसपंचवीस वर्षांनीं बदलण्याइतकें शैथिल्य त्या देशांत नाहीं. अनुभव येईल तसतशी सुधारणा होत आहे असें स्पष्ट दिसतें. प्रारंभीं प्रारंभीं समाजसेवेच्या व राजकीय कामाच्या उत्साहांत शिक्षणाची हेळसांड होऊं लागली तेव्हां विद्याखात्यानें त्या कामावर वेळेचें नियंत्रण घातलें. अमेरिकेपासून घेतलेल्या 'व्यवसाय' व 'स्वाध्याय' अध्यापन-पद्धती (प्रोजेक्ट व डाल्टन) सखोल ज्ञानाचे दृष्टीनें सदोष वाटल्यामुळें रशियन विद्याखात्यानें त्या बंद केल्या. अशा रीतीनें सुधारणा चालू आहेत. आज औद्योगिक प्रगतीची व राजकीय शाश्वतीची रशियाला जरूरी आहे म्हणून हस्तव्यवसाय, भौतिक शास्त्रें व समाजशास्त्रें यावर त्याचा भर आहे. उद्यां ती जरूरी कमी झाली तर सांस्कृतिक आणि 'उदार' विषयांवरही भर दिला जाईल.

## हिंदुस्थान, रशिया व यूरोप

हिंदुस्थानांतील दुय्यम शिक्षणानें रशियापासून काय घ्यावें हा विचारणीय प्रश्न आहे. यूरोपमधील दुय्यम शिक्षणाच्या सर्व दोषांचें येथें अनुकरण झालेलें आहे. गुणांचें मात्र अनुकरण झालेलें नाहीं. इंग्लंडमधील पोषाखी हायस्कुलें येथें आलीं, पण धंदेशिक्षणाच्या संस्था आल्या नाहींत. दुष्ट परीक्षापद्धतींचें अनुकरण झालें पण शाळेंतील सांस्कृतिक शिक्षणाचें वारें येथें आलें नाहीं. समाजापासून अलिप्त अशा दुय्यम शिक्षणाची कल्पना यूरोपपासून आपण घेतली. तिचा सामाजिक जीवनाला व प्रगतीला उपयोग झाला नाहीं. रशियाप्रमाणें समाजाचे आर्थिक व औद्योगिक प्रश्न जमेला धरून शिक्षणक्रम आंखल्यास शाळांचा समाजाला उपयोग होईल. त्याच-बरोबर यूरोपमधील हायस्कूलप्रमाणें सामाजिक व राष्ट्रीय संस्कृतीचें संवर्धन करण्याचें काम शिक्षणानें घेतलें, तर संस्कृति वाढीस लागून तिचा

समाजांत प्रसार होईल. यूरोपियन आणि रशियन दोन्ही शिक्षणपद्धतीं-पासून आपणांस दोन तत्त्वें घेण्यासारखीं आहेत. दोन्ही टोंकांस जाण्याचा अतिरेक न करितां आपणांला योग्य अशी दोनही तत्त्वांची सांगड घालतां येणें शक्य आहे.

---

प्रकरण अकरावें

# विद्यापीठें आणि लोकशिक्षण

## पूर्वी व आतां

सोव्हिएट राज्यक्रांति होण्यापूर्वीच्या पिढीमध्यें रशियांतील उच्च शिक्षणाची काय स्थिति होती याचें शब्दचित्र टॉलस्टॉयनें काढलेलें आहे. तें पाहून आपल्याकडील विद्यापीठ-शिक्षणाचेंच हें चित्र आहे कीं काय, असें कोणाला वाटण्याचा संभव आहे.

"विद्यार्थ्यांचें मुख्य लक्ष टिपणें (नोट्स्) लिहून घेण्याकडे आणि परीक्षेच्या तयारीकरितां शिकण्याकडे आहे. पुस्तकांतून न मिळणारें असें नवीन ज्ञान विद्यार्थ्यांना अध्यापकांकडून मिळत नाहीं. बहुसंख्य विद्यार्थ्यांचें मुख्य लक्ष अध्यापकांना फसवून परीक्षा पास होण्याकडे असतें."

जुन्या शिक्षणपद्धतीमध्यें उच्च शिक्षणाचा फायदा केवळ श्रीमंत आणि उच्च वर्गांतील समाजाला मिळत होता. सामान्य जनांपर्यंत त्याचा प्रसार झालेला नव्हता. कामकरी व शेतकरी वर्गाला उच्च शिक्षणापर्यंत प्रवेश मिळणें दुरापास्त होतें. उच्च शिक्षणाच्या व संशोधनाच्या संस्थाही फार थोड्या होत्या.

समाजवाद्यांची नवीन राज्यपद्धति स्थापन झाल्याबरोबर त्यांच्या औद्योगिक व सांस्कृतिक पंचवार्षिक योजना आंखण्यांत आल्या. या योजनांची

अंमलबजावणी करण्याकरितां व चालू केलेलीं खातीं पुढें चालविण्याकरितां तज्ज्ञ लोकांची जरूरी होती. म्हणून प्रत्येक शाखेंतील उच्च शिक्षणाच्या संस्था काढणें व त्यांतील विद्यार्थ्यांची संख्या वाढविणें जरूर पडलें. गेल्या पिढीमध्यें या संस्थांची व विद्यार्थ्यांची संख्या पुष्कळ वाढली असून त्यांचें जाळें देशभर पसरलेलें आहे.

## तरुण व प्रौढ विद्यार्थी

सध्यां उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांत कामकरी व शेतकरी वर्गांतील लोक आहेत. हायस्कूलमधून वर जाणाऱ्या विद्यार्थ्यांबरोबरच कारखान्यांत निरनिराळ्या कामावर असलेले प्रौढ लोक या संस्थांतून उच्च शिक्षणाकरितां येतात, कारण त्यांचे कामाकरितां त्यांना या शिक्षणाची जरूरी असते. प्रत्यक्ष उद्योगधंद्यांत असलेला कामकरी वर्ग उच्च शिक्षण देऊन तयार करणें हें रशियाचें ध्येय आहे. या लोकांना प्रत्यक्ष ज्ञान कारखान्यांत काम करून झालेलें असतें. त्यांना तात्त्विक व शास्त्रीय ज्ञानाची जोड देऊन वरच्या कामांकरितां लायक करणें हें उच्च शिक्षणाचें ध्येय आहे. अशा रीतीनें तरुण विद्यार्थी व प्रौढ कामकरी अशा उभयतांना उच्च शिक्षणाचा फायदा मिळत आहे.

## निश्चित उद्देशानें शिक्षण

यूरोप-अमेरिकेंत व हिंदुस्थानांत उच्च शिक्षण या शब्दानें जी कल्पना येते त्यापेक्षां रशियन उच्च शिक्षण निराळें आहे. बहुसंख्य विद्यार्थ्यांकरितां उदार आणि वाङ्मयीन शिक्षण व मर्यादित विद्यार्थ्यांकरितां औद्योगिक शिक्षण अशी इतर देशांत उच्च शिक्षणाची कल्पना आहे. रशियांत सर्वच उच्च शिक्षण विशिष्ट व्यवसायाला उद्देशून असतें. सामाजिक व औद्योगिक क्षेत्रांत विशिष्ट कामाकरितां माणूसबळ तयार करण्याच्या उद्देशानें उच्च शिक्षणसंस्थांची स्थापना झालेली आहे. केवळ वाङ्मयप्रधान असा शिक्षणक्रम रशियांत नाहीं. विविध व्यवसायांकरितां शिक्षण घेणाऱ्या सर्वांनाच औद्योगिक शिक्षणाबरोबर कांहीं प्रमाणांत वाङ्मयीन शिक्षणही घ्यावें लागतें. केवळ बौद्धिक व केवळ औद्योगिक ही कामांची वांटणी समाजवाद्यांना मान्य नाहीं. म्हणून उच्च शिक्षणांतही व्यवसायांपासून अलिप्त

असें केवळ वाङ्‌मयीन व उदार शिक्षण तेथें नाहीं. उदार शिक्षण मुळींच नको असा याचा अर्थ नाहीं, तर विशिष्ट वर्गाला हें उदार शिक्षण न देतां समाजांत काम करणाऱ्या सर्वांनाच तें दिलें पाहिजे असा आहे. त्याचप्रमाणें समाजांतील प्रत्येक व्यक्तीचें शिक्षण विवक्षित हेतूनें, समाजांतील विशिष्ट कार्याकरितां झालें पाहिजे, असें उच्च शिक्षणाचें ध्येय आहे. या शैक्षणिक धोरणामुळें उच्च शिक्षण घेणारे विद्यार्थी शिक्षण चालू असतां व नंतर लोंबकळत राहात नाहींत. समाजांत त्यांचें निश्चित स्थान असतें.

उद्योगधंदे व शेती या व्यवसायांतील तज्ज्ञांचीं कामें, शिक्षकाचा व्यवसाय, राज्यकारभाराचीं कामें, संशोधन इत्यादि वरच्या दर्जाचीं कामें करणारे पुढारी, दिग्दर्शक व तज्ज्ञ निर्माण करण्याकरितां अनेक उच्च शिक्षण-संस्था काढलेल्या आहेत. त्यांची संख्या १९३३ मध्यें ६१५ होती व त्यांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या ४,३७,००० होती.

## अभ्यासक्रमाचें धोरण

प्रत्यक्ष उपयोग आणि समाजव्यवहार या तत्त्वांवर रशियन शिक्षणाचा विशेष भर आहे, तो उच्च शिक्षणांतही दिसून येतो. शास्त्रीय विषय व तात्त्विक ज्ञान यांचें शिक्षण दिलें तरी उद्योगधंदे व समाज यांना त्यांचा उपयोग कोणत्या दृष्टीनें होतो व होईल हा हेतु प्रधान असतो. भौतिक शास्त्रांचा उपयोग उद्योगधंद्याकडे कसा होईल, समाजशास्त्रें व वाङ्‌मयीन विषय यांचा उपयोग सामाजिक व राजकीय प्रश्न सोडविण्याकडे कसा होईल, आणि परदेशीय भाषांचा प्रत्यक्ष व्यावहारिक उपयोग काय होईल हा हेतु पुढें ठेवून तात्त्विक ज्ञानाचे अभ्यासक्रम आंखले जातात ; कारण हें शिक्षण घेणारांना पुढें प्रत्यक्ष औद्योगिक आणि सामाजिक क्षेत्रांत कामें करावयाचीं असतात.

## दोन प्रकारचे तज्ज्ञ

रशियन उच्च शिक्षणांतून बाहेर पडणाऱ्या तज्ज्ञांकरितां दोन प्रकारचे अभ्यासक्रम ठेविलेले आहेत. एका अभ्यासक्रमांत तात्त्विक व शास्त्रीय शिक्षणाची भूमिका अधिक व्यापक ठेविलेली आहे ; दुसऱ्या अभ्यासक्रमांत एकेका विशिष्ट क्षेत्रांतील तज्ज्ञ तयार करण्यावर विशेष भर आहे. दुसऱ्या

प्रकारचे तज्ज्ञांचे जोरावर उद्योगधंदे चालतात ; त्यांत व्यापक दृष्टीनें काय धोरणें ठेवावयास पाहिजेत या दृष्टीनें पाहणें, हें पहिल्या प्रतीच्या तज्ज्ञांचें काम असतें. सारांश, देशांतील उद्योगधंद्यांचें व राजकारणाचें भावी धोरण आंखून त्याप्रमाणें तज्ज्ञ माणसें तयार करण्याचें काम उच्च शिक्षणाकडून करून घेतलें जात आहे.

उच्च शिक्षणाचा अभ्यासक्रम चार ते पांच वर्षांचा आहे. पहिलीं दोन वर्षें सामान्य भूमिका तयार करणारा अभ्यासक्रम असतो ; पुढच्या दोन तीन वर्षांत विशिष्ट क्षेत्रांवर भर दिला जातो. अभ्यासक्रम चालू असतां प्रात्यक्षिक ज्ञान व त्याच्या क्षेत्रांतील काम यांवर विशेष भर असतो. शिक्षण पूर्ण झाल्यावर विद्यार्थ्याला प्रत्यक्ष औद्योगिक क्षेत्रांमध्यें खालपासून अनुभव घेत घेत सर्व कामांतून जावें लागतें, आणि नंतर त्याची वरच्या अधिकाराच्या जागेवर नेमणूक होते ; कॉलेजमधून बाहेर पडल्याबरोबर नेमणूक केली जात नाही.

## उच्च शिक्षणसंस्था

उच्च शिक्षणसंस्थांची विविधता, संख्या, व त्यांत शिकणारे विद्यार्थी यांची कल्पना पुढील माहितीवरून येईल. हे आंकडे १९३३ सालचे आहेत.

| विषय | शिक्षणसंस्था | विद्यार्थी |
|---|---|---|
| शिक्षण व अध्यापनशास्त्र | १६४ | ८८,८०० |
| मोठे उद्योगधंदे | ११९ | १,३१,३०० |
| शेतकीशास्त्र | ९७ | ६१,२०० |
| लहान उद्योगधंदे | १७ | १४,३०० |
| वाहतुकीचे उद्योगधंदे | १६ | २०,७०० |
| आर्थिक राज्यकारभार | ९ | ५,२०० |
| सरकारी योजना, आंकडे शास्त्र इ. | ७ | ६२०० |
| आरोग्य व वैद्यक | ४४ | ३०,००० |
| कम्यूनिस्ट विद्यापीठ संस्था | ५४ | २६,५०० |

## कॉलेज विद्यार्थी सरकारचे पाहुणे

रशियांत कॉलेज-विद्यार्थ्यांची चांगली सोय होते. औद्योगिक, सामाजिक,

व राजकीय क्षेत्रांत काम करणारे हे भावी पुढारी असल्यामुळें सोव्हिएट सरकार त्यांची सर्व प्रकारें व्यवस्था ठेवितें. त्यांना शिष्यवृत्त्या दिल्या जातात. राहण्याची, भोजनाची, शैक्षणिक साहित्यसामुग्रीची व इतर व्यवस्था सरकारकडून केली जाते ; वैद्यकीय मदत मिळते व आरोग्याकरितां हवापालट करावयाची सोय होते. याशिवाय व्याख्यानें, नाटकें, व सिनेमा यांचीं तिकिटें मोफत अथवा अल्प खर्चांत मिळतात. सारांश, उच्च शिक्षण चालू असतां अभ्यास आणि प्रात्यक्षिक कामाचा अनुभव याशिवाय कोणतीही विवंचना विद्यार्थ्यामागें नसते. कॉलेजमध्यें येणारे कांहीं प्रौढ कामकरी विद्यार्थी कुटुंबवत्सल असतात. त्यांची सहकुटुंब राहण्याची व्यवस्था स्वतंत्र वसतिगृहांत केली जाते.

कॉलेजमधील अध्यापकांनाही आर्थिक दृष्टीनें पुष्कळ सवलती मिळतात. अध्यापक व विद्यार्थी हे भावी समाजघटनेचे व औद्योगिक प्रगतीचे आधारस्तंभ समजले जातात. म्हणून त्यांची सर्व प्रकारें चांगली व्यवस्था करण्यांत येते.

## संशोधनसंस्थांचें जाळें

आपली सर्व भावी प्रगति संशोधनावर अवलंबून आहे हें तत्त्व रशियानें ओळखलें आहे ; म्हणून लहानमोठ्या सर्व विषयांच्या संशोधन संस्था त्यानें ठिकठिकाणीं स्थापन केलेल्या आहेत. हजारो विद्यार्थी व संशोधक या संस्थांमधून कामें करीत आहेत. भौतिक शास्त्रांच्या तात्त्विक क्षेत्रांतील संशोधन जितक्या काळजीपूर्वक चाललें आहे तितक्याच आस्थेनें लहान मुलांना खेळावयास खेळ कोणते द्यावेत अशा विषयांचेंही संशोधन चाललेलें आहे. शास्त्रीय, औद्योगिक आणि समाजप्रश्नविषयक असें तिन्ही प्रकारचें संशोधन करणाऱ्या संस्था रशियामध्यें निघालेल्या आहेत. या संशोधनांत समाजवाद्यांची अशी विशेष दृष्टि असते. केवळ संशोधनाकरितां संशोधन न करतां समाजाचें त्यापासून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष हित काय होईल या दृष्टीनें संशोधन–विषयांची निवड केली जाते. संशोधन संस्थांची गेल्या पंधरा वर्षांत चौपटीहून अधिक वाढ झालेली आहे. १९१९ सालीं २२१ संस्था होत्या, त्या १९३५ सालीं ९४२ पर्यंत वाढल्या. या संस्थांतून काम करणाऱ्या

संशोधकांची संख्या १९२८ सालीं १,५४८ होती ती १९३२ सालीं १६,५०० झाली ; म्हणजे सोळापट वाढली ! यांपैकीं केवळ औद्योगिक व यांत्रिक क्षेत्रांत संशोधन करणारांची संख्या २,००० पर्यंत होती.

या सर्व संशोधनकार्याचा चांगला परिणाम पुढच्या पिढीच्या भौतिक आणि सांस्कृतिक जीवनावर होईल यांत शंका नाहीं. दुसऱ्या देशांनीं वाढविलेल्या ज्ञानाचा रशियानें आजपर्यंत फायदा घेतला. यापुढें स्वतः त्या ज्ञानांत भर घालण्याकरितां त्यानें प्रयत्न चालविले आहेत.

## प्रौढांचें सामान्य व राजकीय शिक्षण

तरुण पिढींतील लोक शिकून पुढें येतील आणि काम करतील इतकी वाट पाहण्याचा धीर रशियाला नाहीं. एका पिढींत सर्व समाज साक्षर, सुशिक्षित, व समाजवादी झाला पाहिजे अशी त्याची महत्त्वाकांक्षा आहे. म्हणून अरुण–तरुणांकरितां जशी शिक्षणपद्धति आहे तिलाच समांतर अशी दुसरी शिक्षणयोजना प्रौढांकरितां आहे.

साक्षरतेच्या दोन परीक्षा पास झालेल्या नागरिकाला हायस्कूल प्रथम भागाचा तीन वर्षांचा अभ्यासक्रम एकदोन वर्षात करतां येतो, व द्वितीय भागाचा तीन वर्षाचा अभ्यासक्रम दोन वर्षांत पूर्ण करतां येतो. त्यानंतर इच्छेप्रमाणें औद्योगिक किंवा इतर उच्च शिक्षणसंस्थेंत प्रवेश मिळूं शकतो. त्यामुळें वयस्क प्रौढांनाही शिक्षणदृष्टचा आपला दर्जा वाढविण्याची संधि मिळालेली आहे. १९३३ सालीं सव्वाकोटी नागरिकांनीं अशा संस्थांचा फायदा घेतला. या संस्था सर्वसामान्य शिक्षणाच्या आहेत.

राजकीय दृष्टीनें समाजांत काम करणारे पुढारी व अधिकारी कार्यकर्ते निर्माण करण्याकरितां रशियानें राजकारणशास्त्राच्या शिक्षणाची एक स्वतंत्र शिक्षणपद्धतीच स्थापन केलेली आहे. खेडेगांवांत, शेतीवर, कारखान्यांत, व शहरांत मतप्रसाराचे दृष्टीनें जीं कामें चालतात त्यांचें नेतृत्व स्वीकारणारीं माणसें या शिक्षणपद्धतीमधून तयार होतात. वृत्तपत्रांचे संपादक, लेखक, निरनिराळ्या चर्चामंडळांचे चालक, ग्रंथालयांचे व्यवस्थापक, व कम्यूनिस्ट पक्षाचे काम करण्यास लागणारे कार्यकर्ते या विद्यापीठांत पद्धतशीर शिक्षण देऊन तयार केले जातात.

साक्षरता–परीक्षा पास झालेल्यांना प्रथम 'राजकीय–साक्षरतेचा' अभ्यासक्रम असतो. नंतर राजकारणशास्त्र विद्यालयाचा प्रथम आणि द्वितीय विभागांचा वरचा अभ्यासक्रम आहे. त्यानंतर कम्यूनिस्ट विद्या-पीठाच्या स्वतंत्र अभ्यासक्रमाची योजना केलेली आहे.

या शिक्षणसंस्थांत मुख्य भर राजकारण, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, संघटना इत्यादि विषयांवर असतो. समाजवादी दृष्टिकोणांतून हे सर्व विषय शिकविले जातात हें सांगणें नकोच. या राजकीय संस्थांत शिकणाऱ्या प्रौढ विद्यार्थ्यांची संख्या एक लाखपर्यंत असावी.

## व्यापक शिक्षणाच्या संस्था

सर्वसामान्य शिक्षणाच्या ऐच्छिक संघटना किती तरी आहेत. प्रत्येक कारखान्यांत, शेतावर, अथवा ज्या ठिकाणीं पांचपंचवीस माणसें जमूं शकतात त्या ठिकाणीं चर्चामंडळें, वाचनसंघ, स्थिर आणि फिरतीं ग्रंथालयें, हस्त-लिखित व छापील वृत्तपत्रें, अशा स्वरूपाच्या संस्था आहेत. त्या ठिकाणीं राजकीय चर्चा चालतेच. त्याचबरोबर आरोग्यविषयक आणि सांस्कृतिक स्वरूपाच्या विषयांचाही परामर्श घेतला जातो. जनतेंत राजकीय जागृति कायम ठेवणें आणि त्यांचें शिक्षण सतत चालू ठेवणें हा या संस्थांचा उद्देश आहे. त्यांचा सर्वत्र पुष्कळ प्रसार झाला आहे. लहान आगबोटीवरही मूठभर खलाशी असले तरी तेथें त्यांचें एक चर्चामंडळ किंवा वाचनसंघ यासारखी संस्था असते. यालाच जोडून एक लहान ग्रंथालय व वृत्तपत्र-मासिकांचें वाचनालय असतें. पूर्वीच्या समाजांत ठिकठिकाणीं देवळें पसरलीं होतीं तितक्याच प्रमाणांत आतां ठिकठिकाणीं 'लाल कोंपरे' (रेड कॉर्नर्स) पसरले आहेत. रेड कॉर्नर म्हणजे लेनिनचें व समाजवादाचें देऊळ असें म्हणण्यास हरकत नाहीं. एक लेनिनची तसबीर, तांबडें निशाण व थोडी सभेची जागा इतक्या गोष्टी या संस्थेला पुरतात. या ठिकाणीं पांचपंचवीस लोक येऊन समाजांत प्रचलित असलेल्या चळवळींची चर्चा करतात, वाचन केलेलें असल्यास त्याचा सारांश सांगतात, व्याख्यानें करवितात, आणि अशा रीतीनें आजूबाजूच्या समाजांत शैक्षणिक, राजकीय, व सांस्कृतिक जागृति कायम ठेवितात. विशिष्ट मताप्रमाणें कां होईना

पण वाचनावर व अभ्यासावर रशियाचा किती भर आहे तें लक्षांत घेण्यासारखें आहे. बहुजन समाज निरक्षर ठेवून त्याच्या अज्ञानाच्या जोरावर राज्य करण्यापेक्षां आपल्याच मताचे साक्षर व सुशिक्षित लोक करून त्यांचे संमतीनें राज्य करणें सोपें आहे असें कम्युनिस्ट पक्षाचें तत्त्व दिसतें.

## लोकशिक्षण आणि करमणूक

रशियामध्यें शिक्षण आणि प्रचार यांचेकरितां ज्याचा उपयोग केलेला नाहीं असें एकही क्षेत्र सांपडणार नाहीं. त्यामुळें रशियन शिक्षणपद्धतीचे थोडक्यांत वर्णन देणें कठिण आहे. सर्व प्रकारच्या शिक्षणपद्धतींचा त्यानें उपयोग करून घेतला आहे. चित्रपट, नाटकें, रेडिओ, प्रदर्शनें, चित्रप्रदर्शनें व वर्तमानपत्रें या संस्था करमणुकीच्या आहेत तितक्याच त्या ज्ञानप्रसाराच्या व राजकीय प्रचाराच्याही आहेत. सिनेमा व नाटक यांत कलेच्या दृष्टीनें नवीन नवीन प्रयोग चालू असतात. अभिरुचि व राजकारण या दृष्टीनें त्यांवर नियंत्रण असतें. उच्च कलोपासनेचीं हीं साधनें शेतकरी व कामकरी यांच्या सहज आटोक्यांत आलेलीं आहेत. रेडिओचे ध्वनिक्षेपक शहरांतील रस्त्यांवर ठिकठिकाणीं लावलेले आहेत. सहज जातां येतां लोकांच्या कानांवर कांहीं तरी ज्ञान पडत असतें. सर्वांत पद्धतशीर रीतीनें लोकशिक्षणाकरितां उपयोग करून घेतला आहे तो प्रदर्शनांचा. शैक्षणिक, औद्योगिक, राजकीय, ऐतिहासिक, व कलाविषयक अशीं सर्व प्रकारचीं प्रदर्शनें सर्व ठिकाणीं मोठ्या प्रमाणावर स्थापन केलेलीं आहेत. हजारों शेतकरी, कामकरी, विद्यार्थी व स्त्रिया हीं प्रदर्शनें पाहून जातात. ‘क्रांती’चे प्रदर्शनांत सोव्हिएट राज्यक्रांतीपूर्वीचा आणि नंतरचा इतिहास चित्रमय स्वरूपांत दाखविला आहे. ‘माता—बालक जीवन’ या प्रदर्शनांत स्त्रियांची पूर्वींची स्थिति व आजची स्थिति दाखविली आहे. अशाच प्रकारचीं औद्योगिक, आरोग्यविषयक, शैक्षणिक व इतर प्रदर्शनें सर्वत्र आहेत. करमणूक आणि शिक्षण अशा दोन्ही उद्देशांनीं या प्रदर्शनांचा फार चांगला उपयोग करून घेतलेला आहे.

## कला आणि संस्कृतिविषयक शिक्षण

बौद्धिक, औद्योगिक, आणि राजकीय शिक्षणाची जितकी काळजी

घेतलेली आहे तितकीच कलाशिक्षणाचीही आस्था रशियांत दिसून येते. प्रौढांकरितां उच्च प्रतीचे ऑपेरा, नाटकें, संगीत, नर्तन, इत्यादि कार्यक्रम होतात. संगीतकलेचें सर्वांत मोठें महाविद्यालय रशियांत मॉस्कोमध्यें आहे. क्रांतीपूर्वींही रशियांतील कलेचा दर्जा उत्कृष्ट होता पण तिचा प्रसार झाला नव्हता. आतां संशोधन आणि प्रसार दोन्ही कामें चालू आहेत. ज्या संगीत मंदिरांत पूर्वी वीस कार्यक्रम होत तेथें आतां दोनशेंपर्यंत होतात, इतक्या मोठ्या प्रमाणांत सामान्य जनांमध्यें कलेचा प्रसार चालू आहे.

मुलांनाही लहानपणापासून चांगल्या दर्जाच्या कलेची अभिरुचि लागावी म्हणून पद्धतशीर प्रयत्न चालू आहे. मॉस्कोमध्यें " बालक कलाशिक्षण मंदिर " (सेंट्रल हौस ऑफ् चिल्ड्रेन्स् आर्ट एज्युकेशन्) नांवाची संस्था आहे. अशा संस्थेच्या रशियांत १९३३ सालीं नव्वद शाखा होत्या. लहान मुलांना योग्य अशा कला, खेळ, व करमणुकी यांचें संशोधन व शिक्षण या ठिकाणीं चालू असतें. मुलांना योग्य अशी चित्रकला, संगीत, नाटकें, चित्रपट, नृत्यकला, खेळ, करमणुकी इत्यादि शोधण्याच्या दृष्टीनें या ठिकाणीं बालमानसशास्त्रज्ञ व कलातज्ज्ञ यांच्या देखरेखीखालीं काम चालूं असतें. रशियांत बालकांच्या साटीं स्वतंत्र नाटचगृहें व चित्रपटगृहें असतात. त्यांत विद्यार्थ्यांना योग्य अशाच प्रकारचे कार्यक्रम दाखविले जातात. नाटचांचे व चित्रपटांचे प्राथमिक प्रयोग मध्यवर्ती संशोधन-मंदिरांत होतात. या कार्यक्रमांतील कामें प्रौढ नट करितात. प्रेक्षक मात्र मुलें असतात. मुलांच्या मनांवर त्यांचे काय परिणाम होतात तें पाहून योग्य ते फेरबदल करवून घेतात. लहान मुलांच्या सांस्कृतिक शिक्षणाची व करमणुकीची साहित्यसामुग्री रशियांत किती पसरली आहे याची १९३३ सालच्या पुढील आंकड्यांवरून कल्पना येईल.

| | |
|---|---|
| केवळ बालकांकरितां नाटकगृहें | १०० |
| केवळ बालकांकरितां चित्रपटगृहें | ४० |
| कळसूत्री बाहुल्यांचे खेळाचीं नाटकगृहें | ३५ |
| चित्रपट दाखविण्याची सामुग्री असलेल्या शाळा | ५,००० |
| रेडिओ असलेलीं शालागृहें | २६,००० |
| संगीत शिक्षणाच्या शाळा | ५२ |
| बालवाङ्मय प्रकाशन संस्था | ५२ |

या सर्व कलांचीं प्रदर्शनें दरवर्षी भरतात. चित्रकला हा विषय शाळांतून आवश्यक आहे. चित्रकलेच्या प्रदर्शनांत शेंकडा ऐंशी विद्यार्थी भाग घेतात.

पुढच्या पिढींत रशियांतील यांत्रिक व औद्योगिक प्रगति कळसाला पोंचल्यानंतर प्रत्येक नागरिकाला चारपांच तासांपेक्षां अधिक काम पडणार नाहीं. अशा वेळीं लोकांना भरपूर वेळ मोकळा सांपडेल. तो वेळ लोकांनीं सात्त्विक करमणुकी व साहित्य–संगीत–कलेंत कसा घालवावा याचें शिक्षण तरुण पिढीला व जनतेला आजपासूनच दिलें जात आहे असें स्पष्ट दिसतें. इतर देशांत स्वतःच्या आर्थिक फायद्याकरितां खाजगी करमणुकीचे व्यापारी नाटक–सिनेमाद्वारें जनतेची हीन अभिरुचि वाढवीत आहेत. रशियांतील कलाशिक्षणांत उच्च अभिरुचि वाढविण्याचा प्रयत्न आहे.

## रशियन शिक्षणशास्त्रज्ञाचे विचार

रशियाची नवीन शिक्षण पुनर्घटना करण्यांत ज्यांनी भाग घेतला असे प्रो. शाट्स्की एका संशोधन संस्थेचे प्रमुख आहेत. क्रांतीपूर्वीही अनेक वर्षें त्यांनीं शिक्षणाचे क्षेत्रांत काम केलेलें आहे. रशियांतील शिक्षण पद्धतीविषयीं चर्चा करीत असतां ते म्हणाले —

" इतर राष्ट्रें युद्धाकरितां शिक्षणाचे द्वारें तयारी करीत आहेत. आम्ही जनतेला व्यापक शिक्षण देण्याचा प्रयत्न करीत आहोंत. आकुंचित राष्ट्रीय वृत्तीचीं माणसें आम्ही तयार करीत नसून इतर राष्ट्रांचे विषयीं मित्रत्वाची भावना उत्पन्न करीत आहोंत. आमच्या शिक्षणांत आम्हीं युद्ध आणि राष्ट्रीयत्व यांपेक्षां आत्मसंरक्षणावर अधिक भर देतों. भौतिक शास्त्रांना अधिक व्यावहारिक, उपयुक्त, आणि विधायक स्वरूप देण्याचा आमचा प्रयत्न आहे. भांडवलशाहींतील शास्त्रांचा उपयोग विघातक दृष्टीनें करण्यांत येतो. गरिबांची पिळणूक नसलेला, निसर्ग शक्तीवर स्वामित्व चालविणारा, बहुजनांत संस्कृतिप्रसार करणारा, आणि सर्वसामान्य जनांना आत्मविकासाची संधि देणारा असा एक नवीन समाज आम्ही निर्माण करीत आहोंत. सर्व जगाला मुक्त करण्याचें आमचें ध्येय आहे. "

प्रो. शाट्स्की यांनीं प्रतिपादलेली शैक्षणिक वेदांताची ही व्यापक भमिका कोणालाही मान्य होण्यासारखी आहे. शिक्षण देणाऱ्यांच्या अंतःकरणांत

कांहीं दृढ श्रद्धा आणि व्यापक ध्येयवाद असल्याशिवाय शिक्षणाला जिवंतपणा येत नाहीं.

अशा ध्येयवादाच्या आणि श्रद्धेच्या शोधांत सध्यां हिंदी शिक्षण आहे.

---

## प्रकरण बारावें

# हिंदी दृष्टीनें गुणदोषदर्शन

### अनुकूल-प्रतिकूल अभिप्राय

रशियन शिक्षणाकडे पाहण्याची अनेकांची अनेक प्रकारची दृष्टि आहे. जगप्रसिद्ध अमेरिकन शिक्षणशास्त्रवेत्ता प्रो. जॉन् ड्यूई यानें रशियन शिक्षणपद्धति पाहून तिची मुक्तकंठानें स्तुति केली. उलट इंग्लिश शिक्षणतज्ज्ञ या पद्धतीविषयीं बोलूं लागले म्हणजे रशियन शिक्षणांत राजकीय प्रचाराशिवाय कांहीं नाहीं असें विधान करतात. जगाच्या अनुकूल किंवा प्रतिकूल बोलण्याकडे काडीमात्र लक्ष न देतां पुढाऱ्यांनीं आपला प्रयोग धडाडीनें चालविला आहे. आपण स्वतः काय करीत आहोंत याविषयीं ते कांहीं लपवून ठेवीत नाहींत. इतर राष्ट्रांना तें पसंत न पडलें तरी पर्वा करीत नाहींत. शिक्षणाला राजकीय आणि औद्योगिक वळण लाविलें पाहिजे असें रशियन पुढारी स्पष्टपणें बोलत आले आहेत. त्याप्रमाणें त्यांची कृति चालू आहे. त्यांच्याच भाषेंत सांगावयाचें म्हणजे शिक्षणाचें Polytechnicisation and Politicisation त्यांना करावयाचें आहे. औद्योगिक दृष्टचा मागासलेल्या आणि राजकीय दृष्टचा उदासीन असलेल्या आम्हीं हिंदी लोकांनीं हिंदी चष्म्यांतून रशियन शिक्षणपद्धतीकडे पाहिलें पाहिजे. पद्धतीचें अनुकरण आणि मतांचें अनुकरण या अगदीं दोन स्वतंत्र गोष्टी आहेत. रशियाचीं मतें मान्य न करतां पद्धती मान्य होऊं शकतील. आज जर्मनींत आणि

इटलींत, व कांहीं प्रमाणांत इंग्लंड–अमेरिकेंत रशियन शिक्षणतंत्रांचें अनुकरण होऊं लागलें आहे.

## शिक्षणाचें कार्य दुहेरी आहे

रशियन शिक्षणपद्धतीकडे पाहतांना एक तत्त्व लक्षांत ठेविलें पाहिजे. शिक्षणसंस्था ही समाजानें आपल्या हिताकरितां व कार्यसाधनाकरितां निर्माण केलेली आहे. समाजाचे कल्याणाकरितां तिचा उपयोग करून घेतला पाहिजे. समाजांतील परंपरागत संस्कृतीचें रक्षण करणें हेंही शिक्षणाचें कार्य आहे ; परंतु या पुराण संरक्षणाचे कामांतच सध्यां शिक्षणाचा इतका वेळ जात आहे कीं विद्यमान वस्तुस्थितीकडे त्याचें लक्षच जात नाहीं. लॅटिन, संस्कृत, जुना इतिहास, जुनें तत्त्वज्ञान इत्यादि विषयांचें संरक्षण जरूर करावें. परंतु राष्ट्र आणि जनता जिवंत राहिली नाही तर या संस्कृतीचें संरक्षण कोण करणार ? आधीं पोट आणि नंतर संस्कृति असें रशियानें स्पष्टपणें सांगितले आहे. आजच्या आपल्या शिक्षणाची प्रतिगामी वृत्ति लक्षांत घेतां त्याला प्रतिक्रिया म्हणून आपल्या समाजांतही रशियन शिक्षणतत्त्वाचा अवलंब करणारा समाजवर्ग उत्पन्न होईल. तो उत्पन्न होऊं नये असें वाटत असेल तर पुराण संस्कृति आणि विद्यमान समाजजीवन या दोन्ही समाजांगांकडे शिक्षणानें लक्ष दिलें पाहिजे. जुन्या देशांतील आजच्या शिक्षणसंस्था पाहिल्या म्हणजे समाजापासून अलिप्त राहिलेल्या विद्वानांचें तें एक आश्रयस्थान आहे असें वाटतें. हें शिक्षण आणि हे विद्वान् यांना समाजांत आणून बहुजन समाजाची आर्थिक, सामाजिक, व सांस्कृतिक परिस्थिति सुधारण्याच्या कामांत पुढाकार घ्यावयास लाविलें पाहिजे. तसें होणार नसेल तर समाजावर शिक्षण आणि शिक्षक यांना पोसण्याची जबाबदारी नाहीं. मोबदला नाहीं तर खर्च कां करावा असा व्यावहारिक प्रश्न कोणीं विचारल्यास त्याला सयुक्तिक उत्तर नाहीं.

## शिक्षण तत्त्वाचीं दोन टोकें

शैक्षणिक तत्त्वज्ञानांत व्यक्तिवादी आणि समाजवादी असे दोन पंथ आहेत. व्यक्तिवादी शिक्षणाचा उद्देश असा आहे कीं प्रत्येक व्यक्तीच्या कमाल विकासाला पूर्ण वाव द्यावा आणि नंतर अशा व्यक्तींना समाजांत

पूर्ण स्वातंत्र्य द्यावें, म्हणजे त्यायोगें समाजाची प्रगति होईल. विशिष्ट विचार, मनोवृत्ति, भावना या दृष्टीनें व्यक्तीच्या मनावर बंधन घालूं नये. कोमल मनाच्या बालकांवर प्रौढांचे निश्चित मतांचे संस्कार करूं नयेत. समाजवादी शिक्षणाचें तत्त्व याच्या उलट आहे. व्यक्ति ही समाजांतच वाढत असते. शिक्षणानें संस्कार नाहीं दिले तरी ती व्यक्ति समाजांतूनच संस्कार उचलीत असते. मग अनिश्चित संस्कारांना तरुण पिढी बळी देण्यापेक्षां पूर्वनियोजित असे निश्चित संस्कार कां देऊं नयेत? समाजाचा गाडा व्यवस्थित चालावयाचा असेल तर एका संस्कृतींत व एका विचार-सरणींत वाढलेला समाज तो अधिक चांगल्या रीतीनें चालवूं शकेल. व्यक्ति ही समाजाकरितां आहे; सर्वस्वीं स्वतःकरितां नाहीं.

## प्रत्यक्ष व्यवहारांतील तत्त्व

शैक्षणिक तत्त्वज्ञानाचीं हीं दोन टोंकें झाली. प्रत्यक्ष व्यवहारांत असें दिसतें कीं या दोहींचा संगम करावा लागतो. त्यांत कोणी या टोंकाला तर कोणी त्या टोंकाला कमीअधिक झुकतो एवढाच फरक दिसतो. अमेरिक-व इंग्लंड हे देश व्यक्तिवादाच्या आणि रशिया, जर्मनी, व इटली हे देश समाज-वादाच्या टोंकाला झुकतात. पण यांत परिस्थितीचाही पुष्कळ भाग आहे असें दिसून येईल. जे देश व समाज आज सुस्थित, सुखासीन, आणि शुचिस्मित असे आहेत, ज्यांच्या पूर्वजांनीं मिळवून ठेविलेलें असल्यामुळें फक्त संरक्षण आणि उपभोग येवढेंच काम राहिलें आहे, ते व्यक्तिवादी शिक्षणाकडे वळतात. ज्या देशांना व समाजांना कांहीं नवीन साध्य करावयाचें आहे किंवा आपलें नवप्राप्त आसन सुदृढ व स्थिर करावयाचें आहे ते देश समाजवादी शिक्षण-तत्त्वाकडे वळतात. हा भेद न ओळखणारे आपले हिंदी लोक यूरोपमधील व्यक्तिवादी शिक्षणाचीं तत्त्वें इकडे आणून त्यांचेच प्रयोग करूं लागले आहेत. व्यक्तिवादाचें आगर असलेल्या खुद्द अमेरिकेंतच आतां प्रतिक्रिया सुरू झाली आहे. म्हणून शिक्षणाच्या नवयुगांतील नवे विचारही आपली समाजस्थिति पाहूनच चिकित्सकपणें स्वीकारले पाहिजेत. विचारांत दोष नाहीं; औचित्याचा प्रश्न आहे.

## रशियन शिक्षणाचें आद्य कर्तव्य

रशियाची आजची स्थिति अशी आहे कीं त्यानें नवीनच राज्य व समाज-पद्धति स्थापन केलेली आहे. ती बरोबर किंवा चूक हा आतां रशियांत प्रश्न नाहीं. या स्थापन केलेल्या सत्तेला देशांतील नागरिकांचा बौद्धिक व नैतिक पाठिंबा मिळविणें आणि ही व्यवस्था पुढें चालू करणारी तरुण पिढी निर्माण करणें हें रशियाचें क्रमप्राप्त कर्तव्य आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्याचप्रमाणें देशांतील दारिद्र्य नाहीसें करून जोराची औद्योगिक लाट उत्पन्न करणें हेंही सोव्हिएट सरकारला आवश्यक आहे. या दोन गोष्टींवर भर देणें हें सद्य:स्थितीमुळें जरूर आहे. विद्यमान परिस्थिति बदलल्यानंतर रशियाचे शिक्षण–धोरणांतही बदल होईल अशी आशा करण्यापुरेसा पूर्वानुभव आहे. आज अशाच परिस्थितींत अमेरिका किंवा इंग्लंड सांपडलें तर हीं राष्ट्रें देखील शिक्षणाचा उपयोग देशाच्या कामाकडे व विशिष्ट मतप्रचाराकडे करून घेतल्याशिवाय राहणार नाहींत. दुर्दैवानें दुसरें महायुद्ध सुरू झालेंच तर या गोष्टीचें प्रत्यंतर येईल. मागल्या महायुद्धाचे काळांत शाळांतून कसा एकतर्फी प्रचार चालला होता याचें स्मरण अनेकांना असेलच.

## शिक्षणाचा दर्जा

रशियन शिक्षणाची तात्त्विक आणि परिस्थितिजन्य भूमिका काय आहे तें पाहून मग त्याच्या गुणदोषचिकित्सेकडे वळावें. जगांतील सर्व शिक्षणशास्त्रांचें व शैक्षणिक तत्त्वज्ञानाचें मंथन करून आणि त्यांत आपले स्वत:चे विचार घालून रशियानें आपला शैक्षणिक कार्यक्रम आंखलेला आहे. त्यामुळें त्यांत मूळ भूमिकेव्यतिरिक्त इतर दोष काढणें जरा अवघड काम आहे.

रशियांतील शिक्षणसंस्था व संशोधनमंदिरें यांना भेट दिल्यानंतर असें वाटतें कीं संघटना या दृष्टीनें सर्व ठीक आहे, परंतु प्रत्यक्ष ज्ञानाची सखोलता फारशी वाढलेली नाहीं. विद्वत्ता या दृष्टीनें अद्याप वाढ व्हावयाची आहे. हा दोष रशियन पुढारीही प्रांजळपणें मान्य करितील. नवीन शिक्षण-पद्धति स्थापन होऊन अद्याप पुरी एक पिढीही झालेली नाहीं. ज्यांना परंपरागत बौद्धिक शिक्षणाचे संस्कार नव्हते असा बहुसंख्य विद्यार्थीवर्ग एकदम विद्वान् करणें सोपें व नैसर्गिक नाहीं. कामकरी वर्गींपैकींच लोकांना तात्पुरतें

शिक्षण देऊन शिक्षकवर्ग तयार केलेला असल्यामुळें त्याचे ठिकाणींही एकाच जन्मांत फारशी विद्वत्ता येणें संभवनीय नाहीं. जुने शिक्षक लावावेत तर ते निष्ठाहीन, आणि नवीन लावले तर त्यांची तयारी करून घेणें जरूर, असा पेंच रशियाला पडला होता. अशा स्थितींतील शिक्षक आणि विद्यार्थीवर्ग; त्यांतून शिक्षणसंस्थाही नवीनच निघालेल्या ; अशी परिस्थिति असल्यामुळें शिक्षणांतील विद्वत्तेचा आणि ज्ञानाचा दर्जा वाढण्याला कालावधि लागेल. एक पिढी तरी गेली पाहिजे.

## मतप्रचाराचा अतिरेक

विशिष्ट राजकीय व सामाजिक दृष्टीनें इतिहास, समाजशास्त्र इत्यादि विषय प्राथमिक व दुय्यम शाळांतून शिकविले जाणें हें अपरिहार्य आहे. प्रत्येक देशांत थोड्याफार प्रमाणांत हा दोष घडतोच. हिंदुस्थानांत इतिहास विषयाच्या अध्यापनांत अलीकडे थोडा फरक पडला आहे. मागील पिढींतील इतिहासशिक्षण सर्वांच्या परिचयाचें आहेच. प्रत्येक देशांतील सत्ताधारी वर्ग आपल्या विशिष्ट चष्म्यांतून इतिहास पाहून तो समाजांतील तरुण पिढीला देतो. याविरुद्ध कोणी फारशी तक्रार करणार नाहीं. परंतु महाविद्यालयें, विद्यापीठें आणि संशोधनसंस्था यांची जेव्हां एक विशिष्ट पक्षपाती दृष्टि राहते त्या वेळीं या तत्त्वाचा अतिरेक होत आहे असें वाटूं वागतें. प्रत्येक संशोधनाला ' मार्क्सियन ' म्हणून कांहीं निराळें वळण लावलें तर तें तत्त्व-संशोधन होणार नाहीं. फार तर मतप्रचार व विशिष्ट मताप्रमाणें अनुवाद (इंटरप्रिटेशन) होईल. परिपक्व बुद्धीचे, ज्यांनीं स्वतंत्र विचार करावा असे, तत्त्व व सत्य शोधण्याकरितां प्रवृत्त झालेले, असे विद्यार्थी उच्च शिक्षण-संस्थांमधून दाखल करून त्यांच्या बुद्धीवर बंधन घालणें म्हणजे एके परीनें स्वतंत्र बुद्धीचा उपमर्द आहे. हा दोष कमी होण्यास अनेक पिढ्या लागतील. कारण प्रारंभीं मिळालेलें वळण बुजून जाणें कठिण असतें. आज तरी प्रत्येक विषयाचें व ज्ञानाचें क्षेत्र ' मार्क्सियन ' कांचेंतून पाहण्याची वृत्ति रशियन विद्यापीठांतून दिसत आहे. हाच दोष इतर देशांकडून घडत नाहीं असें मात्र नाहीं. जहाल व अप्रिय मतांकरितां प्रत्येक देशांतील अध्यापकांना आपल्या नोकरीवर पाणी सोडावें लागतें हा अनुभव इतर देशांतही आहेच.

### शिक्षणांत पक्षपात

जो पक्षपात भांडवलशाही देशांतून होतो अशी समाजवादी ओरड करतात तोच उलटया बाजूनीं त्यांनीं स्वतः चालू ठेविला आहे. शिक्षण-संस्थांमधून आजपर्यंत कामगार–शेतकरी वर्गाला वाव नव्हता तो आतां रशियानें ठेविला आहे. परंतु रशियांतही एकंदर धोरण असें दिसतें कीं, प्रथम कम्यूनिस्ट पंथाच्या अनुयायांना आणि नंतर पिढीजाद मजूर, कामकरी असलेल्या लोकांना सर्वत्र संधि द्यावयाची; आणि मग वाव असेल तर या-व्यतिरिक्त इतर लोकांना शैक्षणिक सवलती द्यावयाच्या. याच तत्त्वाचें अनुकरण करून हिटलरनें जर्मनींत ज्यूंच्या शैक्षणिक सवलती काढून घेतलेल्या आहेत. आज प्रामाणिक मतभेदाला रशियांत वाव नाहीं.

### समाजकार्यालाही मर्यादा आहेत

विद्यार्थ्यांकडून समाजकार्य करून घ्यावें या तत्त्वाला कोणाचाच विरोध येणार नाहीं. हे कार्य कशा स्वरूपाचें असावें या तपशिलांत उतरल्यानंतर मात्र मतभेद संभवतो. कांहीं कामें विद्यार्थ्यांच्या आकलनक्षेत्रांत येऊं शकतात, व त्या कार्याची तात्त्विक भूमिका समजून ते असें कार्य करतात. साक्षरता-प्रसाराचें, व्यायामशिक्षणाचें, उत्सवांतील स्वयंसेवेचें इत्यादि कामें या सदरांत येऊं शकतील. परंतु कांहीं कार्याचे बाबतींत प्रौढ व समंजस व्यक्तींतही मतभेद असतो व कांहीं ठिकाणी कोमल भावना सोडून कठोरपणा धारण करावा लागतो, अशा ठिकाणी विद्यार्थ्यांचा उपयोग करावा की काय हा प्रश्न आहे. सोव्हिएट सरकार शेतकऱ्यांच्या वैयक्तिक मालकीच्या जमिनी जेव्हां सक्तीनें व सैन्याचा उपयोग करून काढून घेत होतें त्या वेळीं विद्यार्थ्यांचा उपयोग केला गेला. अशा ठिकाणीं अपक्व बुद्धीच्या मुलांचा उपयोग करून घेण्याची वृत्ति त्रयस्थालाही दोषास्पद वाटते.

### पढिक मतें व सुधारणेची अशक्यता

राजकीय व सामाजिक बाब खेरीजकरून इतर क्षेत्रांत वैयक्तिक स्वातंत्र्याला व स्वतंत्र विचाराला रशियांत वाव आहे. राजकीय विचारांचे दृष्टीनें मात्र अगदीं एका सांच्यांतून सर्वांचीं मतें बाहेर काढलीं आहेत असें वाटतें. मतप्रदर्शनाचें शाब्दिक स्वरूपही सर्वत्र एकच दिसलें म्हणजे असें

वाटतें कीं पढिक मतांची ही पोपटपंची अशीच चालू राहिली तर काय होईल? कोणत्याही राजकीय विचारांत आणि शासनपद्धतींत एकसारखी सुधारणा होत राहिली तर ती टिकते नाहीं तर तिच्याविरुद्ध प्रतिक्रिया होऊन ती नामशेष होते. विरुद्ध मताला, विचारांना, व टीकेला थोडासा वाव मिळाला तर प्रचलित सत्तेचे व पद्धतीचे दोष दिसणें शक्य असतें. परंतु सर्वच पिढी एका विचारांतून आणि मतांचे सांच्यांतून काढल्यानंतर स्वतंत्र विचार करण्याची प्रवृत्ति पुढचे पिढींत राहील काय? तशी राहिली नाहीं तर आजच्या समाजपद्धतींत उत्पन्न होणारे दोष कोण दाखवील आणि तिच्यांत सुधारणा कशी होईल? अध्यापकांना व विद्यार्थ्यांना निर्भेळ मतस्वातंत्र्य, अध्यापनस्वातंत्र्य, व अध्ययनस्वातंत्र्य आज कोणत्याच देशांत नाहीं ही गोष्ट खरी. त्याच तत्वाचा अतिरेक रशियांत, जर्मनींत, व इटलींत झालेला आहे. विचारांचे आणि मतांचे स्वातंत्र्याचा समाजाला काय फायदा असतो तो या देशांना पुढच्या पिढींत कळूं लागेल. आज तरी रशियन शिक्षण हें ठराविक विचारसरणीनें बद्ध झालेलें आहे.

## अपूर्व शैक्षणिक कामगिरी

विशिष्ट राजकीय विचारसरणी दृढमूल करणारें आणि नवप्रस्थापित समाजाला सर्व बाजूंनीं स्थिरता आणणारें शिक्षण रशियांत आहे. या परिस्थितीमुळें येणारे सर्व दोष मान्य केल्यानंतर या पद्धतीमधील गुण काय आहेत तेंही पाहणें जरूर आहे.

रशियाची शिक्षणाची व्याख्या हिंदूंच्या प्राचीन शिक्षण पद्धतींप्रमाणेंच व्यापक आहे. शिक्षण हें गर्भापासून मृत्यूपर्यंत चालतें; व्यक्तीच्या शिक्षणाच्या या आद्य व अंतिम मर्यादा आहेत. मूल आईच्या पोटांत असल्यापासून त्याची काळजी घेण्यास प्रारंभ होतो. व्यक्ती वृद्ध झाल्या तरी त्यांना शिक्षण घेण्याच्या सर्व प्रकारच्या सोयी केलेल्या आहेत. शिक्षणाची इतकी व्यापक कल्पना करून त्याप्रमाणें शिक्षणयोजना करण्याची दूरदृष्टि अद्यापपर्यंत एकाही देशानें दाखविलेली नाहीं.

या शिक्षणसंस्थांची विविधता किती आहे, त्यांचा व्याप किती आहे, आणि त्यांची संख्या किती अफाट आहे! बारापंधरा वर्षांचे आंत एवढी मोठी

शैक्षणिक कामगिरी करणाऱ्या देशाचा गौरव करणें जरूर आहे. ज्या देशानें आपल्या समाजांतील निरक्षरता एका तपाचे आंत धुवून काढली त्या देशाचें कौतुक करणें योग्य आहे. जन्मलेल्या बालकांपासून तों वृद्धांपर्यंत सर्वांकरितां, बौद्धिक, औद्योगिक, राजकीय आणि सांस्कृतिक शिक्षणाचा एवढा व्याप कोणत्याच देशांत नाहीं. शिक्षणावर एवढा खर्च अद्याप कोणत्याच देशानें केलेला नाहीं.

## शिक्षणांत सरकारचा पुढाकार

शिक्षणदान हें सरकारचें कर्तव्य आहे हें तत्त्व रशियानें अगदीं व्यापक अर्थानें मान्य करून त्याप्रमाणें योजना केली आहे. इतर देशांत सरकारची वृत्ति शिक्षणाचे बाबतीत कमींत कमी जबाबदारी घेण्याची असते. इंग्लंड व फरान्स हे देश असे आहेत. दुर्दैवानें आपण त्यांचेंच अनुकरण करीत आहोंत. अंगावर पडलेंच म्हणून प्राथमिक शिक्षणाची जबाबदारी घेऊन दुय्यम, उच्च व औद्योगिक शिक्षणाची जोखीम जनतेवर टाकण्याची प्रवृत्ति या देशांत होती. आतां ती कमी होऊं लागली आहे. अमेरिकेच्या आणि रशियाच्या उदाहरणांवरून हें दिसून येईल कीं प्राथमिक शिक्षणापासून उच्च शिक्षणापर्यंतची, त्याचप्रमाणें औद्योगिक आणि कलाविषयक शिक्षणाची जबाबदारी सरकारनें स्वीकारल्यावाचून या शिक्षणाचा प्रसार होणार नाहीं. थोडा झालाच तरी सामान्य जनांना त्याचा फारसा फायदा मिळणार नाहीं.

## सामान्य जनाविषयीं आस्था

एकाद्या देशांत सरकार शिक्षणाची जबाबदारी घेईल. पण त्यामुळें बहुजन समाजाला शिक्षणाचें मुक्तद्वार राहीलच असें नाहीं. सामान्य जनांचें हित पाहणारी शासनसत्ता असेल तर समाजांतील अगदीं खालच्या थरांतील व्यक्तीला तिचा फायदा होतो. रशिया व अमेरिका या दोन देशांतील शिक्षण-पद्धती सामान्य जनांचे उद्धाराकरितां आहेत. या देशांत गरीब माणसांनाही शिक्षणाचें मुक्तद्वार आहे. विशिष्ट समाजवर्गांत जन्माला आल्यामुळें आपणांला शिक्षणाची संधि मिळाली नाहीं व त्यामुळें समाजांत पुढें येतां आलें नाहीं अशी कोणाही व्यक्तीची परिस्थिति राहिली नाहीं. आर्थिक

अडचणीच्या परिस्थितींतही इतर बाबींत झीज सोसून रशियानें बहुजन-समाजाबद्दल जें उदार शैक्षणिक धोरण ठेविलें आहे तें अनुकरणीय आहे.

## विशिष्ट मर्यादेंत व्यक्तिविकास

विशिष्ट राजकीय मतांचे चौकटींत बसण्याची तयारी केल्यानंतर इतर बाबतींत रशियन नागरिकांना वैयक्तिक विकासाला पूर्ण वाव आहे. वाङ्मय, साहित्य, संगीत, कला, संशोधन, औद्योगिक कामें इत्यादि क्षेत्रांत व्यक्तीला आपापले विशिष्ट गुण दाखविण्याची संधि आहे. या क्षेत्रांत पूर्वी असलेला राजकीय दुराग्रह हळुहळू कमी होत चाललेला आहे. परंतु 'कलेकरितां कला' किंवा 'अनिर्बद्ध कला' असे शब्दप्रयोग रशियाचे कोशांत नाहींत. 'सर्व कांहीं समाजाकरितां' हें त्याचें ब्रीदवाक्य आहे.

## स्वतंत्र प्रयोग करण्याचा धीटपणा

स्वतःची शिक्षणयोजना आंखतांना रशियानें स्वतंत्र मार्ग आंखण्याचा धीटपणा दाखविला तो कौतुकास्पद आहे. कारखान्यांतील कामें करवून घेण्याला परदेशीय तज्ज्ञ आणणें ठीक आहे. परंतु आपल्या मुलाबाळांना व तरुण पिढीला काय शिक्षण द्यावें या गोष्टी ठरविण्याकरितां ज्या देशाला परदेशांतील तज्ज्ञ आणावे लागतात व त्यांच्यावर अवलंबून राहावें लागतें, त्या देशाकडून शैक्षणिक क्षेत्रांत कांहीं नवीन कामगिरी होणार नाहीं ; आणि इतरांनीं आंखून दिलेली योजना ही उपयोगीही पडणार नाहीं. परिस्थिती-प्रमाणें शैक्षणिक कार्यक्रमांत बदल करावा लागतो ; प्रत्येक वेळीं परदेशी तज्ज्ञ कसे आणणार ? बांधलेली शिदोरी काय कामाची ? परदेशी तज्ज्ञ किती तपशील सांगूं शकतील ? घरीं आईनें काय शिक्षण द्यावें, शैक्षणिक वाङ्मय कसें असावें, नाटच, चित्रपट, रेडिओद्वारां मुलांचे करितां काय कार्यक्रम असावेत या सर्व गोष्टी दुसरा कोणी सांगू शकेल काय ? या सर्वांत शिक्षण आहे. हें तत्त्व ओळखून रशियानें आपली स्वतंत्र शिक्षण पद्धति स्वतः आंखली. त्या बाबतींत सांप्रदायिक व परंपरागत शिक्षण पद्धतींचें अवास्तव बंधन जुमानलें नाहीं. जुने विषय नको होते ते काढून टाकले. अस्तित्वांत नसलेले नवीन विषय निर्माण केले. आपल्या समाजाला व त्याच्या ध्येयांना आणि महत्त्वाकांक्षांना अनुसरून अशी शिक्षणपद्धति काय

पाहिजे हें ज्या त्या समाजानें इतरांचें अंध अनुकरण न करतां स्वतः ठरवावें, हें रशियन तत्त्व लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

## शिक्षणाची समाजाशीं अभेद्य सांगड

समाज आणि शिक्षण यांत सांगड पाहिजे, असें नवयुग शिक्षण-विचारांतील तत्त्व आहे. या तत्त्वाचे सर्व सिद्धांत व उपसिद्धांत रशियन शिक्षणांत प्रतीत होतात. समाजांतील आर्थिक, समाजिक, आणि सांस्कृतिक जीवन व शाळेंतील शिक्षण हीं दोन्ही समांतर चालू आहेत. शिक्षण हें जीवनाचे मागें राहिलेलें नाहीं. तें रेंगाळत चाललेलें नाहीं, आघाडीवर आहे. समाजांत औद्योगिक व आर्थिक प्रगति घडवून आणावयाची असेल तर शाळेंतील विद्यार्थ्यांना हस्तव्यवसाय आणि उद्योग शिकविले पाहिजेत. समाजांतील संस्कृतीचा दर्जा वाढवावयाचा असेल तर बालपणींच विद्यार्थ्यांच्या सदभिरुचीचें संगोपन केलें पाहिजे. विशिष्ट विचारसरणीचा समाज निर्माण करावयाचा असेल तर बालपणापासून त्या विचारांचें वातावरण मुलांभोंवतीं ठेविलें पाहिजे. अशा रीतीनें समाजाचे व शालेय कार्यक्रमांत सुसंगतता आहे. शिक्षणाची ही समाजनिष्ठा केवळ ग्रांथिक व शाब्दिक राहूं नये म्हणून शैक्षणिक कार्यक्रमांत पहिल्यापासून अखेरपर्यंत विद्यार्थ्यांचा व समाजाचा प्रत्यक्ष संबंध येत असतो. 'आधीं शिकावें मग आचरावें' असें नाहीं. आचरण आणि शिक्षण हीं दोन्ही एकदमच चालावींत म्हणजे तीं परस्परांना उपकारक होतात असें तत्त्व आहे.

## ज्ञान आणि क्रिया यांचा संयोग

क्रिया आणि ज्ञान यांची सांगड रशियन शिक्षणांत घातलेली आहे. शिक्षण म्हणजे शाब्दिक अभ्यास, फार तर प्रयोगशाळेंतील प्रयोग, ही आकुंचित कल्पना रशियन शिक्षणांत नाहीं. निसर्ग, समाज, आणि अर्थोत्पादक श्रम या त्रयीच्या पायावर ही शिक्षणपद्धति उभारलेली असल्यानें तिच्यांत प्रत्यक्ष अनुभव, निरीक्षण, क्रिया, आणि स्वाध्याय अशा सर्व अध्ययन-मार्गांची जरूरी लागते. रशियन विद्यार्थी शाळेंत पुस्तकी शिक्षण घेतो, विद्यार्थ्यांत संघटना करतो, समाजांतील कामें करतो, कारखान्यांतील श्रम करतो, आणि सहाध्यायांशीं चर्चा व विचारविनिमय करतो ; त्यामुळें त्याचे

सार्वांगिक शिक्षण होतें. तो केवळ पुस्तकांतला किडा राहात नाहीं. ज्ञान आणि कर्म अशी सांगड रशियन शिक्षणांत घातलेली आहे. त्यामुळें शाळेंतून बाहेर पडलेले विद्यार्थी ज्ञानातिरेकामुळे निष्क्रिय होण्याची भीति नाहीं! ज्ञान आणि कर्म यांची आदर्श सांगड घालण्याची भगवद्गीतेची कल्पना, किंवा क्रियावान् आणि ज्ञानी जीवनाची एकाच व्यक्तींत सांगड घालण्याची प्लेटोची कल्पना, रशियानें आपल्या शिक्षणांत अंमलांत आणली आहे. इतर देशांतील सांप्रदायिक व परंपराबद्ध शिक्षण हें सक्रिय जीवनापासून आणि समाजापासून लांब लांब जात आहे, अशा वेळीं रशियानें दुसऱ्या टोंकाला जाऊन क्रिया आणि समाजजीवन यांच्यां पायावरच शिक्षणाची पुनर्घटना केलेली आहे. ज्ञान हें केवळ पुस्तकांतून मिळत नाहीं. खरें व मूळ ज्ञान समाजाच्या जीवनांत व व्यक्तीच्या अनुभवांत उत्पन्न होत असतें. ग्रंथांत तें आलें म्हणजे शिळें होतें. आपल्या शाळा हें शिळें ज्ञान शिकवितात. समाजांत रोज वाढणारें, जिवंत स्वरूपाचें परंतु असंघटित, व ग्रंथांत न आलेलें ज्ञान कसें मिळवावें, किंवा स्वानुभवानें ज्ञान कसें वाढवावें ही कला आपली आजची शिक्षणपद्धति शिकवीत नाहीं. ती सर्व देशांच्या शिक्षणपद्धतींत आणणें जरूर आहे.

## सुसंस्कृततेची व्यापक कल्पना

शिक्षण आणि संस्कृति, सुशिक्षितता आणि सुसंस्कृतता, यांची व्याख्या जुन्या शिक्षणानें अगदीं आकुंचित केलेली आहे. केवळ बौद्धिक स्वरूपाचे कांहीं ठराविक विषय शिकल्यानेंच मनुष्य सुसंस्कृत होतो ; ग्रीक, लॅटिन, बीजगणित, परदेशी भाषा, जुना इतिहास, शुद्ध भौतिक शास्त्रें इत्यादि विषयांचे अध्ययनांतच फक्त संस्कार आहेत, अशी जुन्या पंडितांची शिक्षणाची कल्पना आहे. संगीत, चित्रकला इत्यादि कलाविषय हे उच्च संस्कारांत येतात ही गोष्ट त्यांना मान्य नाहीं. अलीकडे कांहीं प्रागतिक शिक्षणसंस्थांत त्यांचा समावेश झालेला आहे. परंतु अद्याप याच्या पुढची पायरी जुन्या शिक्षणतज्ज्ञांना मान्य झालेली नाहीं. प्रत्येक सुसंस्कृत माणसाला समाजांत प्रत्यहीं चालू असलेल्या अर्थोत्पादक जीवनाची सानुभव माहिती पाहिजे हें तत्त्व अद्याप यूरोपमधील दुय्यम आणि उच्च शिक्षणांत सर्वत्र मान्य झालेलें

नाहीं. हायस्कूलमधील खालच्या वर्गांत हस्तव्यवसायाचे नांवाखालीं थोडी सुतारी शिकविल्याचा देखावा केला जातो. परंतु विद्यापीठ-प्रवेशपरीक्षेला जे विषय ठेविलेले आहेत त्यांत हस्तव्यवसायात्मक विषयांची सोय नाहीं. त्याचा अर्थ असा कीं, समाजांतील शेंकडा नव्वद लोकांचें जें जीवन व जो अनुभव तो न घेतांही मनुष्य सुसंस्कृत होऊं शकतो. ही संस्कृतीची व शिक्षणाची व्याख्या बदलून रशियानें शैक्षणिक तत्त्वज्ञानांत क्रांति केली व नवीन परंपरा घालून दिली. प्राचीन हिंदी शिक्षणाची कल्पना सोळा विद्या आणि चौसष्ट कला यांचा समावेश करण्याइतकी व्यापक होती. विद्येबरोबर अविद्येचा जे परामर्श घेत नाहींत ते अधःपतन पावतील असें उपनिषदांनीं सांगितलें आहे—

अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते।
ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाꣳरताः॥
विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयꣳसह ।
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते—॥ई० उ० ९, ११

असें असून यूरोपियन शिक्षणपद्धतीच्या लोभानें आपण संस्कृति आणि शिक्षण यांची आकुंचित व्याख्या केली. ती व्याख्या बदलून बौद्धिक, कलात्मक आणि व्यवसायात्मक अशा तिन्ही अंगांची सांगड आपल्या नवीन शिक्षणपद्धतीमध्यें घातली पाहिजे.

## रशियन व हिंदी शिक्षण

रशियाचीं राजकीय मतें व पद्धती मान्य नसलेल्या देशांनाही त्या देशाच्या शिक्षणपद्धतीपासून कांहीं गोष्टी जरूर घेण्यासारख्या आहेत. वरील गुणदोषचर्चेवरून ग्राह्य–त्याज्य अंगांची कल्पना आली असेलच. शैक्षणिक संघटना या दृष्टीनें ही नवीन पद्धति अभ्यसनीय आहे. निरक्षर, दरिद्री, शेतकीप्रधान, औद्योगिक क्षेत्रांत मागासलेली अशी जनता एका पिढीमध्यें साक्षर, सुशिक्षित, संपन्न व जागृत करण्याकरितां शिक्षणाची संघटना किती व्यापक स्वरूपाची करावयास पाहिजे याची कल्पना रशियावरून येईल. बालपिढी, तरुण, आणि प्रौढ जनता या सर्वांना एकाच वेळीं शिक्षण देऊन त्यांना औद्योगिक, सामाजिक, सांस्कृतिक आणि राजकीय जीवनाला योग्य करणें हें रशियन शैक्षणिक संघटनेचें उद्दिष्ट आहे. निरक्षरता, दारिद्र्य,

औद्योगिक गरजा इत्यादि दृष्टींनीं हिंदुस्थान व रशिया या देशांत पुष्कळ साम्य आहे. राजकीय तत्त्वज्ञानाची भूमिका सोडून दिल्यास जी गोष्ट रशियाला करावयाची होती व आहे तीच हिदुस्थानलाही करावयाची आहे. उपलब्ध साधनें व अधिकार यांचा उपयोग करून ती साध्य करणें यांत आपल्या बुद्धीचें व योजनेचें कौशल्य आहे.

### आक्षेपाला उत्तर

विशिष्ट ध्येयांचा प्रचार व ध्येय यांकरितांच रशियन पद्धति योग्य आहे असा आक्षेप घेतला जाईल. त्याचें उत्तर असें: तुमचें ध्येय अधिक उदार, व्यापक आणि विश्वमान्य ठेवा आणि आक्षेपार्ह आकुंचितपणा काढून टाका. मग अशा ध्येयांच्या व मतांच्या प्रचारार्थ रशियन शिक्षणतंत्रांचें अनुकरण करण्यास हरकत नाहीं. आपल्या समाजाचें व राष्ट्राचें ध्येय यथाशक्य व्यापक ठेवल्यानंतर त्या विवक्षित ध्येयाचे सिद्धीकरितां शिक्षणाचा उपयोग करण्यास हरकत नाही. कितीही उदार, स्वतंत्र व व्यक्तिवादी शिक्षण झालें तरी कांहीं तत्त्वांचा व विचारांचा पगडा बाल व तरुण पिढीचे मनावर बसतोच ; तें अपरिहार्य आहे. मग असा अनिश्चित व मोघम स्वरूपाचा ठसा बसण्यापेक्षां निश्चितपणें चांगला व उदार ठसा बसलेला काय वाईट ?

शेतीची सुधारणा, औद्योगिक प्रगति, उद्योगधंद्यांचा पुनरुद्धार, सामाजिक व राष्ट्रीय एकीकरण, पुराण संस्कृतीच्या इष्ट व उत्कृष्ट अंगांचें संगोपन, आणि लोकशाहींतील राजकीय जबाबदारीची जाणीव, इतक्या गोष्टी आपल्या समाजाच्या पुनर्घटनेकरितां आणि प्रगतीकरितां पाहिजे आहेत. समाजाची जरूरी हाच मूळ पाया धरून त्यावर आपली शिक्षण-पद्धति कशी उभारावी हें तंत्र रशियाच्या शैक्षणिक पुनर्घटनेवरून दिसून येतें. त्याच तंत्रांचा उपयोग येथेंही करावा. तात्कालिक गरजांवर शाश्वत शिक्षणाची इमारत उभारूं नये असें कोणी म्हणतील. समाजाच्या गरजांत संस्कृतिरक्षण ही शाश्वत स्वरूपाची गरज आहे; परंतु त्याचबरोबर तात्कालिक गरजांचाही विचार केला तर समाज व संस्कृति जगेल. समाजच नामशेष झाला तर या शाश्वत स्वरूपाच्या शिक्षणाचा आणि संस्कृतीचा उपभोग कोण घेणार ? इतर देश ?

## विभाग तिसरा

# इंग्लंड——व्यक्तिस्वातंत्र्यवादी शिक्षणपद्धति

## प्रकरण तेरावें

## इंग्लिश शिक्षणपद्धतीचें धोरण

### यदृच्छेनें झालेली वाढ

शिक्षणाची योजनापूर्वक वाढ करण्याचा इंग्लंडमध्यें कधीच प्रयत्न झाला नाही. यदृच्छेनें, लोकांच्या जरूरीप्रमाणें, इतर राष्ट्रांच्या सान्निध्यामुळें, व व्यवहाराला आवश्यक इतकीच वाढ करावयाची असें आजपर्यंत इंग्लंडचें शैक्षणिक धोरण आहे. त्याला विशिष्ट असा शैक्षणिक वेदांत नाहीं. जर्मनी, फरान्स, अमेरिका इत्यादि देशांनीं आपल्या शिक्षणपद्धती राष्ट्रप्रगतीच्या दृष्टीनें आंखल्या व अधिकाराचा उपयोग करून त्या वाढीस लाविल्या. अशा प्रकारचा मोठा व परिणामकारक प्रयत्न इंग्लंडनें अगदीं उशिरा म्हणजे १९१८ सालीं केला, पण तोही अद्याप यशस्वी झालेला नाहीं. इंग्लंडच्या शिक्षणपद्धतीचें अनुकरण करण्यापूर्वी कांहीं विशेष गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत. चार कोटी लोकसंख्येचा व समान संस्कृतीचा लहान देश ; जनतेंत व्यक्तिस्वातंत्र्याची व राजकीय भावना जागृत असलेली ; आणि भोंवतालच्या परिस्थितीला सहज जुळवून घेण्याइतका सुटसुटीत देश व व्यावहारिक वृत्ति ; इतक्या गोष्टींचा इंग्लंडला फायदा असल्यामुळें त्या देशांत यदृच्छेनेंही बरीच प्रगति झाली व यापुढें जरूर ती प्रगति करण्याची ताकद राष्ट्रांत आहे. परंतु एकंदरीनें विचार करतां ही प्रगति अत्यंत सावकाशीनें झालेली आहे. आजही इंग्लिश शिक्षणपद्धतीमध्यें सामाजिक व शैक्षणिक दृष्टीनें अनेक दोष आहेत ; तसेच कारभारविषयक दृष्टीनें अनेक गुणही आहेत. या शिक्षणपद्धतीच

हिंदुस्थानच्या शिक्षणावर फार मोठा परिणाम झालेला आहे. परंतु विचार करतां असें वाटतें कीं या अनुकरणांत आपण नकळत गुणांपेक्षां दोषांचेंच अनुकरण अधिक केलेलें आहे.

## सामान्य जनांच्या शिक्षणाची अनास्था

इंग्लंडची शैक्षणिक प्रगति १८७० नंतरची म्हणजे अगदीं अलीकडे झालेली आहे. त्यापूर्वी शिक्षणाचें काम धार्मिक संस्थांनीं चालविलें होतें व अद्यापही तें चालू आहे. समाजांतील अगदीं अल्पसंख्य अशा उच्च वर्गाची सोय खाजगी शाळा व कॉलेजें यांत होत असे. परंतु बहुजन समाजाच्या शिक्षणाच्या फारशा सोयी नव्हत्या. प्राचीन हिंदू समाजपद्धतीत मुख्यतः ब्राह्मणवर्ग शिक्षण घेत असे ; इंग्लंडमध्यें उपाध्यायवर्ग व श्रीमंत लोक यांनाच शिक्षणाची संधि मिळत असे. दोन्हीही समाजांत सामान्य जनांच्या उच्च शिक्षणाची सोय नव्हती. अद्यापही इंग्लिश शिक्षणपद्धतींत, विशेषतः दुय्यम व उच्च शिक्षणांत, श्रीमंत व गरिबांकरितां स्वतंत्र संस्था असा जातिभेद आहे, हें पुढें दिसून येईलच. इंग्लंडमध्यें १८७६ चे सुमारास सक्तीचे प्राथमिक शिक्षणाचा कायदा पास झाला व १८९१ मध्यें शिक्षण मोफत झालें. त्यानंतरही शिक्षणसुधारणाविषयक अनेक कायदे झाले. परंतु सक्तीच्या शिक्षणाचा कायदा कधींच जारीनें अंमलांत आला नाहीं. इंग्लंडच्या वाढत्या औद्योगिक कारखान्यांकरितां स्वस्तांत काम करणारीं मुलें पाहिजे होतीं. म्हणून या कारखानदारांनीं शिक्षणाधिकाऱ्यांवर वजन पाडून आपल्याला अनुकल अशा प्रकारचे फेरफार सक्तीच्या शिक्षण कायद्यांत करून घेतले. असेंही म्हणतां येईल कीं, गरीब मुलांच्या शिक्षणाच्या प्रसाराला इंग्लंडमधील कारखानदार व श्रीमंत वर्गाचा विरोध झालेला आहे; मनापासून पाठिंबा मिळालेला नाहीं. सक्तीच्या शिक्षणाचें वय चौदापासून पंधरापर्यंत वाढविण्याची खटपट अनेक वर्षे चाललेली आहे. परंतु काटकसरीच्या सबबीवर तिला अद्याप पूर्णपणें यश मिळालेलें नाहीं. एकदां तर कॉमन्स् सभेनें पास केलेला हा ठराव लॉर्डस् सभेनें फेंटाळून लावला ! सक्तीच्या पुरवणी शाळांत (रात्रींच्या) मुलें पाठविण्यास कारखानदारांची नाखुषी असे. जर्मनींत जो 'पुरवणी शाळांचा' प्रसार झाला तो इंग्लंडमध्यें झाला

नाहीं. १९१४ चे सुमारास बारा वर्षे वयाचीं किंवा वरचीं शेंकडा दोनही मुलें शाळेंत शिकत नव्हतीं. १९०२ पर्यंत मध्यम व कामगार वर्गाच्या मुलांकरितां दुय्यम व उच्च शिक्षणाची सार्वत्रिक सोय झालेली नव्हती. याच सुमाराला शिक्षणखात्यानें खाजगी व सार्वजनिक शाळांना आर्थिक मदत देण्यास सुरवात केली.

## गेल्या पिढींतील शिक्षणाचें चित्र पाहा

महायुद्ध १९१४ मध्यें सुरू झालें. त्याच वेळीं इंग्लंडमधील शैक्षणिक चळवळ सुरू झाली. याच सुमारास फरान्स व जर्मनी या देशांतही शिक्षण-चळवळींना जोर आलेला होता. आज हिंदुस्थानांत जी शिक्षणाची परिस्थिति आहे तीच एका पिढीपूर्वी इंग्लंडमध्यें होती.

आरोग्याचे दृष्टीनें मुलांची स्थिति अत्यंत असमाधानकारक होती. बालमृत्यूंचें प्रमाण हजारी एकशेंदहा होतें. शाळेंत येणारीं मुलें अन्नाचे अभावीं कृश झालेली व दुर्बल असत. दांत, डोळे, कान इत्यादि बिघडलेले, शरीर अस्वच्छ, घाणेरड्या संवयी, अशा प्रकारचीं मुलें शाळेंत व बाहेर होतीं. सक्तीच्या शिक्षणाचें चौदा वय संपल्याबरोबर मुलें शाळा सोडून देत. दुय्यम शिक्षणाच्या मुबलक सोयी नव्हत्या. त्यामुळें अठराचे आंतील बालगुन्हेगारांचें प्रमाण फार वाढलें. कारखान्यांत बाल–कामगारांना भरपूर काम करावें लागे. १९२१ सालीं मँचेस्टरमध्यें लहान मुलांना आठवड्याचे पन्नास तास काम करावें लागत असे, असा तेथील अधिकाऱ्याचा अहवाल आहे. १९२६ सालापर्यंत शाळांच्या इमारती कशा प्रकारच्या होत्या याचें वर्णन लंडन टाईम्समध्यें असें आलें होतें—" डुकरांना देखील राहण्यास योग्य नाहींत अशा इमारतींत पांच लाख मुलांना शिकावें लागत आहे. अशा इमारतींत शाळा भरविण्याची परवानगी स्थानिक अधिकाऱ्यांना मिळू शकते....'' आतां नवीन इमारती होत आहेत. परंतु १९३३ साली खुद्द लंडनमधील प्राथमिक व सेंट्रल स्कूल्सच्या अशा इमारती होत्या कीं त्यांत विजेचे दिवे किंवा चित्रदर्शक दाखविण्यास विजेचा प्रवाह नव्हता. कांहीं शाळा मुलांच्या संख्येच्या दृष्टीनें इतक्या लहान होत्या कीं प्राथमिक शाळेच्या एकेका वर्गांत पन्नास ते त्रेपन्न मुलें बसवावीं लागत. त्या मानानें तुलना करतां पुण्यांतील

कांहीं खाजगी शाळांच्या इमारती व फर्निचर इत्यादि सामुग्री लंडनमधील सरकारी शाळांच्यापेक्षां दुपटीनें चांगली आहे असें वाटल्याखेरीज राहात नाहीं. सारांश, १९१४ चे सुमारास इंग्लंडची शिक्षणविषयक परिस्थिति अत्यंत असमाधानकारक व मागासलेली अशी होती.

## शिक्षणसुधारणेविषयीं जागृति

ही परिस्थिति जनतेपुढें मांडून शिक्षणविषयक जागृति करण्याचें काम वृत्तपत्रांनीं फार चांगलें बजावलें. या सुमाराला शिक्षणविषयक प्रश्नांवर वर्तमानपत्रांतून जितकें लिखाण झालें तितकें त्यापूर्वी कधींच झालें नव्हतें. त्यामुळें लोकांमध्यें जागृति झाली व शिक्षणांत सुधारणा झाली पाहिजे अशी भावना प्रबळ झाली. शिक्षणप्रसाराच्या मार्गांत नेहमीं येणारी धोंड म्हणजे काटकसरीची सबब. पण महायुद्धाच्या वेळीं एकेका विमानावर, लढाऊ आगबोटीवर किंवा इतर प्राणघातक सामुग्रीवर इतका खर्च होत होता कीं त्यामानानें तुलना करतां शिक्षणसुधारणेला लागणारा खर्च कांहींच नाहीं असें लोकांना वाटूं लागलें. या सर्व चळवळीचें जागृतीचें बरेंचसें श्रेय कामगार पक्षाकडे दिलें पाहिजे. त्याला शिक्षकसंघांचाही पाठिंबा चांगला मिळाला, कारण शिक्षणाच्या सोयींची खरी जरूरी मध्यम व गरीब वर्गालाच होती. श्रीमंतांच्या सर्व सोयी व्यवस्थित होत्या. या सर्व जागृतीचा परिणाम असा झाला कीं १९१८ सालीं युद्ध संपलें त्याच सुमाराला शिक्षणसुधारणेचें बिल पार्लमेंटांत आलें ; व बऱ्याच वादविवादानंतर तें पास झालें.

## फिशर कायद्यानें आशा उत्पन्न केली

इंग्लंडच्या शैक्षणिक इतिहासांत १९१८ सालीं फिशर बिलानें क्रांति केली. ऑनरेबल् एच्. ए. एल्. फिशर हे शिक्षणानुभवी गृहस्थ १९१७ मध्यें शिक्षणमंडळाचे अध्यक्ष व शिक्षणमंत्री झाले. जनतेच्या असंतोषाला विधायक स्वरूप देऊन त्यांनी पार्लमेंटांत शिक्षणसुधारणा बिल आणलें. या बिलाचा सर्व जगांतील देशांत फार गाजावाजा झाला. अद्यापही फिशर अॅक्टाचें नांव घेतल्याशिवाय इंग्लंडच्या शिक्षणपद्धतीविषयीं बोलणें शक्य नाहीं. या बिलाचा उपयोग आणखी एक पिढीभर तरी होईल यांत शंका नाहीं.

फिशर बिलाचा मुख्य उद्देश शिक्षणाची पवित्र गंगा सर्व राष्ट्राच्या

व गोरगरिबांच्या दाराशीं आणावी हा होता. इंग्लिश शिक्षणांतील मुख्य दोष सामाजिक पंक्तिप्रपंच—तो दूर करण्याचा प्रयत्न या बिलानें करण्याचें योजिलें. पाळण्यांतल्या मुलापासून स्मशानांत पाय ठेवणाऱ्या वृद्धापर्यंत सर्वांच्या शिक्षणाची सोय झाली पाहिजे. राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीला योग्य असें शिक्षण मिळालें पाहिजे; त्याला आर्थिक, सामाजिक किंवा अन्य अडचणी येऊं नयेत. जी शिक्षणाची संधि अमेरिकेसारख्या देशांत सर्वांना आहे तीच इंग्लंडमध्येंही गोरगरिबांना मिळावी हें फिशरबिलाचें मुख्य तत्त्व होतें. त्यांतील सूचनांचें थोडक्यांत सार असें—

—पांच ते चौदा वयापर्यंत सक्तीचें मोफत शिक्षण द्यावें, व त्यानंतर अठरा वयापर्यंत पुरवणी शाळांत रात्रीचें शिक्षण सर्वांना आवश्यक असावें. त्याकरितां जरूर त्या संस्था काढाव्यात.

—दुय्यम शिक्षणाची संधि गरीब वर्गालाही मिळण्याचे दृष्टीनें शिष्यवृत्त्या व पोटगीवृत्त्या (मेंटीनन्स्) यांची भरपूर सोय करावी.

—बालकामगारांची पद्धति बारा वयापर्यंत अजिबात बंद करावी. चौदा वयापर्यंत अंशतः कामाची परवानगी असावी.

—आरोग्यतपासणी व उपचार यांच्या सोयी सर्व शाळांत असाव्यात. सर्व खाजगी व सार्वजनिक संस्थावर शिक्षणखात्याची देखरेख असावी.

—मान्य केलेल्या बाबीचा निम्मा खर्च शिक्षणखात्यानें द्यावा.

वरील कलमांवरून एक गोष्ट लक्षांत येईल की शिक्षणाच्या व आरोग्याच्या सर्व सोयी राष्ट्रांतील असंख्य गरीब बालकांच्या आटोक्यांत याव्यात हा फिशर बिलाचा उद्देश होता. या सर्व कलमांना जनतेचा पाठिंबा मिळाला. परंतु शिक्षणखात्याच्या नियंत्रणाचे बाबतींत जीं कलमें होतीं त्यांना मात्र कसून विरोध झाला. शिक्षणाचे अंतर्व्यवस्थेचे बाबतींत शाळांना व स्थानिक अधिकाऱ्यांना पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे ही आपली वृत्ति इंग्लिश लोकांनीं या वेळीं दाखविली. शेवटीं नियंत्रणाबाबतचीं कलमें वगळून फिशर बिलाचें कायद्यांत रूपांतर झालें. आतां इंग्लंडच्या शिक्षणांत क्रांति होणार व जगांत तें उत्कृष्ट प्रकारचें ठरणार अशी सर्वांना आशा वाटूं लागली. परंतु विचार आणि कृति यांत पुष्कळ अंतर असतें तें सत्य या ठिकाणीं अनुभवास आलें. फिशर कायदा हा केवळ कायद्याच्या पुस्तकांत राहिला.

## इंग्लिश राष्ट्राची निराशा

युद्धानंतर जिकडे तिकडे काटकसरीला सुरुवात झाली. त्याची पहिली कुऱ्हाड शिक्षणावर पडली. एक 'काटकसर चौकशी मंडळ' नेमलें गेलें होतें. त्यांत गेडिससाहेब व रेल्वे आणि जहाज कंपन्यांचे कांहीं मालक असे सभासद होते. त्यांनीं पहिली कुऱ्हाड शिक्षणखर्चावरच घातली. अशा रीतीनें शिक्षण सुधारणेविषयींच्या कळकळीचें पहिलें प्रदर्शन झालें! या काटकसर मंडळाच्या सर्व सूचना मंजूर झाल्या नाहींत. तरी पण काटकसरीच्या सरकारी धोरणाचा परिणाम शिक्षणावर बराच झाला. इतका गाजलेला फिशर कायदा हा केवळ ग्रंथांतच राहिला, आणि शिक्षणसुधारणा पूर्वीप्रमाणें कांसवाच्या मंद गतीनें चाललेली आहे. फिशर कायद्याची अद्याप पूर्ण अंमलबजावणी झालेली नाहीं. मधून मधून संदर्भाकरितां त्याचा उपयोग होतो! बालमंदिरें (नर्सरी स्कूल्स्), पुरवणी शाळा (कंटिन्युएशन स्कूल्स्), शिक्षकांची पगारवाढ, नवीन इमारती, दुय्यम शिक्षणाकरितां भरपूर शिष्यवृत्त्या व पोटगीवृत्त्या इत्यादि सुधारणांची जी लोकांना अपेक्षा होती ती पूर्ण झाली नाही. अद्याप जुन्या इमारतीत मुलांची गर्दी झालेली दिसते, चौदा वर्षानंतर शाळा सोडणाऱ्या मुलांच्या पुरवणी शिक्षणाची सोय झालेली नाहीं, कामगार स्त्रियांच्या मुलांकरितां बालशाळांची पुरेशी संख्या नाही, दुय्यम शिक्षणाकडे अगदीं मर्यादित संख्येव्यतिरिक्त बहुसंख्य विद्यार्थ्यांना जाण्याची सोय नाहीं, आणि अभ्यासक्रमांतही फारशी सुधारणा झालेली नाही. १९१८ सालीं जी अपेक्षा होती तितकी सुधारणा झाली नाही. याचा अर्थ कांहींच फरक पडलेला नाहीं असा मात्र नाही. नेहमीच्या पद्धतीनें सालोसाल जी सुधारणा व्हावयाची ती होत आहे. कायद्यानें जी क्रांति होईल असें वाटलें होतें ती झाली नाहीं इतकेंच.

## शाळांचा क्रम व शिक्षणपद्धति

इंग्लंडमध्यें सक्तीचें शिक्षण पांच ते चौदा वयापर्यंतचें आहे. ऐपत असेल त्या स्थानिक स्वराज्य संस्थांनीं तें पंधरापर्यंत करावें अशी परवानगी आहे. अगदीं मर्यादित पालकांच्या मुलांकरितां बालक शाळा (नर्सरी स्कूल्स्) आहेत. फार गरीब किंवा फार श्रीमंत अशांनाच त्यांचा फायदा मिळूं शकतो.

कारण खर्चाच्या असल्यामुळें त्यांचा सर्वत्र प्रसार झालेला नाहीं व कांहीं पिढ्या होणारही नाहीं. १९३० सालीं या प्रकारच्या खाजगी शाळा त्रेचाळीस व सरकारी बावीस मिळून पांसष्ट होत्या. ऐपतदार पालकांनीं आपल्या मुलांकरितां स्वतःच्या खर्चानें कांहीं शाळा चालविल्या आहेत. सार्वजनिक प्राथमिक शाळांना जोडून सहा वर्षांपेक्षां लहान मुलांकरितां शैक्षणिक खेळाचे कांही वर्ग काढलेले आहेत. परंतु बहुसंख्य मुलांचें शिक्षण पांचवे वर्षीं सुरू होतें.

आवश्यक प्राथमिक शिक्षणाचा शिक्षणक्रम पांच ते अकरा वयापर्यंत, म्हणजे सहा वर्षांचा आहे. यांत तीन तीन वर्षांचे दोन भाग करून एकाला इन्फंट स्कूल व दुसऱ्याला प्रायमरी स्कूल अशीं नांवें दिली आहेत. श्रीमंतांचीं मुलें पहिलीं तीन वर्षे झाल्याबरोबर प्रेपरेटरी स्कूलमध्यें व तेथें पांच वर्षे राहून दुय्यम शिक्षणाच्या शाळांमध्यें जातात.

## विद्यार्थ्यांची विभागणी

प्राथमिक सहा वर्षांचा शिक्षणक्रम झाल्यानंतर तीन प्रकारच्या शिक्षणसंस्था आहेत. त्यांत बुद्धीच्या दर्जाप्रमाणें व आर्थिक ऐपतीप्रमाणें मुलें जातात. प्राथमिक शिक्षणानंतर एक प्रवेश-परीक्षा होते. त्यांत उत्कृष्ट ठरणारे विद्यार्थी दुय्यम शिक्षणसंस्थांमध्यें ((सेकंडरी स्कूल्स्) जातात. त्यांचेपेक्षां किंचित् कमी दर्जाचीं मुलें सेंट्रल स्कूल्स् नांवाच्या शाळेंत जातात, व तेथें औद्योगिक शिक्षणाची दीक्षा घेतात. या दोन शाळांनीं वरची साय काढून घेतल्यावर खालीं राहणाऱ्या शेंकडा नव्वद विद्यार्थ्यांचा भरणा सीनियर एलेमेंटरी स्कूलमध्यें होतो. या शाळेंतील व सेंट्रल स्कूलमधील चार किंवा पांच वर्षांचा अभ्यासक्रम झालेले विद्यार्थी ज्यूनियर टेक्निकल स्कूल नांवाच्या औद्योगिक शाळांत जाऊं शकतात. सेंट्रल स्कूलमधील मुलांना दुय्यम शाळांत व तेथून टेकनिकल् कॉलेजचे शिक्षणाकडेही जातां येतें. चौदाव्या वर्षीं शिक्षण सोडणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां कांहीं ठिकाणीं पुरवणीशाळा आहेत.

## दुय्यम व उच्च शिक्षणसंस्था

दुय्यम शाळांचा शिक्षणक्रम पांच व दोन अशा दोन भागांचा मिळून

# इंग्लिश शिक्षणपद्धति

( संस्थांचे नांवापुढील आंकडे कालमर्यादिचे निदर्शक आहेत. )



सात वर्षांचा आहे. प्राथमिक सहा व दुय्यम सात असा तेरा वर्षांचा अभ्यासक्रम——म्हणजे इकडील इंटरमीजिएट——झालेले विद्यार्थी आर्टस् व सायन्स् कॉलेज, टेकनिकल् कॉलेज किंवा ट्रेनिंग कॉलेज यांत जाऊं शकतात.

इंग्लंडमध्यें एकोणीस विद्यापीठें आहेत. हीं विद्यापीठें सार्वजनिक असून त्यांना सरकारी मदत मिळते. प्राथमिक ट्रेनिंग कॉलेजें हीं स्थानिक स्वराज्य संस्थांनीं चालविलीं आहेत. दुय्यम ट्रेनिंग कॉलेजें विद्यापीठांनीं काढलेलीं आहेत.

प्रौढ शिक्षणाच्या अनेक संस्था इंग्लंडमध्यें आहेत व त्या चांगल्या दर्जाच्या आहेत. त्यांपैकी बऱ्याचशा संस्था कामगार संघांनी चालविलेल्या असून त्यांना स्थानिक स्वराज्य सभेकडून व विद्याखात्याकडून चांगली मदत होते. कांही संस्था विद्यापीठाचे सहकारितेनें चाललेल्या आहेत.

## ग्रामीय महाविद्यालयाचा प्रयोग

१९३४।३५ सालपासून प्रौढ शिक्षणाचा एक नवीन प्रयोग इंग्लंडमध्यें चाललेला असून त्याकडे अनेक देशांचें लक्ष लागलेलें आहे. केंब्रिजशायर परगण्यामध्यें "ग्रामीय महाविद्यालय" (व्हिलेज कॉलेज) नांवाची संस्था मि. हेन्री मॉरीस नांवाच्या शिक्षणाधिकाऱ्यानें काढली असून अशा अनेक संस्था काढण्याचा त्याचा विचार आहे. खेडेगांवांतील जनतेला सांस्कृतिक शिक्षण पाहिजे. परंतु प्रत्येक खेड्यांत संस्था काढणें शक्य नाहीं. म्हणून नऊ-दहा खेड्यांना मिळून एक मध्यवर्ती संस्था काढावयाची व तेथें खेडूत आणि शेतकरी व त्यांच्या स्त्रिया यांना सार्वांगिक शिक्षण द्यावयाचें. खेड्यांतील जीवन हें मुख्य केंद्र धरून त्याची सार्वांगिक सुधारणा कशी करितां येईल हा या प्रयोगाचा मुख्य विषय आहे. तो यशस्वी झाल्यास या संस्थांचा प्रसार सर्वत्र होईल असें वाटतें. मोटारी व वाहतुकीच्या इतर साधनसोयीमुळें इंग्लंडमध्यें खेड्यांच्या सहकारितेनें अशा संस्था चालू शकतील. या कॉलेजच्या एकाच इमारतींत सभागृह, वाचनालय, ग्रंथालय, आरोग्यालय, शिक्षणशास्त्राची माहिती व अनुभव देण्याकरितां बालवर्ग व प्राथमिक शिक्षणाचे कांहीं वर्ग, व्यायाममंदिर इत्यादि सोयी केलेल्या आहेत. तालुका व जिल्हासभा यांच्याकडे केवळ मुलांचें शिक्षण करणें हें काम नाहीं; त्यांनीं

आपल्या आटोक्यांतील सर्व समाजाच्या सामाजिक, आर्थिक, व सांस्कृतिक उन्नतीच्या दृष्टीनें प्रयत्न केला पाहिजे हें या प्रयोगाचें मुख्य तत्त्व आहे. पहिलें प्रायोगिक कॉलेज सॉस्टन येथें १९३० सालीं निघालें. पुढें काटकसरीच्या धोरणामुळें सरकारी मदत बंद झाल्यानें ही कल्पना तशीच राहिली होती. तिला आतां पुन: मूर्त स्वरूप प्राप्त झालें आहे. अमेरिकेंतही या प्रयोगाविषयीं बरेंच कुतूहल उत्पन्न झालें होतें. या कल्पनेचे जनक मि. मॉरीस यांना मुद्दाम अमेरिकन सरकारनें बोलाविलें होतें.

## निवडक मुलांना शिक्षणाची संधि

प्राथमिक शिक्षणाचीं सहा वर्षे पूर्ण झालीं म्हणजे दुय्यम शाळांत व सेंट्रल स्कूलमध्यें निवडक विद्यार्थी पाठविण्याकरितां दोन परीक्षा होतात. एक नादारी मिळवूं इच्छिणाऱ्या मुलांकरितां व दुसरी सुखवस्तू पालकांचे मुलांकरितां. त्यांत दुसरीपेक्षां पहिली परीक्षा कठिण असते; दुसरी तिच्यापेक्षां सोपी असते. नादारी परीक्षेंत चांगल्या रीतीनें पास होणाऱ्या गरीब मुलांना दुय्यम व सेंट्रल स्कूलमध्यें मोफत शिक्षण मिळतें. ही निवड अतिशय कसोशीनें केली जाते, कारण शिष्यवृत्त्या व नादाऱ्या थोड्या असतात व वरच्या शाळांतील जागाही मर्यादित असतात. या निवडक विद्यार्थ्यांना नादारी-व्यतिरिक्त स्थानिक संस्थांकडून शिष्यवृत्त्या व पोटगीवृत्त्याही मिळतात. कारण नादारी असली तरी शहरांतील राहणीच्या खर्चाची व्यवस्था असल्या-शिवाय तिचा कांहीं उपयोग नाहीं. या परीक्षेला भाषा, शुद्धलेखन, स्पेलिंग, इतिहास, भूगोल, व सृष्टिशास्त्र हे विषय असतात. मुलाची शाळेंतील वार्षिक प्रगति पाहिली जाते. कांहीं ठिकाणीं 'बौद्धिक कसोट्या' ही (इंटेलिजन्स टेस्ट्स्) लावल्या जातात. परीक्षा तोंडी व लेखी असतात. त्या-करितां प्राथमिक–दुय्यम शिक्षक व अधिकारी यांचें एक मंडळ नेमलेलें असतें. दार विद्यार्थ्यांकरितां दुसरी सोपी परीक्षा होते, तिच्यांतूनही निवडक विद्यार्थी दुय्यम व सेंट्रल शाळांकडे पाठविले जातात. खालीं राहिलेले सर्व बहुसंख्य विद्यार्थी उच्च प्राथमिक (व्ह. फा.) शिक्षणाकडे जातात. आपल्याकडे हायस्कूलमध्यें कोणीही जाऊं शकतो तशी स्थिति इंग्लंड–जर्मनीमध्यें नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

हायस्कूलमधील पांच वर्षांचा म्हणजे एकूण अकरा वर्षांचा शिक्षणक्रम झाल्यावर प्रथम परीक्षा होते. तेथेंच कांहीं विद्यार्थी शाळा सोडतात. जे राहतात त्यांची दोन वर्षांनी द्वितीय परीक्षा होते. या परीक्षेपूर्वी तेरा वर्षे शिक्षण झालेलें असतें. मग विद्यापीठांत प्रवेश मिळतो. इंग्लिश हायस्कूल व जर्मन गिम्नाझियम् या शाळा संयुक्त प्रांतांतील इंटरमीजिएट कॉलेज-प्रमाणें आहेत. कॉलेजच्या दोन वर्षांचा समावेश हायस्कूलमध्यें करून त्यांची रचना झालेली आहे. इंग्लिश व हिंदी मॅट्रिकच्या दर्जाची तुलना करितांना हा महत्त्वाचा फरक लक्षांत ठेविला पाहिजे, म्हणजे आपल्या शिक्षणाचा बौद्धिक दर्जा कमी लेखण्याची चुकी होणार नाहीं.

## ‘ सर्वांना दुय्यम शिक्षणाचें ’ ध्येय

दुय्यम व सेंट्रल शाळांमध्यें नादारी नसलेल्यांना फी द्यावी लागते. परंतु हें नादारीचें प्रमाण शेंकडा पन्नाससाठपर्यंत गेलेलें आहे ; कायद्यानें तें पंचवीसपर्यंत आवश्यक आहे. लंडनमधील एका हायस्कूलमध्यें पांचशें-पैकीं अडीचशें विद्यार्थी नादार होते; बाकीच्या अडीचशें विद्यार्थ्यांना पालकांच्या उत्पन्नाच्या प्रमाणांत अर्धनादारी किंवा पूर्ण फी होती. कांहीं स्थानिक स्वराज्य सभांनीं तर दुय्यम शिक्षण सर्वत्रांना मोफत करून टाकलें आहे. ‘सर्वांना दुय्यम शिक्षण पाहिजे’ (सेकंडरी एज्युकेशन फॉर ऑल) या मजूर पक्षाच्या मागणीचा हा परिणाम झालेला आहे. पुढच्या दोन पिढ्यांत इंग्लंडमध्यें सर्वत्र दुय्यम शिक्षण मोफत होईल असा अंदाज आहे. फ्रान्समध्यें १९३० चे सुमारासच ही सुधारणा झालेली आहे. सारांश, अमेरिकेंतील सार्वत्रिक मोफत शिक्षणाच्या ध्येयाकडे यूरोपही जाऊं लागला आहे. फक्त निवडीचें तत्त्व यूरोपनें ठेविलें आहे, तेंही हळुहळू सैल होत जाईल.

## खाजगी शाळांचें स्वातंत्र्य

इंग्लंडमध्यें सार्वजनिक व खाजगी अशी दुहेरी शिक्षणपद्धति आहे. या ठिकाणीं सार्वजनिक याचा अर्थ तालुका–जिल्हा–म्युनिसिपालिट्या यांनीं कराचे उत्पन्नांतून चालविलेल्या शाळा असा आहे. दुसऱ्या प्रकार-च्या शाळा खाजगी देणग्यांतून किंवा कायमनिधींतून खाजगी व्यक्तींनीं किंवा संस्थांनीं चालविलेल्या आहेत. त्यांना चुकून ‘पब्लिक्’ अशी संज्ञा पडलेली

आहे. सार्वजनिक शाळांतून मध्यम व गरीब समाजवर्गाचें शिक्षण होतें. खाजगी (पब्लिक्) शाळांतून श्रीमंत व उच्चमध्यम वर्गीयांचें शिक्षण होतें. कांहीं शाळा धार्मिक संस्थांनींही चालविलेल्या आहेत. नर्सरी स्कूलपासून दुय्यम शिक्षणसंस्थांपर्यंत सर्व प्रकारच्या खाजगी शाळा आहेत. प्रवेशवय, अभ्यासक्रम इत्यादि दृष्टींनीं त्यांना पूर्ण स्वातंत्र्य आहे. त्यांची इच्छा असेल तर शिक्षणखात्याकडून तपासणी करवून घेतात. एरव्हीं कायद्यानें जरी खात्याला परवानगी असली तरी तिची प्रत्यक्ष अंमलबजावणी अद्याप झालेली नाहीं. अद्यापपर्यंत या शाळांची व त्यांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची नक्की मोजदादही झालेली नाहीं. १९३२ सालीं एका चौकशी मंडळानें अंदाज केल्याप्रमाणें या शाळांची संख्या दहा हजार व विद्यार्थ्यांची चार लक्ष आहे. यांतील दोन अडीच हजार शाळांची एकाद दुसरी तपासणी झाली असेल ! यावरून खाजगी शाळांना किती स्वातंत्र्य आहे याची कल्पना येईल.

## खाजगी 'पब्लिक स्कूल्स्'

या शाळांपैकीं कांहीं सार्वजनिक संस्थांनीं चालविलेल्या, व कांहीं खाजगी व्यक्तींनीं मालकीच्या म्हणून चालविलेल्या आहेत. व्यापारी धोरणानें चाललेल्याही कांहीं शाळा आहेत. यांतील कांहीं शाळांचा दर्जा उच्च आहे तर कांहीं अगदींच साधारण आहेत. कांहीं शाळांत चांगले शैक्षणिक प्रयोग चाललेले आहेत तर कांहीं केवळ परीक्षेच्या गिरण्या आहेत. कांहीं अगदीं प्रागतिक आहेत तर कांहीं तीन शतकांपूर्वीच्या पुराण धोरणानें चालणाऱ्या आहेत. या सर्व शाळांवर विद्याखात्याचें बंधन असावें असा फिशर बिलाचा उद्देश होता. परंतु लोकमत विरुद्ध असल्यामुळें बिलांतील तो भाग गाळावा लागला. इंग्लिश शिक्षणपद्धतीचा अभ्यास करितांना या खाजगी शाळांचें एकंदर शिक्षणक्षेत्रांत काय महत्त्व आहे तें लक्षांत ठेविलें पाहिजे. या शाळांचा आर्थिक व सामाजिक दर्जा सार्वजनिक (स्थानिक स्वराज्याच्या) शाळांहून अगदीं निराळा आहे. इंग्लिश शाळांतून दोन निरनिराळ्या प्रकारचे नागरिक बाहेर पडतात व समाजांतील द्वंद्व कायम राहतें. तें कसें नाहींसें करितां येईल हा इंग्लिश शिक्षणसुधारकांपुढें मोठा प्रश्न आहे. याच द्वंद्वाला उद्देशून बाल्डविन् आपल्या भाषणांत एकदां म्हणाले—

"आपल्या शाळांचें वर्गीकरण हें शैक्षणिक तत्त्वांवर झालें नसून सामाजिक भेदावर झालें आहे. शाळेच्या स्वरूपावरून तरुणाचा सामाजिक दर्जा ठरविला जातो." यावरून हिंदुस्थानांत 'इंग्लिश पब्लिक स्कूल्स्' काढणारांनीं जरूर तो बोध घ्यावा. आपद्धर्म म्हणून जी गोष्ट तेथें सहन केली जाते ती येथें इष्ट व आदर्श म्हणून आणली जाऊं नये. भेदांनीं बुजबुजलेल्या समाजांत आणखी भेद निर्माण करण्याचें पातक शाळांनीं तरी करूं नये.

## आरोग्यरक्षणाची आदर्श व्यवस्था

मुलांचे आरोग्यरक्षणाकरितां इंग्लंडमध्यें शिक्षणखात्यानें वैद्यक-खात्याचे सहकारितेनें उत्कृष्ट योजना व सोयी केलेल्या आहेत. १९०७ च्या एका कायद्यानें सर्व स्थानिक शाळाखात्यांना मुलांच्या आरोग्यतपासणीची सोय करणें आवश्यक झालेलें आहे. १९१८ सालीं दुसरा एक कायदा झाला त्यामुळें तपासणीबरोबर उपचार करण्याचीही जबाबदारी शाळांवर टाकण्यांत आलेली आहे. शाळेंत असतांना प्रत्येक मुलाची पांच, आठ, बारा व कांहीं ठिकाणीं चौदापंधरा अशा वयांमध्यें शारीरिक तपासणी होते. उपचार करण्याकरितां दवाखान्याच्या (क्लिनिक) सोयी शाळाखात्यांनीं केलेल्या आहेत. तेथें अगदीं थोडी फी घेऊन किंवा गरीब मुलांना फुकट औषधोपचार केले जातात. डोळे, दांत, नाक, कान, दुर्बलता, अपुरी वाढ इत्यादींसारख्या साध्या रोगांवर उपचार करण्याच्या सोयी आहेत. कांही ठिकाणीं शाळांतून नर्स ठेवण्याचीही सोय झालेली आहे. शरीरवाढीनें सदोष असलेल्या मुलांना शाळेंत दूध व भोजन मिळण्याची सोय कांहीं शाळांनीं केलेली आहे. प्राथमिक शाळांतून या सोयी कायद्यानें आवश्यक आहेत. दुय्यम शाळांपैकीं अनेक शाळांनीं याच सोयी पुढें चालू ठेवलेल्या असल्यामुळें शाळेंत जाणाऱ्या मुलांची सोळा ते अठरा वर्षांपर्यंत वैद्यकीय दृष्ट्या काळजी घेतली जाते. त्यापुढच्या वयाच्या नागरिकांची सोय नॅशनल हेल्थ इन्शुअरन्स कायद्यामुळें झालेली आहे. मॅटर्निटी व चाइल्ड् वेल्फेअर ॲक्ट (१९१८) झाल्यापासून गरोदर व लेकुरवाळ्या स्त्रियांची आणि पांच वर्षांपर्यंतच्या बालकांच्या वैद्यकीय तपासणीची व उपचाराची व्यवस्था सार्वजनिक दवाखान्यांतून होऊं शकते. अशा रीतीनें जन्मापासून अखेरपर्यंत वैद्यकीय सोयींचा फायदा इंग्लिश

नागरिकाला मिळतो. याचा परिणाम राष्ट्राचे आरोग्यावर चांगला झाला आहे. बालमृत्यूंचें प्रमाण कमी झालें आहे. शाळेंतील मुलांचें आरोग्य सुधारलें असून त्यामुळें गैरहजेरीचेंही प्रमाण घटलें आहे.

तपासणी व उपचार यांबरोबरच प्रतिबंधक उपाय या दृष्टींनीं शारीरिक शिक्षण, आरोग्यशास्त्राचें शिक्षण, क्रीडांगणें, व्यायामशाळा, पोहण्याचे तलाव इत्यादि योजना अंमलांत आलेल्या आहेत. सारांश, आरोग्य, शिक्षण व वैद्यकीय सोयी या दृष्टीनें इंग्लिश शिक्षणपद्धति जगामध्यें उत्कृष्ट आहे. तिचें आपण अनुकरण केल्यास राष्ट्राचें आरोग्य जरूर सुधारेल.

इतकी प्रगति झालेली असली तरी विद्याखात्यानें शारीरिक शिक्षणाच्या सोयींबद्दल असमाधान व्यक्त केलें असून १९३५।३६ सालापासून शारीरिक शिक्षणाच्या चळवळीला पुनः प्रोत्साहन दिलेलें आहे. इंग्लंड-मध्यें एक शारीरिक शिक्षणाचें महाविद्यालय नुकतेंच स्थापन झालेलें आहे. नवीन क्रीडांगणें सुरू करणें, व्यायामशिक्षक तयार करणें, व शाळेंत नसलेल्याही मुलांच्या व्यायामाची सोय करणें या दृष्टींनीं सध्यां प्रयत्न चाललेला आहे.

शारीरिक शिक्षणाची जागृति आणि युद्धाचें वातावरण या दोन गोष्टींचें साहचर्य दिसतें. युद्धाला सैनिक जमा करण्याचे दृष्टीनें पाहणी होऊं लागली कीं राष्ट्राच्या शारीरिक दारिद्र्याकडे सरकारचें लक्ष जातें. त्यामुळें शारीरिक शिक्षणाच्या आस्थेची निर्भेळता जरा कमी होते असें वाटूं लागतें !

## राष्ट्रीय शिक्षणखातें

इंग्लंडचें शिक्षण मंडळ (एज्युकेशन बोर्ड) हें १८९९ पासून कायदेशीर रीतीनें अस्तित्वांत आलेलें आहे. शिक्षणमंत्री हा या मंडळाचा अध्यक्ष असतो. कमिशनर ऑफ ट्रेझरी, चॅन्सेलर ऑफ दि एक्स्चेकर व पांच सेक्रटरीज् ऑफ स्टेट् या सर्वांचें मिळून शिक्षणमंडळ झालेलें असतें. स्थानिक शिक्षणखातीं, शाळा, किंवा अध्यापक यांना कोणालाच या मंडळांत प्रतिनिधित्व नाहीं. प्रत्यक्ष व्यवहारांत शिक्षणमंत्रीच स्वतः सर्व कारभार पाहतो. मंडळाची कधीं सभादेखील होत नाहीं.

शिक्षणमंत्र्याचा एक 'कायम चिटणीस' (पर्मनंट सेक्रेटरी) असतो, व इकडील विद्याखात्यासारखें त्याचें एक विद्याखातें असतें. राजकीय निवडणुकीमध्यें शिक्षणमंत्री बदलला तरी सेक्रेटरी व त्याचें अधिकारीमंडळ हें कायम असतें. त्यामुळें कामांत व धोरणांत सुसंगतता राखली जाते.

## विद्याखात्याचा मर्यादित अधिकार

विद्याखात्याचे (शिक्षणमंडळाचे) मुख्यत: दोन अधिकार आहेत. स्थानिक संस्थांना आर्थिक मदत (ग्रँट) देणें व जरूर तेथें चर्चा करून सल्लामसलत, माहिती वगैरे पुरविणें. याखेरीज कायदेशीर रीतीनें कोणताही अधिकार विद्याखात्याला नाहीं. अभ्यासक्रम आंखणें, पगारांचें कोष्टक (स्केल) तयार करणें, क्रमिक पुस्तकें ठरविणें, इत्यादि कोणत्याच गोष्टींची शाळांवर सक्ति करण्याइतकी सत्ता विद्याखात्याला कायदेशीर रीतीनें नाहीं. परंतु व्यवहारांत मात्र असें होतें कीं, सरकारी ग्रँट देणें त्याच्या हातांत असल्यामुळें ती देण्यापूर्वी अमुक अटी पाळल्या गेल्या पाहिजेत असें सांगून इष्ट त्या सुधारणा विद्याखात्याला घडवून आणतां येतात. प्रत्यक्ष नियंत्रण न ठेवतां द्रव्याच्या द्वारें अप्रत्यक्ष नियंत्रण शिक्षणावर कसें ठेवितां येतें हें इंग्लिश पद्धतीवरून चांगलें दिसून येतें.

शाळांची देखरेख व तपासणी करण्याचें काम विद्याखात्याचेंच आहे. परंतु या तपासणींत हुकूमशाही गाजविण्यापेक्षां सल्लामसलत व उत्तेजन देण्याची वृत्ति अधिक दिसून येते. अमूक कराच असें न सांगतां, 'इतर शाळांत असें केलें तें चांगलें झालें आहे', असें अप्रत्यक्ष सांगून मन वळवून जरूर त्या सुधारणा घडवन आणल्या जातात. शाळांचे इन्स्पेक्टरांची अशी सहानुभूतीची वृत्ति असल्याकारणानें शिक्षणसंस्था आणि विद्याखातें यांचे संबंध चांगले राहिले आहेत.

## शाळांचे व विद्याखात्याचे आदर्श संबंध

विद्याखात्याचा अधिकार केवळ सल्लागाराचा व ग्रँट देण्याचा असल्यामुळें शाळांना अंतर्व्यवस्थेमध्यें पुष्कळ स्वातंत्र्य मिळतें. अभ्यासक्रम, वेळापत्रक, अध्यापनपद्धति, क्रमिक पुस्तकें, इत्यादि बाबतींत विद्याखातें फक्त सूचनात्मक वाङमय प्रसिद्ध करतें. या वाङमयाचा उपयोग करून व स्वत:ची बुद्धि वापरून

स्थानिक शाळाखात्यांना व शाळांच्या मुख्य अध्यापकांना स्वतंत्र रीतीनें आपापला कार्यक्रम आंखतां येतो. यामुळें इंग्लिश शिक्षणपद्धतीमध्यें एक प्रकारची स्वतंत्रता व विविधता दिसून येते. प्रत्येक ठिकाणीं कांहीं तरी निराळी पद्धति आहे असें वाटतें. शिक्षणाचा दर्जा सर्व ठिकाणीं सारखा नसला तरी शिक्षणाचे निरनिराळे प्रकार मात्र आढळतात. बाह्य स्वरूपावर ग्रँटच्या निमित्तानें नियंत्रण व अंतस्थ कारभारांत स्वातंत्र्य असें इंग्लिश शैक्षणिक कारभाराचें तत्त्व आहे.

## शिक्षणाचा कारभार

शिक्षणमंत्र्याला सल्लामसलत व माहिती देण्याकरितां एक सल्लागार सभा (कन्सल्टेटिव्ह कमिटी) असते. या सभेचे एकवीस सभासद शिक्षण-मंत्र्यानेंच निवडलेले असतात. वारंवार उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांवर माहिती मिळवून अहवाल प्रसिद्ध करणें हें या सभेचें काम आहे. अशा रीतीनें बरीच उपयुक्त माहिती प्रकाशित केली जाते. या सभेच्या सूचना विद्याखात्यावर बंधनकारक नाहींत.

विद्याखात्याची रचना, त्याचे अधिकार, शाळा व स्थानिक संस्थांशीं संबंध, आणि तपासणीच्या पद्धती यांवरून इंग्लिश स्वभावांतील स्वातंत्र्याची वृत्ति चांगल्या रीतीनें निदर्शनास येते.

शिक्षणाचें धोरण व महत्त्वाच्या गोष्टी मुख्य शिक्षणमंडळ (बोर्ड ऑफ एज्युकेशन) व शिक्षणमंत्री हे ठरवितात. तपशीलवार कारभार पाहण्याचें काम स्थानिक स्वराज्यसंस्थांकडे असतें. ही कारभारपद्धति पुष्कळ अंशीं आपल्याकडील स्थानिक स्वराज्याच्या पद्धतीसारखीच आहे. स्थानिक स्वराज्य संस्थांचे आकारमानाप्रमाणें दोन प्रकार केलेले आहेत. त्यांपैकीं आकारानें, लोकसंख्येनें, व उत्पन्नानें लहान अशा स्थानिक स्वराज्यसभांना फक्त बालशिक्षणाची व प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था करण्याचा अधिकार आहे. मोठ्या स्वराज्य सभांना बाल शिक्षणापासून प्रौढ शिक्षणापर्यंत सर्व प्रकारच्या शिक्षणाची व्यवस्था करण्याचा अधिकार आहे. स्थानिक स्वराज्य सभेची एक शिक्षण–सभा (एज्युकेशन कमिटी) असते. तिची नेमणक कोठें अध्यक्ष करतो तर कोठें ती निवडलेली असते. या शिक्षणसभेंत

कांहीं शिक्षणतज्ज्ञ व अनुभवी लोकांना निवड करून घेतलें जावें. शिक्षण-सभेच्या सभासदांची संख्या पांचपासून पन्नासपर्यंत असूं शकते. कारभाराच्या व्यापावर ती अवलंबून आहे.

### स्थानिक कारभारी

स्थानिक स्वराज्यसभेनें एक अॅडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर नेमावयाचा असतो. त्याला क्लार्क, सेक्रेटरी, चीफ एज्युकेशन ऑफिसर, किंवा डिरेक्टर ऑफ एज्युकेशन अशा अनेक नांवांनीं संबोधलें जातें. शिक्षक, मुख्य अध्यापक, शाळातपासनीस, अशा अनेक प्रकारच्या अनुभवांमधून गेलेला किंवा एज्युकेशन ऑफिसमध्यें कामाचा अनुभव घेतलेला असा मनुष्य या जागेकरितां निवडला जातो. या अधिकाऱ्याची नेमणूक स्थानिक स्वराज्य सभेचे मर्जीवर अवलंबून असते.

### गांवसभांची जबाबदारी

शिक्षणाची सर्व जबाबदारी स्थानिक स्वराज्यावर असल्यामुळें विविध प्रकारच्या शिक्षणसंस्था त्यांच्याकडून चालविल्या जातात. बाल-शिक्षण, प्राथमिक शिक्षण, व दुय्यम शिक्षण एवढयाचीच सोय करून भागत नाहीं. औद्योगिक व धंदेशिक्षणाच्या शाळा, पुरवणीशिक्षणाच्या शाळा, रात्रीच्या शाळा, प्रौढांच्याकरितां शिक्षणसंस्था, आरोग्यविषयक व वैद्यकीय उपचाराच्या संस्था, व्यायामविषयक सर्व प्रकारच्या संघटना, बुद्धीनें व शरीरानें दुर्बल अशा मुलांकरितां शाळा, शिक्षक–विद्यालयें (ट्रेनिग कॉलेज), व्यवसाय–मार्गदर्शन केंद्रें, इत्यादि अनेक प्रकारच्या शिक्षणविषयक संघटना काढण्याची जबाबदारी त्यांच्यावर असते. जेथें जरूर तेथें सरकार द्रव्याची मदत करतें. गरीब विद्यार्थ्यांना केवळ गरिबीमुळें शिक्षणाला मुकावें लागणार नाहीं हें पाहण्याची जबाबदारीही स्थानिक स्वराज्यावर आहे. अगदीं गरीब मुलांना शाळेंत दूध व अन्न देणें हें शाळांचें कर्तव्य समजलें जातें.

विद्याखात्याकडून स्थानिक स्वराज्य संस्थांना शिक्षणाकरितां आर्थिक मदत (ग्रँट) मिळते. प्रत्येक मुलाचा खर्च, शिक्षकांचा पगार, आरोग्य-विषयक खर्च, व इतर बाबी या प्रत्येक खर्चापैकीं कांहीं विशिष्ट भाग विद्याखात्यानें द्यावा असें प्रमाण ठरलेलें आहे. साधारण मानानें एकंदर

खर्चापैकीं शेंकडा पन्नास इतका हिस्सा विद्याखात्याकडून मिळेल अशा प्रकारची योजना केलेली असते.

### जनतेचें स्वयंसहकार्य

ज्या समाजांत शिक्षणाचे बाबतींत सरकार फारसा पुढाकार घेत नाहीं तेथें निदान जनतेनें तरी अधिक आस्था दाखवावयास पाहिजे. इंग्लिश लोकांना सरकारनें शिक्षणांत फार ढवळाढवळ केलेली खपत नाहीं. परंतु त्याचबरोबर लोकही स्वतः होऊन स्वयंसेवक वृत्तीनें पुष्कळ काम करण्यास तयार असतात ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. शिक्षणाच्या कामांत व कारभारांत मदत करण्याकरितां लोकांच्या ऐच्छिक संघटना इंग्लंडमध्यें ज्या प्रमाणांत वाढलेल्या आहेत तितक्या इतर देशांत नाहींत. या संघटनांमुळें जनतेचा शिक्षणाशीं संबंध राहतो व अशा सामाजिक नियंत्रणाचा चांगला उपयोग होतो.

### जनतेच्या संघटना

या संघटना तीन चार प्रकारच्या आहेत. 'व्यवस्थापक मंडळ' (मॅनेजर्स) हें स्थानिक स्वराज्य सभेनें नागरिकांपैकीं दोन किंवा चार सभासदांचें नेमलेलें असतें. स्थानिक शिक्षणसभेला (एज्युकेशन कमिटी) व शाळेला शिक्षकांच्या नेमणुका, इमारतदुरुस्ती, शिक्षकांच्या तक्रारी इत्यादि अनेक बाबतींत सल्लामसलतीच्या रूपानें व्यवस्थापक मंडळाची मदत होते. शाळेला भेट देऊन दप्तर पाहण्याचा त्यांना हक्क असतो. त्यांच्या सूचना केवळ सल्ला या दृष्टीनेंच समजल्या जातात. दुय्यम शाळांना अशाच प्रकारचें लोकांतून निवडलेलें 'कारभारी मंडळ' (बोर्ड ऑफ गव्हर्नर्स) असतें. कांहीं ठिकाणीं 'स्वयंसेवक मंडळें' (केअर कमिटीज्) असतात. शाळेंतील विद्यार्थ्यांचें आरोग्य, व्यायामाच्या सोयी, क्रीडांगणें, गरीब मुलांना मदत, उद्योगधंदा पाहून देण्याच्या कामीं मदत, पालकांना सल्लामसलत, अशा प्रकारचीं मुलांच्या हिताच्या दृष्टीनें उपयुक्त कामें करण्याकरितां प्रत्येक शाळेचें स्वयंसेवक मंडळ असतें. यांतही नागरिक व पालक स्वतःच्या इच्छेनें काम करितात. 'शिक्षक सल्लागार मंडळें' हीं शिक्षकांतूनच निवडलेलीं असतात. यांतील सभासद अधिकाऱ्यांकडून किंवा शिक्षकांकडून निवडले जातात. अशीं सल्लागारमंडळें शिक्षणाच्या प्रत्येक विभागाकरितां असतात.

शिक्षणसभा, अधिकारी, शिक्षकसंघ इत्यादि अनेक घटकांशीं सहकार्य करून सल्लामसलत देणें व जरूर तेथें मदत करणें हें या मंडळांचें काम आहे.

### शिक्षणांत लोकशाही केव्हां मानवते?

शिक्षण हें ठराविक व्यक्तीचें काम नसून तें सर्वांच्याच हिताचें आहे, व प्रत्येकानें त्यांत सहकार्य केलें पाहिजे ही भावना इंग्लिश शिक्षण-पद्धतींत व्यक्त होते. लोकशाही तंत्रानें जेव्हां कारभार चालवावयाचा असेल तेव्हां जनतेंत तरी शैक्षणिक जागृति झालेली असली पाहिजे. अशी जागृति इंग्लंडमध्यें व अमेरिकेंत झालेली आहे म्हणून तेथील शिक्षणांत लोकशाही असली तरी त्याची प्रगति होत आहे. ती जागृति व समाजहिताची भावना कमी म्हणून शिक्षणाची लोकशाही आपल्याकडे अद्याप फलदायी होत नाहीं. सावकाश व संथपणें प्रगति करावयाची असेल तर इंग्लंड अमेरिकेचा मार्ग इष्ट आहे. महायुद्धापूर्वीपर्यंत इंग्लिश शिक्षणपद्धति अगदीं पुराण व मागासलेली होती. गेल्या पिढींतच अधिक प्रगति झालेली आहे. मागासलेल्या समाजांत वेगानें व थोडक्या काळांत पुष्कळ प्रगति करावयाची असेल तर रशिया किंवा जर्मनीच्या पद्धतीनें कांहीं काळ सत्तेचा उपयोग करून व निश्चित योजना आंखून ही प्रगति केली पाहिजे. इंग्लंड अमेरिके-प्रमाणें यदृच्छा-प्रगतीवर जर आपण अवलंबून राहिलों तर हीच प्रगति होण्यास कांहीं शतकें लागतील. कारभारविषयक दृष्टीनें इंग्लंड व अमेरिका या देशांची शिक्षणपद्धति पाहतांना त्या समाजांतील जनतेचें शिक्षण व शिक्षणा-विषयीं आस्था या गोष्टी लक्षांत घेऊन मग हिंदुस्थानशीं त्यांची तुलना केली पाहिजे.

### स्वातंत्र्य आणि विविधता

'स्थानिक स्वातंत्र्य' व 'विविधतेला वाव' हीं इंग्लिश शिक्षणपद्धती-मधील मुख्य तत्त्वें आहेत. विशिष्ट राष्ट्रीय ध्येयानें प्रेरित होऊन इंग्लिश सरकारनें किंवा विद्याखात्यानें आपली शिक्षणपद्धति कधींच आंखलेली नाहीं. लोकांना जरूर वाटली तसतशी शिक्षणांत त्यांनीं वाढ व सुधारणा केली. सरकारनें त्याला योग्य तेथें बंधनें घातलीं. लोकांनीं आपलें शिक्षण करावें, जरूर तेथें सरकारनें त्यांत पडावें, हें तत्त्व इंग्लिश शिक्षणाच्या इतिहासांत दिसतें.

त्यांत उच्च ध्येयवाद नाहीं. केवळ व्यवहारबुद्धि आहे. पुढें अगदीं आवश्यक झालें त्या वेळीं सक्तीच्या शिक्षणाचे व इतर शैक्षणिक कायदे अस्तित्वांत आले. परंतु या सर्व कायद्यांची पूर्ण अंमलबजावणी अशी कधींच झालेली नाहीं. तात्त्विक दृष्टीनें विचार करितां विद्याखात्याचा अधिकार सर्व शाळांवर आहे; पण व्यावहारिक दृष्टया स्थानिक व विशेषत: खाजगी शिक्षणसंस्थांना पुष्कळ स्वातंत्र्य आहे. त्यामुळें राष्ट्राच्या शिक्षणपद्धतींत एकसूत्रता किंवा सारखेपणा नाहीं. शिक्षणाचा दर्जा व सोयी यांचे बाबतींत पुष्कळ विविधता दिसते. ज्या ज्या वेळीं शिक्षणाच्या स्वातंत्र्यावर नियंत्रण घालण्याचा प्रयत्न झाला त्या त्या वेळीं इंग्लिश लोकांनीं त्याला कसून विरोध केलेला आहे.

## स्वातंत्र्याचा मोबदला

या स्वातंत्र्याचा परिणाम खाजगी शाळांचे व विशिष्ट समाजवर्गाचे दृष्टीनें चांगला झालेला असला, तरी बहुजन समाजाच्या राष्ट्रीय शिक्षणाची वाढ या दृष्टीनें अनिष्टच झालेला आहे. १९१४ सालपर्यंत इतर पुढारलेल्या देशांत सामान्य जनांच्या शिक्षणाच्या ज्या सोयी होत्या त्या इंग्लंडमध्यें झालेल्या नव्हत्या. इतर देशांत जी शिक्षणप्रगति झालेली होती त्या मानानें इंग्लंड मागें होतें. कांहीं विशिष्ट वर्गांच्या शिक्षणाच्या सोयी चांगल्या होत्या. सामान्य स्थितींतील बालकांच्या शिक्षणांत हा देश मागासलेला होता व अद्याप आहे. अमेरिकेंत अथवा रशियांत साधारण शाळांतूनही ज्या सुधारणा दिसून येतात त्या इंग्लंडमधील बहुसंख्य शाळांत नाहींत. सारांश, शिक्षणाच्या क्षेत्रांतील स्वातंत्र्याच्या तत्त्वाचा फायदा एका विशिष्ट वर्गाला झाला, सर्व जनतेला झाला नाहीं. ज्या ज्या वेळीं शिक्षणविषयक कायदे झाले, आणि सर्व शिक्षणसंस्थांना एका राष्ट्रीय चौकटींत बसविण्याचा प्रयत्न झाला, त्या त्या वेळीं सामान्य जनांच्या शिक्षणाची प्रगति झाली. अशा स्वरूपाची प्रगति करण्यांत मुख्य पुढाकार शिक्षकसंघ व कामगारसंघ यांनीं घेतलेला आहे. गेल्या एकदोन पिढ्यांत जे शिक्षणसुधारणाविषयक विचार पुढें आले त्यांचें बरेंचसें श्रेय कामगार वर्गाचे पुढारी किंवा जनतेचे कैवारी यांनाच आहे. श्रीमंत व मालक यांचा बहुजनांचे शिक्षणप्रसाराला तितकासा मन:पूर्वक पाठिंबा मिळालेला नाहीं.

**बोध व इषारा**

इंग्लिश लोकांच्या शिक्षणक्षेत्रांतील स्वातंत्र्याचें जरूर अनुकरण करावें. परंतु त्याचबरोबर बहुजनसमाजाच्या शिक्षणाविषयींची आस्था व त्या-करितां जरूर तो स्वार्थत्याग करण्याची तयारी हे गुणही दाखविले पाहिजेत तरच इंग्लंडच्या शैक्षणिक इतिहासापासून बोध आणि सावधगिरीचा इषारा दोन्ही घेतल्यासारखें होईल. नाहीं तर न कळत गुणाऐवजीं दोषांचेंच अनुकरण व्हावयाचें !

---

## प्रकरण चौदावें

# सामान्य जनांचें शिक्षण

### शिक्षणाचें व्यक्तिनिष्ठ ध्येय

इंग्लंडमधील प्राथमिक शिक्षणाचा उद्देश व्यक्तीची सार्वांगिक वाढ करावी असा आहे. त्यांत विशेषतः चारित्र्य, बुद्धि व व्यवहार या गोष्टींवर विशेष भर आहे. शिक्षणांतून बाहेर पडलेले विद्यार्थी जगांत व्यवहार करणार आहेत ही गोष्ट इंग्लिशांच्या डोळ्यांसमोर नेहमीं असते. हे लोक ध्येयवादी नसून व्यवहारी आहेत. स्वतःचें असें शिक्षणविषयक तत्त्वज्ञान त्यांनीं ठरविलेलें नसलें, तरी जगांत कोठें काय विचार चालतात तें पाहून त्यांतील निवडक व व्यावहारिक गोष्टी घेण्याकडे इंग्लिश लोकांची प्रवृत्ति असते. फार विद्वान् माणसें तयार करावींत असें त्यांचें ध्येय नाहीं, मुद्दाम देशभक्त तयार करावेत असा संकल्प सोडून ते शिक्षण देत नाहींत, विशिष्ट राजकीय, सामाजिक तत्त्वज्ञानाशीं त्यांच्या शिक्षणाची सांगड घातलेली नाहीं, किंवा विशिष्ट संस्कृतिसंवर्धनाचाही त्यांचे ठिकाणीं आग्रह नाहीं. चांगल्या गुणांची व्यक्ति तयार करावी, मग तिनें आपल्या विवेकबुद्धीचे जोरावर

जगांत काय वाटेल तें करावें. एका शाळेचे मुख्य अध्यापक म्हणाले, " आम्ही चांगलीं माणसें तयार करतों व सोडून देतों. समाजांत विशिष्ट तऱ्हेनें प्रत्येक मनुष्य वागतो कीं नाहीं हें पाहण्यास माणसागणिक पोलीस ठेवणें कांहीं शक्य नाहीं. व्यक्तीची विवेकबुद्धि तयार करून व्यक्तीवरच सर्व सोपवून दिलें पाहिजे. " सारांश, चांगल्या प्रकारचें चारित्र्य तयार करावें, बौद्धिक वाढ करावी, आणि व्यवहारांत कसें वागावें हें शिकवावें, म्हणजे मुलाचें सार्वांगिक शिक्षण झालें ही इंग्रजांची शिक्षणविषयक कल्पना आहे. हेंच प्राथमिक शिक्षणाचें ध्येय आहे. तें अत्यंत संदिग्ध, अस्पष्ट, अनिश्चित व सिद्ध करण्यास कठिण आहे ही गोष्ट खरी. पण इंग्लिश लोकांचें आज त्यावर भागतें.

सुस्थित आणि सुरक्षित राष्ट्रांना असें अस्पष्ट, मोघम, आणि व्यक्तिनिष्ठ ध्येय ठेवणें परवडतें. परंतु संघटनारहित, जगांत मागें पडलेल्या, व पुढें येऊं पाहणाऱ्या राष्ट्राचें मात्र अधिक निश्चित, स्पष्ट, व समाजनिष्ठ ध्येयाशिवाय चालावयाचें नाहीं, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

## प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था

सक्तीच्या प्राथमिक शिक्षणास पांचवे वर्षापासून प्रारंभ होतो. पांचपासून सात वयाअखेर व आठपासून अकरा वयाअखेर असे प्राथमिक शाळेचे दोन विभाग आहेत. पहिल्या तीन यत्तांना बालवर्ग शाळा (इन्फन्ट स्कूल) व नंतरच्या तीन यत्तांना, म्हणजे चौथी ते सहावीपर्यंतच्या शाळेला प्राथमिक शाळा (ज्यूनियर स्कूल) अशीं नांवें आहेत. या सहा यत्तांमध्यें तीन तीन यत्तांचा एक असे स्वतंत्र विभाग असतात. बालवर्ग शाळा हा स्वतंत्र विभाग व प्राथमिक शाळा हा स्वतंत्र विभाग असें समजण्यांत येतें. कांहीं ठिकाणीं या त्रैवार्षिक शाळा स्वतंत्र इमारतींत आहेत. त्यांना मुख्य अध्यापक स्वतंत्र असतो व त्यांचा कारभारही स्वतंत्रपणें चालतो.

सक्तीच्या शिक्षणापूर्वी शिशुशिक्षणाची व्यवस्था कांहीं थोड्या ठिकाणीं केलेली आहे. या संस्थांची जरूरी कारखान्यांत कामाला जाणाऱ्या स्त्रियांना विशेष वाटते म्हणून कामगारवस्तींत अशा शाळा आहेत. एक महिन्यापासून तीन वर्षांपर्यंतचीं मुलें शिशुगृहांत (क्रेचेस्) ठेवितां येतात. हीं सर्वत्र नाहींत. तीं सर्व ठिकाणीं निघावींत अशी कामगारवर्गाची मागणी आहे. कारण

या वर्गालाच त्यांचा विशेष उपयोग आहे. तीन ते पांच वर्षांच्या मुलांकरितां बालकमंदिरें (नर्सरी) निघालेलीं आहेत. यांची संख्या अत्यंत थोडी म्हणजे पन्नास साठ इतकी आहे. कांहीं प्राथमिक शाळांना जोडून तीन ते पांच वर्षांच्या मुलांकरितां एक वर्ग काढलेला असतो त्याला 'शिशुवर्ग' (नर्सरी क्लास) असें म्हणतात. या सोयी सार्वत्रिक नाहींत, म्हणून शिशुवर्गाचें शिक्षण हें ऐच्छिक आहे.

अकरा वयाचे सुमारास मुलाचें सहा वर्षांचें प्राथमिक शिक्षण पूर्ण होतें. त्यानंतर दुय्यम शिक्षणसंस्थांत किंवा सेंट्रल स्कूलमध्यें न जाणाऱ्या मुलांकरितां सीनियर स्कूल्स्,—उच्च प्राथमिक शाळा—आहेत. यांत तीन ते चार वर्षांचा शिक्षणक्रम असतो.

खालच्या व वरच्या प्राथमिक शिक्षणाचे चार भाग पडतात व हे चारी भाग स्वतंत्र असून स्वतंत्र इमारतींत व स्वतंत्र व्यवस्थेखालीं असतात. नर्सरी, इन्फंट, प्रायमरी, ज्यूनियर व सीनियर असे तीन तीन वर्षांचे हे विभाग आहेत.

कांहीं ठिकाणीं मुलामुलींच्या स्वतंत्र शाळा तर कांहीं ठिकाणीं मिश्र शाळा अशी व्यवस्था आहे. या बाबतींत एक ठराविक असा दंडक नाहीं, व विद्याखात्याकडूनही कोणतीच सक्ति केली जात नाहीं.

व्यवस्थेच्या व मालकीच्या दृष्टीनें प्राथमिक शाळांचे तीन प्रकार आहेत—कौन्सिलच्या (स्थानिक स्वराज्य) सार्वजनिक शाळा, विशिष्ट धर्मपंथीयांनीं चालविलेल्या शाळा, व खाजगी शाळा. एकंदर सरकारमान्य शाळांपैकीं दोनतृतीयांश शाळा कौन्सिलच्या व एकतृतीयांश धर्मपंथीयांच्या (चर्च) असें प्रमाण पडेल. खाजगी शाळा साडेतीन लाख आहेत. धर्मपंथीय शाळांतून विशिष्ट धर्मपंथाचें आवश्यक शिक्षण दिलें जातें. या शाळांनाही सरकारी मदत मिळते. कौन्सिलच्या व धर्मपंथीय शाळांना अनुक्रमें 'प्रोव्हायडेड' व 'नॉन प्रोव्हायडेड' अशा विशिष्ट संज्ञा आहेत.

## नर्सरी स्कूल व बालक-मंदिरें

बालकमंदिरांत साधारणपणें साठ ते शंभरपर्यंत बालकें असतात. अशा पुष्कळशा संस्था खाजगीच आहे. १९३३ मध्यें लंडन शहरांत सार्वजनिक (लंडन कौंटी कौन्सिलचीं) अशीं दोनच नर्सरी स्कूल्स् होतीं. बाकीचीं खाजगी होतीं.

मुलांच्या आया सकाळीं मुलांना शाळेंत आणून पोंचवितात. त्यानंतर घरीं त्यांचें तोंड धुणें, स्नान इत्यादि झालें नसल्यास हा कार्यक्रम शाळेंत होतो. दुधाची व भोजनाची व्यवस्था शाळा करितात. त्याकरितां पालकांना फी द्यावी लागते.

शाळेच्या साधनसामुग्रींत मुख्यत: खेळण्याचें अंगण असतें, कारण शहरांतील बालकांना मोकळया जागेची जरूर आहे. त्याशिवाय निरनिराळ्या प्रकारचे शैक्षणिक खेळांचें साहित्य मुलांना दिलें जातें. यांत मॉंटेसोरी पद्धतीच्या साहित्याचाही समावेश केलेला असतो. स्वयंपाकगृह, लहान भोजनशाळा, विश्रांतीची जागा, कपडे ठेवण्याची जागा इतक्या सोयी या इमारतींत असतात. शक्य तेथें लहान बागबगीचाही असतो.

## बालशिक्षणाचा कार्यक्रम

शाळेंत आनंदाचें वातावरण असतें. लहान मुलें पुष्कळ असूनही अपेक्षित रडारड ऐकूं येत नाहीं. प्रत्येक बालक कांहीं ना कांहीं व्यवसायांत अगदीं चूर असतें. नवीन दाखल झालेलीं मुलें लाजाळू असतात. पण एका आठवडयांतच तीं इतरांत मिळून जातात. मुलांना आपापलीं कामें हातानें करावीं लागतात. पाळीपाळीनें वाढणें, ताटें उचलणें, खुर्च्याबाकें मांडणें इत्यादि कामें मुलें करितात.

निरनिराळे खेळांचे व्यवसाय व दैनिक कार्यक्रम हाच या शाळेंतील शिक्षणक्रम. लहान हातोडयानें लांकडांत चुका मारणें, रंग ओळखणें, घरें बांधणें, बाग करणें, गाणीं म्हणणें, गोष्टी ऐकणें व सांगणें इत्यादि कार्यक्रम दिवसभर चालू असतो. त्याचा उद्देश मुलांचीं इंद्रियें तयार करणें, रंग, रूप, स्पर्श, ध्वनि इत्यादि ज्ञान वाढविणें हा आहे. याशिवाय स्वभावाचें शिक्षणही विशेष महत्त्वाचें आहे. आईबापांवर किंवा वडील माणसांवर अवलंबून न राहतां स्वावलंबनानें वागणें हा महत्त्वाचा धडा येथें मिळतो. हिंदुस्थानांत राहून परत इंग्लंडमध्यें गेलेली या शाळेवरील एक अध्यापिका म्हणाली, "हिंदुस्थानांतील लहान मुलांना परावलंबन व निष्क्रियता फार शिकविली जाते. त्यांना स्वावलंबन, स्वतंत्रवृत्ति, आणि काम करण्याची सवय या गुणांचें शिक्षण देण्याची फार जरूरी आहे."

## बालवर्ग शाळा व प्राथमिक शाळा

इंग्लंडमधील बहुतेक शाळा लहान आहेत हें त्यांचें एक वैशिष्ट्य आहे. तीनशें ते पांचशें मुलांपर्यंत एकेका शाळेंत संख्या असते. हजार हजार मुलांच्या शाळा कशा चालत असतील याची तेथील लोकांना कल्पनाच येत नाहीं. अमेरिका व रशिया या बाबतींत अगदीं उलट टोंकाला आहेत.

लंडन शहरांतील बहुतेक प्राथमिक शाळांच्या इमारती जुन्या आहेत. कांहीं ठिकाणीं विजेच्या दिव्यांचा अद्याप शिरकाव झालेला नाहीं. गॅसचे दिवे आहेत. बाकें जमिनीला खिळून टाकलेलीं आहेत. सुटीं बाकें व खुर्च्या असणें हें आधुनिक शिक्षणपद्धतीचें महत्त्वाचें लक्षण समजलें जातें. कारण त्यामुळें मुलांना वर्गांत मोकळी जागा करून हालचालीला अधिक अवसर देतां येतो. कांहीं शाळांत मुलांची गर्दी झाल्यामुळें एकेका वर्गांत पन्नास ते त्रेपन्न मुलें ठेवावीं लागतात. आतां नवीन इमारती होऊं लागल्या आहेत.

विद्यमान परिस्थितींत उपलब्ध साधनांचा उपयोग करून शाळांना व्यवस्थित स्वरूप देण्याचा प्रयत्न मुख्य अध्यापक करीत असतात. जिकडे तिकडे स्वच्छता व टापटीप दिसते. भिंतीवर मुलांनीं काढलेलीं चित्रें लावलेलीं असतात. एका शाळेंतील विद्यार्थ्यांनीं शुबेर्टचा कॉन्सर्ट (संगीत जलसा) केला व त्याच्या उत्पन्नांतून कांहीं मोठीं तैलचित्रें शाळेला घेऊन दिलीं; तीं मोठ्या सभागृहांत मांडलेलीं होतीं.

## शाळेंतील वातावरण

इंग्लिश शाळेच्या वातावरणांत शिस्त, शांतता, संयम, औपचारिकपणा, व सभ्यता या गुणांचा अनुभव प्रेक्षकाला येतो. एकदम उठणें—बसणें—हात वर करणें, मुलांनीं जागच्या जागीं आणि शिक्षकांनीं आपल्या जागीं बसणें, बेतानें जरूरीपुरतेंच बोलणें व उत्तर देणें, असा प्रकार दिसतो. त्यामुळें पाहणाऱ्या प्रेक्षकाला बरें वाटतें; दिसण्यांत व्यवस्था दिसते, पण मुलांना मात्र एक प्रकारचा संकोच होत असावा असें वाटतें. अमेरिकन किंवा रशियन शाळेंत शिक्षकांत व मुलांत जो मोकळेपणा दिसतो तो इंग्लिश शाळांत फारसा दिसून येत नाहीं.

मुलांचें लेखन, चित्रकला, पाठांतर, व हस्तव्यवसाय यांतही एक प्रका-

रचा नीटनेटकेपणा, सुव्यवस्थितपणा, व परिपूर्णता इत्यादि गुण दिसून येतात. एका मुख्य अध्यापिकेनें आपल्या कामाचें सांगितलेलें तत्त्व सर्व इंग्लिश शाळांना लागू पडेल असें वाटतें—" जें काय थोडें आम्ही करितों तें अगदीं परिपूर्णतेनें व उत्कृष्ट करितों." खरोखरीच लेखनांत, चित्रकलेंत, व इतर कामांत ही परिपूर्णता दिसून येते. परंतु मुलांच्या कामांत त्यामुळें सारखेपणा फार येतो ; व्यक्तीचें गुणवैशिष्टय फारसें दिसून येत नाहीं. वृत्तीचा मोकळेपणा नसल्याकारणानें आत्मप्रगटीकरणाला चित्रकलेंत किंवा इतर क्रियेमध्यें जो वाव मिळावा तो या वातावरणांत मिळत नाहीं.

शाळेच्या साहित्यसामुग्रींत नकाशे, चित्रें, नमुने वगैरे प्रात्यक्षिक शिक्षणाचें सामान बरेंच असतें. शक्य तेथें प्रत्यक्ष वस्तूंचा किंवा चित्रांचा उपयोग अध्यापनांत केला जातो. हस्तव्यवसाय-शिक्षणावर विशेष भर असल्यानें चित्रकला, रेखाकला, सुतारी, वेतकाम, मातकाम, मेकॅनो इत्यादि क्रियात्मक शिक्षणाची यथाशक्य व्यवस्था केलेली असते. इंग्लिश मुलाला अगदीं बालवर्गापासून हाताचा व बोटांचा उपयोग करावयास शिकविलें जातें.

## मुख्य अध्यापकाचें वैशिष्टय

इंग्लिश शाळेचा आत्मा म्हणजे मुख्य अध्यापक किंवा अध्यापिका. या व्यक्तीच्या कर्तबगारीवर शाळेचा चांगुलपणा अवलंबून असतो. म्हणून मुख्य अध्यापकाची निवड अगदीं काळजीपूर्वक केलेली असते असा प्रत्यक्ष अनुभव येतो. साध्या प्राथमिक शाळेच्या मुख्य अध्यापकाशीं अर्धा तास संभाषण केलें तरी असें कळून येतें कीं, या माणसाला इंग्लंडमधील शिक्षणाच्या परिस्थितीविषयीं पुष्कळच व्यापक माहिती आहे. दुसरें असें वाटतें कीं, प्रत्येकाला शाळा चालविण्याचें कांहीं विशिष्ट तत्त्व आहे व त्या तत्त्वानें तो आपला कारभार चालवीत असतो. पंधरा मिनिटें त्याच्याशीं बोलल्याबरोबर हें तत्त्व त्याचे मुखांतून बाहेर पडेल. " आम्ही चांगलीं माणसें तयार करितों. व्यक्ति चांगली तयार झाली पाहिजे." " शिक्षणानें मुलांचें गृहजीवन सुधारलें पाहिजे." "लहान मुलें स्वावलंबी व्हावींत." "जें काय करायचें तें उत्कृष्ट करावें." इत्यादि सूत्रमय वाक्यांवरून प्रत्येक शाळेच्या मुख्य अध्यापकाचा शैक्षणिक दृष्टिकोण दिसून येतो. उत्कृष्ट शिक्षक नेमून

त्याला पूर्ण स्वातंत्र्य द्यावें हें इंग्लिश शिक्षणाचें धोरण आहे. त्यांत पुष्कळ तथ्य आहे.

## सीनियर स्कूल—उच्च प्राथमिक शाळा

प्राथमिक शाळेचीं सहा वर्षें झाल्यानंतर दुय्यम शाळांकरितां एक प्रवेशपरीक्षा होते. तींत पास होणारे शेंकडा आठनऊ विद्यार्थी दुय्यम शिक्षणाकडे जातात. नापास झालेले व सामान्य बुद्धीचे शेंकडा नव्वद विद्यार्थी या सीनियर स्कूलमध्यें येतात. बारा वर्षांचा मुलगा झाला कीं, त्याचा अभ्यास झाला असो वा नसो त्याला या शाळेंत घेतात. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचें वय चौदा किंवा पंधरा आहे. तोंपर्यंत विद्यार्थी उपयुक्त शिक्षणांत ठेविला पाहिजे. म्हणून १९२८ नंतर या प्रकारच्या शाळांची अलीकडेच विशेष वाढ झालेली आहे. या शाळांत बहुतेक गरीब व कामकरी वर्गाचीं मुलें येतात. सक्तीचें वय संपल्याबरोबर कामधंदा करणें त्यांना जरूर असतें.

दुय्यम शाळांतील विषयांचाच सोपा अभ्यासक्रम हें या शाळेंतील बौद्धिक शिक्षण आहे. त्याचेच जोडीला हस्तव्यवसाय–शिक्षणाची अधिक प्रमाणांत व्यवस्था केलेली असते. भाषा, गणित, इतिहास, भूगोल, भौतिक शास्त्रें, परदेशी भाषा (फ्रेंच) इत्यादि बौद्धिक शिक्षणाचे विषय असतात. मुलांना सुतारकाम, यांत्रिक काम, व मुलींना गृहशास्त्र असें व्यावहारिक शिक्षण दिलें जातें. ज्या भागांत शाळा असते त्या भागांतील कांहीं विशेष उद्योगधंदा असेल तर तोही या शाळेंत शिकविला जातो.

या विद्यार्थ्यांना परीक्षेचा व अभ्यासाचा काच विशेष नसतो. बौद्धिक शिक्षणापेक्षां व्यावसायिक गोष्टींकडेच विशेष लक्ष देण्यांत येतें. त्यामुळें खालच्या शाळेपेक्षां या शाळेंत मोकळेपणाचें व उत्साहाचें वातावरण अधिक दिसतें. मुलें वर्कशॉपमध्यें आनंदानें व मन लावून कामें करतांना दिसतात. एका शाळेंतील मुलांनीं बॅटरीवर चालणारी विजेची आगगाडी केली होती. एंजिन, डबे वगैरे सर्व बारीकसारीक कामें मुलांनींच स्वत: करून रेल्वेंत असणाऱ्या सर्व गोष्टी लहान प्रमाणावर बनविल्या होत्या.

या शाळेंतील शिक्षणाचें तत्त्व सांगतांना मुख्य अध्यापक म्हणाले— "या मुलांना शाळेंत मिळेल तेवढाच आनंद. कारण घरची परिस्थिति अगदीं

करुणास्पद असते. शाळेच्या शिक्षणानें गृहजीवन कसें सुधारेल हा आमच्या शाळेंतील शिक्षणाचा मुख्य प्रश्न आहे."

## मानसिक अन्याय व परिमार्जन उपाय

सीनियर स्कूलची पद्धति म्हणजे इंग्लिश शिक्षणपद्धतीमधील अन्यायाचें मूर्तिमंत स्वरूप आहे. बुद्धिमान् विद्यार्थ्यांची अगदीं साय काढून घेऊन बाकी सर्व बहुसंख्य विद्यार्थी एका शाळेंत कोंबण्यानें मुलांची किती मानसिक कुचंबणा होत असेल त्याचा विचार करावा. नापास झालेल्या व बुद्धीनें कमी दर्जाच्या मुलांची शाळा म्हणून प्रसिद्ध असलेल्या अशा शाळेंत तीनचार वर्षें जाण्यानें मुलाच्या मनावर कनिष्ठतेचा किती खोल ठसा उमटत असेल तें मुलांच्या भूमिकेवर उभे राहून विचार केला असतां समजेल. इंग्लिश शिक्षणसुधारकांना या अन्यायाची जाणीव झाली असून तो दूर करण्याचा प्रयत्न चाललेला आहे.

१९२६ सालीं विद्याखात्यानें 'हॅडो कमिटी' नेमून या प्रश्नाचा विचार तिच्यावर सोंपविला. कमिटीनें अशी शिफारस केली आहे कीं दुय्यम शाळांना समांतर अशा अनेक प्रकारच्या शाळा असाव्यात. सहा वर्षें प्राथमिक शिक्षण झाल्यावर विद्यार्थ्याला त्याच्या कलाप्रमाणें यांपैकीं कोणत्याही शाळेंत जातां यावें. मुलांच्या स्वभावामध्यें जितकी विविधता असते तितके विविध विषय शिकविणाऱ्या निरनिराळ्या नवीन शाळा काढल्या जाव्यात. इंग्लिश दुय्यम शिक्षणाची सुधारणा हॅडो कमिटीचे सूचनांना धरून होईल.

## सक्तीचा कायदा व अंमलबजावणी

सक्तीच्या शिक्षणकायद्यान्वयें प्रत्येक पालकानें पांच ते चौदा वयापर्यंतचीं मुलें शाळेंत पाठविणें आवश्यक आहे. चांगल्या शिक्षणाची दुसरी व्यवस्था असल्यास, आरोग्याचे दृष्टीनें अशक्यता झाल्यास, घरापासून शाळेचें अंतर दोन मैलांपेक्षां अधिक असेल (अकरा वर्षांचे वरील मुलाला तीन मैलांपेक्षां अधिक असेल) व स्थानिक शाळाखात्यानें वाहनाची सोय केलेली नसेल तर, किंवा घरीं मुलाचें शिक्षण होत असेल तर या कायद्यापासून पालकाला सूट मिळते.

या कायद्याची अंमलबजावणी करण्याकरितां एक मंडळ व अधिकारी

यांची योजना झालेली असते. परंतु गैरहजेरीचे प्रसंग फारसे येत नाहींत, त्यामुळें अधिकाराची व कायद्याची अंमलबजावणी फार कडकपणें करावी लागत नाहीं. हजेरीचें प्रमाण साधारणपणें शेंकडा नव्वद असतें.

## वर्गांतील मुलांची संख्या

प्राथमिक शाळांतील प्रत्येक वर्गांत विद्यार्थ्यांची संख्या चाळीस ते पंचेचाळीस असावी असा साधारण दंडक आहे. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत असें दिसतें कीं शहरांत पन्नासपर्यंत व खेड्यांत साठपर्यंतही मुलें एका वर्गांत बसविलीं जातात. एकंदर शाळांपैकी एकतृतीयांश शाळांतून प्रत्येक वर्गांत चाळीस ते पन्नास विद्यार्थी आहेत. पन्नास ते साठ विद्यार्थी असलेले साडे-आठ हजार वर्ग असून कांहीं वर्गांत साठापेक्षांही अधिक मुलें आहेत! बाकीच्या बहुसंख्य वर्गांतून तीस ते चाळीस इतकी संख्या असते.

## अभ्यासक्रमांत स्थानिक स्वातंत्र्य

अभ्यासक्रमाचे बाबतींत विद्याखात्यानें स्थानिक शिक्षणखात्यांना व शाळांना पूर्ण मोकळीक व विविधतेचें स्वातंत्र्य दिलें आहे. अमुक एक अभ्यासक्रम पूर्ण झालाच पाहिजे अशी सक्ति शाळांवर नाहीं. अभ्यास-क्रमाचें स्वरूप काय असावें याविषयी एक सूचनात्मक पुस्तक (हँडबुक ऑफ सजेशन्स्) प्रसिद्ध केलें जातें. तें शिक्षकांना व मुख्य अध्यापकांना मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडतें. प्रत्येक परगण्याची, गांवाची, व समाजाची परिस्थिति निराळी असते, त्या त्या परिस्थितीला जुळेल व उपयोगी पडेल असा शिक्षण-क्रम स्थानिक शिक्षणखात्यानें किंवा शाळांनी आंखून घ्यावा. सर्व प्रांतांत उपयोगी पडेल अशा स्वरूपाचा तपशीलवार अभ्यासक्रम आंखणें फार कठिण आहे. विद्याखात्याचें असें उदार धोरण असल्यामुळें प्रत्येक ठिकाणीं स्थानिक जरूरीप्रमाणें अभ्यासक्रम आंखतां येतो. त्यामुळें अभ्यासाचा दर्जा कमीअधिक होण्याचा संभव आहे. परंतु शाळातपासणीचे अधिकारी, विद्याखात्यानें प्रसिद्ध केलेलें सूचनारूपी शिक्षणवाङ्मय, ग्रँट देण्याचे वेळीं सादर करण्याचे अहवाल आणि प्राथमिक शिक्षणानंतर होणारी परीक्षा—या सर्व योजनांमुळें शाळांचा दर्जा फार खालीं जाऊं शकत नाहीं.

किमान शिक्षण म्हणून सर्व शाळांतून इंग्लिश भाषा, लेखन, वाचन,

गणित, मापन, आरोग्यशास्त्र, शारीरिक शिक्षण आणि नीतिशिक्षण (धार्मिक) हे विषय आवश्यक शिकविले जातातच. याव्यतिरिक्त पुरवणी शिक्षणार्थ म्हणून जे विषय आहेत त्यांत स्थानिक परिस्थिति, साधनें, आणि जरूरी यांच्या अनुरोधानें कमी अधिक फरक होऊं शकतो. इतिहास, भूगोल, चित्रकला, गायन व संगीतकला, शिवणकाम, हस्तव्यवसाय, निरीक्षण, इत्यादि विषय शाळांना वैकल्पिक असून आर्थिक परिस्थिति व स्थानिक जरूरी यांचा मेळ घालून ते शिकविण्याची व्यवस्था केली जाते.

प्रत्येक मुख्य अध्यापकानें आपापल्या शाळेचा शिक्षणक्रम, अभ्यासक्रम, व वेळापत्रक तयार करावयाचें असतें. लंडनमधील एका शाळेस भेट देऊन अभ्यासक्रमाविषयीं विचारलें असतां अध्यापक म्हणाले—"मी नुकताच येथें बदलून आलों आहें. पूर्वीच्या मुख्य अध्यापकानें आपला अभ्यासक्रम बरोबर नेला. मला माझा अद्याप तयार करावयाचा आहे." हा अभ्यासक्रम तयार करून त्याला विद्याखात्याची मान्यता मिळवावयाची असते. विशिष्ट फरक कां केला याचीं कारणें सांगून खात्री पटवून दिली म्हणजे खात्याकडून नवीन प्रयोग किंवा फेरबदल करण्यास परवानगी मिळते.

## क्रमिक पुस्तकें व अध्यापन

क्रमिक पुस्तकें विद्याखात्यानें नेमलेलीं नसतात. स्थानिक शिक्षण-खातें कांहीं पुस्तकें सुचवितें. मुलांना शाळांकडून पुस्तकें मोफत पुरविलीं जातात. तीं शाळांतच ठेविलेलीं असतात. परंतु मुख्य भर क्रमिक पुस्तकांवर नसतो, व्यापक वाचनावर विशेष असतो. प्रत्येक शाळेचें व कांहीं ठिकाणीं वर्गाचें ग्रंथालय असतें. मुख्य अध्यापकांची व शिक्षकांची तयारी चांगली असल्यामुळें अभ्यासक्रम व क्रमिक पुस्तकें यांचे बाबतींत त्यांना पुष्कळ स्वातंत्र्य देणें शक्य होतें. विद्याखात्याचा शिक्षकवर्गावर पूर्ण विश्वास आहे हें विशेष.

अध्यापनपद्धतींत प्रत्यक्ष क्रिया व साधनसामुग्रीचा उपयोग यांना प्राधान्य दिलें जातें. ही साधनसामुग्री सोडून दिल्यास तिकडील व आपल्या-कडील चांगल्या शिक्षकांच्या अध्यापनपद्धतींत फारसा फरक नाहीं, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

### कांहीं विशेष कार्यक्रम

शाळेंतील शिक्षणांत पद्धतशीर व पूर्वयोजित अशा प्रवासांना फार महत्त्व दिलें जातें. प्रवासांत काय पाहावयाचें, कोठें जावयाचें इत्यादि कार्यक्रम तपशीलवार ठरविलेला असतो. ज्या प्रांतांत प्रवास होतो तेथील ऐतिहासिक, भौगोलिक, सामाजिक, प्राकृतिक इत्यादि सर्व दृष्टींनीं कोणती व कशी माहिती मिळवावयाची त्याच्या टांचणाचें छापील पुस्तक प्रत्येक विद्यार्थ्याला देण्यांत येतें. प्रवासाला जाण्यापूर्वीं व नंतर वर्गांतील अभ्यासाशीं प्रवासांत पाहिलेल्या गोष्टींची व मिळविलेल्या माहितीची सांगड घातली जाते. त्यामुळें प्रवासाच्या कार्यक्रमाचा करमणूक व शिक्षण या दोनही दृष्टींनीं मुलांना उपयोग होतो.

बौद्धिक अभ्यासक्रमांत इंग्रजी भाषेचे अध्ययनाकडे विशेष लक्ष दिलें जातें. शुद्ध व स्पष्ट उच्चारानें बोलणें आणि वाचणें ही कला शिकविण्याचा प्रयत्न होतो. त्याचबरोबर प्रांतिक पोटभाषांकडेही लक्ष दिलें जातें. शारीरिक शिक्षण सर्वत्र आवश्यक आहे. स्वीडिश पद्धतीच्या व्यायामाचा विशेष प्रचार आहे. शहरांत मध्यवर्ती पोहण्याचे तलाव असतात. तेथें पाळीपाळीनें विद्यार्थ्यांना आठवड्यांतून दोनदां नेण्यांत येतें. त्या निमित्तानें त्यांचे शरीराला स्नानही मिळतें.

## *प्रौढ शिक्षणाची संघटना*

### प्रौढ कामगारांत शिक्षणाची भूक

इंग्लंडमधील प्रौढ शिक्षणाची संघटना आदर्श आहे. या संस्थांचा व्याप सर्व देशभर पसरला आहे. सरकार, विद्यापीठें, आणि सार्वजनिक संस्था या सर्वांचे आपापल्यापरी प्रयत्न चालू आहेत. कामगारवर्ग जागृत आणि महत्त्वाकांक्षी असल्यामुळें त्यानें सर्वांच्या सहकारितेनें प्रौढ शिक्षणाच्या चळवळीला आज चांगलें स्वरूप आणलेलें आहे.

एकोणिसाव्या शतकांत औद्योगिक क्रांति झाली. त्यामुळें शेतकरी-वर्ग शहरांत मजूर होऊन राहूं लागला. दिवसभर गिरणींत काम करावें आणि नंतर आपल्या खोपट्यांत येऊन राहावें असें त्याचें जीवन होतें. शिक्षण,

करमणूक, किंवा ललितकलांचा अनुभव या संस्कृतीचा त्याला कांहींच फायदा मिळत नसे.

कामगार वर्गांत राजकीय जागृति जसजशी झाली तसतशी त्यांची शिक्षणाकरितां मागणीही वाढूं लागली. वरच्या समाजवर्गानें आपणांस उच्च शिक्षणापासून अलिप्त ठेविलें आहे असें त्याला वाटूं लागलें. कामाचे तास कमी होऊन सवडीचा वेळ वाढूं लागला, तेव्हां आपणांसही उच्च ज्ञानाचा आस्वाद घेण्याची संधि मिळावी असें या वर्गाला वाटूं लागलें. ही जाणीव गेल्या दोन पिढ्यांमध्यें मोठ्या प्रमाणावर वाढलेली आहे. त्यामुळें प्रौढ शिक्षणाचा व्याप वाढविण्याचें मुख्य कार्य याच वर्गाकडून झालेलें आहे. १९०३ सालीं 'कामगार शिक्षण संघ' (वर्कर्स् एज्युकॅशनल अ‍ॅसोसिएशन---किंवा W. E. A.) ही संस्था स्थापन झाली. या संस्थेनें आजपर्यंत प्रौढ शिक्षणाच्या क्षेत्रांत फार मोठी कामगिरी केली आहे. कामगारवर्ग या कार्यात पडण्यापूर्वीं कांहीं धार्मिक संस्थांनीं व समाजसेवकांनीं अशिक्षित गरीब लोकांना शिक्षण देण्याचे दृष्टीनें प्रयत्न केलेले होते.

कामगारवर्गानें आपल्या हातांत हें शिक्षण घेतल्यानंतर विद्यापीठ संस्थांशीं सहकार्य केलें. हळुहळू सरकारी विद्याखात्यानेंही हें शिक्षण मान्य करून आर्थिक मदत देण्यास प्रारंभ केला. नंतर स्थानिक स्वराज्य संस्थांनींही पुढाकार घेऊन या शिक्षणाला आश्रय दिला. आज प्रौढांचें शिक्षण हा विद्याखात्याच्या अनेक भागांपैकीं एक महत्त्वाचा भाग झालेला आहे.

## अर्थार्जन कीं ज्ञानार्जन ?

प्रौढ शिक्षणाचा उद्देश कामगाराची मिळकत वाढवावी असा नाहीं. त्याला बौद्धिक शिक्षणाची पूर्वीं न लाभलेली संधि देणें हा हेतु आहे. कांहीं ठिकाणीं औद्योगिक दृष्टीनें शिक्षण देणाऱ्या संस्था आहेत हें खरें. परंतु या चळवळीचा मुख्य भर व्यापक दृष्टीनें बौद्धिक व सांस्कृतिक शिक्षण कामगारांस देऊन त्यांना सुसंस्कृत करणें हा आहे. मिळकत वाढणें हा अप्रत्यक्ष परिणाम होऊं शकेल. मुख्य उद्देश ज्ञानार्जन व जिज्ञासातृप्ति हा आहे. या दृष्टीनें विचार करितां विद्यार्थी अवस्थेंतील व या शिक्षणांत उद्देशाचे दृष्टीनें फार फरक आहे.

गेल्या अर्धशतकांत बहुजन समाजामध्यें व्यक्तित्वाची जाणीव झालेली आहे. आपण या जगांत केवळ मजूर किंवा नोकर म्हणून जन्माला आलों नाहीं; स्वतःचे ठिकाणीं कांहीं प्रसुप्त असे गुण आहेत ; त्यांचा विकास झाला पाहिजे ; बौद्धिक वाढ, कलागुणाचा उत्कर्ष, किंवा इतर वैयक्तिक गुणांचें संगोपन करण्याची प्रत्येक व्यक्तीला संधि पाहिजे ; अशा प्रकारची उत्कट जाणीव जनतेंत निर्माण झाली आहे.

लोकशाहीच्या युगांत प्रत्येक नागरिकाला सार्वजनिक प्रश्नावर मत द्यावें लागतें. आजचे राजकीय, आर्थिक, सामाजिक व आंतरराष्ट्रीय प्रश्न इतके गुंतागुंतीचे झाले आहेत कीं, केवळ व्यवहारज्ञानाच्या जोरावर सामान्य व्यक्तीला त्यांचें आकलन होणें शक्य नाहीं. कांहीं तरी पूर्वशिक्षणाची भूमिका नागरिकाला पाहिजे. या दृष्टीनें इतिहास, समाजशास्त्र, राजकारण-शास्त्र, नागरिकशास्त्र, तत्त्वज्ञान इत्यादि विषय शिकण्याची उत्कंठा सामान्य नागरिकांत झालेली आहे.

प्रौढ शिक्षणाचे मुळाशीं केवळ आर्थिक उद्देश नसून शैक्षणिक महत्त्वाकांक्षा, बौद्धिक जिज्ञासा, नागरिकत्वाची जबाबदारी आणि व्यक्तित्वाचे दृष्टीनें स्वतःचे हक्कांची जाणीव या गोष्टी आहेत, हें लक्षांत घेणें जरूर आहे.

## प्रौढ शिक्षणाच्या संघटना

प्रौढ शिक्षण देणाऱ्या संघटना व संस्था अनेक आहेत. त्यांतील मुख्य व सर्वात मोठी संस्था ‘कामगार शिक्षण संघ’ (वर्कर्स एज्युकेशनल असोसिएशन W. E. A.) ही आहे. कामगारांचे उच्च शिक्षणाला प्रोत्साहन देण्याकरितां आल्बर्ट मॅन्स्ब्रिज् यानें ही संस्था १९०३ मध्यें स्थापिली. या संस्थेतर्फे दर वर्षी दीड दोन हजार वर्ग चालविले जातात. नॅशनल कौन्सिल ऑफ लेबर कॉलेजेस्, एज्युकेशनल सेटलमेंट असोसिएशन, इत्यादि अनेक संस्था कामगारवर्गानें चालविल्या आहेत. यांतील एका संस्थेतर्फे तर पांच कामगार महाविद्यालयें (लेबर कॉलेजेस्) चालविलीं जात आहेत. ऑक्स्फर्ड, केंब्रिज, लंडन इत्यादि विद्यापीठांमार्फत कांहीं शिक्षणाचे वर्ग चालू असतात. बौद्धिक दृष्टीनें हे वर्ग वरच्या दर्जाचे असतात. स्थानिक स्वराज्य सभांचीं शिक्षण-खातीं आहेत त्यांचेमार्फत कांहीं शिक्षणाचे वर्ग व संस्था चालू आहेत. धार्मिक

संस्थांच्या मार्फतही बरेंच काम चाललें आहे. त्यांत वाय्. एम्. सी. ए. किंवा तरुण ख्रिस्त संघ (यंग मेन्स् ख्रिश्चन अँसोसिएशन); युनायटेड कौन्सिल ऑफ् मिशनरी एज्युकेशन्, कॅथॉलिक सोशल गिल्ड इत्यादि अनेक संघटना आहेत. कांहीं वर्ग सार्वजनिक संस्थांचे मार्फत चालू आहेत. मातृसंघ (मदर्स युनियन्स्), स्त्रियांचे संघ (वुइमेन्स इन्स्टिटयूटस्), ग्रामोद्धार मंडळें (रूरल् कम्यूनिटी कौन्सिल्स्), इत्यादि अनेक संघटनांच्याद्वारें स्त्रियांचें व कामगारांचें शिक्षण चालू आहे. राजकीय पक्षांच्यातर्फेही कांहीं शिक्षण-वर्ग चालविले जातात. सारांश कामगारवर्ग, विद्यापीठें, स्थानिक स्वराज्य, धर्मपीठ (चर्च), सार्वजनिक संस्था, व राजकीय पक्ष अशा बहुविध संस्थांनीं हें प्रौढ शिक्षणाचें काम अंगावर घेतलें आहे. या कार्याला विद्याखात्याची चांगली सहानुभूति असून एकूण खर्चापैकीं बराच मोठा भाग सरकार देत असतें.

## शिक्षणाचे प्रकार

या शिक्षणांतील अभ्यासक्रम प्राथमिक, दुय्यम, व उच्च अशा सर्व दर्जांचे आहेत. विद्यापीठानें चालविलेले टयुटोरियल् क्लासेसचा अभ्यासक्रम तीन वर्षांचा असतो. चोवीस आठवडयांचें एक सत्र असतें. या वर्गांतील अभ्यास वरच्या दर्जाचा असतो. त्यापेक्षां खालचा व वरचा अभ्यासक्रम प्रेपरेटरी टयुटोरिअल क्लासेस् व अॅडव्हान्सड् टयुटोरिअल क्लासेस यांचे-कडून शिकविला जातो. त्यांचा एक वर्षाचा किंवा अधिक शिक्षणक्रम असतो. याशिवाय तिमाही वर्ग (टर्मिनल् कोर्सेस्), वासंतिक विद्यालयें (समर स्कूल्स्), रविवार विद्यालयें (वीक एंड स्कूल्स्) इत्यादि अनेक प्रकारचे वर्ग असतात. त्यांचा अभ्यासक्रम विद्यापीठांपेक्षां सोपा असतो.

नियमित वर्गातून चालणाऱ्या शिक्षणक्रमाची माहिती वर दिली आहे. याखेरीज चर्चामंडळें, अभ्यास मंडळें, वाचन संघ, व्याख्यानसत्रें, निरनिराळ्या विषयांच्या व कलांच्या अभ्यासाकरितां काढलेले संघ (क्लब्ज्), रेडिओ-वरील व्याख्यानें, शैक्षणिक चित्रपट इत्यादि अनेक मार्गांनीं प्रौढ शिक्षणाचा प्रसार सर्व देशांत झालेला आहे.

वर्षसहा महिने कॉलेजमध्यें राहून अभ्यासक्रम पूर्ण करण्याची व्यवस्थाही कांहीं विद्यापीठांनीं व कामगार संघांनीं केलेली आहे.

## अभ्यासक्रम व अध्यापन

शिक्षणाचें बहुतेक काम स्वयंसेवक शिक्षकांकडून चालतें. पण हा व्याप इतका वाढला आहे कीं, आतां पगारी शिक्षकांचीही योजना होऊं लागली आहे.

प्रौढ कामगारांना कोणते विषय महत्त्वाचे वाटतात तें पाहण्यासारखें आहे. लोकप्रियतेच्या क्रमानें या विषयांची यादी अशी आहे—वाङमय, अर्थशास्त्र, औद्योगिक इतिहास, सामान्य इतिहास, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, समाजशास्त्र, जीवनशास्त्र इत्यादि. यांशिवाय चित्रकला व संगीत या विषयांचीही आवड बरीच दिसून येते.

विद्यार्थ्यांना व प्रौढांना शिकविण्याच्या पद्धतींमध्यें पुष्कळ फरक पडतो. विद्यार्थ्यांपेक्षां कामगार लोक वयानें अधिक असतात. शिक्षण नसलें तरी जगाचा अनुभव त्यांना अध्यापकांपेक्षां अधिक असतो. शिष्य या नात्यानें शिकण्यापेक्षां बरोबरीचा या नात्यानें वागण्याची प्रवृत्ति त्यांच्या ठिकाणीं अधिक असते. उलट सुलट प्रश्न विचारण्याइतकी त्यांची तयारी असते. यामुळें केवळ व्याख्यानपद्धतीनें शिकवून भागत नाहीं, म्हणून प्रश्नोत्तरें व चर्चापद्धति यांचा अधिक उपयोग केला जातो. अध्यापक विद्यार्थ्यांशीं गुरु या नात्यानें वागत नाहीं, मित्र या नात्यानें वागतो. वर्गांत विद्यार्थी व शिक्षक यांचेमध्यें प्रश्नोत्तररूपानें चर्चा चालते. अध्यापक निरनिराळे विचाराचे दृष्टिकोण सुचवितो. वाचनाचे संदर्भ ग्रंथांची यादी देतो. तदनंतर विद्यार्थी त्या विषयावर स्वत: वाचन व विचार करून निबंध लिहून आणतात. अशा अभ्यासाचा मुख्य बोजा विद्यार्थ्यांवर टाकला जातो. अध्यापक फक्त मार्गदर्शनाचें काम करितो. व्याख्यानपद्धतीनें शिकविण्यापेक्षां हें काम अवघड आहे.

## प्रौढ शिक्षणाच्या कांहीं संस्था

लंडनमध्यें टॉईनबी हॉल नांवाची प्रौढ शिक्षणाची मोठी संघटना

आहे. या संस्थेंत १९३३।३४ सालीं शिकविलेल्या कांहीं शिक्षणक्रमाची माहिती पुढें दिली आहे.

त्रैवार्षिक शिक्षणक्रम---अर्थशास्त्र, मानसशास्त्र, (लंडन विद्यापीटाचे विद्यमानें).

एकवार्षिक शिक्षणक्रम---वाङमय व नाटयसाहित्य.

आधुनिक भाषा---फ्रेंच, रशियन, व स्पॅनिश्.

तिमाही शिक्षणक्रम---विज्ञान (आधुनिक विज्ञानाची रूपरेषा), इतिहास (ब्रिटनमधील कामगार चळवळीचा), गृहपरिचर्या (स्त्रिया व पुरुष यांकरितां), आरोग्यशास्त्र, लोकशाही व सामाजिक प्रगति, इत्यादि.

इतर विषय---संगीत, चित्रकला, हस्तकला, मातकाम, नृत्यकला इत्यादि.

विविध संघ---साहित्य मंडळ, संगीत मंडळ, भाषा मंडळ, कलामंडळ इत्यादि.

शहरांतील कामगार वस्तींत 'वर्किंग मेन्स् इन्स्टिटयूट' (कामगार शिक्षणसंस्था) नांवाची एक संस्था आहे. या संस्थेंत कामगार विद्यार्थ्यांकरितां उच्च शिक्षणाचे शंभरपर्यंत निरनिराळे अभ्यासक्रम शिकविले जातात. १८५४ सालीं फ्रेडरिक डेनिसन मॉरिस नांवाच्या गृहस्थानें या संस्थेची स्थापना केली. १९३३, ३४ सालीं शिकविलेल्या कांहीं अभ्यासक्रमांतील विषयांवरून इंग्लिश कामगार काय शिकतात, त्याची कल्पना येईल---इतिहास, अर्थशास्त्र, प्राचीन भाषा, कायदा, फ्रेंच, जर्मन, रशियन, स्पॅनिश, इटालियन, डॅनिश इत्यादि भाषा, गणित, विज्ञान, संगीतकला, नाटयशास्त्र इत्यादि.

मेरी वॉर्ड सेटल्मेंट नांवाची प्रौढ शिक्षणाची एक जुनी संस्था लंडनमध्यें आहे. या संस्थेच्या अनेक शाखांमध्यें "पीपल्स् कॉलेज" (जानपद महाविद्यालय) नांवाची एक शाखा आहे. या कॉलेजमध्येंही इतिहास, अर्थशास्त्र, राजकारण, वाङमय, तत्त्वज्ञान इत्यादि अनेक विषय शिकविले जातात. त्यांपैकीं इतिहास व अर्थशास्त्र या क्षेत्रांत काय विषय येतात त्याची कल्पना पुढील अभ्यासक्रमाचे यादीवरून येईल.

(१) आंतरराष्ट्रीय राजकारणाची रूपरेषा, (२) इंग्लंडचा अर्वाचीन इतिहास, (३) एकोणिसावे शतकांतील ग्रंथकार व कार्यकर्ते,

(४) भांडवलशाही पद्धतीची सद्यःस्थिति, (५) इजिप्तमध्यें संस्कृतीचा उदय, (६) सोव्हिएट रशियामधील जीवन व संस्था, इत्यादि.

वाङमयाच्या क्षेत्रांतील कांही अभ्यासक्रम पुढीलप्रमाणें होते—

(१) काव्याचा अर्थ, (२) इंग्लिश कादंबरी, (३) आधुनिक वाङमयांतील विशेष, (४) शेक्स्पियरचीं सुखांतिक नाटकें, (५) व्यवहार-ज्ञानाविरुद्ध बंड (वर्डस्वर्थ, कोलरिज् व अनुयायी), (६) जीवन व वाङमय, (७) ग्रंथांचा परिचय इत्यादि.

## भावी प्रगतीची दिशा

प्रौढ शिक्षणाच्या संस्था व विद्यार्थी यांची संख्या वाढली आहे व वाढत आहे. १९२८ साली उच्च दर्जाचे त्रैवार्षिक शिक्षणक्रम घेणारांची संख्या १०,००० होती. इतर निरनिराळे वर्गांची व अभ्यासक्रमांची संख्या एक लक्षपर्यंत होती. १९२६।२७ मध्यें लंडन शहरांतच २,००० वर्ग चालू होते

चित्रपट व ग्रामोद्योग यांचा उपयोग प्रौढ शिक्षणाचे दृष्टीनें कसा होईल या दृष्टीनें 'प्रौढ शिक्षण संघ' (ब्रिटिश इन्स्टिटयूट ऑफ ॲडल्ट एज्युकेशन) या संस्थेचा प्रयत्न चालला आहे.

या चळवळीचा पुढाकार प्रथम लोकांनी घेतला आणि नंतर सरकारची मदत होऊं लागली, ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. स्वतःच्या प्रगती-विषयीं इंग्लिश जनता किती जागृत असते तें शिक्षणक्षेत्रांतील सार्वजनिक संस्थांच्या विविधतेवरून दिसून येतें. इंग्लिश कामगारवर्गाचा बौद्धिक दर्जा काय आहे तें प्रौढ शिक्षणाच्या शिक्षणक्रमांतील निरनिराळ्या अभ्यास-क्रमांवरून समजतें. साधा कामगार देखील स्वतःचें घर व कुटुंब यांचेपलीकडे पाहूं लागला आहे. त्याचेबरोबर हिंदी जनता आणावयाची असेल तर किती प्रयत्न केले पाहिजेत, याचा विचार करून लोकांनींच कामाला लागलें पाहिजे.

---

## प्रकरण पंधरावें

# निवडक बुद्धिवानांचें शिक्षण

### शिक्षणांतील जातिभेद व लोकशाही

विद्या आणि सत्ता आपल्या हातामध्यें ठेवून सामान्य जनांना त्यापासून अलिप्त ठेवण्याचा प्रयत्न वरिष्ठ सत्ताधारी वर्गाचा असतो, ही गोष्ट प्रत्येक समाजाच्या इतिहासांत सांपडते. हिंदुस्थानलाच या बाबतींत दोष देण्यांत येतो, व तो स्वीकारला जातो, त्याचे मुळाशीं अज्ञान आहे. सत्ता, संपत्ति, आणि विद्या हीं वरच्या वर्गाकडून सर्व सामान्य जनांत पसरण्याची सामाजिक प्रक्रिया सर्व देशांत व समाजांत हळुहळू चालू आहे. यूरोपमधील देश या अवस्थेमध्यें जरा आधी शिरले ; हिंदुस्थान जरा उशिरा शिरला एवढाच फरक. इंग्लंडच्या शैक्षणिक इतिहासामध्यें हें तत्त्व उत्कृष्ट रीतीनें निदर्शनास येतें. यूरोपमध्यें गेल्या शतकांत जो जातिभेद किंवा वर्गभेद होता त्याचें शैक्षणिक स्वरूप कांहीं देशांत अद्यापपर्यंत राहिलेलें आहे. परंतु लोकशाहीच्या भावनेपुढें तें नाहीसें होत चाललें आहे.

### शिक्षणांत सामान्य जनांचा प्रवेश

इंग्लंडमध्यें सामान्य जनांच्या मुलाबाळांना उपलब्ध अशा दुय्यम शिक्षणाला प्रारंभ १९०२ च्या शिक्षण–कायद्यामुळें झाला. त्यापूर्वी पब्लिक् स्कूल्स् व इतर खाजगी शाळांतून या शिक्षणाची सोय होती. परंतु त्यांत सामाजिक–आर्थिक दृष्टचा सामान्य दर्जाच्या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळण्याचा कांहीं मार्ग नव्हता. १८६४ चे सुमारास या शिक्षणाची चौकशी करण्याकरितां दोन कमिशनें नेमलीं होतीं, त्यांतील एका कमिशननें दुय्यम शिक्षणाच्या विविध प्रकारच्या शाळा जनतेकरितां स्थापन कराव्यात अशी सूचना केली होती, परंतु तिकडे कोणाचें फारसें लक्ष गेलें नाहीं. एकीकडे सामान्य जनतेंतील राजकीय व सामाजिक जागृतीमुळें त्यांची उच्च शिक्षणाकरितां जोराची मागणी होत होती, तर दुसरीकडे या शिक्षणाच्या सोयी अत्यंत मर्यादित होत्या व त्या फक्त धार्मिक लक्ष्मीपुत्रांच्या व खानदानी घराण्यांतील

मुलाबाळांच्या आटोक्यांत असत. अशा स्थितींत १९०२ चा 'शिक्षण कायदा' झाला. या कायद्यानें स्थानिक स्वराज्य संस्थांवर दुय्यम शिक्षणाच्या संस्था काढण्याची जबाबदारी टाकली. अशा रीतीनें चालू शतकाचे प्रारंभीं, म्हणजे अवघ्या दोन पिढ्यांपूर्वीं, राष्ट्रांतील सामान्य जनतेच्या दुय्यम व उच्च दर्जाच्या विद्यादानाला प्रारंभ झाला.

रयतेच्या मुलाबाळांना उच्च शिक्षणाचीं द्वारें खुलीं केल्यास शिक्षणाचा 'दर्जा' कमी होईल अशी भीति त्या वेळीं इंग्लिश लोकांना वाटत होती. परंतु जनतेच्या मागणीचा जोर इतका होता कीं त्यापुढें उच्च शिक्षणाचा व विद्यार्जनाचा मक्ता समाजाचे विशिष्ट वर्गाचे हातांत ठेवणें हें अशक्य झालें. गेल्या दोन पिढ्यांत दुय्यम शिक्षणाची पूर्वीपेक्षां पुष्कळ वाढ झालेली आहे.

## दुय्यम संस्थांचे प्रकार

दुय्यम शिक्षणसंस्थांचे अनेक प्रकार इंग्लंडमध्यें दिसून येतात. निरनिराळ्या काळांत स्थापना, निरनिराळ्या समाजवर्गाकरितां शिक्षण, विद्यादानांत निरनिराळे उद्देश, आणि या संस्थांमध्यें एकसूत्रीपणा आणण्याकरितां जरूर तें नियंत्रण घालण्याची विद्याखात्याची नाखुषी, इत्यादि कारणांमुळें या शिक्षणसंस्थांमध्यें अनेक प्रकार झालेले आहेत. तरी पण सर्व शाळांचें वर्गीकरण करावयाचें झाल्यास मुख्य चार विभाग पडतील— (१) पब्लिक स्कूल्स्, (२) डे ग्रामर स्कूल्स् व हायस्कूल्स्, (३) खाजगी स्वरूपाच्या किंवा प्रयोगार्थ चालविलेल्या दुय्यम शिक्षणसंस्था, व (४) कौन्सिलचीं (तालुका–जिल्हा–गांव सभांचीं) सेकंडरी स्कूल्स.

## पब्लिक स्कूल्स

पब्लिक स्कूल्स् या इंग्लंडच्या भूषणभूत झालेल्या अशा अगदीं जुन्या शिक्षणसंस्था. या विद्यालयांतून मोठमोठे मुत्सद्दी, कवी, लेखक, पराक्रमी पुरुष, व समाजसेवक बाहेर पडले. इंग्लंडवर, हिंदुस्थानवर, आणि सर्व ब्रिटिश साम्राज्यावर राज्य करणारी नोकरशाही याच शाळांमध्यें तयार होते. अगदीं जुन्या परंपरेंतील अशीं सात पब्लिक स्कूल्स् आहेत. पण आज या प्रकारच्या शाळांची संख्या दोनशेंपर्यंत आहे. श्रीमंत व संपन्न समाजाच्या

मुलांनाच या शाळांत प्रवेश मिळणें शक्य असतें. त्यामुळें खालच्या समाजाचा त्यांचेवर कटाक्ष आहे. या शाळांची अत्यंत स्तुति व अत्यंत निंदा इंग्लिश वाङ्मयांतूनच झालेली आहे. एका टीकाकारानें 'इंग्लिश पब्लिक स्कूल' या नांवावर अशी टीका केली कीं या शाळा इंग्लिश म्हणवितात परंतु त्यांचा इंग्लिश भाषेपेक्षां ग्रीक लॅटिनवरच भर अधिक आहे; त्या पब्लिक म्हणवितात परंतु खाजगी व विशिष्ट समाजापुरत्याच मर्यादित आहेत; शेवटीं त्या स्कूल्स् असें म्हणवितात परंतु तेथें विद्यार्जनापेक्षां खेळांकडेच अधिक लक्ष दिलें जातें ! या शाळांवर कितीही टीका झाली व कांहीं आक्षेप खरे असले तरी एक गोष्ट खरी आहे कीं, इंग्लंडच्या सामाजिक, राजकीय, आणि शैक्षणिक इतिहासांत त्यांचें स्थान महत्त्वाचें आहे.

## डे ग्रामर स्कूल्स व हायकूल्स

डे ग्रामर स्कूल्स् व हायस्कूल्स् हीं हिंदुस्थानांतील सार्वजनिक हायस्कूल्स्प्रमाणें आहेत. देणग्या व कायमनिधि, फीचें उत्पन्न, आणि सरकारी ग्रँट यांच्या उत्पन्नांवर या शाळा चालतात. परंपरेचे दृष्टीनें हीं विद्यालयें पब्लिक स्कूल्स् इतकींच जुनी आहेत. परंतु आश्रयाचे दृष्टीनें समाजाशीं संबंध असल्यामुळें सामाजिक जागृतीचा व नवीन शैक्षणिक विचारांचा त्यांचेवर परिणाम झालेला आहे. त्यामुळें या शाळा पुराणप्रिय नसून प्रागतिक आहेत. अभ्यासक्रमांत सुधारणा, सामान्य जनांच्या शिक्षणाला अनुकूलता, विद्येचा दर्जा, इत्यादि गुणांमुळें त्यांनी आपलें स्थान चांगलें ठेविलें आहे.

## खाजगी व प्रायोगिक शाळा

याशिवाय खाजगी शाळांचा तिसरा प्रकार आहे. या वर्गात खाजगी उत्पन्नाकरितां व्यापारी धोरणानें चालविलेल्या वैयक्तिक मालकीच्या शाळा, विशिष्ट ध्येयानें स्वतंत्र प्रयोग करण्याकरितां स्थापन झालेल्या संस्था, किंवा कांहीं कारणानें आपलें स्वातंत्र्य ठेवूं इच्छिणारीं विद्यालयें अशांचा समावेश होतो. शिक्षणांत नवीन नवीन विचार उत्पन्न होत आहेत, त्या दृष्टीनें प्रयोग करणाऱ्या नवयुग शिक्षणसंस्थांचाही समावेश या विभागांत होतो. या शाळांवर विद्याखात्याचें बंधन नाही किंवा सरकारी मदतीची त्यांना अपेक्षा नाहीं. शिक्षणांत सुधारणा होण्याकरितां अशा स्वतंत्र व अनियंत्रित शिक्षण-

संस्थांची अगदीं जरूरी आहे असें इंग्लिश लोकांना वाटतें व हें तत्त्व बरोबर आहे. आपल्या मुलाला वाटेल त्या प्रकारच्या शाळेंत पाठविण्याचा व विशिष्ट शिक्षण देण्याचा हक्क पालकाला आहे असेंही दुसरें तत्त्व या स्वतंत्र शाळांचे मुळाशीं आहे.

## कौन्सिलच्या दुय्यम शिक्षणाच्या शाळा

चौथा व लौकिक प्रकार कौन्सिल (तालुका जिल्हा स्वराज्यसभा) च्या दुय्यम शिक्षण संस्थांचा आहे. या संस्था १९०२ नंतर निघालेल्या आहेत, त्यामुळें त्यांचे पाठीशी पूर्वपरंपरा नाहीं. त्याचा एक फायदा असा झाला आहे कीं, या शाळांत नवीन सुधारणा लौकर होऊं शकतात. सार्वजनिक प्राथमिक शाळांतून नादारी घेऊन किंवा अंशतः फी देऊन राहणारीं सामान्य जनतेची मुलें या शाळांमध्यें शिकतात. जनतेच्या करांतून त्यांचा खर्च भागतो. सरकार निम्मा खर्च देतें व स्थानिक सभा निम्मा खर्च करते.

दुय्यम शाळांत कौन्सिलच्या शाळांचें व सार्वजनिक हायस्कूलचें प्रमाण अधिक आहे. १९३१ मध्यें एकूण १२१८ शाळांपैकीं ७२० कौन्सिलच्या व ४५८ सार्वजनिक शाळा होत्या. या दोन प्रकारच्या शाळांत मिळून एकूण विद्यार्थ्यांपैकीं शेंकडा ७४ विद्यार्थ्यांची संख्या आहे. ५०० शाळा केवळ मुलांच्या, ४८५ केवळ मुलींच्या व ३८२ मिश्र, अशी सहशिक्षणाचे दृष्टीनें वर्गवारी होती.

## कौन्सिल हायस्कूलचें दर्शन

इंग्लंडमधील एका हायस्कूलचें वर्णन दुसऱ्या शाळेला लागू पडणार नाहीं ही गोष्ट खरी. परंतु अनेक प्रकारच्या शाळांची शब्दचित्रानें कल्पना आल्यास इंग्लिश शिक्षणपद्धतीची अधिक चांगली माहिती होईल.

प्राथमिक शाळांपेक्षां हायस्कूलच्या इमारती चांगल्या दिसतात. कारण या शाळा अलीकडेच निघालेल्या आहेत. परंतु शाळेंत प्रवेश केल्याबरोबर आनंदाचें व उल्हासाचें वातावरण असावें तसें वाटत नाहीं; एक प्रकारचें गंभीर, कठोर, आणि औपचारिक वातावरण असल्यासारखा प्रेक्षकाला भास होतो. वर्गांतील भिंती भकास दिसतात. चित्रें व नकाशे लावून त्यांना सुशोभित करण्याचा प्रयत्न टाळलेला दिसतो. वर्गांत एक कपाट, टेबल, खर्ची,

मुलांच्या बैठका, आणि फळा हीच साहित्यसामुग्री. मुलें बसतील एवढीच वर्गांत जागा. मोकळेपणानें हालचाल करण्यास अधिक जागा नाहीं. शिक्षकांचे अंगावर इकडील कॉलेजमधील प्रोफेसरांप्रमाणें काळे झगे असतात. त्यांचे मुखावर उल्हासवृत्तीपेक्षां गांभीर्य अधिक दिसतें. डोक्याला टक्कल पडलेलें असल्यास या अभ्यासजडत्व वृत्तींत भरच पडते ! सुटींत विद्यार्थी मोकळे सुटले तरी त्यांच्या हालचालींत मोकळेपणा दिसत नाहीं. जिकडे तिकडे शांतता, शिस्त, सभ्यता, आणि परंपरासंगोपनाची तत्परता यांचें काळजीपूर्वक आचरण केलेलें दिसतें. विद्यार्थी अकालीं प्रौढ झाल्यासारखे वाटतात. प्राक्तारुण्य वयांतील उल्हास, आनंद, चळवळ, अस्वस्थता इत्यादि वृत्ती मुद्दाम दाबाखालीं ठेवल्या आहेत कीं काय असें वाटतें.

अमेरिकन किंवा रशियन शाळेंतील वातावरण आणि इंग्लिश शाळेंतील वातावरण यांत तिऱ्हाइत प्रेक्षकाला एकदम किती तरी फरक पडलेला दिसतो !

## सामाजिक स्वरूप

कौन्सिलच्या शाळा बहुतेक गरीब व मध्यम स्थितींतील लोकवस्तींत असाव्यात असें वाटतें. लंडनमधील एका शाळेंत पांचशें विद्यार्थी होते, त्यांपैकीं अडीचशें पूर्ण नादार व अडीचशें पालकांच्या उत्पन्नाप्रमाणें कमी अधिक फी देणारे असे होते. पूर्ण फी देणारे विद्यार्थी शेंकडा पंचवीस तीसपर्यंत असतील. त्यावरून मुलांच्या पालकांची आर्थिक व सांस्कृतिक गृहस्थिति काय असेल त्याची कल्पना येईल. वरिष्ठ समाजाचे दृष्टीनें आपण एका मानीव निकृष्ट शाळेंत आहोंत अशी मुलांना आणि शिक्षकांना जाणीव होत असावी. कारण एक शिक्षक शाळा दाखवीत असतांना मध्येंच म्हणाले—"पब्लिक स्कूल्स् आमच्याकडे सामाजिक दृष्टीनें तुच्छतापूर्वक पाहतात. ब्रिटिश व इंडियन सिव्हिल सर्व्हिसकरितां माणसें त्यांच्या शाळांतून तयार होतात. तुमच्या हिंदुस्थानांत जातिभेद आहेत, परंतु आमच्याही शिक्षणांत आमचे जातिभेद आहेत." या शाळांतील विद्यार्थी विद्यापीठ शिक्षणाकरितां जुन्या ऑक्स्फर्ड-केंब्रिज विद्यापीठांत न जातां नवीन स्थापन झालेल्या विद्यापीठांतून जातात. येथील शिक्षकही ऑक्स्फर्ड-केंब्रिजचे नसून नवीन विद्यापीठांतून बाहेर पडलेले असतात. उलट पब्लिक स्कूल्स्चा व खाजगी

शाळांचा संबंध ऑक्सफर्ड–केंब्रिजशींच विशेष. अशा प्रकारें शिक्षकांचें कॉलेज-शिक्षण आणि विद्यार्थ्यांचें उच्च शिक्षण या दोन्ही दृष्टींनीं कौन्सिलच्या शाळा व पब्लिक स्कूल्स् यांत फरक पडतो. त्यामुळें विचारी शिक्षकांच्या तोंडांतून नकळत निराशेचे उद्गार बाहेर पडणें शक्य आहे. "या शाळेंतील एकादा विद्यार्थी चुकून ऑक्सफर्ड–केंब्रिजमध्यें शिक्षण घेऊन बाहेर पडला तरी त्याला सिव्हिल सर्व्हिसमध्यें संधि मिळण्याची शक्यता नाहीं. पब्लिक स्कूलमध्यें शिक्षण झालें नाहीं, या कौन्सिलच्या शाळेंत झालें आहे, ही गोष्ट त्याच्या मार्गांत जन्मभर येईल." इतकें असूनही आपली शिक्षणपद्धति जगांत उत्कृष्ट आहे अशी प्रत्येक इंग्रजाची अंधश्रद्धा असते. हाच शिक्षक म्हणाला, "आमची शिक्षणपद्धति अमेरिकन शिक्षणापेक्षां श्रेष्ठ आहे." वादविवादांत हीं विधानें टिकतील कीं नाहीं याचा विचार न करितां कांहीं सिद्धांत मनाशीं ठरवावेत तसें या लोकांचें दिसलें. या शाळेच्या मुख्य अध्यापकांना विचारलें, "येथें कांही शैक्षणिक प्रयोग, सुधारणा वगैरे चालू आहेत काय ?" तो उत्तरला, "आम्ही शिक्षणक्रमांत फरक करण्याचा प्रयत्न करीत नाहीं. डाल्टन पद्धति वगैरे येथें कांहीं नाही. फरक करण्याची आम्हांस जरूरी वाटत नाहीं. आमच्या या पद्धतीनें विद्यापीठांकरितां मुलांची तयारी चांगली होत आहे, आणि तिच्यांतून प्रामाणिक व कायदापालन करणारे नागरिक तयार होत आहेत." या आत्मसंतुष्ट वृत्तींतून काय सुधारणेची अपेक्षा करावी !

## रत्नांची निवड व वर्गीकरण

दर वर्षीं शाळेंत येण्याकरितां चारशें मुलांनी अर्ज केले तर त्यांतील एकचतुर्थांश म्हणजे शंभर दाखल केले जातात. त्यापूर्वी त्यांची एक प्रवेश-परीक्षा होते. या परीक्षेच्या निकालावरून प्रविष्ट झालेल्या मुलांचे बुद्धी-प्रमाणें पुन: अ, ब, क, असे तीन वर्ग पाडले जातात. थोड्याफार फरकानें हे वर्ग शालेय शिक्षण पूर्ण होईपर्यंत मुलाला चिकटतात. बुद्धीच्या वर्गाप्रमाणें अभ्यासक्रमांत थोडाफार फरक केला जातो. 'परीक्षा आणि निवड' हें इंग्लिश पद्धतीचें तत्त्व आहे. मनुष्यांची अ, ब, क, अशी कायम विभागणी शास्त्रीय दृष्टीनें समर्थनीय आहे कीं काय हा प्रश्न आहे. एकाद्या विषयांत

अ वर्ग म्हणजे जगांत सर्वत्र अ, आणि शाळेंत क वर्ग म्हणजे जगांत सर्वत्र क असा अनुभव येतो काय ? एका विषयांत क वर्ग असलेला मुलगा दुसऱ्या एकाद्या क्षेत्रांत अ वर्ग असूं शकतो. परंतु केवळ बौद्धिक विषयांत क म्हणून जन्मभर त्याचे कपाळावर व मनावर क वर्गाचा शिक्का मारणें हें मानसिक दृष्टया निर्दयपणाचें आहे. अशा माणसाला जन्मभर कनिष्ठ वृत्तीची जाणीव राहील. मानसिक आरोग्याचे (मेंटल हायजीन्) दृष्टीनें ही पद्धति अनिष्ट आहे असें वाटतें.

## परीक्षा व अभ्यासपद्धति

अभ्यासक्रमांत व अध्यापनांत परीक्षेची तयारी करून घेण्याकडे विशेष भर दिसतो. या बाबतींत आपणही इंग्लंडचेंच अनुकरण केलेलें असल्यामुळें परीक्षा पद्धतीचे अनिष्ट परिणाम दोहींकडे सारखेच झालेले आहेत. प्रो. पर्सीनन् या विषयावर लिहितात, "अभ्यासक्रम आणि अध्यापनपद्धति यांचेवर परीक्षांचा पगडा फार बसला आहे. ....सुधारून पद्धतशीर केलेल्या परीक्षापद्धतीमुळें तर शाळांच्या मानेवर त्या पूर्वीपेक्षां दाबून बसल्या आहेत. ....विशेषतः मध्यम स्थितींतील शाळांत खऱ्या ज्ञानार्जनापेक्षां परीक्षेच्या अभ्यासाची घाई आणि चिंता याच विशेष दिसून येतात." प्रत्येक शाळेंत एकाद्या विषयाकडे विशेष लक्ष दिलेलें दिसतें. पहिल्या यत्तेंत एकाद्या विषयाला जो शिक्षक असतो तो आपला विषय त्याच मुलांना चार वर्षें शिकवून पूर्ण करतो. गणित व भूमितीच्या तासांत सुतारकाम व रेखाकला या विषयांचा समावेश केला आहे. परंतु हस्तव्यवसायाकडे दुय्यम शाळांचें विशेषसें लक्ष नाहीं हें स्पष्ट दिसतें. इतर बौद्धिक विषयांचे मानानें त्यांचा दर्जा खालचा समजला जातो.

कौन्सिलच्या शाळांमधून ग्रीक व लॅटिनपेक्षां फ्रेंच, जर्मन, गणितशास्त्रें, इतिहास, अर्थशास्त्र, इंग्लिश इत्यादि अर्वाचीन विषयांवर विशेष भर आहे. नवीन शाळा असल्यामुळें त्यांना आधुनिक विषय अधिक प्रिय आहेत. या शाळांतील विद्यार्थी सामान्य लोकांतील असले तरी अखेरपरीक्षेंत इतर शाळांपेक्षां त्यांचा निकाल चांगला असतो. खालच्या समाजवर्गांतील विद्यार्थी उच्च शिक्षणांत आल्यामुळें विद्येचा दर्जा उतरेल अशी भीति इंग्लिश पंडितांना

पडली होती ती गेल्या पिढींतील अनुभवानें निराधार ठरलेली आहे. उलट हेच विद्यार्थी इतर विद्यार्थ्यांपेक्षां श्रेष्ठ ठरले आहेत. कॉलेज शिक्षणाकडे जाणाऱ्या एकंदर विद्यार्थ्यांत याच विद्यार्थ्यांचें प्रमाण शेंकडा पांसष्टपर्यंत आहे.

### "दि ग्रेट पब्लिक स्कूल्स्"

ब्रिटिश साम्राज्य चालविणारीं माणसें जेथें तयार झालीं असा समज आहे; त्या प्रसिद्ध शाळांना पब्लिक स्कूल्स् असें म्हणातत. या शाळा प्रेक्षकाला पाहावयास मिळणें फार कठिण असतें. जरी एकाद्याला आंत प्रवेश व परवानगी मिळाली तरी बारीक खांचाखोचा व तपशीलवार माहिती तितक्याशा मोकळ्या मनानें दिली जात नाहीं, असा अनेकांचा अनुभव आहे. या शाळांचें खाजगी स्वरूप, त्यांचेवर झालेल्या व होत असलेल्या टीकेमुळें प्रेक्षकांची फाजील टीकाखोर अशी दृष्टि, आणि शिक्षणाचे कामांत तिऱ्हाइताचा व्यत्यय टाळण्याची चालकांची काळजी, या सर्व कारणांमुळें लोकांचा असा समज झालेला असेल. परंतु समज आहे व तो होण्यास कारणें आहेत, हें मात्र खरें.

### निवडक मुलांना प्रवेश

लंडन शहरापासून अर्धाएक तासाचे अंतरावर 'हॅरो ऑन् दि हिल्' नांवाचें एक इतिहासप्रसिद्ध पब्लिक् स्कूल आहे. एका निसर्गरमणीय अशा उंचीच्या जागेवर चारशें एकर जागेंत ही संस्था आहे. ही शाळा म्हणजे एक स्वतंत्र वसाहत किंवा लहान संस्थानच आहे. देशांतील सर्व भागांतून विद्यार्थी येथें येतात. ते सर्व मोठमोठ्या श्रीमंत आणि खानदानी घराण्यांतील असतात. मुलें जन्मास आल्याबरोबर त्यांचीं नांवें येथें नोंदविली तर प्रवेश मिळण्याचा संभव असतो, इतकी त्याची लोकप्रियता आहे. कांहीं कांहीं घराण्यांचें पिढीजाद शिक्षण या विद्यालयांत झालेलें असतें. आजोबा ज्या खोलींत राहिले तेथें वडील, आणि वडील ज्या खोलींत राहिले तेथें मुलगा राहतो. त्याला मुलगा झाल्याबरोबर तो तीच खोली अडकवून ठेवितो. ती नाहीं मिळाली तर तो शाळेंत येणार नाहीं! या ठराविक घराण्यांशिवाय आणि त्यांच्या परिवार–समाजाशिवाय एकाद्या गरीब विद्यार्थ्याला, तो जरी बृहस्पतीचा अवतार असला तरी, येथें प्रवेश मिळणें शक्य नाहीं. जन्मसिद्ध जातिभेद शिक्षणांत आहे तो असा.

## इंग्लिश वातावरण

या शाळांच्या इमारती चांगल्या प्रशस्त, मोठ्या, आणि हवाशीर आहेत. साहित्यसामुग्री भरपूर असते. इमारतीमध्यें जुने अवशेष व परंपरा अत्यंत काळजीपूर्वक राखून ठेविलेल्या आहेत. १६०० सालची अगदीं जुनी वर्गाची खोली काळजीपूर्वक जतन करून ठेविलेली आहे. लाकडाचीं जाडजूड बाकें झिजलेलीं आहेत. लाकडी भिंतींवर माजी विद्यार्थ्यांनीं आपापलीं नांवें चाकूनें कोरलेलीं आहेत. त्यांत बायरन, शेरिडन सारख्यांचीं विद्यार्थीवयांतील हस्ताक्षरें सांपडतात ! जुन्या विद्यार्थ्यांचीं नांवें लिहून निरनिराळ्या ठिकाणीं फलक लाविले आहेत. राष्ट्राच्या इतिहासांत या शाळेच्या माजी विद्यार्थ्यांपैकीं कोणी प्रधान, कोणी मुत्सद्दी, कोणी सेनापती वगैरे होऊन गेले त्यांचीं स्मारकें उभीं केलेलीं आहेत. महायुद्धांत ज्या विद्यार्थ्यांनी भाग घेतला त्यांचें स्वतंत्र स्मारक उभारलेलें आहे. सारांश, तीन शतकांचा जिवंत इतिहास येथें मुलांचे पुढें मूर्तिमंत उभा असून त्या वातावरणांत विद्यार्थी चोवीस तास राहात आहेत. आणखी निराळें शिक्षण काय पाहिजे ?

या शाळेंतील प्रत्येक विद्यार्थ्याला विशिष्ट गणवेष असतो. जांभळा कोट, करड्या रंगाची विजार, काळा नेक्टाय, व गवताची बसकी टोपी, असा पोषाख लहानापासून मोठ्या विद्यार्थ्याचा असतो. इतर शाळांचा निरनिराळा असतो. मॉनिटर्स, क्रिकेट टीमचे खेळाडू, इत्यादींना निराळ्या खुणा असतात. नऊ वर्षांपासून अठरा वर्षांपर्यंतचे विद्यार्थी येथें राहतात.

## नेतृत्वाचें अनुभवात्मक शिक्षण

या शाळांचें खरें शिक्षण वर्गांत होत नसून त्यांच्या वसतिगृहांत व क्रीडांगणावर होत असतें. पन्नास ते ऐंशी विद्यार्थ्यांचें एकेक वसतिगृह (हौस) असतें. तेथें एक गृह–शिक्षक (हौस मास्टर) सहकुटुंब राहतो. विद्यार्थ्यांमध्यें अंतर्व्यवस्थेच्या दृष्टीनें अधिकाऱ्यांच्या पायऱ्या असतात. त्यांना मॉनिटर्स म्हणतात. हे अधिकारी सर्व व्यवस्था पाहतात. कांहीं चूक झाली तर मुख्य अध्यापक सर्व मॉनिटर्संना बोलावून त्यांच्यावर जबाबदारी टाकतात.

आपणही मॉनिटर व्हावे अशी प्रत्येक मुलाची महत्त्वाकांक्षा असते. त्यापूर्वी उमेदवारी करावी लागते. या अनुभवाचे शिक्षणांतून पुढारी आणि हुकमत गाजविणारा वर्ग (गव्हर्निंग क्लास) निर्माण होतो असा इंग्लिश लोकांचा समज आहे. क्रीडांगणावरही आज्ञापालन, नेतृत्व, आणि सहकार्य यांचें शिक्षण मिळत असतें. सुटींत जगांतील निरनिराळ्या भागांत विद्यार्थी प्रवासाला व भौगोलिक आणि शास्त्रीय संशोधनाला जातात. दक्षिण ध्रुवाचें संशोधन करणाऱ्या स्कॉटच्या तुकडींतील एका संशोधकाचे नेतृत्त्वाखालीं पब्लिक स्कूल्स्‌मधील कांही विद्यार्थी फिनलँड व लॅपलँड या भागांत प्रवासाकरितां गेले होते. त्या वेळेपासून या संशोधनात्मक प्रवासाची गोडी विद्यार्थ्यांना लागली असून सर्व शाळांचें मिळून एक "पब्लिक स्कूल्स् संशोधक प्रवासी मंडळ" (एक्स्प्लोअरिंग सोसायटी) १९३३ मध्यें स्थापन झालेलें आहे. अशा रीतीनें अनुभवात्मक शिक्षणानें इंग्लिश पुढारी तयार होतात, देशभक्तीच्या शाब्दिक शिक्षणानें होत नाहीत.

## अभ्यासक्रमांत विशेष कांहीं नाहीं

येथील अभ्यासक्रमांत विशेष कांहीं नसतें. दुय्यम शिक्षणाचा ठराविक अभ्यासक्रम शिकविला जातो. लॅटिन भाषा आवश्यक व ग्रीक वैकल्पिक आहे. अध्यापनाचे पद्धतीमध्येंही कांहीं विशेष नाहीं. वर्गात विद्यार्थी थोडे असतात. साहित्यसामुग्री भरपूर असल्यामुळें प्रात्यक्षिक शिक्षणास मदत होते. या शाळेंत एक आर्ट स्टुडिओ व वर्कशॉप हीं खातीं आहेत. कारखान्यांत प्रत्येक विद्यार्थ्याला सुतारकाम शिकावें लागतें. अर्थात् हीं खातीं अलीकडेच निघालेलीं असावींत. पूर्वी प्राचीन भाषा शिकविण्यावर या शाळांचा फार भर असे. त्याचप्रमाणें खेळांत व सामन्यांत विद्यार्थ्यांचा अधिक वेळ जात असे. तेथील मुख्य अध्यापक व प्रसिद्ध इंग्लिश शिक्षण पुढारी मि. सिरिल् नॉरवुड् म्हणाले, "अभ्यासक्रमाला आधुनिक वळण देण्याकडे आणि उपयुक्त विषयांचा समावेश त्यांत करण्याकडे सध्यां विशेष प्रवृत्ति आहे." मीं विचारलें, "त्यामुळें शिक्षण फार उपयुक्ततावादी होईल असा आक्षेप येणार नाहीं काय?" त्यावर मि. नॉरवुड म्हणाले, "नाहीं, या शाळांचें खेळाकडे लक्ष होतें तें आम्हीं महत्प्रयासानें आतां अभ्यासाकडे खेंचलेलें आहे."

## गुरुकुल व पब्लिक स्कूल

बाह्य स्वरूपाच्या उपाधी सोडून दिल्यास गुरुकुलाचे व पब्लिक स्कूलसचे मुळांशीं तत्त्व एकच आहे. विशिष्ट वातावरणांत आणून विद्यार्थ्यांचें मन तयार करावयाचें हा दोन्ही संस्थांचा उद्देश आहे. परंतु गुरुकुलाचा साधेपणा पब्लिक स्कूलमध्यें नाहीं. कारण श्रीमंतांचे मुलांकरितां त्यांची योजना आहे. गुरुकुलाचा भर आध्यात्मिक वृत्ति वाढविण्यावर आहे, तर या शाळेचा भर साम्राज्यनिष्ठा, राष्ट्रीय स्वभाव, आणि इंग्लिश परंपरांविषयीं अभिमान या गोष्टींवर आहे. चारित्र्यसंवर्धन हा दोहोंचा उद्देश आहे. परंतु गुरुकुलांत चारित्र्याचा अर्थ आध्यात्मिक व नैतिकदृष्ट्या व्यक्तिविकास करणें हा आहे. पब्लिक स्कूलमध्यें चारित्र्याचा अर्थ एक विशिष्ट राष्ट्र, समाज, आणि नीति यांना अधिक अनुलक्षून आहे. एकाची भावना धार्मिक आहे, दुसऱ्याची भावना राष्ट्रीय आहे. पहिल्याचें लक्ष आध्यात्मिक जीवनाकडे आहे, दुसऱ्याचें भौतिक व इहलोकींच्या जीवनाकडे आहे.

## इंग्रजांची टीका

या शाळांची वार्षिक फी प्रत्येक मुलामागें दोन हजार रुपयांपासून चार हजार रुपयांपर्यंत आहे. इतकी फी देणारे पालक एका विशिष्ट वर्गांतीलच असणार. इंग्लिश लोकांचाच या शाळांवर असा आक्षेप आहे कीं, समाजांतील वरचा व खालचा वर्ग यांत या शाळा द्वंद्व उत्पन्न करतात. लहानपणापासून मुलगा सामान्य समाजापासून अलिप्त अशा फक्त एका विवक्षित समाजांतच वावरतो. त्यामुळें बहुजनसमाजाचा अनुभव त्याला येत नाहीं. त्या लोकांविषयीं वरच्या वर्गाला आपलेपणा वाटत नाहीं. हा आक्षेप दूर व्हावा म्हणून सार्वजनिक शाळांतील मुलांत मिसळण्याचे प्रसंग, कामकरी लोकांचे वस्तींत स्वयंसेवा, बालवीर संघ, इत्यादि मार्गांनीं प्रयत्न केला जातो. तरी पण पब्लिक स्कूल्स् श्रीमंतांसाठीं व कौन्सिल हायस्कूल्स् गरिबांसाठीं हा भेद इंग्लिश लोक विसरूं शकत नाहींत.

या शाळांवर विद्याखात्याचा मुळींच ताबा नाहीं. तरी पण कांहीं चालक आपण होऊन शाळा तपासून घेतात. शैक्षणिक दृष्टीनें कांहीं शाळा पुढारलेल्या आहे. अभ्यासक्रम व अध्यापनपद्धति यांत सुधारणा करण्याचा

प्रयत्न कांहीं पब्लिक स्कूल्स्नीं केलेला आहे. परंतु कांहीं शाळा अगदींच पुराणमतवादी आहेत. या शाळांची एकूण संख्या दोनशेंपर्यंत आहे.

## नवयुग शिक्षण विद्यालयें

इंग्लिश शिक्षणावर ज्यांचा परिणाम भावी काळांत होणार आहे अशा शाळा या खाजगी व स्वतंत्र शाळांच्या वर्गांत येतात. या शाळांवर विद्याखात्याचें कांहीं बंधन नाहीं. त्या ग्रँट घेत नाहींत. कांहीं विशिष्ट तत्त्वाकरितां किंवा शैक्षणिक प्रयोग करण्याकरितां त्या चालविलेल्या आहेत. साधारणपणें असें विधान करतां येईल कीं, श्रीमंतांकरितां पब्लिक स्कूल्स्, त्याचप्रमाणें बुद्धिजीवी, उच्च व मध्यम वर्गाकरितां या खाजगी शाळा आहेत. आर्थिक, सामाजिक, किंवा तात्त्विक कारणास्तव ज्या पालकांना पब्लिक किंवा कौन्सिल स्कूल्स् या वरच्या आणि खालच्या दोन्ही शाळांत मुलें पाठविण्याची इच्छा नसते, त्यांचेकरितां या मध्यम दर्जाच्या शाळा आहेत. त्यांचे चालक उदारवृत्तीचे, शांततावादी, शिक्षणाच्या नवीन तत्त्वांवर श्रद्धा असलेले, आणि ध्येयनिष्ट असे लोक आहेत.

या शाळांत पाऊल टाकल्याबरोबर निराळ्या वातावरणाचा अनुभव यतो. निसर्गरमणीय अशी जागा, भरपूर क्रीडांगण, मोकळ्या मनानें खेळणारीं, वागडणारीं मुलें, उल्हासित वृत्तीचे विद्यार्थी व शिक्षक, अशा प्रकारचा देखावा तेथें दिसतो. वर्गांतील फर्निचर सुटें असल्यामुळें वाटेल तेव्हां वर्गांत हालचालीकरितां मोकळी जागा करून घेतां येते. आर्ट स्टूडिओ, वर्कशॉप, ग्रंथालय, प्रयोगशाळा अशा ठिकाणीं मुलें हौसेनें आपापले अंगीकृत व्यवसाय करीत बसलेलीं असतात. एका शाळेच्या चालिकेनें सांगितलें कीं—"आमच्या शाळेचें सर्व काम ग्रंथालय, प्रयोगशाळा, व कलामंदिर या ठिकाणीं होत असतें."

## मोकळेपणाचें वातावरण

याही शाळांतील शिक्षणाचें महत्त्व अभ्यासक्रमांत नसून तेथील वातावरणांत आणि वर्गाबाहेर चालणाऱ्या व्यवसायांत आहे. एक विद्यार्थी म्हणाला, "इथें आम्ही शिक्षकांना 'सर' वगैरे म्हणत नाहीं. आम्ही त्यांना त्यांच्या घरगुती नांवानें हांका मारतों." दुसऱ्या एका शाळेचे व्यवस्थापक

म्हणाले, " या शाळेची शिक्षणपद्धति शब्दांत सांगणें फार कठिण आहे. आमचें शिक्षण विशिष्ट अभ्यासक्रमांत नाहीं. येथील वातावरणांत जें जीवन आहे तेंच आमचें शिक्षणवैशिष्टच." यांपैकीं कांहीं शाळा वसतिगृहाच्या व कांहीं केवळ शिक्षणाच्या आहेत. भांडीं घासणें, वाढणें वगैरे आपापलीं कामें मुलें स्वतःच हातांनीं करतात. तेथें मुलांचें खरेखुरें स्वराज्य असतें. शिस्तीमध्यें कठोरता नाहीं. मुलांच्या व शिक्षकांच्या वागण्यामध्यें मोकळेपणा दिसून येतो. अशा शाळांतून प्रेक्षकाला देखील एक प्रकारच्या आपलेपणाच्या भावनेनें वागवून शाळा दाखविली जाते. अशी वृत्ति इतर प्रकारच्या शाळांतून दिसून येत नाहीं. यांपैकीं कांहीं ठिकाणीं सहशिक्षणाचा प्रयोग चालू आहे. वसतिगृह शाळेंत असा प्रयोग करणें फारच जबाबदारीचें आहे, असें तेथील चालकानें सांगितलें.

## विशेष सुधारणा

या शाळांच्या अध्यापनपद्धतींत कांहीं ठिकाणीं डाल्टन प्लॅन (स्वाध्याय पद्धति) व प्रोजेक्ट मेथड (व्यवसाय पद्धति) यांचा अंशतः उपयोग केलेला दिसतो. परंतु असे अपवादाचे वर्ग सोडल्यास इतर ठिकाणीं नेहमींच्याच पद्धतीनें शिक्षण होतें. शुद्धलेखन, गणित, पाठांतर वगैरे बाबतींत आपल्याकडील व त्या शाळांत फारसा फरक दिसत नाहीं. अभ्यासक्रमाचे बाबतींत विशेष विचार किंवा सुधारणा या नवीन शाळांनीं केलेली आहे असें नाहीं. किंबहुना विद्यापीठाच्या परीक्षेकरितां तयारी करणें हें ध्येय गृहीत धरूनच दुसऱ्या बाजूचा विचार त्यांनीं सोडून दिलेला असावा. अध्यापनाच्या पद्धतींत सुधारणा आणि अभ्यासाव्यतिरिक्त इतर बाबतींत उदार आणि प्रागतिक दृष्टि हें या शाळांचें वैशिष्टच दिसतें. सहशिक्षण, सौम्य शिस्त, वागण्यांत मोकळेपणा, मुलांचें स्वराज्य, कला व हस्तव्यवसायांकडे लक्ष, आत्मप्रकटीकरणास अधिक वाव, त्याकरितां निरनिराळे व्यवसाय, अध्यापनांत नवीन पद्धतींचा अंशतः उपयोग इत्यादि गुणांमुळें नवयुग शिक्षणशाळा इतर शाळांपेक्षां उठून दिसतात.

यूरोप-अमेरिकेंत नवीन शिक्षणतत्त्वांची जी वाढ झाली तिचें अंतःकरणपूर्वक स्वागत इंग्लंडमध्यें सार्वजनिक शिक्षणांत झालें नाहीं म्हणन

हीं तत्त्वें अधिक लोकप्रिय करण्याकरितां खाजगी शाळांचे प्रयोग व प्रयत्न चालले आहेत. परंतु एकंदरीनें विचार करितां शिक्षणविषयक नवीन विचारांचा प्रसार व आचार इंग्लंडमध्यें कमी प्रमाणांत आहे.

## सामाजिक अलिप्तता

समाजापासून अलिप्तता हा दोष याही शाळांमध्यें थोड्या प्रमाणांत दिसतो. सुखवस्तु पालकांचीं मुलें आणून त्यांना, जरा चांगल्या अर्थानें, व्यक्तिनिष्ठ शिक्षण येथें दिलें जातें. समाजांत कांहीं दोष व अन्याय आहेत आणि त्यांच्या निरसनाकरितां तरुण पिढीच्या प्रयत्नांची जरूरी आहे अशी भावना मुलांत उत्पन्न होत नाहीं. कला व साहित्याच्या दृष्टीनें सुसंस्कृत जीवन कसें घालवावयाचें एवढेंच शिक्षण दिलें जातें. समाजांतील आजच्या परिस्थितीला अनुलक्षून तरुण पिढीला ध्येयवाद देण्याचा प्रयत्न फारसा होत नाहीं. अमेरिकेंतील व इंग्लंडमधील नवयुग शिक्षणसंस्थांवर हाच आक्षेप घेण्यांत येतो. या शाळांचें अनुकरण सध्यां हिंदुस्थानांत होत आहे. सुस्थित व सुखासीन अशा राष्ट्रांत या प्रकारचें व्यक्तिनिष्ठ शिक्षण क्षम्य होईल. परंतु ज्या देशाला आपला समाज नवीन जोमानें पुन्हां उभा करावयाचा आहे त्याच्या तरुण पिढीला व्यक्तिनिष्ठ शिक्षणापेक्षां समाजनिष्ठ शिक्षणाची अधिक जरूरी आहे. ही कसोटी लावून नवीन शाळांकडे पाहावें. केवळ कलामंदिर काढून चित्रकला–संगीत शिकविल्यानें आणि डाल्टन प्लॅन व प्रोजेक्ट मेथड सुरू केल्यानें शिक्षणसुधारणा होऊं शकत नाहीं. समाजाविषयीं मुलाच्या काय कल्पना करून दिल्या जातात आणि आयुष्यांत उपयोगी पडणारा असा जोरकस ध्येयवाद त्याला काय दिला जातो या गोष्टीवर हिंदुस्थानांतील नवयुग शिक्षण अवलंबून आहे. इंग्लंड अमेरिकेंतील शाळांच्या अनुकरणावर नाहीं.

## दुय्यम शिक्षणाचा कारभार

इंग्लंडच्या शिक्षणव्यवस्थेंत अंतर्व्यवस्था आणि बाह्य कारभार असा स्पष्ट भेद केलेला असतो. अंतस्थ कारभारांत मुख्य अध्यापकाला पूर्ण स्वराज्य असतें. हें स्वातंत्र्य टिकविण्याकरितां व अधिक मिळविण्याकरितां 'मुख्य अध्यापक परिषदे'चा (हेडमास्टर्स कॉन्फरन्सचा) नेहमीं प्रयत्न चालू

असतो. कौन्सिल शाळांच्या व्यवस्थेंत मुख्य अध्यापक गव्हर्निंग बॉडीच्या साहाय्यानें अंतर्व्यवस्था पाहतो. या मंडळांत शिक्षणसभेचे सभासद व सन्मान्य नागरिक असतात. बाह्य कारभाराचे बाबतींत मुख्य अध्यापक स्थानिक स्वराज्य सभेच्या तंत्रानें चालतो.

### ग्रँटचे नियम व अटी

विद्याखात्याकडून कौन्सिलच्या व इतर शाळांना ग्रँट मिळण्याच्या बाबतींत कांहीं नियम आहेत. शाळांची तपासणी, इमारती, साहित्य इत्यादि गोष्टींखेरीज पुढील नियमांचा त्यांत समावेश होतो. वर्षांतून छत्तीस आठवडे शाळा भरली पाहिजे ; वर्गात मुलांची कमाल संख्या तीस असावी ; बहुसंख्य विद्यार्थी शाळेंत निदान चार वर्षें म्हणजे प्रथम परीक्षेपर्यंत राहिले पाहिजेत ; आणि प्राथमिक शाळेंतून येणाऱ्या विद्यार्थ्यांना किमान शेंकडा पंचवीस नादारी दिल्या पाहिजेत. ही नादारीसंबंधींची अट घातली तेव्हां गरीब विद्यार्थ्यांचा फार भरणा होऊन आपल्या शिक्षणाचा दर्जा उतरेल अशी जुन्या शाळांना भीति पडली. त्यांना खास सवलत म्हणून नादारीचें प्रमाण पंचवीसपेक्षां कमी करण्यांत आलें, पण तें किमान दहा तरी असलेंच पाहिजे अशी अट आहे. या अटी पाळणाऱ्या शाळांना साधारणपणें खर्चाच्या निम्मी ग्रँट मिळते.

### फी व नादारी

नादारीचें प्रमाण शेंकडा पंचवीस ठरविलेलें असलें तरी कैक शाळातून तें साठपर्यंतही जातें. १९३३ सालीं विद्याखात्यानें नवीन फर्मान काढून अगदीं गरीब विद्यार्थ्यांना नादारी द्यावी व इतरांकडून उत्पन्नाचे मानानें निम्मी अथवा अधिक फी घ्यावी असा नियम केला आहे. महिन्याचे बारा ते सोळा पौंडांपेक्षां कमी उत्पन्न असलेल्या पालकांचे मुलाला नादारी मिळते; चांगल्या पालकाला नऊदहा पौंड वार्षिक फी द्यावी लागते. दुय्यम शिक्षणाकरितां दर विद्यार्थ्यागणिक शाळेला अंदाजें पसतीस पौंड खर्च येतो. फीसंबंधीं नवीन नियम १९३३ पासून अंमलांत आले आहेत.

### अभ्यासक्रमांतील विषय

इंग्लंडमधील हायस्कूलच्या शिक्षणक्रमांत प्रत्येक शाळेमध्यें कांहीं ना

कांहीं निराळी योजना केलेली आढळते. कारण अमुक एक अभ्यासक्रम शिकविलाच पाहिजे अशी विद्याखात्याची सक्ति नाहीं. प्रत्येक शाळेनें आपल्या विद्यार्थीवर्गाची जरूरी पाहून स्वतःची योजना करावी आणि विद्याखात्याची तिच्या चांगूलपणाविषयी खात्री पटवून ती मंजूर करून घ्यावी अशी पद्धति आहे. हायस्कूलच्या प्रथम आणि द्वितीय परीक्षांना ठेविलेल्या विषयांत ऐच्छिक निवडीला वाव असल्या कारणानें शाळांना आपापल्या जरूरीप्रमाणें निरनिराळ्या विषयांची सोय करितां येते. विद्याखात्यानें कांहीं विषय व वेळापत्रक सुचविलेलें असतें पण तो केवळ सल्ला म्हणूनच असतो. बंधन नाहीं. हे विषय व तास (पंचेचाळीस मिनिटांचे) असे आहेत—

**इंग्लिश हायस्कूलमधील विषय व तास**

| | | | |
|---|---|---|---|
| दोन इतर भाषा | ९ | रेखाकला | २ |
| गणित | ६ | हस्तव्यवसाय | २ |
| सायन्स | ६ | शारीरिक शिक्षण | २ |
| मातृभाषा-इंग्लिश | २—४ | गायन | १ |
| भूगोल | ३ | पवित्र ग्रंथ | १ |
| इतिहास | २ | | |

एकूण ३६ ते ३८

## मॅट्रिक व इंटरमीजिएटचे विषय

प्रथम परीक्षा चार वर्षांनीं व द्वितीय परीक्षा दोन वर्षांनीं होते. प्रथम परीक्षेला बौद्धिक विषयांचे तीन गट व कला विषयांचा एक गट असे चार गट असतात. त्यांतून कोणतेही पांच विषय घेऊन परीक्षेला बसतां येतें. मात्र कला विषयांपैकीं एकच विषय घ्यावा. कोणत्या तरी एका विषयांत उत्कृष्ट गुण मिळवावेत.

**हायस्कूल—प्रथम परीक्षेचे विषय**

(अ) इंग्लिश गट—(१) पवित्र धर्म, (२) इतिहास, (३) इंग्लिश, (४) भूगोल.
(ब) इतर भाषा गट—(१) लॅटिन, (२) ग्रीक, (३) फरेंच, (४) जर्मन, (५) स्पॅनिश, (६) इटालियन, (७) आरबी.

(क) भौतिक शास्त्रें——(१) प्राथमिक गणित, (२) उच्च गणित, (३) फिजिक्स, (४) केमिस्ट्री, (५) फिजिक्स व केमिस्ट्री, (६) जनरल सायन्स, (७) बॉटनी, (८) बायॉल्जी.

(ड) कला गट——(१) संगीत, (२) चित्रकला, (३) भूमितीची व मेकॅनिकलची रेखाकला.

दोन वर्षांनीं म्हणजे एकूण सहा वर्षांनीं दुसरी परीक्षा असते. यांत ऐच्छिक विषयांचें क्षेत्र निवडून त्याचा उच्च दर्जाचा अभ्यास असतो. हा अभ्यास धड कॉलेजचा नाहीं व धड शाळेचाही नाहीं अशी कॉलेज अध्यापकांची त्याविषयीं तक्रार आहे. पुढील सहा क्षेत्रांपैकी एक मुख्य व एक दुय्यम अशीं क्षेत्रें निवडून विद्यार्थ्यानें एकंदर पांच किंवा सहा पोटविषयांचा अभ्यास करावयाचा असतो. हे विषय इकडील इंटरमीजिएटप्रमाणेंच वाटतील.

### हायस्कूल——द्वितीय परीक्षेचे विषय

१. प्राचीन भाषा व संस्कृति——ग्रीक व लॅटिन भाषा, वाङ्मय आणि संस्कृति.
२. अर्वाचीन भाषा व संस्कृति——यूरोपियन भाषा, इतिहास व संस्कृति.
३. प्राचीन व अर्वाचीन भाषा आणि संस्कृति——पहिल्या दोन क्षेत्रांचें मिश्रण.
४. विज्ञान, गणित, भौतिक शास्त्रें इत्यादि.
५. भूगोलाबरोबर इतिहास व भौतिक शास्त्रें, यांपैकीं निदान एक आवश्यक. यांपैकीं दोनच विषय घेतल्यास आणखी तिसरा ऐच्छिक विषय निवडणें.
६. विद्याखात्याचे संमतीनें जरूर त्या विषयांचा शिक्षणक्रम करून घेतां येतो.

विद्यापीठांकडून द्वितीय परीक्षा घेतली जाते. त्यांत निरनिराळ्या प्रकारानें विषयांचें मिश्रण केलेलें असतें. एका विषयाचा विशेष अभ्यास करून इतर विषयांचा सामान्य अभ्यास व्हावा हें त्यांत धोरण दिसतें. निरनिराळ्या विद्यापीठांच्या परीक्षांनीं ठेविलेल्या ऐच्छिक व आवश्यक विषयांची संख्या प्रथम परीक्षची अठ्ठावीस व द्वितीय परीक्षेची चोवीस होईल.

## अभ्यासक्रमावर आक्षेप

वरील अभ्यासक्रमावर असे आक्षेप आहेत कीं, त्यांत बौद्धिक विषयांच्या निवडीस पुष्कळ वाव असला तरी कला व हस्तकला यांच्या निवडीस फारसा वाव ठेविलेला नाहीं. परीक्षेचा व पदवीचा पगडा सर्व अभ्यासक्रमावर पडल्यानें सेंट्रल स्कूलसारख्या उद्योगप्रधान शाळेंतील मुलांनाही बौद्धिक विषय घेऊन परीक्षेला बसावेसें वाटतें. हिंदुस्थानांत अभ्यासक्रमाचे विषय व परीक्षा यांचेबाबत ज्या अडचणी आहेत त्याच इंग्लंडमध्यें आहेत. फरक एवढाच कीं, इंग्लिश अभ्यासक्रमांत बौद्धिक विषयांचे निवडीला थोडा अधिक वाव आहे. परंतु इतकी सुधारणा आपल्याकडेही कांहीं प्रांतांतून झाली आहे. सर्वस्वीं इंग्लिश पद्धतीचें अनुकरण केल्यामुळें तेच दोष आपल्याही शिक्षणांत उतरलेले आहेत. आज इंग्लिश शिक्षणसुधारणावाद्यांची अशी मागणी आहे की बौद्धिक आणि कलात्मक असे अनेक विषय परीक्षेकरितां ऐच्छिक म्हणून असावेत, आणि कोणतेही विषय घेतले तरी शिफारसपत्र मात्र एकाच प्रकारचें व दर्जाचें असावें. कारण कलात्मक विषयांना कमी दर्जाचें व बौद्धिक विषयांना वरच्या दर्जाचें शिफारसपत्र दिल्यास सर्वांची प्रवृत्ति बौद्धिक विषयांकडेच होते. हिंदुस्थानचा व इंग्लंडचा प्रश्न एकच आहे.

## परीक्षांची भूमि

इंग्लंडमधील शिक्षण पाहिलें म्हणजे असें वाटतें कीं, त्यांत परीक्षांचा फार बुजबुजाट झालेला आहे. त्याविरुद्ध इंग्लिश लोकांचीही ओरड चालली आहे. स्वातंत्र्यामुळें शिक्षणांत जी विविधता व प्रयोगवृत्ति उत्पन्न व्हावयाची ती या परीक्षापद्धतीनें मारून टाकली आहे. त्यामुळें सध्यां या दोषाकडे तज्ज्ञांचें विशेष लक्ष वेधलें आहे. १९१७ पूर्वी तर या परीक्षांची संख्या आजच्यापेक्षां अधिक होती. सध्यां हायस्कूलप्रवेश, हायस्कूल प्रथम व हायस्कूल द्वितीय अशा तीन परीक्षा कॉलेजमध्यें जाण्यापूर्वी आहेत. विद्यापीठें एकंदर एकोणीस आहेत तरी कांहींच्या परीक्षा सहकारितेनें होतात. त्यामुळें सध्यां परीक्षा घेणाऱ्या अशा आठ संस्था आहेत—जॉइंट मॅट्रिक्युलेशन बोर्ड ऑफ नॉर्थर्न युनिव्हर्सिटीज्, ऑक्स्फर्ड-केंब्रिज स्कूल्स् एक्झामिनेशन बोर्ड, लंडन-ब्रिस्टल-

डरहॅम युनिव्हर्सिटीज् इत्यादि. या परीक्षांमुळें शिक्षणाचा दर्जा सगळीकडे सारखा होतो. परंतु त्यांचेखालीं विद्यार्थ्यांचें व्यक्तित्व दडपून जातें. विशिष्ट कारखान्यांकरितां सगळे विद्यार्थी तयार केले जातात.

निकालांचें प्रमाण १९३१ सालीं प्रथम व द्वितीय परीक्षांचें अनुक्रमें ६७.२ व ६९.२ असें होतें.

## इंग्लिश व हिंदी शिक्षण

पुढच्या पिढींत शिक्षणसुधारकांचें मुख्य लक्ष दुय्यम शिक्षणाच्या सुधारणेकडे लागेल असें स्पष्ट दिसतें. परंपरागत चालत आल्यामुळें या शिक्षणांत पुराण पद्धतींनीं आपलें ठाणें दिलें आहे. त्या सहजासहजीं आपलें स्थान सोडणार नाहींत. अभ्यासक्रमाची विविधता, परीक्षापद्धतींत सुधारणा, अधिक विद्यार्थ्यांना दुय्यम शिक्षणाची संधि, शैक्षणिक जातिभेदाचें उच्चाटन, इत्यादि अनेक दृष्टींनीं इंग्लिश दुय्यम शिक्षणाचे पद्धतीत सुधारणा व्हाव्यात म्हणून लोकांची मागणी आहे. या मागण्यांना अनुसरून असा बदल शिक्षणांत हळुहळू होणें अपरिहार्य आहे.

हिंदुस्थानांतील दुय्यम शिक्षणाचे क्षेत्रांतील कार्यकर्त्यांनीं केवळ इंग्लिश शिक्षणाकडे न पाहतां जगांतील इतर पद्धतींकडेही पाहावें. म्हणजे एकाच शिक्षणपद्धतीचें अनुकरण केल्यानें दोषांचेंही अनुकरण होण्याचा जो संभव असतो तो कमी होतो. विविधता पाहिल्यानें स्वतंत्र विचार सुचतात. एकच पद्धति पाहिल्यानें अनुकरणबुद्धि उत्पन्न होते. आज हिंदी शिक्षणांत इंग्लिश दोषांचेंच अनुकरण झालें आहे. प्राचीन भाषांवर अवास्तव भर, परीक्षा-पद्धतीचें फाजील स्तोम, 'सर्टिफिकेट' पद्धतीची गुलामगिरी, बौद्धिक विषय-प्रधान एकांगी अभ्यासक्रम, उद्योग व कला यांविषयीं अनास्था, इत्यादि दोष इंग्लिश व हिंदी दोन्ही शिक्षणांत सारखेच आहेत. ते नाहीसे करावयाचे असतील तर आपल्या शिक्षणाची सांगड दुसऱ्या एकाद्या देशाशीं न घालतां, परंतु दुसऱ्यांच्या अनुभवाचा फायदा घेऊन, आपला स्वतंत्र मार्ग आपणच आंखला पाहिजे. इंग्लिश लोक स्वतःच्या विचारानें चालतात. हिंदी लोकांनींही तेंच करणें युक्त आहे.

## प्रकरण सोळावें

# औद्योगिक संस्थांचा प्रचंड व्याप

### धंदेशिक्षकांचे विचार

लंडनमधील एका टेक्निकल स्कूलच्या मुख्य अध्यापकाशीं संवाद चालला होता. औद्योगिक शिक्षण आणि इंग्लंडची औद्योगिक भरभराट यांचा संबंध काय आहे असा प्रश्न होता. तो म्हणाला, "इंग्लंडची औद्योगिक वाढ त्याच्याजवळ कोळसा, लोखंड, आणि वसाहती असल्यामुळें झाली. आतां इतर राष्ट्रें त्याच्यापुढें जाऊं लागली आहेत. * * * सध्यां औद्योगिक क्षेत्रांत उद्योगांची संख्या पुष्कळ झाली आहे. त्यामुळें विशिष्ट धंद्याचें शिक्षण मुलाला दिल्यास कदाचित् तें पुढें निरुपयोगी होईल. म्हणून विशिष्ट धंद्याच्या शिक्षणापेक्षां सामान्य मूलभूत असे शिक्षण देण्याकडे सध्यां प्रवृत्ति आहे. त्यामुळें बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेणें माणसाला शक्य होईल." "हिंदुस्थानांत औद्योगिक शिक्षणानें उद्योगधंदे अस्तित्वांत येऊं शकतील काय?" असा प्रश्न अनेक धंदेशिक्षकांना विचारला परंतु या प्रश्नाचें उत्तर देण्याइतका विचार अर्थातच कोणीं केलेला नव्हता.

### गवंड्यांचें शास्त्रोक्त शिक्षण

लंडनच्या पश्चिम भागांत इमारतबांधकामविषयक शिक्षण देण्याकरितां एक धंदेशिक्षणाची शाळा आहे. शाळेची इमारत अगदी नवीन आहे. प्राथमिक व दुय्यम शाळांच्या इमारतींपेक्षांही या इमारतीत विजेचा पाळणा वगैरे अद्ययावत् सोयी होत्या. शाळेंतील शिक्षणविषयक साहित्यसामुग्रीही उत्कृष्ट होती. शाळेच्याच आवारांत प्रयोगाकरितां लहान इमारती प्रत्यक्ष बांधून त्या मोडण्याची सोय होती.

या शाळेंत दिवसां तीनशें विद्यार्थी पूर्णकाल धंदेशिक्षण घेतात. रात्रीं सातशें प्रौढ विद्यार्थी पुरवणी शिक्षण घेण्याकरितां येतात. दिवसभर ते पोटाकरितां अन्यत्र याच धंद्यांत काम करतात.

या शाळेला प्राथमिक धंदेशिक्षण शाळा (ज्यूनियर ट्रेड स्कूल) म्हणतात.

प्राथमिक शिक्षणाची सहा व उच्च प्राथमिकचीं तीनचार अशीं नऊदहा वर्षे शिक्षण झाल्यावर विद्यार्थी या शाळेंत दाखल होतात. उद्योगधंद्यांत ज्या प्रमाणांत कामगारांची मागणी असेल त्या प्रमाणांत विद्यार्थी घेतले जातात.

या मुलांना तीन वर्षांचा अभ्यासक्रम असतो. त्यांतील पहिलीं दोन वर्षे दुय्यम शाळेंत मिळणारें सामान्य शिक्षण असतें. भाषा, गणित, इतिहास, विज्ञान, व रेखाकला हे विषय शिकविले जातात. तिसऱ्या वर्षी धंद्याचें विशिष्ट शिक्षण दिलें जातें. हें शिक्षण पूर्ण झाल्यावर इमारत बांधकामाच्या निरनिराळ्या धंद्यांत विद्यार्थी पडतात. सुतारकाम, गवंडीकाम, वास्तुशिल्प-कला, डिझाईनिंग इत्यादि प्रात्यक्षिक शिक्षण मिळतें. अनुभवाकरितां बाहेर काम मिळण्याची फारशी सोय नाहीं, असें अध्यापकानें सांगितलें. या शिक्षणाबद्दल लोकमत विचारतां तो म्हणाला, "दुय्यम किंवा सेंट्रल स्कूलच्या शाळांपेक्षां येथील शिक्षण कमी दर्जाचें आहे, असें मानण्याची वृत्ति लोकांत नाहीं."

## टेक्निकल इन्स्टिटयूटचें दर्शन

या प्रकारच्या सर्व संस्था औद्योगिक काम करणाऱ्या लोकवस्तींत आहेत. भोंवतालीं गरीब कामगारवर्गाची वस्ती दिसते. ज्या प्रकारची कामें लोक करतात त्याच कामाचें शिक्षण देण्याची शाळा त्या त्या वस्तींत असते. अशा रीतीनें लंडन शहराच्या आसमंतात् अनेक ज्यूनियर टेक्निकल स्कूल्स् पसरलीं असून तेथें प्रत्येक धंद्याचें शिक्षण दिलें जातें. येथें प्राथमिक धंदेशिक्षण झाल्यानंतर उच्च शिक्षण देण्याकरितां शहराला मध्यवर्ती अशा भागांत माध्यमिक औद्योगिक शिक्षणसंस्था (पॉली-टेक्निकल् स्कूल किंवा लोकल् कॉलेज) आहेत.

या शाळेंत दिवसा मुलें व रात्रीं प्रौढ कामगार लोक शिकण्याकरितां येतात. साहित्यसामुग्री व यंत्रें अगदीं आधुनिक पद्धतीचीं ठेवलेलीं आहेत. मुलांनीं घडविलेलें कामही चांगल्या दर्जाचें होतें. बौद्धिक शिक्षणाच्या शाळांतील मुलांपेक्षां या शाळांतील मुलें आपल्या कामांत अधिक समाधिपूर्वक गढून गेलेलीं दिसलीं. प्रत्येक जण यंत्रापाशीं कांहीं ना कांहीं काम करीत होता. इंग्लंडच्या उद्योगधंद्यांतील भावी कामगार येथें तयार

होतात. शाळेंत दोनतीन मॅजिक लँटर्न आणि एक एपिडायास्कोप अशी दृष्टिशिक्षणाची सामुग्रीही होती. यावरून धंदेशिक्षण शाळेंतील सामुग्री परिपूर्ण ठेवण्याकडे किती कटाक्ष आहे, तें लक्षांत येईल.

यांत्रिक उद्योगधंदे (मेकॅनिकल् आर्टस्) हें येथील वैशिष्टच आहे. परंतु बौद्धिक शिक्षणाचा पाया पक्का करून घेण्याचे दृष्टीनें विज्ञान (फिजिक्स, केमिस्ट्री), गणित, इतिहास, इंग्लिश इत्यादि विषयही शिकविले जातात. फक्त फरेंच किंवा जर्मन इत्यादि परभाषा शिकविल्या जात नाहींत. हायस्कूलच्या शिक्षणक्रमांतील इतर विषय अधिक प्रात्यक्षिक पद्धतीनें शिकविले जातात. धंदेशिक्षणाचे दृष्टीनें कार्पेंटरी, पॅटर्न मेकिंग, मशिन शॉप, इलेक्ट्रिकल् वर्कशॉप, डिझाइनिंग इत्यादि विषय अभ्यासक्रमांत असतात.

याच शाळेला जोडून स्त्रियांच्या धंदेशिक्षणाचा एक विभाग आहे. तेथें शिवणकाम, स्त्रियांचे झगे करणें व टोप्या करणें असे तीन धंदे शिकविले जातात. लंडनमध्यें इतरत्र स्वयंपाककला, व वाढपीकला इत्यादि शिकविण्याच्या शाळा आहेत.

मोनोटेक्निकल् स्कूल्स्मध्यें एकच धंदा शिकविला जातो; पॉलि-टेक्निकल् स्कूलमध्यें अनेक धंद्यांचें शिक्षण मिळतें. लंडनमध्यें दोन्ही प्रकार आहेत.

## धंदेशिक्षणाचा कारभार

संघटित आणि पूर्णकाल धंदेशिक्षणाला प्रारंभ १९०२ पासून झाला. या सुमारास ज्यूनियर टेक्निकल स्कूल्स् सारख्या संस्था निघाल्या. यापूर्वी पुरवणी शिक्षण म्हणून रात्रींच्या धंदेशिक्षणाच्या शाळा १८७० पासून निघालेल्या आहेत. त्या अद्यापही अस्तित्वांत आहेत. १९१८ सालीं जो फिशर कायदा झाला त्यांत ‘पुरवणी शिक्षण’ (कंटिन्युएशन स्कूल) सक्तीचें असावें अशी योजना होती. परंतु काटकसरीच्या धोरणामुळें या निघालेल्या शाळा बंद पडल्या. सक्तीचे पुरवणी शिक्षणाची योजना जर्मनींत व अमेरिकेंत आहे तशी अद्याप इंग्लंडमध्यें अस्तित्वांत आलेली नाहीं. त्या दृष्टीनें अद्याप हा देश मागें आहे.

धंदेशिक्षणाचा सगळा कारभार मुख्य विद्याखात्याकडे (बोर्ड ऑफ

एज्युकेशन) आहे. प्रत्यक्ष शाळा काढणें व चालविणें कामें हीं स्थानिक स्वराज्य सभा व म्युनिसिपालिट्या करितात. लंडन, मँचेस्टर वगैरे शहरांतील संस्था तेथील स्थानिक स्वराज्य सभांनीं चालविलेल्या आहेत. अर्थात् विद्याखात्याकडून खर्चाकरितां त्यांना ग्रँट मिळते.

## औद्योगिक शिक्षणाचें वैपुल्य

इंग्लंडमध्यें जरूरीपेक्षां अधिक धंदेशिक्षण झालेलें आहे. नकोत इतकीं माणसें या शाळांतून तयार होत आहेत. प्राथमिक, माध्यमिक, आणि उच्च धंदेशिक्षणसंस्था लहानमोठ्या गांवांतून व शहरांतून सर्वत्र पसरलेल्या आहेत. प्रत्येक गांवांत बहुतेक एक टेक्निकल् स्कूल असतें. तेथें यांत्रिक शिक्षण, व्यापारी शिक्षण, आणि गृहशास्त्र शिक्षण या तीन शाखांची तरी सोय असतेच. १९२८ चे सुमारास या शाळांची व त्यांमधील विद्यार्थ्यांची संख्या किती होती ती पुढें दिली आहे--

| शाळेचा प्रकार | संख्या | विद्यार्थी |
|---|---|---|
| इव्हनिंग स्कूल्स् (रात्रींच्या धंदेशाळा) | ४,२९९ | ७,२७,६५० |
| स्कूल ऑफ आर्ट (कलागृह) | २३१ | ५१,४९२ |
| डे टेक्निकल् क्लासेस् (यांत्रिक शिक्षणवर्ग) | १२२ | १७,०७० |
| ज्यूनियर टेक्निकल् स्कूल्स् (प्राथमिक धंदेशाळा) | १०१ | १८,७०४ |
| डे कंटिन्युएशन स्कूल्स् (पुरवणी शाळा) | ६७ | २३,८८४ |
| सीनियर कॉलेजेस् (उच्च धंदेशिक्षण संस्था) | ५० | ५,६७० |
| ज्यूनियर आर्ट डिपार्टमेंट्स् (प्राथमिक कलागृहें) | २९ | १,७८४ |
| ज्यूनियर हौसवाइफ्री स्कूल्स् (गृहशास्त्र शिक्षण) | १२ | ७८७ |
| नॉटिकल् स्कूल्स् (नाविक विद्यालय) | ६ | १,३९० |

विश्वविद्यापीठांतून चालू असलेल्या उच्च शिक्षणाचे औद्योगिक संस्थांचा वरील आंकड्यांत उल्लेख आलेला नाहीं. नवीन निघालेल्या विद्यापीठांचें या शिक्षणाकडे विशेष लक्ष आहेच. पण जुनीं विद्यापीठेंही एंजिनिअरिंग, मेडिकल्, अॅग्रिकल्चरल्, फॉरेस्ट्री इत्यादि शिक्षणाकडे लक्ष देत आहेत. यांतून औद्योगिक शिक्षण घेतलेले पदवीधर विद्यार्थी बाहेर पडतात.

ज्या वस्तींत किंवा भागांत जो धंदा चालू असेल त्या ठिकाणीं त्या विषयाची धंदेशाळा काढावयाची असें तत्त्व आहे. त्यामुळें या धंद्यांतील प्रौढ कामगारांना त्या शाळेचा उपयोग होतो. मुलांना तर होतोच. अशा रीतीनें शाळेचा उद्योगधंद्याच्या सुधारणेकडे उपयोग केला जातो. लंडन-मँचेस्टर सारख्या शहरांत निरनिराळ्या भागांत मिळून अनेक धंद्यांच्या शाळा आहेत. समुद्रकिनाऱ्यानजिक जहाजें बांधण्याच्या आणि नाविक विद्येच्या शाळा आहेत. स्वयंपाक-कला, नाविक-कला, धोबी-कला अशा लहानसहान धंद्यांपासून तों शेतीच्या आणि एंजिनियरिंगच्या उच्च संशोधनापर्यंत सर्व दर्जाच्या उद्योगधंद्यांच्या शिक्षणसंस्था इंग्लंडमध्यें आहेत. त्यांच्याच जोरावर हा देश उद्योगधंद्यांमध्यें टिकाव धरून राहिलेला आहे.

## औद्योगिक शिक्षणांतील धोरणें

औद्योगिक शिक्षणाच्या संघटनेंत इंग्लिश लोकांचीं कांहीं विशेष तत्त्वें ठरल्यासारखीं आहेत. त्यांची एकदां माहिती झाली म्हणजे या शिक्षणसंस्थांचें स्वरूप व अभ्यासक्रम यांविषयीं सहज कल्पना येते.

व्यावहारिक दृष्टि हा या शिक्षणांतील विशेष आहे. प्रत्यक्ष काम करावें म्हणजे शिक्षण होतें. माणसानें सर्वसामान्य शिक्षण झाल्यावर प्रथम शक्य तितकें व्यवहारांत व प्रत्यक्ष कामांत पडावें, मग तें काम चालू असतां हळुहळू पुढचें शिक्षण चालू ठेवावें. त्या योगानें अनुभव आणि ज्ञान यांची चांगली सांगड जमते. या तत्त्वावरील विश्वासामुळें धंदेशिक्षणाच्या रात्रीं चालणाऱ्या पुरवणी शाळांची संख्या चार हजारांचेवर गेली आहे. शाळांच्या अभ्यासक्रमांतही प्रत्यक्ष कामावर व अनुभवावर अधिक भर दिलेला असतो. त्या विषयाच्या तात्त्विक शिक्षणाकडे जरूरीपुरतें लक्ष दिलें जातें. कांहीं शाळांत शिक्षण आणि कारखान्यांतील काम यांना आलटून पालटून वेळ दिला जातो या पद्धतीला सँडविच् सिस्टिम् म्हणतात.

धंद्याच्या शिक्षणाबरोबर सर्वसामान्य शिक्षण (साऊंड जनरल एज्युकेशन) चांगलें झालें पाहिजे असा या लोकांचा दृढ सिद्धांत आहे. पालकाचें धोरण मुलाला शक्य तितकें सर्वसामान्य बौद्धिक शिक्षण देऊन नंतर धंद्यांत घालण्याचें असतें. त्याचप्रमाणें औद्योगिक शिक्षणक्रमांतही केवळ औद्योगिक

विषयांचा अभ्यासक्रम नसतो ; त्याबरोबर भाषा, इतिहास, भूगोल, गणित, विज्ञान इत्यादि विषयांचा अभ्यास असतो. शक्य तर या विषयांचा विशिष्ट उद्योगधंद्याचे दृष्टीनें अभ्यास आंखला जातो. व्यापारी शिक्षणांत व्यापारी दृष्टीनें भाषा, भूगोल, व इतिहास; यांत्रिक शिक्षणांत यंत्रशास्त्राचे दृष्टीनें गणित व विज्ञान, अशा प्रकारची योजना असते. एकंदर धंदेशिक्षणाच्या अभ्यासक्रमांत एकचतुर्थांश किंवा एकपंचमांश वेळ तरी या सामान्य बौद्धिक शिक्षणाला दिला जातो.

धंदेशिक्षणाच्या विषयांतही एका विशिष्ट धंद्याचे शिक्षणावर भर देण्यापेक्षां अनेक तत्सदृश धंद्यांना मूलभूत असें शिक्षण देण्याकडे शाळांचें विशेष लक्ष असतें ; कारण औद्योगिक क्रांतीच्या युगांत उद्योगधंदे बदलत असतात. आज चालू असलेल्या धंद्यांचें स्वरूप एकसारखें बदलत असतें. त्या बदलत्या परिस्थितीबरोबर स्वतःच्या कलेला जुळवून घेण्याचें ज्ञान व्यक्तीच्या ठिकाणीं पाहिजे. तें नसल्यास बेकारीची भीति आहे.

शाळेंत शिकविण्याचे दृष्टीनें कोणताही धंदा हलका नाहीं, हेंही तत्त्व लक्षांत घेण्यासारखें आहे. नापिक क्रियेसारखाही धंदा शिकविण्याच्या शाळा आहेत. असें ऐकल्यानंतर अपरिचित माणसाला हंसूं येईल. कोणत्याही विषयाला शाळा आणि शिक्षक मिळाल्यानंतर त्या विषयाचा पद्धतशीर अभ्यास होऊं लागतो. त्यामुळें तो धंदा सुधारतो. धंद्यांत पडलेल्यांची आर्थिक स्थिति सुधारते आणि समाजाचा फायदा होतो. प्राचीन शास्त्रांत चौसष्ट कलाशिक्षणामध्यें क्षुद्र कलांचाही समावेश केलेला होता. यावरून प्रत्येक कलेच्या पद्धतशीर शिक्षणाचें समाजाला किती महत्त्व आहे हें सिद्ध होतें.

देशाच्या प्रगतीला उत्कृष्ट औद्योगिक शिक्षणाची जरूरी आहे. या तत्त्वांची जाणीव इंग्लिश लोकांना झालेली आहे. त्यामुळें प्राथमिक व उच्च अशा धंदेशाळांचें जाळें त्यांनीं सर्व देशभर पसरलें आहे. त्यांत साहित्य-सामुग्रीही उत्कृष्ट आणि अद्ययावत् अशी आहे. असेंही म्हणतां येईल कीं, खर्चाचे दृष्टीनें बौद्धिक शिक्षणापेक्षां इंग्लंडचें धंदेशिक्षणाकडे अधिक लक्ष आहे. या शिक्षणाचा किती अतिरेक झाला आहे याविषयीं लंडनच्या शिक्षण-

खात्यांतील मि. स्पेन्सर नांवाचे गृहस्थ लिहितात—"देशांत जरूरी आहे त्यापेक्षां अधिक व्यापक अशा धंदेशिक्षणाची सोय इंग्लिश विद्यापीठांनीं केली आहे, असें म्हणतां येईल."

### धंदेशिक्षणाची उतरंड

इंग्लिश बालकाच्या धंदेशिक्षणास त्याचे बालवर्गातच प्रारंभ होतो. तेथें प्रत्यक्ष धंदा शिकविला जातो असें नव्हे ; तर कोणताही हस्तव्यवसाय करण्यास लागणारें हातांचें आणि इंद्रियांचें मूलभूत शिक्षण त्या ठिकाणीं होतें. कागद कांपणें, मातकाम, वेतकाम, मेकॅनोसारखे यांत्रिक खेळ इत्यादि कामें प्राथमिक शाळेंतून करून घेतली जातात. उच्च प्राथमिक शिक्षणांत आणि दुय्यम शिक्षणांतही सुतारकाम किंवा यांत्रिक काम आणि रेखाकला यांचा समावेश केलेला असतो. सेंट्रल स्कूल्स् हीं बौद्धिक व औद्योगिक शिक्षणाचे मिश्रणानेंच झालीं आहेत. बौद्धिक शिक्षणांतील हस्तव्यवसायाच्या शिक्षणाचा हा एक प्रकार झाला. याला प्रत्यक्ष धंदेशिक्षण न म्हणतां हस्तव्यवसाय व इंद्रियशिक्षण असें संबोधलें जातें.

दुसरा प्रकार पुरवणी धंदेशिक्षण शाळांचा किंवा रात्रींच्या शाळांचा (पार्ट टाईम ईव्हनिंग ट्रेड स्कूल्स्, कंटिन्यूएशन स्कूल्स् इ.) आहे. प्रत्यक्ष धंदा करणारांना त्या व्यवसायाचें पद्धतशीर शिक्षण रोज एकदोन तास दिलें जातें. त्यालाच जोडून जरा वरच्या दर्जाचें शिक्षण टेक्निकल स्कूल्स् व टेक्निकल् कॉलेजेस् नांवाच्या संस्थांमध्यें दिलें जातें. या सर्व संस्था धंद्यांतल्या लोकांकरितां दिवसांतून थोडा वेळ (पार्ट टाईम्) शिक्षण देणाऱ्या आहेत.

त्यापेक्षां वरच्या दर्जाचें शिक्षण टेक्निकल स्कूल्स् व लोकल कॉलेजेस् या संपूर्ण दिवस शिक्षण देणाऱ्या संस्थांतून दिलें जातें. या शाळांत जाणारांना शिक्षण चालू असतां उद्योगधंदा करतां येत नाहीं.

सर्वांत वरच्या दर्जाचें शिक्षण विश्वविद्यापीठाच्या धंदेशिक्षण संस्थांतून होतें. तें पूर्ण करणारांना पदव्या मिळतात. त्याव्यतिरिक्त इतर शिक्षणाकरितां सर्टिफिकेट्स् व डिप्लोमा वगैरे दिले जातात.

अशा रीतीनें प्राथमिक, माध्यमिक, आणि उच्च धंदेशिक्षणाची ही

उतरंड आहे. देशांतील प्रत्येक व्यक्ति यांपैकीं कोठें तरी सहज शिक्षण घेऊं शकते.

## सेंट्रल स्कूल्स—बौद्धिक व औद्योगिक शिक्षण

औद्योगिक वळणाचें (बायस्) बौद्धिक शिक्षण देण्याकरितां या शाळा लंडनमध्यें १९११ मध्यें प्रथम निघाल्या. हायस्कूलपेक्षां कमी परंतु प्राथमिक-पेक्षां उच्च अशा मध्यम दर्जाचें शिक्षण देऊन त्यांत औद्योगिक विषयांची भर घालणें हा त्यांचा उद्देश आहे. कामगार वर्गापैकीं वरच्या दर्जाच्या समाजांतील मुलांकरितां हें शिक्षण आहे. एकूण चार वर्षांचा अभ्यासक्रम असतो. त्यांत दोन वर्षें सामान्य शिक्षण व नंतर दोन वर्षें विशेष धंद्याचें किंवा व्यापाराचें शिक्षण अशी योजना आहे. बौद्धिक शिक्षणांत हायस्कूलचेच विषय असतात. परंतु ग्रीक लॅटिन्ऐवजीं फरेंच किंवा जर्मन अशा अर्वाचीन भाषा शिकवितात. विज्ञान व गणितासारखे विषय शिकवितांना त्यांच्या औद्योगिक क्षेत्रांतील उपयोगाकडे लक्ष दिलें जातें. इंग्शिल, परदेशी भाषा, इतिहास वगैरे विषयांचा व्यापारी शिक्षणशाखेंत त्या दृष्टीनें विस्तार केला जातो.

औद्योगिक शिक्षणांत यांत्रिक उद्योगधंदे, व्यापार, व गृहशास्त्र अशा तीन शाखा आहेत. यांशिवाय एकादा विशेष स्थानिक धंदा असल्यास त्याचा समावेश केला जातो. या शाळांतून बाहेर पडणाऱ्या मुलांमुलींना उद्योगक्षेत्रांत चांगली मागणी आहे. व्यापारी शिक्षणाकडे विद्यार्थ्यांचा विशेष ओढा आहे.

## बौद्धिक व औद्योगिक शाखांचा कलह

हायस्कूलचे व या शाळेचे बौद्धिक शिक्षणाचे कांहीं विषय एकच असल्यामुळें औद्योगिक शिक्षणापेक्षां हायस्कूलच्या प्रथम परीक्षेस बसण्याकडे मुलांचा अधिक कल होऊं लागला आहे ; कारण त्या परीक्षेला सामाजिक दर्जा चांगला आहे, आणि कॉलेजशिक्षाणकडेही तिचा उपयोग होतो. यामुळें या शाळांचें नियोजित स्वरूप नाहीसें होऊन त्यांत विकृति झालेली आहे.

इंग्लंडमध्यें परीक्षा, सर्टिफिकिटें, पदव्या आणि त्यांना मिळालेला सामाजिक दर्जा, या सर्वांचा परिणाम शिक्षणाला मारक होत आहे हें या सेंट्रल स्कूलसच्या विकृतीवरून दिसून येईल. औद्योगिक हेतूनें काढलेल्या या शाळांतील मुलांचा ओढा पुन्हां विद्यापीठांच्या परीक्षांकडे जाऊं लागला,

म्हणून कांहीं शाळांनीं परीक्षेची तयारी करण्याचाच उपक्रम केला आहे. त्यामुळें मूळचें ध्येय बाजूला पडत आहे. परीक्षा व सर्टिफिकिटें यांच्या साधनानें बौद्धिक व औद्योगिक शिक्षणाला निरनिराळा दर्जा देण्याचा पंक्तिप्रपंच जोंपर्यंत केला जात आहे तोंपर्यंत औद्योगिक शिक्षणाकडे मुलांची प्रवृत्ति होणें शक्य नाहीं. माणसाला जगावयाचें असतें पण मानानें जगावयाचें असतें. तो मान न मिळतां नुसतें धंदेशिक्षण मिळालें तर त्याला किंमत नाहीं बौद्धिक आणि औद्योगिक विषयांना एकाच दर्जाचें सर्टिफिकेट मिळालें पाहिजे, या तत्त्वाची जाणीव इंग्लंडमध्येंही झालेली आहे. परंतु बौद्धिक शिक्षण हेंच संस्कृतिसर्वस्व असें समजणाऱ्या एककल्ली पंडितांचा या तत्त्वाला विरोध आहे. हिंदुस्थानांतही तीच स्थिति आहे. इंग्लंडच्या गुणदोषांचें अनुकरण येथेंही बिनचूक होत आहे! राष्ट्राच्या संस्कृतीत हस्तव्यवसाय व कला यांना किती मोठें स्थान आहे तें अमेरिकेच्या व रशियाच्या शिक्षणपद्धतीवरून दिसून येतें.

## औद्योगिक रातशाळा

या शाळांत चौदा ते सोळा वर्षांचे विद्यार्थी घेतले जातात. साप्ताहिक सहा तास शिक्षण असतें. बौद्धिक अभ्यासक्रमांत गणित, विज्ञान, व भाषा हे विषय येतात, आणि औद्योगिक शिक्षणांत यांत्रिक, व्यापारी, व गृहशास्त्र शिक्षण अशा तीन शाखा आहेत. यांना रातशाळा ( इव्हनिंग स्कूल्स् ) म्हणतात. कामगारांना अधिक वरच्या दर्जाचें शिक्षण टेक्निकल् स्कूल व कॉलेज या संस्थांमध्यें मिळतें. कामधंदा करणारे पंधरासोळा वर्षांचे उमेदवार येथें शिकतात. इंग्लंडमधील प्रत्येक शहरांत अशा संस्था आहेत. एकूण सहासात लाख विद्यार्थी यांतून शिकत असावेत. अशा संस्था लंडनमध्यें अकरा, मँचेस्टरमध्यें आठ, व इंग्लंडमध्यें एकशेंबावीस आहेत. प्रत्येक धंद्याचे शिक्षणाची सोय कोणत्या ना कोणत्या तरी टेक्निकल् स्कूल किंवा कॉलेजामध्यें आहे. मोठ्या शाळेंत मुख्यतः पांच शाखांची सोय असते. यांत्रिक धंदे, रासायनिक धंदे, वास्तुकला, चित्रकला, व गृहशास्त्र. यांशिवाय खाणी, आगबोटी, विमानें इत्यादींसंबंधीं कामें शिकविणाऱ्या अनेक शाळा आहेत.

### ज्यूनियर टेक्निकल स्कूल्स

संपूर्ण दिवस पद्धतशीर शिक्षण घेणाऱ्या चौदापंधरा वर्षांच्या विद्यार्थ्यां-करितां या संस्था आहेत. यांत प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यावर प्रवेश मिळतो. बहुसंख्य नादार व थोडे फी देणारे असे दोन्ही प्रकारचे विद्यार्थी येथें असतात. स्थानिक स्वराज्याच्या शिक्षणखात्यांनीं या शाळा चालविल्या आहेत. सर्व लहानसहान उद्योगधंदे येथें शिकविले जातात.

### टेकनिकल लोकल कॉलेज

ही माध्यमिक दर्जाच्या धंदेशिक्षणाची शाळा आहे. इंग्लंडमध्यें अशा चाळीसपर्यंत संस्था आहेत. मुंबईच्या व्हि. जु. टेक्निकल् स्कूल किंवा बडोदा कलाभुवन यांच्या दर्जाचें शिक्षण येथें मिळतें. पण विषयांत विविधता पुष्कळ आहे, आणि प्रत्येक मोठ्या शहरांत त्यांचा प्रसार आहे. येथें सोळासतरा वयाचे विद्यार्थी घेतले जातात. कारखानदारांचीं मुलेंही त्यांत शिकण्यास जातात. स्थानिक शिक्षणखातें व सरकारी विद्याखातें मिळून शिक्षणाचा निम्मानिम खर्च सोसतात.

प्राथमिक व माध्यमिक शेतकी शिक्षणाचे दृष्टीनें हा देश मागें आहे. उच्च शेतकी शिक्षणाच्या संस्था मात्र आहेत.

### विद्यापीठांतील औद्योगिक शिक्षण

ऑक्सफर्ड, केंब्रिज या जुन्या विद्यापीठांतून आणि लंडन, मँचेस्टर, लिव्हर-पूल वगैरे नव्या विद्यापीठांतून उच्च औद्योगिक शिक्षणाची भरपूर व्यवस्था आहे. यंत्रशास्त्र, रासायनिक धंदे, वास्तुशास्त्र, शेतकी, वैद्यक इत्यादि विषयांखेरीज नाट्यकला, ग्रंथालयशास्त्र वगैरे नवीन विषय शिकविण्याच्या सोयीही झालेल्या आहेत.

## *व्यवसायसंशोधन व मार्गदर्शन*

### संस्थांचे अनेक प्रकार

शिक्षण पूर्ण झाल्यानंतर मुलांमुलींना उद्योगधंदा पाहून देऊन कामाला लावण्याकरितां अनेक संघटना देशभर पसरलेल्या आहेत. मुलें शाळेंत असतांना मुलांना व पालकांना भावी शिक्षण आणि उद्योगधंद्याविषयीं माहिती देणें,

शाळा सोडणाऱ्या मुलांमुलींना कामधंदा शोधण्यास मदत करणें किंवा शोधून देणें, रात्रींच्या शाळांत जाण्याविषयीं किंवा शिक्षण पुढें चालू ठेवण्याविषयीं त्यांचें मन वळविणें, आणि नुकत्याच कामाला लागलेल्या तरुण कामगारांवर सहानुभूतीनें लक्ष ठेवून त्यांना व्यायाम, सात्त्विक करमणूक व पुरवणी शिक्षण यांच्या सोयींचा परिचय करून देणें, अशा अनेक मार्गांनीं या संस्थांचें काम चालू असतें.

प्रत्येक ठिकाणच्या स्थानिक शिक्षणसभेनें एक 'बाल कामगारांना नोकरी शोधून देणारें मंडळ' (जुव्हेनाईल एंप्लॉयमेंट कमिटी) नेमलेलें असतें. शिक्षण आणि उद्योगधंदे यांच्याशीं संबंध असलेले सभासद या मंडळांत असतात. कारखाने व उद्योगधंदे यांच्या मालकांशीं या संस्थेचा संबंध असतो. जागा रिकाम्या झाल्या म्हणजे या संस्थेकडे कळविलें जातें आणि त्या जागेला जो विद्यार्थी योग्य असेल त्याला या नोकरीची माहिती दिली जाते.

याच पद्धतीवर औद्योगिक खात्याची (लेबर डिपार्टमेंट) 'बाल कामगारांना सल्ला देणारी संस्था' (जुव्हेनाईल अॅडव्हायसरी कमिटी) असते. तिचें एक 'व्यवसायवार्ता मंडळ' (एंप्लॉयमेंट ब्यूरो) असतें, त्यांत रिकाम्या झालेल्या जागा आणि गरजू विद्यार्थी उमेदवार या उभयतांची माहिती असते. शिक्षण पूर्ण झालेल्या विद्यार्थ्याला या संस्थेतर्फे नोकरी देण्याची खटपट केली जाते.

## मार्गदर्शनाची पद्धति

दुय्यम शाळा आणि सेंट्रल स्कूल्स् यांचे शिक्षणांतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांना कामधंदा शोधून देण्याकरितां लेबर खात्याने "व्यवसायवार्ता मंडळें" (एंप्लॉयमेंट ब्यूरो) काढलेलीं आहेत. शाळेच्या मुख्य अध्यापकांचाही कारखान्यांशीं व उद्योगधंद्यांशीं संबंध असतो. शिक्षण पूर्ण झालेल्या मुलाला कोठें तरी योग्य काम पाहून देण्याचे दृष्टीनें त्यांची मदत होते.

व्यवसायसंशोधनाच्या या कामाकरितां विद्यार्थ्याविषयींची सर्व प्रकारची माहिती या संस्थांना लागते. ती वर्गशिक्षक व मुख्याध्यापक यांचेकडून पुरविली जाते. या माहितीच्या आधारावर आणि उद्योगधंद्यांचे क्षेत्रांतील स्वतःचे अनुभवाचा उपयोग करून व्यवहारज्ञानानें या संस्थेचे

अधिकारी आपलें काम करितात. त्यांना औद्योगिक मानसशास्त्राचें किंवा पद्धतशीर व्यवसायमार्गदर्शनाचें शिक्षण मिळालेलें नसतें.

याशिवाय प्रत्येक शाळेला जोडून 'बाल कामगार मार्गदर्शक मंडळ (आफ्टर केअर कमिटी) नांवाची संस्था असते. या संस्थेंत स्थानिक शिक्षणाधिकारी, धर्मोपाध्याय, समाजसेवक, आणि शिक्षक अशा प्रकारचे सभासद असतात. शाळा सोडल्यानंतर आणि कामधंदा लागून समाजांत मुलगा चांगला रुळेपर्यंत ही संस्था त्याचेवर लक्ष ठेविते. मुलाचे पालक, कारखान्याचे मालक आणि मुलगा या तिघांशीं या संस्थेचा संबंध असतो. हें काम स्वयंसेवेच्या तत्त्वावर होतें. एंप्लॉयमेंट ब्यूरोचा खर्च मात्र लेबर खात्याकडून केला जातो.

शाळेची पहिली सहामाही संपल्यानंतर अखेरच्या वर्गांतील विद्यार्थ्यांना व पालकांना एकत्र बोलाविलें जातें. तेथें मुख्य अध्यापक, लेबर खात्याचा प्रतिनिधि, आफ्टर केअर कमिटीचा चिटणीस, आणि रात्रीच्या शाळेचे व्यवस्थापक, अशा चौघांची सभा (कमिटी) जमते. विद्यार्थ्याचें पूर्वीचें दप्तर पाहून त्याच्या बौद्धिक व व्यावसायिक प्रवृत्तीविषयीं सभासद माहिती मिळवितात. नंतर पालकाची आणि विद्यार्थ्याची मुलाखत घेऊन त्यांना योग्य उद्योगधंदा आणि पुरवणी शिक्षण यांविषयीं माहिती देतात व मार्ग दाखवितात. मुलाचें नांव एंप्लॉयमेंट ब्यूरोचे यादीवर घातलें जातें. स्वतंत्र रीतीनें मुलाला काम मिळालें नाहीं तर ब्यूरोतर्फे देतात. बेकारीचे दिवस असले तर पंधरा ते अठरा वर्षांचे मुलाला पोटगीपुरता भत्ता मिळतो.

## शास्त्रोक्त व्यवसायमार्गदर्शन

हें व्यवसायसंशोधनाचें कार्य अधिक शास्त्रोक्त व्हावें म्हणून लंडनमध्यें "औद्योगिक मानसशास्त्र संशोधन संस्था" (इन्स्टिटयूट ऑफ इंडस्ट्रियल सायकॉलॉजी) स्थापन झालेली आहे. मानसशास्त्रदृष्टया कांहीं परीक्षा घेऊन व्यक्तीला तिच्या प्रवृत्तींना व नैसर्गिक गुणांना योग्य असा उद्योगधंदा शोधून देतां येईल किंवा काय हें पाहण्याचा तेथें प्रयत्न चाललेला आहे. प्रत्येक कामाला विवक्षित प्रकारची बुद्धि व इंद्रियपटुता लागते. प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं विशिष्ट बुद्धि व विशिष्ट इंद्रियक्रियेचा उत्कर्ष झालेला असतो. या

दोहींची सांगड घातल्यास योग्य व्यक्तीला योग्य काम मिळेल. शाळेंत मुलांना व्यवसायमार्गदर्शन करणारे शिक्षक (करीअर–मास्टर्स) व एंप्लॉयमेंट ब्यूरोज्-मधील अधिकारी यांना शिक्षण देण्याचें काम या संस्थेमध्यें होऊं लागेल.

विद्यार्थ्यांना नुसतें शिक्षण देऊन जगाच्या पाटीवर मोकळें सोडून दिलें म्हणजे झालें, नंतर त्यांचे कांहीं होवो, अशी आपल्याकडे शाळाचालकांची प्रवृत्ति असते ; उलट शिक्षण पूर्ण झालेल्या मुलाला योग्य काम पाहून देणें आणि कामाला लागल्यानंतर त्याचें जीवन सुरळीतपणें चाललें आहे कीं नाहीं हें पाहाणेंही आपलें कर्तव्य आहे अशी इंग्लिश शाळांची कर्तव्यबुद्धि आहे.

असंघटित समाज आणि संघटित समाज यांत इतकें अंतर असतें !

---

## प्रकरण सतरावें

# गुणदोषनिरीक्षण व पुनर्घटनेची दिशा

### तत्त्वनिष्ठेपेक्षां व्यवहारावर भर

इंग्लिश लोकांत तत्त्वनिष्ठेपेक्षां व्यवहारकुशलता अधिक आहे. हा त्यांचा गुण शिक्षणपद्धतीमध्यें प्रतिबिंबित झाला आहे. इंग्लंडमधील शिक्षणाची वाढ एका विशिष्ट तत्त्वनिष्ठेमुळें झालेली नसून त्या त्या वेळीं उत्पन्न झालेल्या परिस्थितीत जरूर त्या सुधारणा करण्याच्या प्रवृत्तीमुळें झालेली आहे. त्या कारणानें इतर राष्ट्रांच्या शिक्षणविकासांत जी सुसंगतता आणि जो पद्धतशीरपणा दिसतो तो इंग्लंडच्या शिक्षणांत दिसत नाहीं. लोक-शाहीच्या तत्त्वाकरितां अमेरिकेनें आपला शिक्षणपसारा वाढविला, जर्मन राष्ट्राच्या उत्कर्षाकरितां जर्मनीची शिक्षणप्रगति झाली, कम्यूनिझम्‌च्या तत्त्वाकरितां रशियन शिक्षणपद्धति अमलांत आली आणि फाशिझम्‌च्या स्थैर्याकरितां इटालियन शिक्षणाची वाढ झाली. इतर राष्ट्रांप्रमाणें एकदम

राजकीय क्रांत्या इंग्लंडमध्यें झाल्या नाहींत; त्याच्या समाजाची आणि राजकारणाची वाढ परिस्थित्यनुरूप सावकाश झाली आहे. तीच गोष्ट शिक्षणक्षेत्रांतही आढळून येते. राष्ट्राचा राजकीय वेदान्त बदलल्याशिवाय त्याच्या शिक्षणपद्धतींत आमूलाग्र फरक होऊं शकत नाहीं.

एकोणिसाव्या शतकांत शास्त्रीय शोध लागले आणि यांत्रिक प्रगति झाली. त्या कारणानें औद्योगिक युग सुरू झालें. शहरांत राहणाऱ्या कामगारवर्गाच्या मुलांकरितां भूतदयेच्या भावनेनें प्राथमिक शिक्षण अस्तित्वांत आलें. कामगारवर्ग सामर्थ्यवान् बनत चालला, तेव्हां प्राथमिक शिक्षण आवश्यक होऊन त्याचा अधिक प्रसार झाला. शिक्षणांत एकदां शिरल्यानंतर गरिबी असली तरी दुय्यम आणि उच्च शिक्षण घेण्याची महत्त्वाकांक्षा कामकरी वर्गांतही उत्पन्न होते. या वर्गाच्या मागणीमुळें त्याच्याकरितां उच्च शिक्षणाच्या शाळा काढणें इंग्लंडला भाग पडलें. सारांश, परिस्थित्यनुसार लोकांची जसजशी मागणी वाढत गेली तसतसा इंग्लिश शिक्षणाचा व्याप वाढत गेला. लोकांना शिक्षण दिलें पाहिजे या तत्त्वानें शिक्षणवाढ झाली नसून लोकांनीं शिक्षण मागितलें म्हणून त्याची वाढ झाली.

## शिक्षणांतील जातिभेद

इंग्लंड आणि अमेरिका यांच्या सामाजिक व शैक्षणिक विचाराच्या दिशा अगदीं भिन्न आहेत. इंग्लंडचें तत्त्व व्यक्तिस्वातंत्र्य (लेझे फेअर) आणि लढेल तो जगेल (सरव्हायव्हल ऑफ दि फिटेस्ट), असें आहे. जीवनकलह चाललेला आहे, यांत ज्यांचा टिकाव लागेल ते लोक वर येतील, बाकीचे गळतील. प्रत्येकानें इतरांना मागें सारून आपला घोडा पुढें घालण्याचा प्रयत्न करावा. समर्थांनी जगावें, दुर्बलांनीं मरावें. उलट अमेरिकन लोकांचें तत्त्व असें आहे कीं, प्रत्येक व्यक्तीला या जीवनकलहांत संधि द्यावी. समर्थ व्यक्ती आपल्या जोरावर जगतीलच, पण दुर्बल व्यक्तींनाही जगांत पुढें येण्याकरितां तयार केलें पाहिजे. समाजांतील प्रत्येक व्यक्ति चांगली तयार झाली तरच समाज तरेल. या तत्त्वभेदामुळें इंग्लंड व अमेरिका या दोन देशांच्या शिक्षणपद्धती भिन्न झाल्या आहेत. अमेरिकेनें आपल्या शिक्षणाचीं दारें गरीब व श्रीमंत, मंद व बुद्धिमान, पुढारलेले व मागसलेले या सर्वांना उघडीं

ठेविलीं आहेत; इंग्लंडनें आपल्या पद्धतींत, 'लायकीप्रमाणें शिक्षण' असें तत्त्व ठेविलें आहे. "लायकी" शब्दाचा अर्थ व्यापक केला तर लायकीप्रमाणें शिक्षण हें तत्त्व उत्कृष्ट आहे. पण इंग्लंडमध्यें लायकीचा अर्थ संपत्ति आणि बुद्धि असा केला जातो. त्यामुळें अर्थसंचय आणि बौद्धिक विकास यांची संधि मिळाली नाहीं, अशा वर्गाला इंग्लंडची आजची शिक्षणपद्धति पसंत नाहीं.

## शिक्षणपद्धतीमधील विविधता

परिस्थित्यनुसार शिक्षणसंस्था काढण्याच्या आणि त्यांचें स्वरूप सुधारण्याच्या इंग्लिश प्रवृत्तीमुळें या शिक्षणपद्धतींत एक प्रकारची विविधता आली आहे, ती मात्र इतर देशांत फारशी आढळत नाहीं. व्यवहाराला आधारभूत असें कांहीं तरी तत्त्व लागतेंच. असें एक तत्त्व ज्या देशांत नसेल तेथें न कळत अनेक तत्त्वांवर अनेक प्रकारच्या संस्था स्थापन होतात, तसें इंग्लंडचें झालें आहे. इंग्लिश लोकांनीं बुद्धिपूर्वक आणि विचार करून असें शिक्षणाचें तत्त्वज्ञान वाढविलेलें नाहीं. त्यामुळें जर्मनी, अमेरिका आणि रशिया यांचे मानानें शिक्षणाच्या तात्त्विक विचारांत इंग्लंड दरिद्री आहे. परंतु इंग्लिश शिक्षणसंस्था आणि त्यांची विविधता पाहिली म्हणजे त्यांच्या मुळाशीं असलेल्या निरनिराळ्या तत्त्वांचा प्रत्यय येतो.

## व्यक्तिनिष्ठ शिक्षण

शिक्षणावर तात्त्विक चर्चा करतांना इंग्लिश शिक्षणतज्ज्ञ म्हणतात कीं, "आम्हीं व्यक्तीचे दृष्टीनें शिक्षण देतों." या तत्त्वाप्रमाणें शिक्षण दिलें तर वैयक्तिक गुणांचा विकास होण्याकरितां अभ्यासक्रमांत व वर्गाचे अध्यापनपद्धतीमध्यें अधिक मोकळेपणा पाहिजे; परंतु तसा तो दिसून येत नाहीं. एकंदर पद्धति पाहिली तर व्यक्तीच्या ठिकाणीं असलेलें व्यक्तित्व वाढीस लागण्यापेक्षां तें दडपलें जाण्याचाच संभव अधिक दिसतो. हजारो विद्यार्थ्यांना एका सांच्यांत ओतून परीक्षा घेण्याच्या पद्धतींत व्यक्तित्व वाढीस लागणार नाहीं. ठराविक विषय चांगले तयार करून घेण्याकडे इंग्लिश शाळांचें विशेष लक्ष आहे. या शिक्षणाला कांहीं सामाजिक ध्येयवाद नाहीं असा जो आक्षेप येतो त्याला उत्तर, व विद्यमान पद्धतीचें समर्थन म्हणून ही शैक्षणिक

व्यक्तिवादाची ढाल पुढें केली जाते असें वाटतें. प्रत्यक्ष शिक्षणक्रमांत या तत्त्वाचें फारसें प्रतिबिंब पडलेलें दिसत नाहीं.

शिस्तखोरपणा आणि विवक्षित पद्धति यांचें स्तोम या शिक्षणांत इतकें आहे कीं त्यांत व्यक्तिविकास फार थोडचा प्रमाणांत होईल. वैयक्तिक गुण स्वतःचें स्वरूप धारण करून पुढें आले तरी ते भोंवतालच्या बंधनांनीं जखडल्यासारखे दिसतात. शाळेंतील चित्रकला, लेखन आणि मुलांचें वर्तन यांत त्यांचें व्यक्तित्व दिसून येत असतें. परंतु इंग्लिश शाळांतील मुलांच्या चित्रकलेंत व्यक्तित्वाची जिवंत विविधता व ताजेपणा दिसत नाहीं. एका ठराविक सांच्यांतून व ठराविक बंधनांतून सर्व काम निघाल्यासारखें दिसतें. त्याचप्रमाणें विद्यार्थ्यांच्या वागण्यांत जो सहज मोकळेपणा दिसावयास पाहिजे तो न दिसतां त्यांचे मनावर एक प्रकारचें दडपण पडल्यासारखें वाटतें. तिऱ्हाइत प्रेक्षकाला तरी निदान अशा वातावरणाचा भास होतो यांत शंका नाहीं. कांहीं ठराविक स्वरूपाच्या शाळा या विधानाला अपवाद आहेत.

## सामाजिक ध्येयवादाचा अभाव

शिक्षणाच्या सामाजिक उपयुक्ततेचें महत्त्व इंग्लिश लोकांना फारसें वाटलें नाहीं. वैयक्तिक दर्जा वाढविण्यास तें उपयोगी पडतें एवढीच जाणीव त्यांचे ठिकाणीं आहे. या दृष्टीनें इंग्लिश शिक्षणपद्धति व्यक्तिनिष्ठ आहे असें म्हणतां येईल. तिच्या इतिहासांत जोरदार सामाजिक ध्येयवाद निर्माण झालेला दिसत नाहीं. समाजांत वर येण्याचें साधन म्हणून शिक्षणाची मागणी झाली आणि सरकारकडून ती पुरवली गेली. अखिल जनतेला ज्ञानार्जनाची आणि संस्कृतीची उच्च संधि निर्माण करून दिली पाहिजे असा उदार ध्येयवाद १९१८ च्या फिशर बिलाच्या मुळाशीं होता. त्याला इंग्लिश लोकांची शाब्दिक सहानुभूति मिळाली. सक्रिय सहानुभूति फारशी मिळाली नाहीं. काटकसरीच्या सबबीखालीं फिशर ॲक्ट कुजत पडला आहे. त्यांतील चौदा ते अठरा वयांत पुरवणी शिक्षण सक्तीचें करण्याच्या कलमाची, किंवा सक्तीच्या शिक्षणाचें वय पंधरापर्यंत वाढविण्याच्या योजनेची अंमलबजावणी अनेक वेळ लांबणीवर टाकण्यांत आली. इतर राष्ट्रीय खर्चाकडे व साम्राज्याच्या संपत्तीकडे पाहतां काटकसरीची सबब मनाला पटत नाहीं. इंग्लंड-

मधील सामान्यवर्ग सध्यांच्या शिक्षणपद्धतीवर खुष नाहीं हें तेथील लोकांशीं संबंध आला असतां स्पष्टपणें कळून येतें. खालच्या समाजांत राजकीय जागृति झाली तेव्हां "आपल्या धन्यांना आपण शिकवूं या" (लेट् अस् एज्युकेट् आवर मास्टर्स) अशी घोषणा ऐकूं आली. पण तिच्या मुळाशी ध्येयवादापेक्षां उपरोधिकपणाची वृत्तीच अधिक होती, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

समाज दृष्ट्या शिक्षक उदासीन असल्याकारणानें, आहे हीच समाज-स्थिति कायम राखण्याकडे (स्टेटस् को) त्याची मदत होते. शिक्षकवर्गीतील आत्मसंतुष्टता हें या शिक्षणांतील विशेष लक्षण दिसतें. "आमच्या शिक्षणानें कायदा पालन करणारे नागरिक तयार होत असून विद्यापीठांच्या प्रवेश परीक्षेंत विद्यार्थी चांगले पास होतात. फरक करण्याची आम्हांला जरूरी वाटत नाहीं." असे उद्‌गार दुय्यम शिक्षणशाळेच्या एका मुख्य अध्यापकाच्या तोंडून निघावेत याचा दुसरा अर्थ काय?

## चारित्र्यशिक्षणाचीं साधनें

परीक्षापद्धतीमुळें जें स्वातत्र्य अभ्यासांत मिळत नाहीं तें अभ्यासा-व्यतिरिक्त इतर मार्गांनीं प्रकट होतें. इंग्लिश शिक्षणपद्धतीमधील घेण्यासारखा भाग हा अभ्यासाव्यतिरिक्त इतर कार्यक्रमांतच पुष्कळ आहे. चारित्र्य हा इंग्लिश शिक्षणाचा विशेष गुण समजला जातो. पण हे चारित्र्याचें शिक्षण अभ्यासक्रमांतून आणि वर्गांतून दिलें जात नाहीं. वर्गाबाहेर, क्रीडांगणावर, आणि विद्यार्थ्यांच्या अभ्यासेतर चळवळी चालू असतांना शीलवर्धनाचें शिक्षण मिळतें. सुटीमध्यें विद्यार्थी प्रवासाला जातात त्यांत त्यांची निरीक्षणवृत्ति वाढीला लाविली जाते. साहस आणि संशोधन हे इंग्लिश पूर्वजांचे गुण नष्ट होऊं नयेत म्हणून कधीं दक्षिण अमेरिकेंत, कधी यूरोपमध्यें तर कधी आर्क्टिक प्रदेशांत मुलांच्या सफरी काढल्या जातात. इंग्लिश विद्यार्थ्यांची एक तुकडी हिंदुस्थानांतही प्रवास करून गेली. ही एक राष्ट्रीय शिक्षणाची बाब समजली जाते. अभ्यासेतर कार्यक्रम चारित्र्यसंवर्धना-करितां जरूर आहेत, असें इंग्लिश लोकांना वाटतें. परंतु चारित्र्य हें ध्येय कल्पून त्याला अनुकूल अशी सर्व अभ्यासक्रमाची पुनर्घटना झालेली नाहीं. शिवाय चारित्र्य (कॅरेक्टर) या गुणाची इंग्लिश व्याख्याही

मर्यादित आहे. तिला तात्त्विक व आध्यात्मिक विचाराचें अधिष्ठान नाहीं. विवक्षित समाज, विशिष्ट ध्येयें, आणि विशिष्ट परंपरा यांच्याविषयीं जी निष्ठा, तिला चारित्र्य असें समजलें जातें. आपल्या समाजाबाहेरील इतर समाज, इतर ध्येयें आणि परंपरा याही आपल्या कक्षेंत घेण्याइतकी चारित्र्याची व्याख्या व्यापक झालेली नाहीं. सारांश, चारित्र्याची इंग्लिश व्याख्या शाश्वत आणि सार्वत्रिक नसून मर्यादित आणि सापेक्ष आहे.

## ज्ञानार्जनाची कल्पना

शैक्षणिक मानसशास्त्राचे दृष्टीनें विचार करितां जुन्या अध्यापनपद्धतीचाच पगडा अद्याप अधिक बसलेला दिसतो. नवीन कल्पनांचा प्रसार फारसा झालेला नाहीं. शिक्षकानें ज्ञान 'द्यावें' आणि विद्यार्थ्यांनीं तें 'घ्यावें' ही ज्ञानार्जनाची प्रधान कल्पना दिसते. वास्तविक नवीन शिक्षणपद्धतींचा प्रभाव शिक्षकमहाविद्यालयांमध्यें (ट्रेनिंग कॉलेजमध्यें) दिसावा. परंतु तेथेंदेखील ही ज्ञानाच्या 'देण्याची' व 'घेण्याची' कल्पनाच अधिक प्रचारांत असलेली दिसून येते. शिक्षकानें व्याख्यानें द्यावीत आणि विद्यार्थ्यांनीं भराभर 'नोटस्' उतरून घ्याव्यात या पद्धतीचा प्रसार विशेष दिसतो. त्यामुळें या देशांत आणि हिंदुस्थानांत अध्यापनपद्धतीच्या दृष्टीनें फारसा फरक वाटत नाहीं.

जागृत झालेल्या व्यक्तीच्या ठिकाणीं ज्ञान आपोआप निर्माण होतें किंवा ज्ञान मिळविण्याची नैसर्गिक आतुरता त्या व्यक्तीला लागून ती स्वतः ज्ञान मिळविते, ही कल्पना व्यवहारांत फारशी उतरलेली दिसत नाहीं. प्रागतिक म्हणवून घेणारीं विद्यालयें जरी पाहिलीं तरी, कांहीं अपवाद सोडून दिल्यास, आत्मस्फूर्तीनें स्वतःच्या प्रयत्नांनीं विद्यार्थी काम करीत बसलेले आहेत, असें फारसें दिसत नाहीं. शिक्षक, वर्ग, वह्या आणि टिपणें यांचीच पुनरावृत्ति ठिकठिकाणीं होते. कदाचित् हा परीक्षापद्धतीचा परिणाम असावा. नवीन शैक्षणिक मानसशास्त्राचा परिणाम अध्यापनपद्धतींवर फारसा झालेला दिसत नाहीं.

स्वाध्यायप्रधान डाल्टन पद्धतीचा इंग्लंडमध्यें प्रसार होत आहे. ठराविक अभ्यास थोडक्या वेळांत संपवून परीक्षेची तयारी चांगली करण्याचे दृष्टीनें ही पद्धति उपयुक्त आहे म्हणून तिचा स्वीकार झालेला असावा.

## अभ्यासक्रमाची बाह्यतः सुधारणा

अध्यापनपद्धतीत फारशी सुधारणा झालेली नाहीं, त्याचप्रमाणें अभ्यासक्रमाचे बाबतींतही परिस्थिति आहे. इंग्लंडचा उच्च शिक्षणाचा इतिहास पाहिला तर त्यांत जुने विषय आणि नवे विषय यांचा एकसारखा झगडा चाललेला दिसून येईल. एके वेळीं ग्रीक व लॅटिन या विषयांनीं मातृभाषेला विरोध केला. अर्वाचीन भाषाशिक्षणालाही विरोध झालाच. भौतिक शास्त्रांचा समावेश विद्यापीठांत होईना म्हणून त्यांना सवता सुभा स्थापावा लागला. पुढें त्यांचा प्रवेश झाला तरीही प्राचीन भाषापंडितांना तो एक तिरस्काराचाच विषय होता. तसेंच हायस्कूलच्या शिक्षणक्रमाचेंही सध्यां झालेलें आहे. आजच्या जगांत समाजविषयक शास्त्रांना महत्त्व प्राप्त झालेलें आहे. परंतु त्यांचा आवश्यक शिक्षणक्रमांत समावेश करण्याची चळवळ फारशी दिसून येत नाहीं. अर्थशास्त्र आणि आधुनिक व्यापारपद्धति यांचा समावेश शिक्षणांत व्हावा अशी कांहीं व्यापारी लोकांनीं सूचना केलेली आहे. नागरिकशास्त्राचें शिक्षण देण्याकरितां स्वतंत्र संघटना निघत आहेत. हस्तव्यवसायाच्या शिक्षणाची प्रगति होत आहे. परंतु ' सभ्य गृहस्था 'च्या (इंग्लिश जंटलमन) आवश्यक शिक्षणांत या गोष्टींचा समावेश करण्याची फारशी उत्सुकता शाळा चालकांचे ठिकाणी दिसून येत नाही.

इंग्लंडमध्यें शिक्षणाच्या पुनर्घटनेविषयीं जो विचार चाललेला आहे तो शिक्षणाच्या बाह्य स्वरूपाविषयी व घटनेविषयीं आहे. अभ्यासक्रमाचे तपशिलाची आजच्या परिस्थितीप्रमाणें पुनर्घटना झाली पाहिजे अशी जागृति तेथें दिसत नाहीं. हा प्रयत्न अमेरिकेंत मोठ्या प्रमाणावर चालू आहे.

## अभ्यासेतर कार्यक्रमाचें प्रयोजन

शिक्षणाचें ध्येय वगैरे गोष्टी जर्मन शिक्षणतज्ज्ञाला जितक्या समजतात तितक्या इंग्लिश शिक्षकाला समजत नाहींत. तो तात्त्विक दृष्ट्या फारसा विचार करीत नाहीं, व्यवहार दृष्ट्या विचार करतो. शैक्षणिक तत्त्वज्ञानावर इंग्लंडमध्यें फारसें वाङमय निर्माण झालेलें नाहीं. जर्मनी–अमेरिका–रशियांत त्याची आवड अधिक आहे. आपलीं मुलें पुढें 'सभ्य स्त्री–पुरुष' (जंटलमन व जंटलवूमन) व्हावींत व त्यांचें 'चारित्र्य' चांगलें असावें यापलीकडे

अधिक ध्येयाचा विचार इंग्लिश लोक करीत नाहींत. परंतु हें सभ्यतेचें आणि चारित्र्याचें ध्येय जुन्या पद्धतीच्या अभ्यासक्रमांतून, केवळ कांहीं विषयांची परीक्षा दिल्यानें साध्य होणें शक्य नाहीं. म्हणून शाळेच्या व वर्गाच्या बाहेरील अभ्यासेतर व्यवसायांना प्राधान्य आलेलें आहे. क्रीडांगणावरील खेळ, वसतिगृहांतील जीवन, निरनिराळे संघ, प्रवास, बालवीर चळवळ इत्यादि कार्यक्रमांचे द्वारें आपलें शिक्षणध्येय साधण्याचा इंग्लिश पद्धतीचा प्रयत्न आहे. सारांश, या शिक्षणांत एक प्रकारची दुहेरी राज्यपद्धति आहे. परीक्षेकरितां एक प्रकारचा अभ्यासक्रम व शिक्षणध्येय साध्य करण्याकरितां अभ्यासेतर कार्यक्रम. शिक्षणध्येयांना सुसंगत अशी अभ्यासक्रमाचीच पुनर्घटना करण्याचा प्रयत्न झालेला नाहीं. त्यामुळें शिक्षणाचीं ध्येयें हीं वरून डकविल्यासारखीं वाटतात, अंगभूत अशीं वाटत नाहींत.

## वर्गवारीची अनिष्ट पद्धति

श्रेष्ठ, मध्यम, आणि कनिष्ठ अशा तत्त्वांवर वस्तूंची व जनावरांची वर्गवारी करणें ठीक आहे. परंतु चालत्या, बोलत्या, वाढत्या, बदलत्या, अशा जिवंत माणसांची वर्गवारी करून त्यांच्या कपाळावर श्रेष्ठतेचा किंवा कनिष्ठतेचा शिक्का मारून कांहीं काल त्यांना त्या वर्गांत ठेवणें हें अन्याय्य आहे असें वाटतें. इंग्लिश शाळांची योजना आणि शाळेंतील वर्गांची विभागणी या तत्त्वावर आहे. प्राथमिक शिक्षण झाल्याबरोबर मुलांची श्रेष्ठ-मध्यम-कनिष्ठ अशी वर्गवारी करून त्यांना हायस्कूल, सेंट्रल स्कूल, आणि सीनियर स्कूलमध्यें घातलें जातें. त्यामुळें या शाळेंत जाणाऱ्या सर्व व्यक्तींवर एक ठराविक शिक्का बसल्यासारखा होतो. दुय्यम शाळेंत मुलें आल्याबरोबर त्यांच्यावर अ, ब, क असे छाप मारून ते थोडयाफार फरकानें अखेरपर्यंत ठेविले जातात. अशा रीतीनें मध्यम व कनिष्ठ म्हणून शिक्का ज्यांचे कपाळावर मारला जात असेल त्यांच्या मनोवृत्तीवर याचा काय परिणाम होईल याची कल्पना कोणालाही करितां येईल. अशा व्यक्तीच्या मनांत जन्मभर कनिष्ठतेची भावना (इन्फीरिऑरिटी कॉम्प्लेक्स्) राहणें संभवनीय आहे. राष्ट्रांतील बहुसंख्य व्यक्तींना अशा मनःस्थितींत ठेवणें, हें मानसस्वास्थ्य (मेंटल हायजीन) दृष्टया हानिकारक आहे. असें वर्गीकरण केवळ बौद्धिक कसोटीवर करणें

हें मानसशास्त्र दृष्ट्या अशास्त्रीय आहे हा भाग वेगळाच. तिसऱ्या वर्गाचा किंवा क वर्गाचा शिक्का मारलेला मुलगा पहिल्या प्रतीचा लढवय्या, समाज-सेवक, यांत्रिक, किंवा धाडशी निघणार नाहीं कशावरून ? मग बालपणींच त्याच्यावर क वर्गाचा शिक्का मारण्यांत काय अर्थ आहे. ही वर्गवारी जाहीर रीतीनें होते हे तर व्यक्तीचे स्वाभिमानाचे दृष्टीनें अगदीं अनिष्ट आहे. कोणालाही अशा वर्गवारींत कायमचें बसावेंसें वाटणार नाही.

## परीक्षांचें स्तोम

इंग्लिश शिक्षणपद्धतीमधील शाळांची उतरंड पाहिली म्हणजे त्यांच्या परीक्षापद्धतीचा उद्देश समजतो. किंबहुना इंग्लिश शिक्षण पाहून क्षणभर असें वाटतें की त्यांत परीक्षांशिवाय दुसरें कांहींच नाहीं. उच्च दर्जाच्या नोकऱ्या आणि पांढरपेशांचे व्यवसाय यांकरितां बुद्धिमान् माणसें निवडावयाची हें शिक्षण-पद्धतीचें ध्येय. अशी माणसें निवडण्याकरितां आज इंग्लंडजवळ परीक्षे-शिवाय दुसरें साधन नाहीं. म्हणून शिक्षणक्रमांत प्रत्येक पायरीपायरीवर परीक्षांची चाळणी ठेवण्यांत आली आहे उत्कृष्ट माणसें निवडण्याला परीक्षेशिवाय अन्य तंत्र शोधून न काढल्यामुळें इंग्लिश अभ्यासक्रमाला गिरणीचें स्वरूप आलें आहे. परीक्षेची तयारी करण्याकरितांच सर्व अभ्यास करावयाचा असें शाळांचें ध्येय झालेलें आहे. इंग्लंडमधील प्रगतिशील अशा शाळा पाहिल्या तरी त्यांची प्रगति अभ्यासक्रमाव्यतिरिक्त इतर क्षेत्रांतच दिसून येते. ठराविक विषयांची तयारी करून मुलें परीक्षेला बसविल्याखेरीज कोणतीच शाळा चालू शकणार नाही. इंग्लंडची सावलट जोंपर्यंत हिंदी शिक्षणावर आहे तोंपर्यंत हिंदुस्थानाचीही या परीक्षापद्धतीपासून मुक्तता होणें शक्य दिसत नाही.

## असामान्य गुण

तात्त्विक दृष्टीनें विचार केला असतां इंग्लिश पद्धतींत कांहीं दोष दिसतात ही गोष्ट खरी असली तरी तींत गुणही तितकेच आहेत, हें विसरून चालणार नाहीं. मुलाच्या आरोग्याची पद्धतशीर काळजी शाळेंत व शाळे-बाहेर घेतली जाते. प्रौढ शिक्षणाचा इंग्लंडमधील प्रसार रशियाव्यतिरिक्त इतर कोणत्याही देशापेक्षां मोठा आहे. अमेरिकेंत प्रौढ शिक्षणाचा इतका

व्याप वाढलेला नाहीं. इंग्लिश औद्योगिक शिक्षणपद्धति अलीकडच्या दोन पिढ्यांत वाढली असून ती उत्कृष्ट आहे. पब्लिक् स्कूल्स्मध्यें आधुनिक दृष्ट्या अनेक दोष असले तरी ब्रिटिश साम्राज्याचे पाईक त्यांनीं निर्माण केले हें विसरून चालणार नाहीं. शिक्षणसुधारणेच्या चळवळीमध्यें 'नूतन शिक्षण संघा' सारख्या (न्यू एज्युकेशन् फेलोशिप) संस्थांनीं पुढाकार घेतलेला असून त्याचे पडसाद यूरोपमध्यें व साम्राज्यभर उठत आहेत. बालमानसशास्त्र, औद्योगिक मानसशास्त्र, परीक्षापद्धतीचें संशोधन इत्यादि शैक्षणिक संशोधन-क्षेत्रांत इंग्लंडची कामगिरी भरीव होत आहे. या सर्व गोष्टींकडे शिक्षणतज्ज्ञांनी लक्ष देणें जरूर आहे.

इंग्लिश शाळांतून मुख्य अध्यापकाला मिळणारें स्वातंत्र्य दुसऱ्या कोणत्याही देशांत नाहीं. स्थानिक स्वराज्याचें शिक्षणखातें, स्थानिक नियंत्रण मंडळ ( गव्हर्निंग बॉडी ), इत्यादि संस्थांना बाह्य गोष्टींत ढवळाढवळ करितां येईल, परंतु अभ्यासक्रम आणि अध्यापन या बाबतींत मुख्य अध्यापक आपल्या शाळेचा मालक आहे. सरकारी विद्याखात्यानेंही त्याला बरेंच स्वातंत्र्य दिलेलें असून कोणताही नवीन प्रयोग करून पाहण्या-इतकी संधि ठेविलेली आहे. इंग्लिश आणि हिंदी शिक्षणपद्धतींत याच बाबतींत फार मोठा विरोध आहे.

जें स्वातंत्र्य मंजूर झालेल्या शाळांना आहे त्याहीपेक्षां अधिक स्वातंत्र्य मंजूरी न घेणाऱ्या शाळांना आहे. एकदांही ज्यांची तपासणी झाली नाहीं अशा हजारो खाजगी शाळा आहेत. असें स्वातंत्र्य यूरोपमध्यें आज अन्यत्र क्वचितच दिसून येईल. शिक्षण ही सर्वत्र सरकारचे अधिकारांतील बाब झालेली आहे. ज्ञानदानाचे आणि ज्ञानार्जनाचे स्वातंत्र्याची कल्पना इंग्लंडचीच आहे.

इंग्लिश शाळांचा आकार आटोपशीर असतो. तीनशेंपासून पांचशें-पर्यंत विद्यार्थी असल्यानें शिक्षक व विद्यार्थी यांचे संबंध येण्यास वाव राहतो. शाळेंतील प्रत्येक भागांत पूर्वयोजना, पद्धतशीरपणा आणि शिस्त हे गूण दिसतात. शिक्षकांची निवड चांगली झालेली असते. मुख्य अध्यापकांत कांहीं वैशिष्ट्य असतें. कांहीं तत्त्वानें तो शाळा चालवीत असतो. शाळा गरीब

असल्या तरी उपलब्ध साधनसामुग्रींत कोंडयाचा मांडा करून चांगलें शिक्षण देण्याचा शिक्षकांचा प्रयत्न दिसतो. कामचुकारपणा किंवा टाळाटाळीची वृत्ति दिसून येत नाहीं. प्रयोगशाळा आणि वर्कशॉप यांकडे विशेष लक्ष दिलेलें दिसतें. एका शाळेला सर्व गोष्टी करणें शक्य नाहीं तेथें अनेक शाळांचें सहकार्य झालेलें दिसून येतें. सुतारीचें वर्कशॉप्, पोहण्याचा तलाव इत्यादि सोयी अनेक शाळांनीं मिळून सामुदायिक रीत्या केलेल्या आहेत. शाळांतील कामांना मदतनीस व पूरक म्हणून नागरिकांनीं "आफ्टर केअर कमिटीज्" सारख्या संस्था काढल्या आहेत, त्यांवरून नागरिकांचीही सहकार्य करण्याची तत्परता व जबाबदारीची जाणीव दिसून येते.

## असंतोष व पुनर्घटनेच्या योजना

प्रचलित शिक्षणपद्धतीविषयीं इंग्लंडमध्येंही असंतोष आहे. पुनर्घटनेचे व सुधारणेचे अनेक मार्ग सुचविले जात आहेत. पहिला महत्त्वाचा दोष म्हणजे दुय्यम व उच्च शिक्षणाची सामान्य जनांना अगदीं मर्यादित संधि मिळते हा आहे. ही संधि वाढविण्याचे दृष्टीनें फिशर अॅक्टानें प्रयत्न केला परंतु तो यशस्वी झाला नाहीं. आज प्राथमिक शाळांतून दुय्यम शाळांत जाणाऱ्या विद्यार्थ्यांचें प्रमाण अगदीं थोडें, म्हणजे शेंकडा ८।९ इतकें आहे. बाकीच्या शेंकडा ९१।९२ विद्यार्थ्यांना या शिक्षणाव्यतिरिक्त इतर शाळांत जावें लागतें. त्यांना उच्च शिक्षण घेण्याची संधि मिळत नाहीं. आजच्या लोकशाहीच्या काळांत ही पद्धति अन्याय्य आहे, अशी चोहोंकडून ओरड चालली आहे. अमेरिकेंत सर्व रयतेला दुय्यम शिक्षण मोफत आहे. फरान्सनें १९३१ पासून आपलें दुय्यम शिक्षण मोफत केलें. एकंदर प्रवृत्ति उच्च शिक्षणाचीं द्वारें सामान्य जनतेला उघडीं टाकण्याकडे असतांना इंग्लंडमध्यें मात्र अगदीं मूठभर मुलांना ही संधि दिली जात आहे. समान संधीच्या (इक्वॉलिटी ऑफ अपॉर्च्युनिटी) दृष्टीनें विद्यमान पद्धति कालमानाला धरून नाहीं. हा दोष दूर करण्याकडे इंग्लिश शिक्षणसुधारकांचें लक्ष लागलें आहे. या बाबतींत पुढें काय सुधारणा होईल तें सांगणें कठिण आहे. कारण इंग्लिश लोक अत्यंत पुराणमतवादी, परंपराप्रिय, आणि सावकाश सुधारणा करणारे आहेत. अगदीं जरूरी पडेल तेवढीच सुधारणा ते करतात. एकादी

चांगली योजना होऊन ती पार्लमेंटांत पसार झाली तरी व्यवहारांत येईलच असें नाहीं, हें फिशर कायद्यानें सिद्ध झालेलें आहे. तरी पण सुधारणा झालीच तर कोणत्या दिशेनें होईल त्याचें अनुमान करण्यास साधन आहे.

## सल्लागार समितीच्या सूचना

शिक्षणसुधारणा कोणत्या दिशेनें करावी हें अजमावण्याकरितां विद्याखात्यानें आपल्या 'सल्लागार समिती'ला (कन्सल्टेटिव्ह् कमिटी) एक अहवाल सादर करण्यास सुचविलें. १९२६ सालीं हा अहवाल प्रसिद्ध झाला असून भावी सुधारणेची दिशा त्यांत दाखविली आहे. "बारा ते पंधरा वयांतील शिक्षण" (एज्युकेशन ऑफ दि ॲडोलेसंट) असें या अहवालाचें नांव आहे. त्यांतील महत्त्वाच्या सूचना अशा आहेत--

'अकरा वर्षांपर्यंतच्या शिक्षणाला प्राथमिक शिक्षण असें नांव द्यावें व या मर्यादेपर्यंत हें शिक्षण संपावें. या वयाचे नंतरच्या सर्व शिक्षणाला दुय्यम शिक्षण असें संबोधावें. देशांतील सर्व मुलांमुलींना दुय्यम शिक्षण घेण्याची संधि मिळाली पाहिजे. त्याला आर्थिक, सामाजिक, किंवा अन्य परिस्थिति आडवी येऊं नये. हें शिक्षण प्रत्येक विद्यार्थ्याला त्याच्या नैसर्गिक प्रवृत्तींना धरून दिलें जावें; सर्वांना एकच प्रकारचें शिक्षण देऊं नये. त्याकरितां दुय्यम शिक्षणाच्या शाळांमध्यें विविधता असावी. बुद्धीमध्यें जितकी विविधता तितकी अभ्यासक्रमांत विविधता पाहिजे. या शाळांत गरीब विद्यार्थ्यांनाही जातां यावें म्हणून नादारी, शिष्यवृत्त्या व पोटगीवृत्त्या यांची अधिक सोय करावी.

दुय्यम शिक्षणाच्या शाळांत चार प्रकार असावेत--(१) सध्यांच्या हायस्कूलप्रमाणें निवडक मुलांकरितां 'ग्रामर स्कूल्स्'; (२) सेंट्रल स्कूल्स्-प्रमाणें निवडक मुलांकरितां 'मॉडर्न स्कूल्स्'; (३) बिननिवडक सर्व विद्यार्थ्यांकरितां 'मॉडर्न स्कूल्स्'; यांत अभ्यासक्रमाची विविधता अधिक असावी आणि व्यावहारिक विषय जास्त असावेत; (४) जेथें 'मॉडर्न स्कूल्स्' काढणें शक्य नाहीं तेथें प्राथमिक शाळेलाच जोडून 'सीनियर क्लासेस्' असावेत.

सर्व विद्यार्थी दुय्यम शाळेंत येणार त्या अर्थीं अभ्यासक्रमांत विविधता

अधिक पाहिजे. विशेषत: व्यावसायिक व व्यावहारिक विषयांचा समावेश अधिक केला जावा. हस्तव्यवसाय शिक्षण हें उदार व सुसंस्कृत शिक्षणाचेंच एक अंग आहे, या दृष्टीनें त्याला मॉडर्न स्कूल्स्मध्यें महत्त्वाचें स्थान दिलें जावें. या चार प्रकारच्या शाळा निघाल्यानंतर एका शाळेंतून दुसऱ्या शाळेंत संक्रमण करण्याची सुलभता ठेवावी, म्हणजे विद्यार्थी स्वत:ला योग्य असा अभ्यासक्रम बदलून घेऊं शकेल, आणि बुद्धीनें लायक अशा सर्व विद्यार्थ्यांना विद्यापीठांतील उच्च शिक्षणाची संधि मिळेल. इतक्या विविध शाळा निघाल्यानंतर कोणत्या विद्यार्थ्यानें कोणत्या शाळेंत जावें हें सुचविण्याकरितां, आणि निवडक विद्यार्थी त्यांना योग्य अशा शाळांत पाठविण्याकरितां कांहीं तरी योजना असावी.'

## इंग्लिश व हिंदी शिक्षणाचें भवितव्य

सर डब्ल्यू. एच्. हॅडो यांचे अध्यक्षतेखालीं सल्लागार समितीने वरील अहवाल सादर केलेला आहे. त्यांत दोन महत्त्वाचीं तत्त्वें ग्रथित झालेली आहेत; अकरा वर्षांनंतर सर्व विद्यार्थ्यांना घरची परिस्थिति कशीही असली तरी दुय्यम शिक्षण घेण्याचा हक्क आहे, आणि दुय्यम शिक्षण म्हणजे केवळ बौद्धिक विषयांचें शिक्षण नसून हस्तव्यवसायात्मक शिक्षणक्रमाचाही त्यांत अंतर्भाव होऊं शकतो. "A humane educatione is not one given through books alone, but one which brings children into contact with the larger interests of mankind; and the aim of the schools (*i. e.* Modern Schools) should be to provide such an education by means of a curriculum containing large opportunities for practical work and related to living interests."—(एज्युकेशन् ऑफ दि अॅडोलेसंट, लंडन १९२६, पान ८४).

**"उदार शिक्षण केवळ पुस्तकांमधूनच मिळत नसून त्याबरोबर मानव जातीच्या विविध कार्यक्षेत्रांशीं मुलांचा संबंध आणल्यानेंच तें मिळूं शकतें. अशा प्रकारचें शिक्षण देण्याचें शाळांचें ध्येय असावें. त्याकरितां अभ्यासक्रमांत हस्तव्यवसायात्मक विषयांना अधिक वाव देऊन प्रत्यक्ष जीवनाशीं शिक्षणाचा अधिक संबंध आणला पाहिजे."**

हॅडो रिपोर्टांतील सूचना इंग्लिश लोकांना आणखी एक पिढी तरी सहज पुरतील. मध्यंतरीं महायुद्ध उपस्थित झालें तर शिक्षणसुधारणांचा वेग जरा वाढेल. फिशर ॲक्ट आणि हॅडो रिपोर्ट या दोन संहितांना अनुसरून इंग्लिश शिक्षणांत लौकर सुधारणा झाली तर तिचा हिंदुस्थानवरही अनुकूल परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. ‘तिकडे’ पाहून शिक्षण-सुधारणेचें पाऊल टाकणारांना तो एक चांगला आधार होईल. म्हणून स्वार्थी दृष्टीनें तरी अशी इच्छा करण्यास हरकत नाहीं कीं इंग्लिश शिक्षणांत नियोजित सुधारणा लौकर अंमलांत याव्यात.

---

विभाग चौथा

# जर्मनी, इटली, व फरान्स—संस्कृतिप्रधान शिक्षण

प्रकरण अठरावें

## जर्मन शिक्षणाची विचारभूमिका

### एका पिढींत दोन क्रांत्या

एका पिढीच्या कालावधींत जर्मनीच्या शिक्षणपद्धतींत दोन वेळां क्रांति झालेली आहे. राजकारणांत घडामोडी होतात त्या वेळीं शिक्षणांतही फेरबदल होत असतो. महायुद्धानंतर जर्मनींतील राजसत्ता नष्ट होऊन तिच्या ठिकाणीं समाजवादी लोकसत्ता पक्ष (सोशल डेमोक्रॅटिक पार्टी) सत्ताधारी झाला. त्यानें १९१९ मध्यें वीमार येथें नवीन राज्यघटना तयार केली त्या वेळीं शिक्षणामध्यें महत्त्वाचे फरक घडवून आणले. ही क्रांति होऊन बारा वर्षे जातात न जातात तोंच १९३३ सालीं दुसरी राज्यक्रांति होऊन राष्ट्रीय समाजवादी (नॅशनल सोशालिस्ट किंवा नाझी) पक्षानें सत्ता आपल्या हातांत घेतली. या नवीन पक्षाचे हातांत सत्ता आल्यानंतर त्यानेंही पूर्वीच्या शिक्षणामध्यें महत्त्वाचे फेरबदल केलेले आहेत. यूरोपमधील अनिश्चित राजकीय परिस्थितीमध्यें एकेका पिढींत किती क्रांत्या होतील आणि त्यामुळें शिक्षणावर काय परिणाम होईल हें सांगणें कठिण आहे.

### राष्ट्रीय शिक्षणाची परंपरा

राष्ट्रीय उन्नतीकडे शिक्षणाचा उपयोग करून घेतां येईल या तत्त्वाचें आकलन यूरोपमध्यें प्रथम जर्मनीस झालें. १८०६ मध्यें फरान्सनें जीना येथें

जर्मनीचा पराभव केला. त्या वेळेपासून आपल्या समाजांत व शिक्षणांत आमूलाग्र पुनर्घटना केली पाहिजे असें जर्मन राज्यकर्त्यांना वाटूं लागलें. शिक्षणपद्धतीचें ध्येय केवळ जुन्या ग्रीक व रोमन भाषा शिकविणें हेंच नसून राष्ट्र तयार करणें हें आहे, असें जर्मन बादशहानें आपल्या शिक्षणपुढाऱ्यांना स्पष्ट शब्दांत सांगितलें---"आम्हांला आतां ग्रीक व रोमन तरुण तयार करावयाचे नसून जर्मन तरुण तयार करावयाचे आहेत." या दृष्टीनें जर्मनींत बौद्धिक, औद्योगिक, आणि प्रौढ शिक्षणाचा पाया घातला गेला. जर्मनीची औद्योगिक आणि प्रौढ शिक्षणपद्धति इतकी उच्च दर्जाला पोंचली होती कीं इंग्लंडसारख्या देशांनी तेथें आपले प्रतिनिधी पाठवून या पद्धतीविषयीं माहिती आणविली व स्वतःच्या शिक्षणसुधारणेकडे त्यांचा उपयोग करून घेतला. महायुद्धापूर्वीच्या जर्मनींत सार्वत्रिक प्राथमिक शिक्षणाचा प्रसार जनतेंत झालेला होता. १८७१ सालपासून प्रौढ शिक्षणाची पद्धति अस्तित्वांत आली होती. ज्ञान व विद्वत्तेच्या दृष्टीनें उच्च दर्जाच्या दुय्यम शिक्षणाच्या शाळा आणि विद्यापीठें यांचा प्रसार झाला होता. जर्मन शिक्षणांतून बाहेर पडलेल्या विद्वानांचा दर्जा मोठा होता. मध्यम व उच्च औद्योगिक शिक्षणाच्या शाळा शहरांतून सर्वत्र पसरलेल्या होत्या. विद्यार्थ्यांना लष्करी शिक्षण आवश्यक होतें. शिक्षणाचे द्वारें जर्मन राष्ट्रीयत्वाचा परिपोष केला जात होता. जर्मन राष्ट्रांत व शिक्षणांत पिढ्यान् पिढ्या चालत आलेली ही राष्ट्रीयत्वाची परंपरा लक्षांत ठेवणें जरूर आहे. तिचा परिणाम पुढच्या शिक्षणपद्धतीवर व राष्ट्रावर झालेला आहे.

## जुन्या पद्धतीविषयीं असंतोष

जर्मन साम्राज्यांतील ही शिक्षणपद्धति त्या वेळीं कितीही उत्कृष्ट असली तरी समाजांत वाढणाऱ्या नवीन नवीन कल्पनांच्या दृष्टीनें ती सदोष होती. विद्वान् आणि पंडित तयार करण्याच्या मोहानें व्यक्तीच्या बौद्धिक वाढीवर शिक्षणक्रमानें फाजील भर दिलेला होता. शिस्तीचें स्तोम फार माजलें होतें. विद्यार्थ्यांच्या नैसर्गिक वृत्तींना वाव नव्हता. नवीन शिक्षणशास्त्राचे दृष्टीनें हे दोष जुन्या पद्धतींत होते त्याविरुद्ध सार्वत्रिक असंतोष उत्पन्न झाला होता. सामाजिक दृष्टीनें जागृत झालेल्या सामान्य जनांत या

पद्धतीविषयीं असमाधान होतें. कारण या जुन्या शिक्षणक्रमांत दोन जाती होत्या. श्रीमंत व ऐपतदार पालकांच्या मुलांकरितां एक प्रकारचें शिक्षण आणि गोरगरिबांकरितां निराळ्या प्रकारचें शिक्षण असे दोन प्रकार त्यांत होते. गरिबांकरितां फक्त प्राथमिक शिक्षण असे. या शिक्षणपद्धतींतून जाणाऱ्यांना विद्यापीठाचे व दुय्यम शिक्षणाचे दरवाजे बंद होते. उलट दुसऱ्या श्रीमंती शिक्षणपद्धतीमधून जाणाऱ्यांना उच्च शिक्षण व त्यामुळें मिळणाऱ्या सर्व राजकीय व सामाजिक सवलती यांचें मुक्तद्वार होतें. गरिबी शिक्षणपद्धतींतून जाणाऱ्यांपैकीं दहा हजारांत एकाद्याचाच उच्च शिक्षणामध्यें प्रवेश होई. अशा या जातिभेदात्मक शिक्षणपद्धतीविरुद्ध गरीब कामकरी-शेतकरी वर्गाच्या मनांत असंतोष उत्पन्न झालेला होता.

जर्मन शिक्षणांत हा जो जातिभेद होता तशाच प्रकारचा भेद इंग्लंड, फरान्स इत्यादि देशांतही गेल्या पिढीपर्यंत होता. तो मोडून गरीब–श्रीमंत सर्वांकरितां एकाच प्रकारची शिक्षणपद्धति स्थापन करावी अशा प्रकारची चळवळ त्या देशांतून झाली. त्या चळवळींना निरनिराळ्या देशांत निरनिराळीं नांवें होतीं. फरान्समध्यें ‘लेकोल यूनिक’, इंग्लंडमध्यें ‘सेकंडरी एज्युकेशन फॉर ऑल’, आणि जर्मनीमध्यें ‘आईन्‌हाईट् शूल’ अशा निरनिराळ्या नांवाखालीं ही चळवळ झाली; तरी सर्वांचा उद्देश एकच होता कीं शिक्षणांत उच्च वर्गाकरितां निराळी आणि खालचे वर्गाकरितां निराळी पद्धति असा सामाजिक अन्याय नसावा.

## जर्मन शिक्षणांत लोकशाहीचा उदय

महायुद्धांत जर्मनीचा पराभव होऊन शिवाय देशांत राज्यक्रांति झाली. कैसर बादशहाऐवजीं तेथें लोकशाही (रीपब्लिक) स्थापन झाली. या राज्यक्रांतीमुळें शिक्षणांत जे अनेक महत्त्वाचे फेरबदल झाले त्यांतील महत्त्वाचा फरक म्हणजे प्राथमिक शिक्षणांतील जातिभेद नष्ट करण्यांत आला हा होय. गरीब आणि श्रीमंत सर्वांकरितां एकच प्रकारची चार वर्षांची प्राथमिक शाळा अस्तित्वांत आली. त्यापूर्वीं सामान्य जनांचे आणि श्रीमंतांचे प्राथमिक अभ्यासक्रमांत फरक होता. तो नाहींसा करण्यांत आला, त्यामुळें गरीब विद्यार्थ्यांनाही उच्च शिक्षणाचीं द्वारें मोकळीं झालीं. जरूर तेथें क्रमिक पुस्तकें

व साहित्यसामुग्री ही देखील मोफत देण्याची व्यवस्था करण्यांत आली. अमेरिकेंत एका शतकापूर्वी शैक्षणिक संधिस्वातंत्र्याचें जें तत्त्व अस्तित्वांत आलें तेंच मर्यादित स्वरूपांत जर्मनींत मान्य झालें.

दुसरा महत्त्वाचा फरक म्हणजे हस्तव्यवसायाचें आवश्यक शिक्षण अंमलांत आलें हा होय. श्रीमंत आणि गरीब सर्वांना शैक्षणिक हस्तव्यवसायाच्या अभ्यासक्रमांतून जावें लागलें. सामाजिक दृष्ट्या वरच्या वर्गाचे पालकांना ही गोष्ट नवीनच होती. दुय्यम शिक्षणसंस्थांमध्येंही या नवीन राजवटींत महत्त्वाचे फरक झाले. नवीन प्रकारचें दुय्यम शिक्षण देणाऱ्या संस्था अस्तित्वांत आल्या. उच्च शिक्षणाची संधि सर्वांना द्यावी हा त्यांचा मुख्य उद्देश होता.

सारांश, युद्धानंतरच्या लोकशाही युगांत सामाजिक अन्याय दूर करण्याच्या दृष्टीनें व नवीन जन्मास आलेल्या शैक्षणिक तत्त्वांच्या अनुरोधानें जर्मन शिक्षणपद्धतीत अनेक सुधारणा झाल्या. परंतु त्यापेक्षांही मूलग्राही फरक १९३३ च्या नाझी राज्यक्रांतीनंतर अस्तित्वांत आला.

## नाझी शिक्षणक्रांति

हिटलरच्या नेतृत्वाखाली जर्मनीनें साम्राज्याच्या जीवनांत राजकीय, आर्थिक, व सामाजिक दृष्टीनें आमूलाग्र फरक करण्याचें धोरण ठेविलें. जर्मन नाझींनीं केलेली शिक्षणाची पुनर्घटना समजण्याकरितां नाझींच्या राजकीय व सामाजिक तत्त्वज्ञानाची माहिती झाली पाहिजे, कारण आजच्या जर्मन शिक्षणांत राजकारण आणि शिक्षण यांची अभेद्य अशी सांगड घातली गेलेली आहे.

१९३३ सालीं झालेली राष्ट्रीय समाजवादी किंवा नाझी (नॅशनल् सोशॅलिस्ट) राज्यक्रांति ही केवळ राजकीय स्वरूपाचीच नाहीं. समाजाच्या सांस्कृतिक जीवनाची आमूलाग्र पुनर्घटना करावी असा तिचा उद्देश आहे. जर्मन समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत आपले विचार पोंचले पाहिजेत या दृष्टीनें नाझी सत्तेनें शिक्षणपद्धतीचा उपयोग करून घेतलेला आहे. नवीन जोमाचा जर्मनी निर्माण करावा असा नाझी पुढाऱ्यांचा निर्धार आहे. नवीन राजकीय ध्येयांची आणि विचारांची छाप शिक्षणावर पडलेली आहे. जर्मन

शिक्षणाचें स्वतंत्र तत्त्वज्ञान नाझी पुढाऱ्यांनीं निर्माण केलेलें आहे, त्यांत चांगल्या तत्त्वांबरोबर पुष्कळ दुराग्रहांचीही भेसळ झालेली आहे. परंतु शिक्षणावर त्यांचा परिणाम झालेला आहे ही गोष्ट मात्र सत्य आहे.

## ‘ जर्मन भूमि ’ आणि ‘ जर्मन वंश ’ हें सूत्र

जर्मन शैक्षणिक तत्त्वज्ञानाचें मुख्य सूत्र “ मायभूमि आणि जर्मन वंश ” (सॉईल् अँड ब्लड्) असें आहे. तरुण पिढींत जर्मन राष्ट्राविषयीं निष्ठा आणि जर्मन वंशाच्या समाजाविषयीं प्रेम निर्माण करणें हें शिक्षणाचें ध्येय आहे. जर्मनीचा इतिहास, संस्कृति, परंपरा, वाङमय, तत्त्वज्ञान यांची माहिती मुलांना झाली पाहिजे. सर्व जर्मन लोक एका वंशाचे आहेत ही भावना निर्माण व्हावी. अशा रीतीनें राष्ट्र आणि समाज यांचेविषयीं निष्ठा उत्पन्न झाली तरच तरुण पिढी देशाचे उन्नतीकरितां व संरक्षणाकरितां तयार होईल असें पुढाऱ्यांना वाटूं लागले.

महायुद्धानंतरच्या शांततेच्या काळांत जर्मनीमध्यें आंतरराष्ट्रीयत्व आणि शांतता या तत्त्वांचा प्रसार होऊं लागला होता. जर्मनीची राजकीय स्थिति लक्षांत घेतां हा उदारमतवाद धोक्याचा आहे असें पुढाऱ्यांना वाटलें. महायुद्धांत जर्मनीचा पराभव झाल्यानंतर व्हर्सायच्या तहानें जर्मनीवर इतर राष्ट्रांनीं जो अन्याय केला, त्याचें परिमार्जन करण्याकरितां राष्ट्रीय वृत्तीची आणि लष्करी बाण्याची अशी तरुण पिढी निर्माण करणें जरूर होतें. म्हणून राष्ट्रीयत्वाचें संगोपन करणें हें जर्मन शिक्षणाचें मुख्य ध्येय आहे. विवक्षित राजकीय परिस्थितीचा परिणाम शैक्षणिक तत्त्वांवर कसा होतो तें पाहण्यासारखें आहे.

## संस्कृतीचें संगोपन

जर्मन संस्कृति शुद्ध स्वरूपांत राखणें हें राष्ट्रीयत्वपोषक शिक्षणाचें मुख्य ध्येय आहे. जर्मन तरुणांना त्यांच्या स्वतःच्या पुरातन काळापासून चालत आलेल्या संस्कृतीचें ज्ञान झालें पाहिजे. म्हणून साहित्य, तत्त्वज्ञान, कला, जानपद वाङमय, कलाकौशल्य, जर्मन पौराणिक कथा इत्यादि ज्या ज्या गोष्टींचा अंतर्भाव संस्कृतीमध्यें होतो त्यांचें ज्ञान जर्मन विद्यार्थ्यांना देऊन त्यांचे ठिकाणीं संस्कृतीविषयीं अभिमान उत्पन्न केला जातो. शुद्ध

जर्मन संस्कृतीचें रक्षण झालें पाहिजे. इतर राष्ट्रांच्या संस्कृतीशीं तिचें मिश्रण होऊं नये, असें जर्मन लोकांना वाटतें. इतरांचे संस्कृतीविषयींही जर्मनीला आदर आहे. पण प्रत्येकानें आपापल्या संस्कृतीचें वैशिष्टय राखण्यांतच हा आदर अधिक व्यक्त होतो, अनुकरण करण्यानें उभय संस्कृतींची हानि होते अशी जर्मनीची दृष्टि आहे.

## क्षात्रवृत्तीवर जोर

नाझींच्या तत्त्वज्ञानांत सामर्थ्य संपादनाला विशेष स्थान आहे. राष्ट्रानें बलाची व सामर्थ्याची जोपासना करावी; त्याचप्रमाणें व्यक्तीनें क्षात्रवृत्तीचें संगोपन (सोल्जर लाइक् पर्सनॅलिटी) केलें पाहिजे. 'युद्ध झालें तर प्रत्येकानें मर्दाप्रमाणें वागलें पाहिजे', असें जर्मनीनें तरुणांना ब्रीदवाक्य दिलेलें आहे. या शिपाई बाण्याचा इष्ट परिणाम व्यक्तीच्या व राष्ट्राच्या नैतिक आणि आध्यात्मिक जीवनावर होतो असें नाझींचें म्हणणें आहे. शिपाई बाण्यानें शेंकडों तरुण चाल (मार्च) करूं लागले म्हणजे अंतःकरणानें आपण सर्व एक आहोंत अशी त्यांची भावना होते व त्यामुळें राष्ट्रैक्याला मदत होते. बलोपासनेचें हें तत्त्व शिक्षणांत शिरल्यामुळें आज जर्मन शाळा व महाविद्यालयें यांना बाह्यतः लष्करी शाळांचें स्वरूप आलेलें आहे. विद्यार्थ्यांचा एकरंगी (यूनिफॉर्म) पोषाख, त्यांची वागण्याची व चालण्याची ढब आणि शिस्त या सर्व गोष्टींत लष्करी बाणा आलेला आहे. शारीरिक आणि वाङ्मयात्मक सर्व शिक्षणविभागांत हा क्षात्रवृत्तीचा सांप्रदाय शिरलेला आहे.

## वंशशुद्धीचें तत्त्वज्ञान

जर्मन लोक हे शुद्ध आर्यन् वंशापासून उत्पन्न झाले असून त्यांचा वंश अद्याप शुद्ध राहिलेला आहे. साहस, पराक्रम, उद्योगशीलता आणि कनिष्ठ समाजांवर राज्य करण्याची कुशलता हे गुण आर्य लोकांचे ठिकाणीं होते तेच आज जर्मन लोकांचे ठिकाणीं आहेत. हे गुण पिढयान् पिढया टिकविले पाहिजेत. याकरितां इतर वंशाचे लोकांपासून जर्मन लोकांना अलिप्त ठेविलें पाहिजे. कनिष्ठ वंशाशीं जर्मनीच्या वंशाचें मिश्रण झालें तर कनिष्ठ गुण त्यांच्यांत उतरून राष्ट्राचा व समाजाचा अधःपात होईल. या दृष्टीनें

वंशाभिमान आणि वंशशुद्धीचें महत्त्व शिक्षणामधून तरुण पिढीला शिकविणें जरूर आहे असें जर्मनीचें धोरण आहे.

वर जें वंशशुद्धीचें तत्त्वज्ञान दिलें आहे तें कृत्रिम असून शास्त्रीय सत्याला धरून नाहीं. तो एक दुराग्रह आहे. पण जर्मनीनें आजच्या स्थितींत त्याचा उपयोग करून घेतला आहे.

## एक पुढारी, एक पक्ष, एक मत

लोकशाहीच्या तत्त्वाविरुद्ध नाझींनीं बंड पुकारून पंथभेद, मतभेद, विचारस्वातंत्र्य, पक्षोपपक्ष इत्यादि तत्त्वांना मूठमाती दिली. देशांत एकच पुढारी असावा. त्या पुढाऱ्याचें सर्वांनीं ऐकलें पाहिजे. देशांत एकच पंथ. दुसरा पंथ निर्माण झाल्यास दुफळी होईल व इतर राष्ट्रें त्याचा फायदा घेतील. राष्ट्रपुरुषाच्या (स्टेट) शरीरांत समाजांतील सर्व व्यक्ती येतात, त्यांना निराळें अस्तित्व नाहीं. हिटलरसारखा पुढारी हा त्या राष्ट्रपुरुषाचा प्रतिनिधि आहे. त्याचें आज्ञापालन हें सर्वांचें कर्तव्य आहे. पुढाऱ्यांचें आज्ञापालन कसें करावें याचें शिक्षण तरुण पिढीला शिक्षणांतून दिलें पाहिजे. अशा तत्त्वांवर नवीन शिक्षणाची उभारणी झाली आहे. इतर देशांतील शाळांत लोकशाहीचें शिक्षण म्हणून 'मुलांचें स्वराज्य' असतें तसें जर्मनींत नाहीं. लष्करी शिस्त, बिनतक्रार आज्ञापालन, सामुदायिक हिताकरितां मतभेद विसरणें, आणि पुढाऱ्याच्या मतांशीं एकरूप होणें, हे गुण जर्मन विद्यार्थ्यांच्या अंगीं आणण्याचा नवीन शिक्षणाचा प्रयत्न आहे.

तात्कालिक परिस्थितींत या गुणांचा उपयोग झाला तरी दूरदृष्टीनें विचार करितां या शिक्षणपद्धतीमध्यें स्वतंत्र विचारशक्ति व वैयक्तिक कर्तबगारी हे गुण मारले जातील अशी शंका आल्यावाचून राहात नाहीं.

## राष्ट्रहिताकरितां वर्गसहकारिता

समाजवादी पक्षाशीं लढा करून व त्याला नामोहरम करून नाझी पक्ष अधिकारारूढ झाला आहे. समाजवादी तत्त्वाशीं त्याचा विरोध आहे. वर्ग-युद्ध हें समाजवादाचें तत्त्व आहे, तर वर्गांचें ऐक्य हें नाझींचें तत्त्व आहे. हें तत्त्व शिक्षणाचे द्वारें तरुण पिढीला द्यावयाचें आहे. राष्ट्रामध्यें मालक आणि मजूर, भांडवलवाले आणि कामकरी, असे पक्ष कल्पून त्यांत दुही उत्पन्न न

करितां ऐक्य निर्माण केलें पाहिजे. त्याचप्रमाणें ज्या ज्या अनेक कारणांनीं देशांत दुही माजण्याचा संभव असेल तीं कारणें व दुहीच्या भावना नाहींशा करून जर्मनींत ऐक्य स्थापन होणें जरूर आहे. देशांत ज्या भावनांनीं ऐक्य निर्माण होईल त्या निर्माण करणें हें शिक्षणाचें काम आहे. म्हणून सुशिक्षित आणि अशिक्षित, खेडूत आणि शहरवासी, बुद्धिजीवी आणि श्रमजीवी, अशा सर्व प्रकारच्या लोकांना एकत्र आणून आपण एका राष्ट्राचे नागरिक आहोंत, खांद्यास खांदा लावून जर्मनीकरितां काम केलें पाहिजे, असा अभिमान त्यांच्यांत उत्पन्न केला जातो. वैयक्तिक बुद्धि, श्रम, व संपत्ति वैयक्तिक फायद्याकरितां व स्वार्थाकरितां नसून राष्ट्रांकरितां आहे. त्याच्या सेवेकरितां सर्वांनीं आपलें सर्वस्व अर्पण केलें पाहिजे. भांडवलवाले व मालक यांची संपत्ति राष्ट्राकरितां आणि मजूरांचे श्रम हेही राष्ट्राकरितांच आहेत. राष्ट्रीय दृष्टीनें दोघेही सारखेच महत्त्वाचे आहेत. त्यांत सत्तेचा व स्वार्थाचा प्रश्न नाहीं. भावनेच्या आणि विचारांच्या दृष्टीनें समाजांतील निरनिराळ्या वर्गांमध्यें ऐक्यवृत्ति उत्पन्न करणें हें शिक्षणाचें कार्य आहे. त्याकरितां सर्व दर्जाचे व व्यवसायाचे लोकांचीं मुलें एकत्र आणून त्यांच्यांत समताभाव उत्पन्न करण्याचा प्रयत्न जर्मन शिक्षणांत केला जातो.

## एकांगी बौद्धिक वाढ नको

नाझी तत्त्वांचा कृतीवर अधिक भर आहे. म्हणून पूर्वीच्या शिक्षणपद्धतीमध्यें बौद्धिक अभ्यासक्रमावर भर होता तो नवीन योजनेंत कमी करण्यांत आलेला आहे. व्यक्तीची केवळ बौद्धिक दृष्टीनेंच एकांगी वाढ न करितां ती सर्व बाजूंनीं झाली पाहिजे. याकरितां शारीरिक व लष्करी शिक्षण, काटकपणा, मनोनिग्रह, प्रत्यक्ष राष्ट्रीय व सामाजिक काम करण्याची संवय, शारीरिक कष्टाचीं कामें करणें अशा कार्यक्रमांचा समावेश शिक्षणांत केलेला आहे. महायुद्धानंतरच्या शिक्षणांत बौद्धिक शिक्षणांतील अतिरेकाविरुद्ध जी प्रतिक्रिया झाली होती तीच नाझी शिक्षणपद्धतींत उतरलेली आहे. व्यक्तीची सार्वांगिक व चौरस वाढ हेंच शिक्षण. एकादा विद्यार्थी प्रत्यक्ष ज्ञानसंग्रहाचे दृष्टीनें जरी कमी असला तरी त्याला बौद्धिक परिपक्वता आली असेल तर वरचे वर्गांत घालावा असा नवीन नियम अंमलांत आलेला आहे. विद्यार्थी

इतर विषयांत चांगला असला तर एकाद दुसऱ्या विषयांत नापास असला तरी वर जाऊं शकतो.

## शिक्षणाचा खेडऱ्याकडे ओढा

नाझी शिक्षणपद्धतींत ग्रामीय जीवनावर विशेष भर देण्यांत आलेला आहे. राष्ट्राची खरी शक्ति खेडेगांवांत व शेतावर आहे. तेथून चांगल्या माणूसबळाचा व बुद्धीचा पुरवठा होत राहिला तर राष्ट्र जगेल. नाहीं तर औद्योगिक व शहराच्या जीवनानें तें क्षीण होऊन जाईल. परंतु आजच्या शहराच्या राहणीमुळें व शिक्षणसंस्था शहरांत असल्यामुळें सुशिक्षिताला ग्रामीय जीवन आवडत नाही. म्हणून शिक्षणसंस्थाच शक्य तेथें खेडेगांवांत नेण्याचें धोरण विद्याखात्यानें स्वीकारलेलें आहे. प्राथमिक शिक्षकांचीं महाविद्यालयें (ट्रेनिंग कॉलेज) शहरांतून खेड्यांत नेलीं जात आहेत. शहरांत असलेल्या विद्यापीठांतील विद्यार्थ्यांची संख्या मर्यादित करून खेड्यांतून शहरांत येणारा विद्यार्थ्यांचा प्रवाह खेड्यांतच अडवून धरला जात आहे. प्राथमिक शिक्षणाचे अखेरचे वर्षी सर्व विद्यार्थ्यांना खेडेगांवांत नेऊन तेथें शिक्षण दिलें जातें. शहरांतील विद्यार्थ्यांना खेड्यांत जाऊन राहतां यावें म्हणून प्रत्येक शाळेचें एक ग्राम-निवासाचें घर खेडेगांवांत असावें असा उपक्रम सुरू झाला आहे. सारांश, शिक्षणाला शहराचा व पोषाखीपणाचा फार वास लागला होता तो कमी करून खेडेगांवांकडे विद्यार्थ्यांचें व शिक्षकांचें लक्ष वळविलें जातें. शेतकरी व विद्यार्थी आणि शिक्षक यांचा निकट परिचय यावा; विद्यार्थ्यांनीं खेड्यांतील शेती व उद्योगधंदे यांच्यांत भाग घ्यावा; अशा प्रकारचे कार्यक्रम शिक्षणांत समाविष्ट झालेले आहेत.

## राजकीय शिक्षणावर भर

नाझी शिक्षणांत राजकीय शिक्षणावर विशेष भर आहे. सर्व अभ्यासक्रमांतून राजकीय विचार पेरले गेलेले आहेत. नाझी शिक्षणाचीं मुख्य शिक्षणसूत्रें क्रीक या ग्रंथकारानें लिहिलेल्या एका पुस्तकांत आहेत. त्याचें नांव "राष्ट्रीय राजकीय शिक्षण" (नॅशनल पोलिटिकल् एज्युकेशन) असें आहे. यावरून नवीन शिक्षणपद्धतीचा रोख राष्ट्रसंघटन व राजकीय जागृति यांवर आहे हें सहज लक्षांत येईल. जर्मनींतला प्रत्येक शिक्षक विशिष्ट

राजकीय शिक्षणामधून गेला पाहिजे. वर्षांतून चार आठवडे शिक्षकांकरितां खास छावणी असते. त्या ठिकाणीं शिक्षकानें जरूर गेलें पाहिजे. तेथें राष्ट्रीय समाजवाद ऊर्फ नाझी राजकारण, नाझी शिक्षणाची भूमिका इत्यादि विषयांचें शिक्षण दिलें जातें. शारीरिक आणि शेतकऱ्यांच्या जीवनाशीं परिचय या गोष्टींचाही समावेश छावणीच्या कार्यक्रमांत होतो. शिक्षक "खाकी डगलेवाला" ( ब्राऊन शर्ट किंवा एस्. ए. ) म्हणजे हिटलरचा कट्टा अनुयायी असावा. नेमणूक होतांना केवळ विद्वत्तेकडे लक्ष न देतां इतर गुणांकडेही पाहिलें जातें. त्यांत राष्ट्रीय निष्ठा, राजकीय मतें, आणि विद्यार्थ्यांना स्फूर्ति देण्याची पात्रता या गुणांवर विशेष लक्ष असतें. विद्यार्थ्यांना राजकीय शिक्षण देण्याचे दृष्टीनें उन्हाळ्यांत तीन आठवडे वर्ग भरविले जातात. राजकारण, शारीरिक लष्करी शिक्षण, आणि ग्रामीय जीवनाचा अभ्यास असा त्रिविध कार्यक्रम या वर्गांत करून घेतला जातो. अनेक शाळांचे प्रौढ विद्यार्थी एकत्र मिसळून लायक अशा शिक्षकाचे देखरेखीखालीं हे वर्ग चालविले जातात.

## नवीन शिक्षणाचा मालमसाला

नाझींनीं शिक्षणांत नवीन असा कांहीं शोध लाविलेला नाहीं. त्यांचें राजकीय तत्त्वज्ञान फक्त नवीन आहे. जर्मनीमध्यें अनेक वर्षें शिक्षणाचे प्रयोग आणि विचार चाललेले आहेत. किंबहुना महत्त्वाच्या शैक्षणिक तत्त्वांचा जन्म जर्मनींतच झालेला आहे. फरोबेल, हर्बार्ट, कर्शेनस्टाईनर्, नातॉर्प, स्प्रांगर इत्यादि शिक्षणतज्ज्ञांनीं जर्मनीला अनेक शिक्षणाचीं तत्त्वें दिलेलीं आहेत. या मालमसाल्याचा उपयोग करून घेऊन व आपला राजकीय मसाला त्यांत टाकून नाझींनीं आपलें शैक्षणिक तत्त्वज्ञान बनविलें. विस्कळित अशा तत्त्वांना एका सुसंगत विचारसरणींत ओवून, त्यांना एका जिवंत अशा राजकीय तत्त्वज्ञानाची जोड देण्याचें काम नाझी शिक्षणपुढाऱ्यांनीं केलें. तुलना करून पाहिली तर रशिया व जर्मनी यांच्या शिक्षणतत्त्वांत साम्य दिसेल, पण त्यांच्या राजकीय व सामाजिक तत्त्वज्ञानांत मात्र विरोध आहे.

## शिक्षणाचें व्यापक क्षेत्र

शाळेच्या आवारांत आणि वर्गांतच शिक्षण होतें असें नाहीं, बाहेरही तें होत असतें. म्हणून बाहेरचें वातावरण विशिष्ट ध्येयांनीं भारणें हेंही

विद्याखात्याचें काम आहे, अशी नाझींची व्यापक कल्पना आहे. म्हणून शाळेच्या बाहेरील शिक्षणसंस्थांचा उपयोग करून घेण्यांत आलेला आहे. क्रीडांगण, समाजजीवन, विद्यार्थीसंघ, वननिवास, ग्रामनिवास, छावण्या इत्यादि अनेक संघटनांचा शिक्षणाचे कार्यक्रमांत समावेश झालेला आहे. नाझींचे हातांत शिक्षणखातें आल्यापासून प्रत्यक्ष शिक्षणपद्धतीच्या बाह्य स्वरूपांत त्यांनीं आमूलाग्र असा फरक केला नाहीं. परंतु विद्यमान शिक्षणाला नवें धोरण व नवी दृष्टि दिली आणि याच शिक्षणाला समांतर अशी निराळी शैक्षणिक संघटना निर्माण केली. या स्वतंत्र संघटनेंत हिटलर युवक संघ, श्रमाच्या छावण्या, ग्रामनिवास, शारीरिक शिक्षण, राजकीय अभ्यासक्रम इत्यादि गोष्टींचा समावेश होतो. बौद्धिक शिक्षणाव्यतिरिक्त अभ्यासेतर व्यवसायांतही किती महत्त्वाचें शिक्षण देण्याची शक्यता आहे, हें तत्त्व लक्षांत घेण्यासारखें आहे.

## समाजजीवन हेंच शिक्षणाचें क्षेत्र

नाझींच्या पूर्वी शिक्षणतज्ञांनीं जे निरनिराळे प्रयोग व तत्त्वसंशोधन केलें त्यांचा उपयोग नाझींनीं करून घेतला. याचें उत्कृष्ट उदाहरण त्यांच्या प्राथमिक शिक्षणाच्या पुनर्घटनेंत दिसून येतें. समाज व शिक्षण हीं अभिन्न व एकरूप आहेत या तत्त्वाचें यथाशक्य परिपालन ग्रामीय प्राथमिक शिक्षणांत झालेलें आहे. आतांपर्यत अभ्यासक्रमांतील ज्ञानाची व समाजांतील जीवनाची फारकत झालेली होती. म्हणून शिक्षण आणि समाज यांचा संबंध तुटला होता. शिक्षणाकरितां किंवा बौद्धिक तालमीकरितां लॅटिन, ग्रीक, व गणित यांसारखे विषय शाळेनें शिकविले तरी त्यांचा प्रत्यक्ष संबंध समाजाशीं कोठेंच नव्हता. जर्मनीच्या नवीन शिक्षणपद्धतींत केवळ बुद्धीला प्राधान्य न देतां, साधन या दृष्टीनें तिचा उपयोग करून घेतलेला आहे. नाझी तत्त्वज्ञानांतील हा महत्त्वाचा सिद्धांत आहे कीं बौद्धिक जीवनाइतकेंच भावनात्मक व कार्यात्मक जीवनही महत्त्वाचें आहे. नवीन शिक्षणांत विषयांची जुनी योजना रद्द होऊन तिच्या ऐवजीं भोंवतालचा समाज हाच अध्ययनाचा विषय झाला आहे. समाजाच्या विविध जीवनांत प्रत्यक्ष भाग घेऊन शिक्षण दृष्ट्या अनुभव मिळविणें हाच नवीन अभ्यासक्रम; वर्गशिक्षण हें त्याला पूरक म्हणून

असतें. खेड्यांतील समाज, शेतीचे व्यवसाय, निसर्गसृष्टि, उद्योगधंदे यांचें साहाय्यानें इतिहास, भूगोल, विज्ञान, भाषा इत्यादि विषयांचा अभ्यास होतो. रशियन शिक्षणाच्या तत्त्वांतील 'निसर्ग, समाज, व अर्थोत्पादन' या त्रयींची छाया या नवीन प्रयोगांत पडलेली स्पष्ट दिसते. शिक्षणतत्त्वें तींच, परंतु उपयोग निराळा.

## शाश्वत आणि तात्कालिक तत्त्वांचें मिश्रण

जर्मनींतील नाझींची शिक्षणपद्धति हीं अनेक तत्त्वांची खिचडी आहे. तात्कालिक आणि शाश्वत, स्थानिक आणि सार्वत्रिक, परिस्थिति–विशेष आणि सामान्य, अशा दोन्ही स्वरूपांचीं तत्त्वें एकत्र मिसळलेलीं आहेत. जर्मनींत अनेक वर्षें चालत आलेल्या शैक्षणिक विचारपरंपरेंतून शाश्वत आणि सार्वत्रिक अशा शिक्षणतत्त्वांचा समावेश त्यांत झालेला आहे ; त्याचबरोबर विशिष्ट राजकीय व राष्ट्रीय परिस्थितींत जरूर असलेल्या स्थानिक, तात्कालिक, व परिस्थितिविशेष अशा तत्त्वांचीही जोड त्यांना दिलेली आहे. शारीरिक शिक्षण, समाजसंबद्ध अभ्यासक्रम, व्यक्तीची चौरस वाढ, अर्थोत्पादक जीवनाशीं परिचय इत्यादि तत्त्वें सर्वमान्य होण्यासारखीं आहेत. जर्मन वंशनिष्ठा, शिरसावंद्य आज्ञापालन, लष्करी शिक्षणावर जोर, विशिष्ट विचारसरणींचा प्रचार इत्यादि तत्त्वें हीं जर्मनीच्या विशिष्ट राजकीय परिस्थितींतून उत्पन्न झालेलीं आहेत.

## शाश्वत स्वरूपाचीं तत्त्वें

महायुद्धापूर्वीच्या जर्मन शिक्षणांत बौद्धिक शिक्षणावर अवास्तव भर होता, त्याविरुद्ध अनेक वर्षें प्रतिक्रिया चालू होती ; तिचा कळस नाझी कारकीर्दींत झाला. नवीन शिक्षणक्रमांत बौद्धिक शिक्षणाइतकेंच महत्त्व भावना आणि प्रत्यक्ष क्रिया यांना दिलेलें आहे. प्राथमिक शिक्षणापासून विद्यापीठ शिक्षणापर्यंतच्या सर्व क्षेत्रांत ही नवीन प्रवृत्ति अनुभवास येते. जर्मनीनें आपल्या नवीन शिक्षणपद्धतींत बुद्धि आणि क्रिया, ज्ञान आणि आचार, तत्त्वज्ञान व व्यवहार, अशा अंगांचा समन्वय यशस्वी रीतीनें करून दाखविला तर शिक्षणांत तें एक नवीन तत्त्व प्रस्थापित होईल.

शालेय शिक्षणाची समाजापासून फटकून राहण्याची जी संन्यासी प्रवृत्ति होती तिला प्रतिक्रिया म्हणून, समाजजीवन हीच शाळा, असें तत्त्व जर्मनीनें स्वीकारलें आहे. अशाच प्रकारचे ग्रामीय प्राथमिक शिक्षणाचे प्रयोग मेक्सिको, पॅलेस्टाईन, सीलोन इत्यादि ठिकाणीं चालू आहेत.

आरोग्य आणि शारीरिक शिक्षण यांवरील भर हा वाजवी आहे. तरुण पिढीला ग्रामजीवनाकडे व शेतीकडे खेंचण्याचा जर्मन प्रयोगही आजच्या आर्थिक परिस्थितीमध्यें अत्यंत आवश्यक असाच आहे. शेतीवरील आणि खेडेगांवांतील बुद्धिवान् तरुण पिढी आपापल्या समाजांत राहून तेथेंच अधिक उपयुक्त कशी होऊं शकेल हा आज पुष्कळ देशांत प्रश्न आहे. शिक्षण कृषिजीवनाला पूरक कसें करतां येईल या दृष्टीनें जर्मन प्रयोग महत्त्वाचा आहे. निसर्ग आणि ग्रामीय जीवनाचा अनुभव यांना मुलांच्या शिक्षणांत जें स्थान दिलें आहे तें नवीन शिक्षणविचारसरणीला अनुसरूनच आहे.

## तात्कालिक तत्त्वांची मीमांसा

शांततावाद, बुद्धिवाद, व्यक्तित्ववाद, लोकशाही, आंतरराष्ट्रीयत्व, इत्यादि उदार आणि प्रागतिक विचारसरणीविरुद्ध प्रतिक्रिया झालेली जर्मन शिक्षणांत दिसते. जर्मनीची राजकीय परिस्थिति याला जबाबदार आहे. पराभूत, अवमानित, आणि शस्त्रविहीन अशा राष्ट्राला शांततेपेक्षां युद्धवाद आवडतो ; आंतरराष्ट्रीयत्वापेक्षां राष्ट्रीयत्व पसंत पडतें ; बुद्धिवादापेक्षां सामर्थ्यवाद अधिक मानवतो. जर्मनीसारख्या पराभूत, अवमानित आणि शस्त्रहीन अशा कोणत्याही राष्ट्रांत जर्मनीसारखेच विचार उत्पन्न झाले असते, होतील, व होणें स्वाभाविक आहे. हा विशिष्ट परिस्थितीचा प्रश्न आहे. त्याबद्दल एकाद्या राष्ट्रास दोष देणें चुकीचें आहे. महायुद्धानंतर जर्मनींत लोकशाही स्थापन झालेली होती व उदारमतवादाचा पुष्कळ प्रचार झाला होता. परंतु राजकीय पक्षोपपक्ष, मतभेद, आणि मध्यवर्ति सत्तेची अशाश्वतता, यामुळें प्रतिक्रिया होऊन लोकशाही व व्यक्तिवाद या तत्त्वांचे ऐवजीं हुकूमशाही, आज्ञापालन, लष्करी शिस्त, आणि राष्ट्रवाद हीं तत्त्वें प्रचारांत आलीं. वंशशुद्धि आणि एकांतिक संस्कृतिनिष्ठा या तत्त्वांचा जन्म निद्रिस्त झालेल्या राष्ट्राला चेतवून जागृत करण्याकरितांच झालेला आहे

असें स्पष्ट दिसतें. राजकीय परिस्थितीमुळें तात्कालिक स्वरूपाचीं तत्त्वें जर्मन शिक्षणांत आलेलीं आहेत. परिस्थिति पालटल्याबरोबर त्या तत्त्वांतही बदल होईल. परंतु शाश्वत स्वरूपाचीं तत्त्वें मात्र कायम राहतील.

जर्मनी, रशिया, आणि इटली यांच्या शिक्षणपद्धतींपासून शिक्षणशास्त्र-जिज्ञासूंनीं एक बोध घ्यावयास पाहिजे. समाजाच्या परिस्थितीविषयीं शिक्षणाला उदासीन राहतां येत नाहीं. समाजाचीं ध्येयें जितकीं आकुंचित किंवा उदार असतील तितकें शिक्षण हें देखील आकुंचित किंवा व्यापक राहील. समाजाचीं ध्येयेंच विशाल आणि उदार अशीं ठेविलीं तर शिक्षणाच्या ठिकाणींही आकुंचितपणा येण्याची भीति नाहीं. केवळ आकुंचितपणाच्या भीतीनें समाजापासून दूर पळाल्यानें शिक्षण व्यापक होऊं शकत नाहीं.

## जर्मनी व हिंदुस्थान

राष्ट्रीय शिक्षणपद्धतीचा जन्म विशिष्ट समाजपरिस्थितींतून कसा होतो या तत्त्वाचें जर्मन शिक्षण हें एक उदाहरण आहे. त्यापासून हिंदुस्थानला कांहीं तत्त्वें सुचण्यासारखीं आहेत. समाजाचीं आणि राष्ट्राचीं ध्येयें निश्चित झालीं तरच शिक्षणाचीं ध्येयें हीं देखील निश्चित होतात. एरव्हीं समाजाला शिक्षणाचा फारसा उपयोग होत नाहीं. हिंदी समाजाची परिस्थिति जमेला धरून आपल्या शिक्षणाचीं तत्त्वें ठरविलीं पाहिजेत. इंग्लंड किंवा दुसऱ्या एकाद्या देशांतून आणलेलीं तत्त्वें उपयोगी पडतीलच असें नाहीं. परिस्थिती-नुरूप सारासार विचार केला पाहिजे. अनेक राष्ट्रांच्या शिक्षणपद्धती पाहून आपणांस विचार व सूचना मिळूं शकतील. परंतु त्यांतून सुसंगत असें शैक्ष-णिक तत्त्वज्ञान निर्माण करणें हें आपल्या समाज राष्ट्र व शिक्षणविषयक कल्पनांवर अवलंबून आहे. राष्ट्रांत ऐक्य निर्माण करून एका निष्ठेनें सर्व समाज बांधणें, आर्थिक दृष्टीनें उन्नति करणें, आणि संस्कृतीमधील इष्ट भागाची जोपासना करणें, हीं जर्मन शिक्षणाचीं तत्त्वें हिंदुस्थानच्या परि-स्थितींत उपयुक्त आहेत. परंतु तत्त्वसाधनांची विशिष्ट पद्धति व तंत्रें जर्मनी-पासूनच घेतलीं पाहिजेत असें नाहीं. तीं आपण येथेंही निर्माण करूं शकूं.

## प्रकरण एकोणिसावें

# प्राथमिक व उच्च शिक्षण

### शिक्षणांत जर्मनीची आघाडी

जर्मनी ही शिक्षणशास्त्राची जन्मभूमि आहे. या देशांतील आधुनिक शिक्षणाला प्रारंभ यूरोपमधील इतर देशांच्या आधीं झाला. जर्मनीची औद्योगिक व इतर शिक्षणपद्धति पाहण्याकरितां इतर राष्ट्रें आपापले प्रतिनिधि व चौकशी–मंडळें पाठवीत व त्या माहितीचे आधारानें आपल्या शिक्षणाची पुनर्घटना करीत. विविध प्रकारचें दुय्यम आणि औद्योगिक शिक्षण, प्रत्येक तपशिलांत परिपूर्णता, आणि विद्वत्तेची सखोलता, या दृष्टींनीं जर्मन शिक्षणाची प्रसिद्धि होती. १९१९ च्या आणि १९३३ च्या राजकीय क्रांती-नंतर जर्मन शिक्षणांत दोन वेळां पुनर्घटना झाली. त्यामुळें शिक्षणाच्या बाह्य आणि अंतस्थ अशा दोन्ही स्वरूपांत महत्त्वाचे फेरबदल झाले, तरी रशियन शिक्षणाप्रमाणें या शिक्षणपद्धतींत अभूतपूर्व अशी क्रांति झाली नाहीं. तिचें मूळ स्वरूप थोडयाफार फरकानें आहे तसेंच आहे. उदार शिक्षणसुधारणा-वाद्यांना त्यांच्या कल्पनेप्रमाणें सुधारणा करण्यास अवसर मिळाला नाहीं, कारण पुराण परंपरा आणि राजकीय परिस्थिति या गोष्टी प्रत्येक वेळीं प्रगतीच्या मार्गांत आल्या.

### सरकारी नियंत्रणाच्या मर्यादा

जर्मनींत अनेक संस्थानें अथवा प्रांत असून त्या सर्वांचें एक मध्यवर्ति सरकार आहे. प्रत्येक प्रांताला स्वतःचें असें शिक्षणखातें असतें. सर्व प्रांतांच्या शिक्षणांत सुसंगतता राखण्याकरितां जर्मनीचा एक शिक्षणमंत्री असतो. त्याला ‘ विद्या, शास्त्रें, आणि लोकशिक्षण मंत्री ’ ( मिनिस्टर ऑफ सायन्स, इन्स्ट्रक्शन अँड पॉप्युलर एंज्युकेशन) असा किताब आहे. त्याच्याकडून निघालेलीं फर्मानें सर्व प्रांतांना लागू असतात.

जर्मनींत शिक्षणावर सरकारचा पूर्ण ताबा आहे. प्राथमिक, दुय्यम, उच्च, औद्योगिक, प्रौढ अशा सर्व प्रकारच्या शिक्षणाची जबाबदारी

सरकारची आहे. स्थानिक अधिकाऱ्यांमार्फत शिक्षणसंस्था चालविल्या जातात. खाजगी शाळाही आहेत पण त्यांचेवर पुष्कळ नियंत्रण आहे. सरकारी परवानगीशिवाय कोणीही शाळा चालवूं शकत नाहीं. ज्या ठिकाणीं जरूरी असेल तेथें खाजगी शाळांना परवानगी मिळते, परंतु त्यापूर्वी शिक्षकांच्या पगाराचे व शाश्वतीचे दृष्टीनें आर्थिक स्थिति समाधानकारक आहे कीं नाहीं तें पाहिलें जातें. शिक्षकांना खाजगी शिकवण्या करितां येत नाहींत. त्या करण्यास कायद्यानें प्रतिबंध आहे ; विशिष्ट बाबतींतच परवानगी दिली जाते. खाजगी शाळा विशेष कारणाकरितांच काढतां येतात. विशिष्ट धर्मपंथाच्या लोकांना धार्मिक शिक्षण देण्याचे उद्देशानें किंवा शैक्षणिक प्रयोग करावयाचा असेल तर, सरकारची समाधानकारक खात्री झाल्यास, परवानगी मिळते. सारांश, प्रजेला काय शिकविलें जावें किंवा जाऊं नये या बाबतींत धोरण ठरविण्याचा सरकारचा हक्क आहे. म्हणून शिक्षणावर सर्व प्रकारचें नियंत्रण सरकारनें ठेविलेलें आहे. जर्मनींत ही पूर्वीपासूनची परंपरा आहे. १९१९ ते १९३३ च्या काळांत लोकशाही राज्यपद्धति होती, त्या काळांत हें धोरण जरा उदार झालें होतें. परंतु पुनः नाझी राज्यपद्धति आल्याबरोबर पूर्वीइतकेंच नियंत्रण आलेलें आहे.

## नियंत्रणाचा परिणाम

या सरकारी नियंत्रणाचे दोन परिणाम झालेले आहेत. विशिष्ट नियमांप्रमाणें शाळा चालल्या कारणानें शिक्षणाचा विशिष्ट दर्जा व पद्धति कायम राहूं शकते. त्यांत अव्यवस्थितपणा किंवा हलगर्जीपणा होऊं शकत नाहीं. लोकांच्या मर्जीवर कारभार सोंपविल्यामुळें माजणाऱ्या बजबजपुरीचा दुष्परिणाम शिक्षणावर होत नाहीं. उलट परिणाम असाही होतो कीं सरकारी नियंत्रण फार असल्यामुळें स्वतंत्र शिक्षणप्रयोगाला फारसा उत्साह राहात नाहीं. ज्या ज्या देशांत शिक्षणसत्ता सरकारचे हातांत केंद्रीभूत झालेली आहे त्या त्या ठिकाणीं नवीन शिक्षणप्रयोग व विचार यांना फारसें प्रोत्साहन मिळालेलें नाहीं. किंबहुना नाझींची कारकीर्द आल्याबरोबर अशा खाजगी शिक्षणप्रयोगाच्या संस्था त्यांनीं आपल्या नियंत्रणाखालीं घेतल्या. त्याकारणानें पूर्वीचे कार्यकर्ते सोडून गेले व त्या शिक्षणसंस्थांचें प्रयोगाचें स्वरूप

नष्ट होऊन त्या सरकारी संस्थांच्या ओळींत येऊन बसल्या. हेर गेहीब यांनीं शिक्षणप्रयोगार्थ चालविलेल्या ओडेनवॉल्ड शूल या संस्थेची अशीच स्थिति झाली.

## शाळापद्धतीची रचना

आवश्यक शिक्षण सहावे वयापासून सुरू होतें. त्या सुमारास प्रत्येक पालकानें मुलांना शाळेंत घातलेंच पाहिजे. सहा वयाच्या सुमाराला असलेल्या मुलांची खानेसुमारी होते व कोणत्या मुलांनीं कोणत्या शाळेंत जावें तें स्थानिक अधिकाऱ्यांकडून ठरवून दिलें जातें. सहा वयाचे पूर्वी बालोद्यान व बालगृह पद्धतीनें शिक्षणाची सोय आहे. परंतु या संस्था खाजगी आहेत. त्यांचा फायदा सुखवस्तु पालकांना घेतां येतो. सर्वत्रांकरितां या संस्था काढण्याइतकें द्रव्य सरकारजवळ नाहीं. बालोद्यान (किंडरगार्टन) पद्धतीचा जन्म जर्मनींत झालेला असून तिचा प्रसार स्वतःच्या जन्मभूमींतही होऊं नये हा योगायोग पाहण्यासारखा आहे.

प्राथमिक शिक्षण सहा ते दहा वयापर्यंत चार वर्षांचें असतें. सर्व शाळांतून एकच प्रकारचा अभ्यासक्रम शिकविला जातो. १९१९ पूर्वी श्रीमंत व सुखवस्तु पालकांचे मुलांकरितां स्वतंत्र प्राथमिक शाळा होत्या व गरिबांकरितां निराळ्या शाळा होत्या. पहिल्या प्रकारच्या शाळांतील अभ्यासक्रम दुय्यम शिक्षणाला जोडलेला होता. दुसऱ्या प्रकारच्या अभ्यासक्रमांतून वरच्या शिक्षणाकडे जाण्याची सोय नव्हती. महायुद्धानंतर लोकशाही स्थापन झाल्याबरोबर हा पंक्तिप्रपंच काढून टाकला गेला, खाजगी शाळांवर नियंत्रण पडलें, आणि सर्वांनीं एकच प्रकारचा अभ्यासक्रम शिकवावा असा कायदा झाला. या चतुर्वार्षिक प्राथमिक शाळेला 'ग्राऊंड स्कूल' किंवा 'फोक्स स्कूल' असें अभिधान आहे. सर्व जनतेला शिक्षण देणारी प्राथमिक शाळा असा तिचा अर्थ आहे.

चार वर्षांनंतर ज्यांना उच्च दुय्यम शिक्षणाकडे जावयाचें नसेल त्यांचे-करितां उच्च प्राथमिक शिक्षण चार वर्षांचें असतें. इकडच्या व्हर्न्याक्युलर फायनलप्रमाणेंच हा एकंदर आठ वर्षांचा अभ्यासक्रम असतो. त्यानंतर दिवसाचें पूर्णकाल शिक्षण सोडून देतां येतें.

पूर्णकाल सक्तीच्या शिक्षणाची मर्यादा सहा ते चौदा वर्षांपर्यंत आहे परंतु त्यानंतर शिक्षण अजिबात सोडून देतां येत नाहीं. अर्धकाळ किंवा सायंकाळ शिक्षणसंस्थांमध्यें साप्ताहिक सहा ते नऊ किंवा अधिक तास जावें लागतें. याला 'पुरवणी शाळा' (कंटिन्युएशन स्कूल) म्हणतात. चौदा ते अठरा वर्षांपर्यंत सर्वांना तें घ्यावें लागतें, असा कायदा आहे. परंतु जेथें आर्थिक अडचणीमुळें संस्थांची सोय नाहीं तेथें सूट मिळते. शेंकडा नव्वदपर्यंत मुलें व पन्नासपर्यंत मुली या शाळांत जातात.

## दुय्यम व उच्च शिक्षण

प्राथमिक शिक्षण चार वर्षांचें झाल्यानंतर दहावे वर्षी दुय्यम किंवा माध्यमिक शिक्षणास प्रारंभ होतो. या दुय्यम शिक्षणाच्या शाळांची विविधता जर्मनींत जितकी आहे तितकी अन्य देशांत नाहीं. मुलांमुलींकरितां मिळून एकंदर तेरा निरनिराळ्या प्रकारच्या शाळा आहेत ! या शाळांचे प्रकारांची ही संख्या कमी करून दोनतीन ठोकळ प्रकार ठेवावेत असा प्रयत्न अनेक वर्षे चालू आहे. या शाळांपैकीं प्रत्येक शाळा एकेका विषयाला वाहिलेली आहे. लॅटिन, ग्रीक सारख्या प्राचीन भाषा, फरेंच, इंग्लिशसारख्या अर्वाचीन परदेशी भाषा, जर्मन भाषा–इतिहास–संस्कृति, गणित व भौतिक शास्त्रें, इत्यादि निरनिराळ्या शाखांत पारंगत विद्यार्थी तयार करणें हें एकेका शाळेचें ध्येय आहे. गिम्नाझियम्, रेआल् गिम्नाझियम्, ओबररेआल् शूल, डच् ओबर शूल, आऊफबाऊ शूल, प्रोगिम्नाझियम्, रेआल् प्रोगिम्नाझियम्, रेआल शूल अशीं विविध प्रकारचीं नांवें या दुय्यम शाळांना आहेत. तीं वाचन त्रयस्थ मनुष्य भांबावूनच जातो !

दुय्यम शिक्षणाचा अभ्यासक्रम नऊ वर्षांचा असतो. कांहीं शाळांचा सहा वर्षांचाही असतो. परंतु विद्यापीठांत जाण्यापूर्वी या शिक्षणाचीं नऊ वर्षे पूर्ण व्हावीं लागतात. म्हणजे त्या सुमारास इकडील इंटरमीजिएटचा दर्जा येतो. त्यानंतर चार किंवा अधिक वर्षें विद्यापीठांत शिक्षण घेतल्यावर 'पंडित' (डॉक्टर ऑफ् फिलॉसफी वगैरे) अशी पदवी मिळते.

## औद्योगिक शिक्षणाचे प्रकार

बौद्धिक शिक्षण सोडून औद्योगिक शिक्षणाकडे ज्यांना जावयाचें असेल

त्यांना प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या या तेरा वर्षांच्या शिक्षणक्रमांतून तीन निरनिराळ्या वेळीं जातां येतें—

१. प्राथमिक शिक्षणाचीं आठ वर्षे पूर्ण झाल्यानंतर,

२. दुय्यम शिक्षणाचीं सहा वर्षे पूर्ण झाल्यावर, किंवा

३. दुय्यम शिक्षणाचीं नऊ वर्षे पूर्ण झाल्यानंतर.

पूर्वशिक्षण जितकें अधिक तितकें औद्योगिक शिक्षण उच्च प्रकारचें घेतां येतें. कोणतेंही औद्योगिक शिक्षण घेणाराचें आठ, दहा, किंवा तेरा वर्षांचें सामान्य पूर्वशिक्षण झालेलें असतें. प्राथमिक, माध्यमिक, व उच्च अशा तीन प्रकारच्या औद्योगिक शिक्षणाच्या सोयी आहेत. विविधता आणि परिपूर्णता या दृष्टींनीं जर्मनीच्या औद्योगिक शिक्षणाची प्रसिद्धि आहे. प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम एक ते तीन वर्षांचा असतो. उच्च औद्योगिक शिक्षणाचा अभ्यासक्रम निदान चार वर्षांचा असतो.

प्रौढ शिक्षणाच्या संस्था औद्योगिक आणि सर्वसामान्य अशा दोन प्रकारच्या आहेत. रात्रींच्या ' पुरवणी शाळांत ' कामकरी लोकांची औद्योगिक शिक्षणाची सोय होते. त्याशिवाय ' जानपद विद्यापीठ ' (फोक्स् होक् शूल्) नांवाच्या बौद्धिक व सांस्कृतिक शिक्षणाच्या संस्थाही निघालेल्या आहेत.

## शिक्षणांतील कांहीं विशेष

जर्मन शिक्षणपद्धतीमधील कांही विशिष्ट गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. प्राथमिक शाळेंतून दुय्यम शिक्षणाकडे जातांना म्हणजे वयाच्या दहावे वर्षी, आपणाला काय उद्देशानें शिक्षण घ्यावयाचें आहे, याचा विचार विद्यार्थ्याला किंवा त्याच्या पालकाला करावा लागतो. शाळेंत शिकत असतांना विशिष्ट ध्येय डोळ्यांपुढें राहतें. पुढें आपणांस कोणत्या शाखेचें उच्च शिक्षण किंवा कोणतें औद्योगिक शिक्षण घ्यावयाचें आहे याचा विचार करून त्याला योग्य अशी दुय्यम शिक्षणाची शाळा निवडतां येते. दुय्यम शिक्षणांत अनेक विषयांची व शाळांची विविधता असल्यानें विद्यार्थ्याला त्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीला अनुकूल असे विषय शिकतां येतात.

बौद्धिक शिक्षण सोडून औद्योगिक शिक्षणाकडे जाण्याची सोय तीन निरनिराळ्या पायऱ्यांवर केलेली आहे. त्यामुळें नाइलाज म्हणून एकाच

# जर्मन शिक्षणपद्धति

( संस्थांचे नांवापुढील आंकडे कालमर्यादिचे निदर्शक आहेत. )



प्रकारच्या बौद्धिक शिक्षणाच्या चकारींतून जाण्याचा प्रसंग विद्यार्थ्यांवर येत नाहीं. बौद्धिक शिक्षणांत तशीच औद्योगिक शिक्षणांतही विविधता आहे.

जुन्या शिक्षणपद्धतीमध्यें प्राथमिक शाळेंतील विद्यार्थ्यांना विद्यापीठाचे अभ्यासक्रमाकडे जाण्यास कांहीं मार्ग नव्हता. एका अभ्यासक्रमांतून दुसऱ्या प्रकारच्या अभ्यासक्रमांत संक्रमण करण्याची सोय जुन्या पद्धतीमध्यें नसे. त्यामुळें गरिबी किंवा खेड्यांतील राहणी या कारणांमुळें पुष्कळ विद्यार्थ्यांना दुय्यम व उच्च शिक्षणाची संधि मिळत नसे. सध्यांच्या शिक्षणपद्धतीमध्यें शक्य तेथें एका अभ्यासक्रमांतून दुसऱ्या अभ्यासक्रमांत जाण्याची सोय केलेली आहे.

दुय्यम शिक्षणाकडे जाणाऱ्या सुखवस्तु मुलांना शिक्षण निराळें, आणि केवळ प्राथमिक किंवा औद्योगिक शिक्षण घेणारांना शिक्षण निराळें असा पंक्तिप्रपंच पूर्वी होता तो आतां काढून टाकलेला आहे. देशांतील सहा ते दहा वर्षांच्या सर्व मुलांना त्यांची सामाजिक व आर्थिक परिस्थिति कशीही असली तरी एकाच प्रकारचें शिक्षण मिळतें.

समान शिक्षण, संक्रमणसुलभता, आणि अभ्यासक्रमांची विविधता या सुधारणा करण्याचा प्रयत्न गेल्या पिढींत चाललेला होता. तो आतां यशस्वी झाला आहे.

## प्राथमिक शाळेचें स्वरूप

प्राथमिक शिक्षण पुढील अभ्यासक्रमाचा पाया असल्यानें त्याकडे विशेष लक्ष दिलें जातें. शाळेमध्यें साहित्यसामुग्री चांगली असते. पुस्तकांपेक्षां वस्तूंच्या साहाय्यानें शिक्षण देतां यावें या दृष्टीनें शाळेंतील सामानाची योजना केली आहे. लांकडाचीं मूळाक्षरें, आकृति करण्याकरितां प्लॅस्टिलीन (चिकट लांबीसारखा पदार्थ), निरनिराळ्या वनस्पती, मासे वगैरे जिवंत प्राणी, चित्रें, खेळण्याची व व्यायामाची विविध साहित्यसामुग्री, हस्तव्यवसाय शिकविण्याकरितां छोटा कारखाना, स्वयंपाक शिकविण्यासाठीं छोटें स्वयंपाकघर, भौतिक शास्त्रांची प्रयोगशाळा, इत्यादि अनेक शिक्षणोपयोगी वस्तूंचा संग्रह प्राथमिक शाळेंत असतो. जर्मन प्राथमिक शाळेंत ज्या प्रकारची प्रयोगशाळा व प्रयोगसाहित्य आहे तशी योजना इकडे दुय्यम शिक्षणाच्या

शाळेंतही क्वचितच असते. भौतिकशास्त्रांचे शिक्षणावर जर्मनीचा किती कटाक्ष आहे हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

शाळेंतील वातावरण आनंदी असतें. महायुद्धापूर्वीच्या शिस्तखोर जर्मन शाळा व आजच्या जर्मन शाळा यांत पुष्कळ फरक आहे. मुलांना शाळेंत अधिक मोकळेपणा असतो व शिक्षक–विद्यार्थी संबंधही मनमोकळे दिसतात. विद्यार्थी दिवसभर बाकांवर बसून राहिले आहेत, आणि शिक्षक त्यांच्या डोक्यांत ज्ञान ओतीत आहेत असा देखावा दिसत नाहीं. उलट विद्यार्थ्यांच्या हालचाली व विविध व्यवसाय चालू असून त्यांत ते निमग्न असलेले दिसतात. याचें कारण प्राथमिक शाळेंतील शिक्षणपद्धतींत फरक पडलेला आहे. शाळा ही केवळ 'ज्ञान घेण्याची' जागा नसून 'स्वतःच्या अनुभवानें शिकण्याची शाळा आहे'; चार भिंती हीच शाळेची मर्यादा नसून त्या भिंतीच्या पलीकडील समाज व निसर्ग यांचाही शालागृहांतच समावेश होतो; या तत्त्वांवर प्राथमिक शिक्षणाची योजना झालेली आहे.

## प्राथमिक चौथीचा अभ्यास

प्राथमिक शाळेच्या पहिल्या चार वर्षांत पुढील विषय शिकविले जातात. चौथ्या यत्तेचे विषय व त्यांचे तास पुढें दिले आहेत.

**प्राथमिक चौथीचे विषय व साप्ताहिक तास**

| | |
|---|---|
| धर्म अथवा नीतिशिक्षण | ४ |
| समाज व सृष्टिज्ञान आणि जर्मन भाषा–मिश्रपद्धति | ११ |
| लेखन | २ |
| गणित | ४ |
| रेखाकला | २ |
| गायन | २ |
| शारीरिक शिक्षण | ३ |
| शिवणकाम (मुलींकरितां) | २ |
| एकूण | २८ |

## अध्यापनाचीं तत्त्वें

जर्मनीच्या प्राथमिक शिक्षणांतील कांहीं तत्त्वें समजून घेणें जरूर आहे. समाज, सृष्टिज्ञान, आणि मातृभाषा यांचा अभ्यास एकत्र ठेविलेला आहे. मुलाच्या भोंवतालचा समाज, त्यांतील उद्योगधंदे, कलाकौशल्य, संस्था, निसर्गसृष्टि, यांचा अभ्यास प्रत्यक्ष दर्शनानें व अनुभव पद्धतीनें झाला पाहिजे. शाळा आणि समाज यांत फरक नाहीं, या शैक्षणिक तत्त्वाचें हें व्यावहारिक तंत्र आहे. दुसरें तत्त्व व्यवसाय अथवा क्रियापद्धतीचें आहे. एका जागीं बसून केवळ ग्रंथवाचनानें किंवा प्रवचन–श्रवणानें ज्ञान न मिळवितां मुलानें आपल्या क्रियेनें व अनुभवानें तें मिळवावें. शिक्षकानें या ज्ञानाला संघटित रूप द्यावें व कमी पडेल तेथें शिकवावें. एकच व्यवसाय किंवा क्रिया करीत असतां अनेक विषय एकदम शिकतां येतात, असें मिश्र पद्धतीचें तिसरें तत्त्व आहे. ‘पोस्ट ऑफिस’ सारखा खेळ मुलें खेळूं लागलीं तर, लेखन, वाचन, गणित, हिशेब, भूगोल इत्यादि विषय त्यांत येतातच. चौथें तत्त्व संस्कृतिनिष्ठेचें आहे. जर्मन मुलाला आपल्या भोंवतालच्या संस्कृतीचें ज्ञान देऊन अभिमान वाटेल अशा रीतीनें शिक्षणाची व विषयांची योजना झालेली असते. वाचन-पुस्तकें, इतिहास, लेखन इत्यादि विषय शिकवितांना या ध्येयाचा परिपोष केला जातो.

## प्राथमिक शिक्षणाचा उत्तर विभाग

पूर्वप्राथमिक शिक्षणांतून दुय्यम शिक्षणाकडे न जातां उत्तर प्राथमिक विभागाकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां चार वर्षांचा अभ्यासक्रम असतो. यानंतर हे विद्यार्थी धंदेशिक्षणाकडे जातात. शाळा सोडल्यानंतर या विद्यार्थ्यांना बौद्धिक शिक्षणाची संधि मिळणार नाहीं या दृष्टीनें स्वयंपूर्ण असा सर्वसामान्य बौद्धिक शिक्षणाचा अभ्यासक्रम आंखलेला आहे. आठवी यत्ता पूर्ण केल्यानंतर म्हणजे इकडील प्राथमिक शाळेंतील सातवीच्या सुमाराचा अभ्यास पूर्ण करतांना जर्मन मुलांना काय विषय शिकावे लागतात त्याची कल्पना पुढील विषयांवरून येईल.

**प्राथमिक आठव्या यत्तेचा (व्ह. फा.) अभ्यासक्रम व साप्ताहिक तास**

| | |
|---|---|
| धर्म | ४ |
| मातृभाषा–जर्मन | ६ ते ७ |
| इतिहास–नागरिकशास्त्र | ३ |
| भूगोल | २ |
| सृष्टिशास्त्रें | ३ |
| गणित–भूमिती (मुलींना ३) | ५ ते ६ |
| रेखाकला | २ |
| गायन | २ |
| शारीरिक शिक्षण | ३ |
| हस्तव्यवसाय, (मुलींना शिवणकला २–३) | २ |
| एकूण | ३२ ते ३४ |

प्राथमिक शाळेंत हस्तव्यवसायाला इतर विषयांइतकेंच महत्त्व दिलेलें आहे. मुलांना पुस्तकबांधणी, यांत्रिक कला, इत्यादि विषय व मुलींना शवणकामासारखे गृहोपयोगी विषय शिकविले जातात. कांहीं शाळांतून मुलींना सक्रिय स्वयंपाकशास्त्र शिकविलें जातें आणि मुलांना भौतिक शास्त्रांचें अधिक शिक्षण देतात. नाझींची राजवट सुरू झाल्यापासून वंशशास्त्र व लष्करी बाण्याचें शारीरिक शिक्षण यांचा समावेश अभ्यासक्रमांत झालेला आहे.

## शाळांचे व वर्गांचे आकार

प्राथमिक शिक्षण सर्वत्र मोफत व सक्तीचें आहे. गरीब विद्यार्थ्यांना नादारी मिळते व पुस्तकांची सोय केली जाते. सालोसाल परीक्षा होत नाहींत. शिक्षणक्रम पूर्ण झाल्यानंतर मुख्य अध्यापक एक प्रशस्तिपत्र देतात. शंभर विद्यार्थ्यांपैकीं अजमासें साठ दुय्यम शिक्षणाकडे जातात व चाळीस प्राथमिक शिक्षणाच्या आठ यत्ता पूर्ण करतात, असें बर्लिन शहरांतील कांहीं शाळांचें प्रमाण आहे. प्रत्येक वर्गांत चाळीस ते पंचेचाळीस विद्यार्थी असतात. ही संख्या कधीं अधिकही होते. १९२२ मध्यें कायद्यानें ही संख्या ऐंशीपर्यंत वाढविलेली होती! शहरांतील शाळांतून एकेका यत्तेला एकेक शिक्षक

असतो. परंतु लहान गांवांतून मिश्रवर्ग असतात. एका शिक्षकाचे हाताखालीं सर्व यत्तांचे वर्ग आहेत. अशा शाळांची संख्या शेंकडा ३३ पर्यंत असेल. अमेरिका, इंग्लंड इत्यादि सर्व देशांत अशा मिश्र यत्तांच्या शाळा आहेत. तेथें एकाच शिक्षकाला सर्व वर्ग शिकवावे लागतात.

## दुय्यम शाळांचे अनेक प्रकार

जर्मनीच्या दुय्यम शिक्षणाच्या शाळा म्हणजे आपल्याकडील हायस्कूल व इंटरमीजिएट कॉलेज यांचें मिश्रण आहे. त्यांचा अभ्यासक्रम नऊ वर्षांचा असतो. तो पूर्ण झाल्यावर विद्यापीठांत प्रवेश मिळतो. कांहीं शाळांत सहा वर्षांचाच अभ्यासक्रम आहे, तो धंदेशिक्षणाकडे जाणारांना पुरेसा होतो. दुय्यम शिक्षणाचे अनेक विषय सर्व शाळांतून शिकविले जातात असें असलें तरी प्रत्येक शाळेचा एकाद्या विशिष्ट ज्ञानक्षेत्रावर भर असतो. प्रत्येक शाळेचें असें काय वैशिष्टय आहे तें पुढील माहितीवरून लक्षांत येईल. मुलांकरितां व मुलींकरितां शाळा निराळ्या आहेत. मुलींना कांहीं विषयही निराळे असतात.

### जर्मन दुय्यम शाळांचे प्रकार

**मुलांकरितां दुय्यम शाळा**

| शाळेचें नांव | शिक्षणवैशिष्टय |
|---|---|
| १. गिम्नाझियम् | लॅटिन-ग्रीक इ. प्राचीन भाषा व संस्कृति |
| २. रेआल् गिम्नाझियम् | लॅटिन व अर्वाचीन भाषा व संस्कृति |
| ३. ओबेर रेआल शूल | गणितशास्त्र व भौतिक शास्त्रें |
| ४. डच् ओबररेआल शूल | जर्मन भाषा व संस्कृति |
| ५. रेफॉर्म गिम्नाझियम् | प्राचीन व अर्वाचीन भाषा |
| ६. रेफॉर्म रेआल गिम्नाझियम् | अर्वाचीन भाषा व संस्कृति |
| ७. रेफॉर्म शूल | खालचे वर्गांत सामान्य शिक्षण, शेवटचे वर्गांत ऐच्छिक शिक्षण |
| ८. आऊफ्बाऊ शूल | उच्च प्राथमिक शिक्षणांतून दुय्यम शिक्षणाकडे जाणारांकरितां शाळा |

**मुलींकरितां दुय्यम शाळा**

| | |
|---|---|
| ९. लीझियम् | सामान्य अभ्यासक्रम |

१०. ओबेर लीझियम् — विद्यापीठाकडे न जाणाऱ्यांकरितां सामान्य अभ्यासक्रम

११. गिम्नाझियम्
१२. रेआल् गिम्नाझियम्
१३. ओबेररेआल शूल
} १, २ व ३ या मुलांच्या शाळांप्रमाणें मुलींच्या शाळा

या निरनिराळ्या विद्यालयांत कोणते विषय शिकविले जातात आणि अखेरच्या म्हणजे नवव्या यत्तेला विषयाचे साप्ताहिक किती तास असतात त्याचें कोष्टक पुढें दिलें आहे. त्यावरून या शाळांतील सूक्ष्म फरक समजून येईल.

**जर्मन दुय्यम शाळांतील नवव्या यत्तेचे विषय व साप्ताहिक तास**

(शाळांचें क्रमांक वर दिल्याप्रमाणेंच आहेत.)

| विषय | प्रत्येक प्रकारच्या शाळेंतील तास | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ | ६ | ७* |
| धर्म | २ | २ | २ | २ | २ | २ |
| मातृभाषा जर्मन | ३ | ३ | ३ | ४ | ३ | ४ |
| लटिन | ५ | ३ | ० | ० | ४ | ० |
| ग्रीक | ५ | ० | ० | ० | ० | ० |
| अर्वाचीन भाषा १ | २ | ४ | ३ | ४ | ४ | ४ |
| अर्वाचीन भाषा २ | ० | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| इतिहास—नागरिकनीति | ३ | ३ | ३ | ४ | ३ | ४ |
| भूगोल | १ | १ | १ | २ | १ | २ |
| गणित | ३ | ४ | ५ | ४ | ४ | ४ |
| भौतिकशास्त्रें | २ | ४ | ६ | ४ | ३ | ४ |
| रेखाकला | १ | १ | १ | १ | १ | २ |

शाळांचे हे सर्व प्रकार पाहून जर्मन पालक किती गोंधळांत पडत असतील असा विचार मनांत येतो. परंतु याचें उत्तर सोपें आहे. मोठमोठ्या शहरांत हे शाळांचे सर्व प्रकार दिसतात. ज्या ठिकाणीं फक्त एक दोनच शाळा ठेवणें शक्य आहे तेथें एकाच शाळेंत या दोनतीन प्रकारच्या शाळांचें मिश्रण केलें जातें. कांहीं शाळांच्या प्राथमिक तीन वर्षांतील अभ्यासक्रम सारखेच

* ही शाळा सहा वर्षांची असल्यानें त्याच यत्तेचे विषय आहेत.

आहेत. त्यामुळें एका शाळेंत तयारी करूनही दुसऱ्या शाळेंत जातां येतें. शाळांचे हे अनेक प्रकार काढून ठोकळ मानानें दोनतीन प्रकार ठेवावेत याकरितां शिक्षणसुधारकांची अनेक वर्षे खटपट चालू आहे. नाझी विद्याखात्याचाही तो एक उद्देश आहे. जर्मन दुय्यम शाळांतील बारीकसारीक सूक्ष्म भेद जमेस धरले तर या शाळांचे एकूण तीस प्रकार होतील. ते कमी करण्याकरितां नाझी विद्याखात्यानें एक नवीन नियम केला आहे. १९३७ पासून सर्व शाळांनीं दुसरी भाषा इंग्लिश हीच सुरू केली पाहिजे. यापूर्वी आपापल्या वैशिष्ट्याप्रमाणें शाळा लॅटिन, ग्रीक, फरेंच, इत्यादि निरनिराळ्या भाषा प्रारंभींच्या यत्तांत शिकवीत असत. त्यामुळें एका शाळेंतून दुसऱ्या शाळेंत जाणें विद्यार्थ्यांना कठिण पडत असे. नवीन नियमानें पूर्वीपेक्षां थोडी अधिक सोय झाली आहे. या नियमाला प्राचीन भाषा–विद्यालयें (क्लासिकल् गिम्नाझियम्) अपवाद आहेत. जर्मनींतील या अनेक शाळांची उत्पत्ति मोठी मनोरंजक आहे. प्राचीन भाषा शिकविणाऱ्या शाळा अर्वाचीन भाषांना कमी लेखूं लागल्या म्हणून दुसऱ्या शाळा निघाल्या. त्या शाळा गणित व शास्त्रें यांना वाव देईनात म्हणून तिसरा प्रकार निघाला. पुनः या शाळांत जर्मन संस्कृतीवर भर नव्हता म्हणून पांचवा प्रकार निघाला. प्रस्थापित पद्धतींत फेरबदल करण्याची नाखुषी आणि एकेका विषयाच्या तज्ज्ञांना त्या त्या विषयाचा अभिमान यामुळें हे इतके प्रकार आलेले आहेत.

### प्रवेशाच्या नवीन अटी

दुय्यम शाळांत अगदीं निवडक विद्यार्थी घेण्याची प्रथा आहे. आजपर्यंत केवळ बौद्धिक दर्जा पाहून ही निवड होत असे. परंतु जुलै १९३५ पासून विद्याखात्यानें या प्रवेशअटी अधिक व्यापक परंतु अवघड केलेल्या आहेत. पहिली अट शारीरिक आरोग्याविषयीं आहे. आनुवंशिक रोग असलेले किंवा खुजट रोगिष्ट शरीरप्रकृतीचे विद्यार्थी शाळेंत घेतले जात नाहींत. विशेष प्रसंगीं वैद्यकीय तपासणीचा दाखला लागतो. कणखर, नियमित व्यायाम घेणारे, आणि आरोग्यदक्ष असलेले असेच विद्यार्थी ठेविले जातात. दुसरी अट वर्तनाचे दृष्टीनें आहे. बंधुभावना, संघनिष्ठा, शिस्त, आज्ञापालन, प्रामाणिकपणा, विनय, आणि निष्ठा हे गुण असलेलेच विद्यार्थी दुय्यम शाळेंत

दाखल होतात. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास नाझी पक्षाचा भावी निष्ठावंत सभासद होण्यासारखा विद्यार्थी उच्च शिक्षणाच्या संस्थांत पाहिजे आहे. बौद्धिक दृष्टीनें पूर्वीच्या अटीपेक्षां नवीन अटी अधिक उदार आणि व्यापक आहेत. विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं योग्य ज्ञानसंग्रह आणि बुद्धि पाहिजे. परंतु ज्ञानसंग्रहापेक्षां बुद्धीच्या परिपक्वतेवर विशेष भर आहे. ज्ञान थोडें कमी असलें आणि बुद्धि प्रगल्भ असली तरी विद्यार्थी चालतो. त्याचप्रमाणें कांहीं विषयांत उत्कृष्ट प्रगति झालेली असेल तर इतर एकदोन विषयांत तो विद्यार्थी कमी असला तरी दाखल केला जातो. सारांश, प्रकृतीनें कणखर, वर्तनानें निष्ठावंत, आणि बुद्धीनें प्रगल्भ असे विद्यार्थी दुय्यम शाळांमध्यें घेतले जातात.

## अभ्यासक्रमांतील जर्मन दृष्टि

प्रत्येक शाळेला एकेका विषयावर भर आहे. त्या विषयाची विशेष तयारी करून घेण्याचे दृष्टीनें शाळेचा स्वतंत्र कार्यक्रम आंखलेला असतो. या विषयांचे जोडीला वंशशास्त्राचा अंतर्भाव करून जीवशास्त्र शिकविलें जातें. जर्मन, इतिहास, भूगोल, वाङमय, आणि संस्कृति या विषयांकडे शाळांचें विशेष लक्ष आहे. वाङमयात्मक व शास्त्रात्मक विषयांतील तपशिलांची निवड करतांना पराक्रम, देशप्रेम, स्वार्थत्याग, युद्धशास्त्र, देशसंरक्षण, आणि संस्कृतिनिष्ठा यांकडे लक्ष देऊन पोटविषयांची निवड होते. पराक्रमाचे दृष्टीनें वीररसात्मक काव्य, युद्धविषयक वाङमय, देशसंरक्षणाचे व औद्योगिक दृष्टीनें भूगोल, संस्कृतिपरिचयाचे दृष्टीनें इतिहास, वंशनिष्ठेचे दृष्टीनें जीवनशास्त्र, उद्योगधंद्याचे दृष्टीनें भौतिक शास्त्रें, आणि युद्धकलेचे दृष्टीनें शारीरिक शिक्षण, अशा रीतीनें प्रत्येक विषयाचा अभ्यासक्रम आंखतांना शुद्ध ज्ञानाबरोबर जर्मनीची अशी एक निराळी दृष्टि दिली जाते. कोणताही विषय शिकतांना "आपला जर्मनी" विद्यार्थ्यांचे दृष्टिआड होत नाहीं.

## इंग्रजी विषयाची अभ्यासपद्धति

आपल्याकडील हायस्कूलें म्हणजे केवळ इंग्रजीभाषाप्रधान शाळा आहेत. उलट जर्मनींत इंग्रजी, फरेंच वगैरे भाषा कशा व काय दृष्टीनें शिकविल्या

जातात तें पाहण्यासारखें आहे. इंग्लिश किंवा फरेंच शिकविण्याचा मुख्य उद्देश या भाषा सफाईनें बोलतां याव्यात हा नसून त्या भाषा बोलणाऱ्या राष्ट्राची संस्कृति व स्वभाववैशिष्ट्य यांची माहिती व्हावी, असा आहे. जर्मन शाळांतून चाललेलें इंग्रजीचें अध्यापन प्रत्यक्ष पाहिल्यानंतर असें दिसतें कीं संभाषणापेक्षां आकलनशक्तीवर शिक्षणाचा भर अधिक आहे. उच्चार, ठेका, आणि अस्खलितपणा या दृष्टीनें आपल्याकडील विद्यार्थी व शिक्षक यांची प्रगति अधिक आहे. आपल्या विद्याखात्यानें किंवा विद्यापीठानें त्या बाबतीत कितीही ओरड केली तरी परकीय भाषा म्हणून इंग्रजी शिकणाऱ्या इतर कोणत्याही राष्ट्रांपेक्षां आपण अधिक सुंदर इंग्रजी बोलतों व लिहितों हें निश्चित आहे. परंतु आकलनशक्तीचे दृष्टीनें दोनतीन वर्षांत जर्मन विद्यार्थी वरच्या दर्जाचें इंग्रजी वाङमय समजूं शकतो. त्याला बोलतां येत नसलें तरी ऐकलेलें व वाचलेलें चांगलें समजतें. जपानी लोकांचें इंग्रजी तर भयंकरच आहे ! इटालियन किंवा फरेंच लोकांपेक्षांही आपले उच्चार चांगले असतात. परंतु भाषेचें बाह्यस्वरूप सोडून दिलें तर ज्ञानवस्तु या दृष्टीनें आपलें शिक्षण अगदीं कोतें पडतें. इंग्रजी शिकणाऱ्या जर्मन विद्यार्थ्याला इंग्रजांची संस्कृति, त्यांचा समाज, त्यांचे गुणदोष, त्यांचें राष्ट्रीय वैशिष्ट्य, त्यांच्या समाजाचे प्रश्न, त्यांचा इतिहास, वाङमय, उद्योगधंदे इत्यादि अनेक अंगांची माहिती होते. कांहीं क्रमिक पुस्तकें व त्यांतील विषय पाहिले म्हणजे हा मुद्दा विशेष लक्षांत येतो. " इंग्लंड अँड अमेरिका ; देअर कॅरॅक्टर अँड कल्चर ", " इंग्लिश ट्रेट्स ", यांसारखीं क्रमिक पुस्तकें असतात. एका क्रमिक पुस्तकांत पुढील विषय होते—इंग्लिशांच्या स्वभावाचें वैशिष्ट्य ; इंग्लंड हें जागृत राष्ट्र आहे काय ? इंग्लिश लोक लढवय्ये आहेत काय ? बौद्धिक आणि नैतिक संस्कृति ; राजकीय व सामाजिक वैशिष्ट्य ; ब्रिटिश साम्राज्याचें भवितव्य, इत्यादि. " दि इंग्लिश " नांवाच्या दुसऱ्या एका क्रमिक पुस्तकांत पुढील विषय होते—इंग्लिश राष्ट्र, राजसत्ता, वरचा समाजवर्ग, कामगारवर्ग, इंग्लिशांचे स्वभावविशेष, इत्यादि.

यावरून इंग्लिश भाषा शिकण्यांत जर्मनीचा उद्देश समाज, संस्कृति व राष्ट्र यांचें ज्ञान व्हावें हा आहे. केवळ इंग्लिश वक्तृत्व व लेखन करावें हा नाहीं हें स्पष्ट दिसून येईल.

## अखेर परीक्षा

जर्मनीच्या दुय्यम शाळांतूनही सालोसाल परीक्षा घेतल्या जात नाहींत. वर्षाअखेर वर्गशिक्षकांच्या संमतीनें मुख्य अध्यापक मुलांना वर घालतो. प्रत्येक वर्गांत तीनचार विद्यार्थी खालीं राहतात. लागोपाठ नापास होणारांना कमी केलें जातें. शालेय शिक्षण संपल्यानंतरची परीक्षा शाळेंतच होते. विद्याखात्याचा एक प्रतिनिधि, मुख्य अध्यापक, व शिक्षक हे परीक्षा घेतात. दुय्यम शाळांतून अनेक विद्यार्थी पास झाले तरी विद्यापीठांत मात्र अगदीं निवडक विद्यार्थीच घेतले जातात. दुय्यम शिक्षण पूर्ण केलेले सर्वच विद्यार्थी उच्च शिक्षणसंस्थांत दाखल होऊं शकत नाहींत. बहुसंख्य मुलें धंदेशिक्षण किंवा उद्योगधंदे यांकडे जातात.

जर्मन हायस्कूलशिक्षण पूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांचें शिक्षण कालदृष्ट्या आपल्याकडील इंटरमीजिएटच्या विद्यार्थ्याइतकें असतें. प्राथमिक चार व हायस्कूल नऊ असें तेरा वर्षें त्याचें शिक्षण होतें. अखेरच्या परीक्षेला जर्मन भाषेंत आबिटूरिएंटेनेक्झामेन किंवा राईफ प्युफूंग (मॅच्युरिटी एक्झामिनेशन) असें नांव आहे.

नाझींच्या पूर्वीच्या व आजच्या शाळांत फरक आहे. पूर्वींच्या शिक्षणांत बौद्धिक प्रगतीवर भर होता. सध्यांच्या शाळांत चौरस वाढीला अधिक प्राधान्य आहे. बौद्धिक, शारीरिक, व क्रियात्मक विकास अशा तिन्ही दृष्टींनीं विद्यार्थ्यांना शिक्षण दिलें जातें.

## सहा वर्षांचें दुय्यम शिक्षण

कांहीं दुय्यम शिक्षणाच्या शाळा सहा वर्षांचा अभ्यासक्रम शिकवितात. यांतील कांहीं विद्यार्थी पुढें आणखी तीन वर्षें नववार्षिक दुय्यम शाळांत जातात. बाकीचे विद्यार्थी व्यापारी व औद्योगिक शिक्षणाच्या संस्थांमध्यें प्रवेश मिळवितात. या शाळांचा आणि नववार्षिक दुय्यम शाळांचा अभ्यास-क्रम यांत बरेंच साम्य आहे. त्यामुळें विद्यार्थ्यांचें संक्रमण एका शाळेंतून दुसऱ्या शाळेंत होतें. ज्या गांवीं नऊ वर्षांचें विद्यालय ठेवणें शक्य नसतें तेथें सहा वर्षांचें विद्यालय असतें.

## अभ्यासेतर कार्यक्रम

प्रत्यक्ष शाळेंत जें शिक्षण होतें त्याला अभ्यासेतर व्यापक शिक्षणाची जोड देण्याकरितां जुन्या व नव्या अनेक संघटना आहेत. त्यांतील ‘ हिटलर युवक संघ ’ ही महत्त्वाची आहे. याशिवाय अनेक प्रासंगिक कार्यक्रम असतात. वर्षांतून कांही दिवस वननिवास व ग्रामनिवास यांत घालविले जातात. सुटीचे दिवसांत राजकीय शिक्षणाचे वर्ग असतात. राजकीय व सामाजिक समारंभांत विद्यार्थी भाग घेतात व जरूरीच्या वेळीं स्वयंसेवक म्हणून कामें करतात. या शिक्षणाकडेही विद्याखात्याचें विशेष लक्ष आहे.

## विद्यार्थ्यांची कामकरी छावणी

दुय्यम शिक्षण पूर्ण झाल्यानंतर सर्व विद्यार्थ्यांना सहा महिने किंवा वर्ष-भर ‘ कामकरी छावणीं ’त (वर्क कँप) काम करावें लागतें. या ठिकाणीं शेंकडा साठसत्तर लोक मजूर व शेतकरी असतात, त्यांत तीसचाळीस विद्यार्थी मिळून मिसळून कामें करतात. अरण्यें तोडणें, रेल्वे रस्ता करणें, बोगदे खोदणें, कालवे खणणें, रस्ते तयार करणें, इत्यादि शारीरिक कष्टाचीं आणि सार्वजनिक उपयोगाची कामें या ठिकाणी केली जातात. रोज सहासात तास शारीरिक काम असतें. श्रीमंत व गरीब सर्व विद्यार्थी येथें संघभावनेनें एकत्र राहतात. दोन तास शारीरिक व लष्करी शिक्षण असतें. एकादा तास बौद्धिक शिक्षणाचा असतो. त्या वेळी ‘ राष्ट्रशास्त्र ’ (नॅशनॉलजी) या विषयावर व्याख्यानें होतात. छावणींतील वातावरण लष्करी शिस्तीचें आणि गंभीर असतें. राहणी अगदीं साधी असते. आहारही साधा असतो. विद्यार्थ्यांत कणखरपणा वाढेल असा एकंदर कार्यक्रम असतो. या कार्यक्रमांतून पार पडल्यानंतर मग विश्वविद्यालय, उच्च धंदेशिक्षण, किंवा प्रत्यक्ष व्यापार धंदा यांत विद्यार्थी शिरतो.

## विद्यापीठ प्रवेशाचे नवीन नियम

महायुद्धानंतरच्या काळांत दुय्यम शिक्षण सर्वांना सुलभ झाल्याबरोबर विद्यापीठामध्यें विद्यार्थ्यांची भरती झाली. पुष्कळ पदवीधर बाहेर पडले. सुशिक्षितांची बेकारी वाढली. नाझी विद्याखात्यानें या बेकारीवर एक उपाय म्हणून विद्यापीठांतील विद्यार्थ्यांच्या संख्येवर १९३३ पासून नियंत्रण घातलेलें

आहे. दरवर्षी दाखल होणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या पूर्वीपेक्षां निमपटीनें कमी झाली आहे असें मानण्यास हरकत नाहीं. १९३४ सालीं फक्त १५,००० नवीन विद्यार्थी घेतले गेले. १९३५ मध्यें विद्यापीठप्रवेशाचे आणखी नवीन नियम केलेले आहेत. खेड्यांतून व लहान शहरांतून मोठ्या शहरांकडे विद्यार्थी येऊं नयेत म्हणून शहरांतल्या शिक्षणसंस्थांतील विद्यार्थ्यांची संख्या मर्यादित केली आहे. त्यमुळें विद्यार्थी आपापल्या गांवाजवळ व घराजवळ राहून उच्च शिक्षण घेतात. प्रत्येक जिल्ह्यांतून लोकसंख्येच्या प्रमाणांत विद्यार्थी दाखल केले जातात. एकंदर संख्येंत फक्त शेंकडा दहा विद्यार्थिनी घेण्याची परवानगी आहे. शारीरिक आणि बौद्धिक दृष्टींनीं असामान्य असेच विद्यार्थी घेतले जातात. वर्तन आणि देशप्रेम या गुणांना प्रवेशाचे दृष्टीनें विशेष प्राधान्य दिलें जातें. विद्यापीठांत दाखल करण्यापूर्वी दुय्यम शिक्षण पूर्ण झाल्याचें शिफारसपत्र नसल्यास विद्यार्थ्यांची प्रवेशपरीक्षा घेतली जाते.

## विद्यापीठांतील शिक्षण

जर्मनींत एकंदर पंचवीस विद्यापीठें आहेत. याशिवाय उच्च औद्योगिक शिक्षणाच्या अनेक संस्था आहेत. कॉलेजमध्यें नांव दाखल करून विद्यार्थ्यानें आपला अभ्यास करावा. वर्गांत हजर राहण्याबद्दल सक्ति नसते. अखेरची पदवी चार ज्ञानक्षेत्रांत दिली जाते—धर्म, कायदा, तत्त्वज्ञान, व वैद्यक. तत्त्वज्ञान या क्षेत्रांत भाषा, इतिहास, गणित, भौतिकशास्त्रें, राजकारण, समाजशास्त्र इत्यादि विषयांचा समावेश होतो. उच्च शिक्षणाचा अभ्यासक्रम झाला कीं डॉक्टर ऑफ थिऑलॉजी, लॉ, फिलॉसफी, किंवा मेडिसीन यांपैकीं एकादी पदवी मिळते. जर्मन पदवीधर हा कोणत्या तरी विषयांचा डॉक्टर (पंडित) असतो. बहुतेक विद्यापीठें सरकारी आहेत.

नाझी कारकीर्द आल्यापासून जर्मन विद्यापीठें बाह्यस्वरूपांत लष्करी विद्यालयांसारखीं दिसूं लागलीं आहेत. विद्यार्थ्यांचा पोषाख व एकंदर वातावरण हें लष्करी धर्तीचें दिसतें. विद्यार्थी राजकारणांत बराच भाग घेतात. विद्यापीठाच्या अभ्यासक्रमालाही राजकीय वळण लागत चाललें आहे. राष्ट्रीय समाजवादाच्या दृष्टीनें प्रत्येक विषयाकडे पाहण्याची वृत्ति अस्तित्वांत आलेली आहे.

### भावी सुधारणेची दिशा

इतर देशांत शिक्षणसुधारणेचे प्रयत्न चालू आहेत तशीच जर्मनीचीही स्थिति आहे. प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रांत ही सुधारणा साध्य झाली आहे. परंतु दुय्यम शिक्षणाच्या क्षेत्रांत मात्र बराच विरोध होत आहे. अनेक प्रकारचीं हायस्कूलें रद्द करून दोनतीन प्रकार ठेवावेत असा सुधारकांचा प्रयत्न चालू आहे. परंतु प्रस्थापित संस्थांचा व विद्यापीठांचा त्याला विरोध आहे. त्यामुळें जुन्या संस्था अस्तित्वांत ठेवून नव्या निर्माण करण्याचा प्रयत्न चालू असतो. त्या कारणानें शाळांचे प्रकार वाढतात.

दुय्यम शिक्षणाच्या शाळांतून हस्तव्यवसायासारख्या विषयांचा अद्याप प्रवेश झालेला नाहीं. बौद्धिक शिक्षणाचे अभिमान्यांना हा विषय दुय्यम शिक्षणांत येऊं द्यावयाचा नाहीं. त्यामुळें केवळ बौद्धिक शिक्षणानें जी पोषाखी वृत्ति बनते ती मारण्याकरितां 'कामकरी छावणी' सारखे उपक्रम शाळेच्या बाहेर करावे लागतात. चित्रकला व गायन या विषयांचा समावेश सांस्कृतिक शिक्षणांत झाला आहे. पण अद्याप हस्तव्यवसायाला हें मानाचें स्थान देण्यांत आलेलें नाहीं. यावरून दुय्यम शाळांत केवळ एकांगी बौद्धिक शिक्षणावर जर्मनीचा किती कटाक्ष होता व आहे तें दिसून येतें.

---

## प्रकरण विसावें

# औद्योगिक व प्रौढ शिक्षण

### धंदेशिक्षणाचा आदर्श

औद्योगिक क्षेत्रांत एके वेळी जर्मनीनें आघाडी मारली होती. महा-युद्धानंतरच्या परिस्थितीमुळें तो मागें पडला. परंतु औद्योगिक प्रगतीच्या मुळांशीं पद्धतशीर धंदेशिक्षण व उच्च औद्योगिक शिक्षण आहे हें तत्त्व

पुढारलेल्या राष्ट्रांनाही जर्मनीनें शिकविलें. जर्मनीची औद्योगिक शिक्षणपद्धति पाहून इतर राष्ट्रांनीं आपापल्या शिक्षणपद्धतींत पुनर्घटना केलेली आहे.

लहान क्षेत्रफळ आणि मोठी लोकसंख्या असल्यामुळें जर्मन राष्ट्राला आर्थिक जीवनकलह विशेष जाणवतो. उपलब्ध असलेली जमीन, नैसर्गिक द्रव्यें, आणि मनुष्यबळ यांचा अधिकाधिक उपयोग करून जगाच्या स्पर्धेत आघाडीला कसें राहावें हा जर्मनीचा प्रश्न आहे. पद्धतशीर औद्योगिक शिक्षण हें त्याचें एक उत्तर आहे.

प्रत्येक उद्योगक्षेत्राचे तपशीलवार पोटविभाग पाडून त्या प्रत्येक उद्योगाकरितां धंदेशाळा जर्मनीनें काढलेल्या आहेत. चांभार, सुतार, शिंपी, घिसाडी, न्हावी, आचारी, वाढपी, सोनार, झाळणार, घड्याळजी, मोटारवाला, कुलूपवाला, मच्छीमार इत्यादि लहानसहान धंदे शिकविण्या-करितां शाळा आहेत. जर्मनीच्या एंजिनियरिंग व औद्योगिक रासायनिक व्यवसाय शिकविण्याच्या उच्च शिक्षणसंस्था तर प्रसिद्धच आहेत. हलक्या धंद्यांपासून अगदीं उच्च व्यवसायापर्यंत सर्व व्यवसायांच्या शिक्षणाची सोय जर्मनीनें केलेली आहे. आजच्या हलाखीच्या स्थितींतही जगाला आव्हान देण्याचें सामर्थ्य जर्मनीला आलें आहे तें या औद्योगिक आत्मविश्वासाच्या जोरावर, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

## कारखाने व शाळा यांचें सहकार्य

औद्योगिक कारखाने आणि धंदेशिक्षण यांचा जर्मनींत अगदीं निगडित संबंध आहे. किंबहुना या शिक्षणाची अंशतः जबाबदारी सरकारनें कार-खान्यांवरच टाकलेली आहे, कारण त्यांनाच या शिक्षणाचा उपयोग होतो. अनेक धंदेशाळा कांहीं कारखान्यांनींच स्वतः चालविलेल्या आहेत. कांहीं संस्था लोकांनीं चालविलेल्या आहेत त्यांचा निम्मा खर्च कारखाने व औद्यो-गिक संघ देतात. कारखान्यांत जी नवीन यंत्रसामुग्री तयार होते त्यांचे नमुने (मॉडेल्स्) कारखान्यांकडून शाळांना पुरविले जातात. इतरही यंत्रसामुग्री कारखाने धंदेशाळांना देतात. अशा रीतीनें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मार्गांनीं औद्योगिक शाळांना मदत करणें हें आपल्याच हिताचें आहे अशी औद्योगिक

संघांची खात्री झालेली आहे. त्यामुळें सरकार आणि जनता यांचेवरील खर्चाची जबाबदारी अंशतः कमी होते.

या खर्चाचा मोबदला कारखान्यांनाही मिळतो. जर्मनींतील उद्योगशाळा या केवळ शिक्षणशाळा नसून त्या प्रयोगशाळा आहेत. कारखान्यांना स्वतःचे प्रगतीकरितां या संस्थांचा प्रयोगशाळांसारखा उपयोग होतो. बर्लिनमध्यें एक विणकामशास्त्राची उच्च उद्योगशाळा आहे. या शाळेंत कापडावरील नक्षीचे (डिझाइन्सचे) जे प्रयोग चाललेले असतात त्यांचा उपयोग कारखाने करून घेतात व त्याबद्दल मोबदला शाळेला देतात. दुसऱ्या एका शाळेंत रंगावर प्रयोग चाललेले आहेत; असे अनेक प्रयोग अनेक उद्योगशाळांतून चाललेले आहेत. त्यांचा फायदा कारखान्यांना व उद्योगधंद्यांना होतो.

## अनुभव व तात्त्विक शिक्षण यांची विभागणी

कारखाने व औद्योगिक शाळा या एकमेकांना पूरक आहेत. परस्पराच्या कामाची पुनरावृत्ति टाळली जाते. प्रत्यक्ष कामाची संवय लावणें हें कारखान्यांना शक्य आहे, शाळेंत तें कठिण जातें. तात्त्विक व प्रायोगिक ज्ञान देणें हें शाळांना शक्य आहे, तें देण्यास कारखान्यांना वेळ नसतो. म्हणून शक्य तेथें अशा प्रकारची कार्यविभागणी केली जाते. कित्येक धंदेशाळांची अशी अट आहे कीं विद्यार्थी शिक्षणाकरितां दाखल होण्यापूर्वी त्याला तीन वर्षे तरी कारखान्यांतील कामाचा प्रत्यक्ष अनुभव मिळालेला असला पाहिजे. हा पूर्वानुभव असला म्हणजे प्रत्यक्ष काम करून घेण्यांत शाळेचा फारसा वेळ जात नाहीं व प्रयोगशाळेचा व्यापही फार वाढत नाही. काही शाळा अशा आहेत कीं तेथें दिवसां कारखान्यांत काम करणारे लोक तात्त्विक व शास्त्रीय माहितीसाठीं येऊन शिक्षण घेतात. अशा रीतीनें आर्थिक व शैक्षणिक अशा दोन्ही दृष्टींनीं कारखाने व धंदेशाळा या एकमेकांना पूरक आहेत. त्यांची परस्परांना द्रव्याचे व शिक्षणाचे दृष्टीनें मदत होते.

## धंदेशिक्षणाचे प्रकार

जर्मन मुलाच्या धंदेशिक्षणास प्रारंभ त्याच्या प्राथमिक शाळेपासून होतो. प्राथमिक शाळेंत अनेक हस्तव्यवसाय करून घेतले जातात. त्यांचा उद्देश उद्योगकौशल्याचे दृष्टीनें हातांना व डोळ्यांना वळण लागावें हा आहे.

जर्मन व गणित या विषयांचा एकेक तास कमी करून हस्तव्यवसायाकरितां वेळ काढलेला आहे. या वेळांत एकाद्या लहान व्यवसायाचें शिक्षण दिलें जातें. यांत्रिक आणि औद्योगिक क्रियांची गोडी मुलाला लागावी हा या शिक्षणाचा उद्देश आहे. एकादीच वस्तु परंतु ती नीटनेटकी व बाजाराच्या दृष्टीनें चांगली तयार करावी हें ध्येय मुलापुढें ठेविलें जातें. प्राथमिक व माध्यमिक शाळांतील या हस्तव्यवसायांचा अप्रत्यक्ष उपयोग पुढें धंदेशिक्षणाकडे होतो. या विषयाची प्रथा महायुद्धानंतर जी शिक्षणसुधारणा झाली त्या वेळेपासून पडलेली आहे, त्यापूर्वी फारशी नव्हती.

आठ वर्षे प्राथमिक शिक्षण झाल्यावर ज्यांना धंद्यांत पडावें लागतें, त्यांचेकरितां पुरवणीशिक्षणाच्या धंदेशाळा आहेत. दुय्यम शिक्षणाचीं सहा वर्षे पूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांकरितां धंदेशिक्षणाच्या माध्यमिक दर्जाच्या शाळा आहेत. ज्यांचें नऊ वर्षाचें हायस्कूल शिक्षण (म्हणजे इकडील इंटरमीजिएट) पूर्ण झालेलें असतें त्यांना उच्च औद्योगिक शिक्षणांत प्रवेश मिळतो. ठोकळ मानानें प्राथमिक, दुय्यम, व उच्च अशा तीन दर्जाच्या धंदेशिक्षणशाळा जर्मनीत आहेत.

यांपैकीं कांहीं शाळा अगदी जुन्या आहेत. बर्लिनमधील कांहीं शाळा पन्नासपाऊणशें वर्षांपूर्वी निघालेल्या आहेत ; देशाच्या मानानें या शाळांची संख्या अफाट असून सर्व देशभर त्या पसरलेल्या आहेत. ज्या ठिकाणीं जो उद्योगधंदा किंवा व्यापार सुरू असेल त्या ठिकाणीं त्या धंद्याची शाळा काढली जाते. अशा तऱ्हेची योजना लहान प्रमाणावर आपल्याकडे संयुक्तप्रांतांत केलेली आहे. लखनौ, बनारस इत्यादि ठिकाणीं स्थानिक धंद्यांना पोषक अशा शाळा काढलेल्या आहेत. परंतु संख्येच्या दृष्टीनें जर्मनीच्या शाळा पुष्कळ आहेत. १९२६।२७ सालीं दुय्यम व प्राथमिक स्वरूपाच्या २९,६५२ शिक्षणसंस्था होत्या व त्यांत २५,०७,०२८ विद्यार्थी शिकत होते. १९३१ मध्यें उच्च औद्योगिक शिक्षणाच्या, म्हणजे इकडील कॉलेजच्या तोडीच्या शिक्षणसंस्थांतून १,३८,०१० विद्यार्थी वरच्या दर्जाचें शिक्षण घेत होते. जर्मनी देश हा हिंदुस्थानांतील एका प्रांताएवढा असेल. त्या दृष्टीनें ही संख्या पाहिली म्हणजे तिचें महत्त्व लक्षांत येईल.

## शाळांच्या खर्चाची व्यवस्था

धंदेशिक्षणाची जबाबदारी सरकार आणि जनता दोघांनीं मिळून घेतलेली आहे, परंतु सरकारनें विशेष लक्ष घातलेलें आहे. सर्व शाळांवर सरकार नियंत्रण व देखरेख ठेवितें आणि आर्थिक मदतही देतें. उच्च औद्योगिक शिक्षण-संस्था सरकारच चालवितें. प्राथमिक व माध्यमिक दर्जाच्या धंदेशाळा स्थानिक स्वराज्य संस्था, कारखाने, व सार्वजनिक संस्था अशा तिघांनीं स्वतंत्र रीतीनें किंवा परस्परांच्या सहकार्यानें चालविलेल्या आहेत. अनेक संस्था स्थानिक म्युनिसिपालिटयांनींच चालविलेल्या असतात; त्यांना सरकारची मदत मिळते. स्थानिक व्यापारी संघ व औद्योगिक संघ यांचेकडूनही या संस्थांना आर्थिक मदत मिळते. प्राथमिक धंदेशिक्षणाच्या शाळा व पुरवणी शाळा (कंटिन्युएशन स्कूल्स्) या जिल्हा–तालुक्याच्या स्थानिक स्वराज्य संस्थांनीं चालविलेल्या आहेत. त्यांचा निम्मा खर्च जनतेच्या करांतून भागतो, व बाकीचा निम्मा खर्च भागविण्याकरितां स्थानिक उद्योगधंद्यांवर कर बसविण्याचा त्यांना अधिकार आहे. अशा रीतीनें शाळांच्या स्थापनेची व आर्थिक जबाबदारीची कार्यविभागणी झालेली आहे. त्यामुळें कोणालाच फारसें ओझें न होतां औद्योगिक शिक्षणाचा प्रसार झालेला आहे.

## प्राथमिक धंदेशाळा

प्राथमिक व माध्यमिक शाळांत जे हस्तव्यवसाय शिकवितात त्यांत मुख्यतः कागद, लांकूड, व पत्रा यांना आकार देऊन त्यांच्या वस्तू कशा कराव्यात हें शिक्षण मिळतें. हाताला वळण मिळावें व वस्तू तयार केल्याचाही आनंद व्हावा हा त्यांत उद्देश आहे. दहा ते पंधरा मुलांचे असे लहान वर्ग असतात. या विषयाचें विशेष शिक्षण घेतलेले शिक्षक या वर्गावर नेमलेले असतात. दुय्यम शिक्षणाच्या उत्तरभागांत या शिक्षणाला फारसें प्राधान्य नाहीं. रेखाकला या विषयाला मात्र साप्ताहिक दोन तास दिले जातात.

प्राथमिक दर्जाच्या धंदेशाळांतून मुख्यतः चौदा ते अठरा वयाचीं मुलें येतात. या शाळा सकाळीं सातपासून सायंकाळीं सातपर्यंत उघडया असतात. प्रत्येकानें आपापल्या सवडीप्रमाणें शिकून जावें. कारखान्यांतून प्रत्यक्ष काम करणारे लोक या शाळेंत शिक्षणाकरितां येतात. त्यांत हरएक

धंद्याचें शिक्षण दिलें जातें. ज्या भागांत शाळा असेल त्या भागांतील धंद्यांची व्यवस्था ती शाळा करते. मोठ्या शहरांतून प्रत्येक धंद्याकरितां स्वतंत्र शाळा असतात. लहान गांवांत एकाच शाळेंत अनेक विषय शिकविण्याची सोय केलेली आहे. फार लहान गांवांतील शाळेंत विषयांची संख्या मर्यादित असते. खेडेगांवांत शेतीविषयक धंदेशाळा काढलेल्या आहेत. सुतारी, लोहारी, घरबांधकाम, छापखाना, न्हावी काम, धोबी काम, यांत्रिक काम इत्यादि विविध धंदे शिकविले जातात. शेतकीच्या शाळेंतून शेतकीचें प्राथमिक शास्त्रीय ज्ञान व ग्रामीय जीवन यांचें शिक्षण देतात.

प्रत्यक्ष धंद्याच्या शिक्षणाव्यतिरिक्त सामान्य ज्ञानवर्धनाचे दृष्टीनेंही कांहीं विषय ठेविलेले आहेत. नागरिकशास्त्र, गणित, जमाखर्चपद्धति, रेखाकला, मुलींचेकरितां स्वयंपाक व गृहशास्त्र, इत्यादि विषय शिकविले जातात. अगदीं कनिष्ठ प्रतीच्या जर्मन नागरिकालाही इतकें किमान शिक्षण मिळतें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. बहुजन समाज म्हणून जो म्हणतात त्याचें किमान शिक्षण प्राथमिक आठ वर्षें व औद्योगिक तीनचार वर्षें इतकें झालेलें असतें. शिक्षणानें राष्ट्र पुढें येतें या तत्त्वाचें मर्म काय आहे तें यावरून ध्यानांत येईल. या समाजाशीं अज्ञ, निरक्षर, आणि अशिक्षित अशा हिंदी समाजाला बरोबरी करावयाची आहे.

## माध्यमिक व्यवसायशिक्षण

दुय्यम दर्जाच्या उद्योगशाळा आहेत त्यांत दोन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारच्या शाळांत प्रवेश मिळण्याकरितां धंद्याचा पूर्वानुभव लागत नाहीं. एकदम विद्यार्थी त्यांत जाऊं शकतो. दुसऱ्या प्रकारच्या शाळा थोड्या वरच्या प्रतीच्या असल्यानें त्यांत प्रवेश मिळण्यापूर्वी कारखान्यांत पूर्वानुभव मिळविणें जरूर असते. हा अनुभव सहा महिने ते तीन वर्षांचा असावा अशी अट आहे. दुय्यम दर्जाच्या धंदेशाळांत व्यापार, यांत्रिक उद्योगधंदे, स्थापत्यकला, व शेतकी अशा सर्व क्षेत्रांतील व्यवसाय सोपपत्तिक रीतीनें शिकविले जातात. कारखान्यांत लागणारा मध्यम दर्जाचा अधिकारीवर्ग या शाळांतून तयार होतो.

बर्लिनसारख्या मोठ्या शहरांत एकेका उद्योगक्षेत्राकरितां एकेक उत्कृष्ट शाळा आहे. त्या क्षेत्रांतील पोटविषयही तेथें शिकविले जातात.

साहित्य व यंत्रसामुग्री चांगल्या प्रकारची असते. दोन ते चार वर्षांचा अभ्यासक्रम असतो. बर्लिनमधील विणकामशास्त्राची एक शाळा १८८० चे सुमारास निघालेली आहे. पुढच्या वसंत ऋतूंत स्त्रियांच्या कपड्याची काय 'फॅशन' असावी तें एक वर्ष आधीं या शाळेंत प्रयोगानें ठरविलें जातें, इतका या शाळांचा कारखान्यांवर व समाजावर परिणाम होतो. लहान यंत्रांचें शिक्षण देणारी एक शाळा आहे (गाऊस शूल). तेथें रेडियो, टेलीग्राफी, टेलीफोन, विद्युत् यंत्रें, एक्स्रेज् इत्यादि यंत्रांसंबंधीं शिक्षण दिलें जातें. स्क्रू तयार करण्याचें अगदीं अद्ययावत् उत्कृष्ट यंत्र या शाळेंत होतें. एका मुद्रण व चित्रकला विद्यालयांत छपाई, लिथोग्राफी, ब्लॉक मेकिंग, बाइंडिंग, फोटोग्राफी, चित्रकला, व्यापारी चित्रकला इत्यादि अनेक पोटखातीं होतीं. स्त्रियांकरितां उच्च धंदेशिक्षण देणाऱ्या एका संस्थेंत उच्च फोटोग्राफी शिक्षणाचे विविध प्रकार होते ; साधी, एक्स्रेज, बॅक्टेरियालॉजिकल, मेटॅलर्जिकल्, मेडिकल्, मायक्रॉस्कोपिक इत्यादि फोटोग्राफीच्या अनेक शाखाचें उत्कृष्ट शिक्षण मुलींना येथें मिळतें. हिंदुस्थानांत अद्याप अशी एकही शाळा नाही. विविध कलामंदिर (कून्स्ट्गेवर्ब शूल) नांवाचे एक कलाभवन बर्लिनमध्यें आहे. तेथें कलाशिक्षणाचे सर्व विभाग आहेत. व्यापारी व साधी चित्रकला, नाट्यगृहांतील चित्रकला व रंगभूमीरचना, गृहशोभेची कला (इंटीरिअर डेकोरेशन), लांकूड खोदकाम, दगडी खोदकाम, वस्तुशास्त्रोपयोगी शिल्पकला, सोन्याचांदीची नक्षीकामें, इत्यादि अनेक कलांचें शिक्षण या ठिकाणी देतात व प्रयोग चालू असतात. एका हिंदी राजवाड्यांतील अंतरंग शोभेचें (इंटीरिअर डेकोरेशनचें) काम याच शाळेंतील एका कारागिरानें केलेलें आहे ; निरनिराळे रंग करण्याचे प्रयोग या ठिकाणी चालतात. त्यांत हिंदी पिवडीचा रंग (इंडियन यलो) वापरण्याची मनाई आहे असें समजलें. जर्मनीची विशिष्ट अशी कला काय असावी या दृष्टीनें या शाळेंत निरनिराळ्या क्षेत्रांत प्रयोग चालू असतात. साधेपणा आणि आधुनिकता हे दोन गुण प्रामुख्यानें असणारी कला वाढविण्याचा प्रयोग चाललेला आहे. यावरून समाजाच्या जीवनावर व संस्कृतीवर या शाळांचा किती परिणाम होत आहे त्याची कल्पना येईल.

## उच्च दर्जाचें औद्योगिक शिक्षण

उच्च औद्योगिक शिक्षणाच्या जर्मन शाळांचा दर्जा फार मोठा आहे. या ठिकाणीं विद्यार्थी व अध्यापक एकेका प्रश्नावर वर्षानुवर्षें अभ्यास करीत असतात. अध्यापकाला स्वतःची अशी स्वतंत्र प्रयोगशाळा असते. त्याचप्रमाणें पीएच्. डी. चा अभ्यास करणाऱ्या एकेका विद्यार्थ्यालाही स्वतंत्र प्रयोगशाळा असते. अशा वीसपंचवीस विद्यार्थ्यांची सोय एकेका शाळेंत आहे. तेथील साहित्यसामुग्री अगदीं आधुनिक आहे. शाळेची स्वतःची मोठी यंत्रकामशाळा (वर्कशॉप) असून तेथें जरूर ती साहित्यसामुग्री पाहिजे त्या प्रकारची करवून घेतां येते. प्रयोग दाखविण्याकरितां हजार विद्यार्थी बसतील असें प्रयोग–सभागृह आहे. टेबलावरील प्रयोग सर्व विद्यार्थ्यांना दिसणें शक्य नाहीं, म्हणून अध्यापकाच्या प्रयोगाची साहित्यसामुग्री पारदर्शक असते. प्रयोग चालू असतां त्याचें चित्र चित्रदर्शकाचे साहाय्यानें एका पडद्यावर पाडलें जातें व तेथें विद्यार्थी तो प्रयोग पाहतात. जहाजें बांधणें, विमानें बांधणें, खाणींतून द्रव्यें काढणें इत्यादि शिक्षणाचीही साधनसामुग्री अप्रतिम आहे. एका संस्थेंत विद्यार्थ्यांना खाणींतील एंजिनियरिंगची कल्पना येण्याकरितां एक कृत्रिम खाण करून दाखविलेली आहे.

## मोठ्या उद्योगधंद्यांचें शिक्षण

उच्च शिक्षणाच्या शाळांत सर्व मोठ्या उद्योगधंद्यांचें शिक्षण दिलें जातें. या संस्थांचे पांच मुख्य प्रकार आहेत––उद्योगधंद्यांना उपयोगी भौतिक शास्त्रें, यांत्रिक शास्त्रें व धंदे, रासायनिक शास्त्रें व धंदे, स्थापत्यशास्त्र, आणि शेतकीविषयक शास्त्रें. या प्रत्येक प्रकारांत आणखी पोटभेद आहेत. जर्मनींत असा एकही मोठा धंदा नाहीं कीं ज्याचें शास्त्रोक्त आणि पद्धतशीर शिक्षण देण्याची व्यवस्था देशांत नाहीं. कागदाचा धंदा, गॅस् करणें, जहाजें बांधणें, विमानें बांधणें, फार्मसी, खाणी, मेटॅलर्जी इत्यादि अनेक धंद्यांचें उच्च शिक्षण या संस्थांतून दिलें जातें. त्याव्यतिरिक्त चित्रकला व संगीत या कलांचें उच्च शिक्षण देणारीं अनेक महाविद्यालयें जर्मनीमध्यें आहेत.

लोकसंख्येनें सहा कोटी व क्षेत्रफळानें मद्रास इलाखा व म्हैसूर इतका असलेल्या या देशांतील उच्च औद्योगिक शिक्षणसंस्थांची संख्या पुढें दिली

आहे; त्यावरून औद्योगिक शिक्षणाविषयीं आस्था असलेलें सरकार काय करूं शकतें त्याची कल्पना येईल. शेतकी महाविद्यालयें ४, फॉरेस्ट्री ३, पशुवैद्यक २, खाणीशास्त्र २, उच्च व्यापारी शिक्षण ५. यांशिवाय दहा शहरांमध्यें मोठीं "औद्योगिक महाविद्यालयें" (हायर टेक्निकल् स्कूल्स्) आहेत. शहराचे आकारमानानें एक किंवा अनेक संस्था एकेका शहरांत असतात.

## प्रवेशाच्या अटी व शिक्षणाचा दर्जा

माध्यमिक दर्जाच्या औद्योगिक शाळेंत प्रवेश मिळण्यापूर्वीं विद्यार्थ्यांचें इकडील मॅट्रिक इतकें किंवा जर्मन हायस्कूलचें सहा वर्षांचें शिक्षण व्हावें लागतें. त्यानंतर एकाद्या कारखान्यांत सहा महिनेपासून तीन वर्षे तरी पूर्वानुभव मिळालेला पाहिजे. व्यावहारिक शिक्षणाचा पूर्वी अनुभव आलेला असला म्हणजे शाळेंत फक्त तात्त्विक व शास्त्रीय शिक्षणावर भर देतां येतो. अनुभवाची पूर्वभूमिका असतेच. बर्लिनमधील या प्रकारच्या एकेका शाळेमध्यें ७५० पासून २००० पर्यंत विद्यार्थी शिकत असतात. यांतील बहुसंख्य विद्यार्थी रात्रीचे वेळीं येऊन शिकतात. दिवसा कारखान्यांत अथवा आपल्या उद्योगधंद्यांत काम करितात. प्रत्यक्ष कामाला उच्च शिक्षणाची जोड मिळाल्यामुळें कामांत दिवसेंदिवस सुधारणा होत जाते. त्याचा उद्योगधंद्यांना आणि शिकणाऱ्या व्यक्तींना उभयतांनाही फायदा होतो.

उच्च औद्योगिक शिक्षणसंस्थांत प्रवेश मिळण्यापूर्वीं इकडील इंटरमीजिएटइतकें म्हणजे जर्मन हायस्कूलचें नऊ वर्षांचें शिक्षण व्हावें लागतें. त्यांत भौतिक शास्त्रें व अर्वाचीन भाषा या विषयांचा विशेष अभ्यास झालेले विद्यार्थी औद्योगिक शिक्षणाकडे जातात. बर्लिनमधील एका औद्योगिक महाविद्यालयांत (टेकनिशे फाक् शूल) ५००० विद्यार्थी आहेत! जर्मनीच्या अनेक संस्थानांपैकीं प्रशिया संस्थानांत असलीं चार महाविद्यालयें आहेत.

या संस्थांतून विद्यार्थ्यांचें काम अतिशय पद्धतशीर, शास्त्रोक्त, आणि परिपूर्णतेकडे लक्ष देऊन होत असतें. मध्यम दर्जाच्या शाळेंत विद्यार्थ्यांना रोज आठ तास, सकाळीं आठ ते दुपारीं चारपर्यंत, काम असतें. उच्च संस्थांमध्यें साप्ताहिक चाळीस तास शाळेंतील काम व अभ्यास, आणि तीस तास गृहपाठ इतका अभ्यासाचा बोजा असतो. हा कमी करावा अशी विद्यार्थ्यांची

मागणी आहे. चार वर्षांचे अभ्यासक्रमापैकीं पहिलीं दोन वर्षे सामान्य अभ्यासक्रम व नंतर विशिष्ट औद्योगिक क्षेत्राचा अभ्यास असतो. दोन वर्षांनंतरच्या परीक्षेंतून साधारणपणें शेंकडा चाळीस विद्यार्थी पास होऊन पुढें जातात. हीं उच्च औद्योगिक विद्यालयें म्हणजे जर्मनीचें काळीज आहे. सर्व राष्ट्राच्या औद्योगिक जीवनाला येथून नवीन चैतन्य मिळत असतें.

## व्यवसाय-मार्गदर्शन केंद्रें

उद्योगधंद्याच्या दृष्टीनें पुढारलेल्या या देशांत आज जवळजवळ १५०० तरी निरनिराळे धंदे असतील. एकाद्या व्यक्तीनें यांपैकीं कोणता धंदा उचलावा व त्यापूर्वी कोणतें शिक्षण घ्यावें हा प्रश्न स्वाभाविकपणेंच प्रत्येक विद्यार्थ्यापुढें येतो. त्याला या संशोधनांत मदत करण्याकरितां पुरवणी धंदेशाळांना जोडून किंवा अन्यत्र 'व्यवसाय मार्गदर्शन केंद्रें' (व्होकेशनल गायडन्स् सेंटर) निघालीं आहेत. या ठिकाणीं विद्यार्थ्याला त्याच्या भावी धंदेशिक्षणासंबंधीं व धंद्यासंबंधीं मार्गदर्शन करणारे तज्ज्ञ असतात. हीं सर्व केंद्रें 'जर्मन औद्योगिक खातें' (फेडरल लेबर मिनिस्ट्री) आणि 'व्यवसाय वार्ता कार्यालय' (फेडरल एंप्लॉयमेंट एक्स्चेंज ऑफिस) यांच्यामार्फत चालविलीं जातात. शिक्षक, डॉक्टर, आणि मानसशास्त्रज्ञ यांनीं प्रथम विद्यार्थ्याबद्दल त्यांचा अहवाल सादर करावयाचा असतो. प्रत्येक शाळेंतील शिक्षकानें विद्यार्थ्याचा स्वाभाविक कल, औद्योगिक प्रवृत्ति, बुद्धिमत्ता इत्यादि उपयुक्त माहितीची नोंद ठेवणें व व्यवसायसंशोधन खात्याला पुरविणें जरूर असतें. व्यवसाय-मानसशास्त्रज्ञ मुलाला निरनिराळ्या प्रकारच्या परीक्षांच्या (टेस्ट्स्) साहाय्यानें तपासतो. शारीरिक दृष्ट्या कोणते व्यवसाय टाळावेत तें डॉक्टर सांगतो. ही सर्व माहिती जमेला धरून आणि विवक्षित व्यवसायांत असलेला वाव किंवा गर्दी लक्षांत घेऊन व्यवसायसंशोधनतज्ज्ञ विद्यार्थ्यांना सल्लामसलत देतो. शहरांतील शेंकडा सत्तर ते ऐंशी विद्यार्थी या सोयीचा फायदा घेतात असा अनुभव आहे. वाढत्या युगांत व्यवसायसंशोधन हें एक आवश्यक शिक्षण आहे.

## प्रौढ शिक्षणाची मागणी

जर्मनींत संघटित प्रौढ शिक्षणास प्रारंभ १८७१ मध्यें झाला. उद्योग

धंद्यांत पडलेल्या कामगारांना त्यांच्याच धंद्याचें अधिक शिक्षण देऊन त्यांना अधिक कार्यक्षम करावें हा या शिक्षणाचा उद्देश होता. यांत्रिक सुधारणा जसजशी वाढली तसतशी कामगारवर्गांत अधिक जागृति झाली. आपणांस केवळ औद्योगिक शिक्षणाव्यतिरिक्त कांहीं तरी सांस्कृतिक व बौद्धिक शिक्षण पाहिजे अशी जाणीव त्यांच्यांत उत्पन्न झाली. यंत्रप्रसारामुळें रोजीं कामाचे तासही कमी झाले. या रिकाम्या वेळेचा उपयोग करण्याचे दृष्टीनेंही कांहीं सात्त्विक स्वरूपाचें जीवन देणारें शिक्षण आपणांस पाहिजे असें या वर्गास वाटूं लागलें. औद्योगिक सुधारणेमुळें जे अनेक राजकीय, आर्थिक, व सामाजिक प्रश्न उत्पन्न झाले त्यांचें सोपपत्तिक ज्ञान व शिक्षण आपणांस पाहिजे अशी मागणी कामकरीसंघांकडून होऊं लागली. किंबहुना श्रमजीवी वर्गाला योग्य अशी सांस्कृतिक व बौद्धिक शिक्षणाची कल्पना कामकरी संघांनींच काढली. १९१९ साली समाजवादी लोकशाहीची घटना वीमार येथें झाली. त्या घटनेंत कामकरी वर्गाचे सांस्कृतिक उच्च शिक्षणाची जबाबदारी सरकारवर आहे हें तत्त्व मान्य झालें. महायुद्धानंतरच्या लोकशाहीच्या काळांत कामकरी वर्गापैकीं जे कर्तबगार लोक पुढें आले त्यांचें शिक्षण या नवीन प्रकारच्या प्रौढ शिक्षणसंस्थांमधूनच झालें होतें.

## सामाजिक उद्देश

समाजांत कामकरी जीवन आणि बौद्धिक जीवन असें द्वंद्व आहे तें नष्ट करून एकाच व्यक्तीच्या ठिकाण दोन्ही अंगें आणणें हें प्रौढ शिक्षणाचें उद्दिष्ट आहे. समाजांतील एका वर्गानें सर्वस्वीं बौद्धिक व सांस्कृतिक जीवनाचा उपभोग घ्यावा आणि बहुजन समाजाला केवळ शारीरिक कष्टाचीं कामें देऊन त्यांना बौद्धिक जीवनापासून अलिप्त ठेवावें हा अन्याय आहे. त्यामुळें सुशिक्षित व सुसंस्कृत वर्ग (एलीट्) आणि अशिक्षित श्रमजीवी वर्ग (मासेस्) असा जातिभेद समाजांत निर्माण होतो. तो राष्ट्रहितास विघातक आहे. सांस्कृतिक प्रौढ शिक्षणाचा उद्देश श्रमजीवी कामकरी वर्गाला बौद्धिक व कलाविषयक शिक्षणाचे संस्कार देऊन त्यांचा दर्जा वाढविणें हा आहे.

## प्रौढ शिक्षणाला आश्रय

या संस्थांपैकीं बऱ्याचशा संस्था कामगार संघांनीं काढल्या असून त्यांना सरकार व म्युनिसिपालिट्या यांचेकडून मदत होते. शहरांतील शाळा–कॉलेजच्या इमारती व सामान यांचा उपयोग करण्याची परवानगी व आर्थिक मदत शहरांकडून मिळते. विद्यार्थ्यांकडून थोडी फी घेतली जाते पण तिचें उत्पन्न फारसें नसतें.

राजकीय, धार्मिक, किंवा शैक्षणिक संस्थांच्या आश्रयाखालीं प्रौढांच्या शाळा आणि महाविद्यालयें चालतात. वास्तविक हें विश्वविद्यापीठांचेंच एक काम आहे. परंतु अनुभव असा कीं विद्यापीठाची असावी तशी सहकारिता प्रौढ शिक्षणसंस्थांना मिळत नाहीं. बहुजन समाजाचे शिक्षणाविषयीं पंडितांनीं आणि विद्वानांनीं उदासीन राहावें हा न्याय सर्वत्रच दिसून येतो. सामान्य जन आणि वरचा वर्ग यांच्या संस्कृतींत फार अंतर राहिलें म्हणजे एका वर्गाला दुसऱ्या वर्गाविषयीं तिरस्कार व तुच्छता वाटते. म्हणून हें अंतर कमी करणें, हें शिक्षणाचें काम आहे.

## सामान्य लोकांचें महाविद्यालय

प्रौढांच्या शिक्षणाची प्रमुख संस्था म्हणून "जानपद विद्यापीठ" (फोक्स् होक्शूल) किंवा "सामान्य लोकांचें महाविद्यालय" हें प्रसिद्ध आहे. यांत बहुसंख्य वर्ग कामकरी लोकांचा असतो. विद्यार्थी तरुण किंवा मध्यम वयाचे असतात. स्त्रियांचा भरणा विशेष असतो. फ्रांकफूर्ट या शहरांत १९२४।२५ सालीं ५,२१८ कामकरी विद्यार्थ्यांनीं निरनिराळे अभ्यासक्रम अशा विद्यापीठांत घेतले होते.

या विद्यालयांत विद्वान् आणि तज्ज्ञ अशा अध्यापकांचीं व्याख्यानें होतात. प्रसिद्ध कलावंतही अध्यापक म्हणून कामें करितात. विद्यालयाची स्वतःची इमारत असल्यास तेथें निरनिराळे कार्यक्रम चालू असतात. व्याख्यानें, कला-शिक्षण, वादविवादसभा, चर्चामंडळें, संगीत शिक्षण, नाट्यशिक्षण, शैक्षणिक सिनेमा किंवा रेडिओ, बेकारांकरितां अभ्यासक्रम इत्यादि कामकरी लोकांना

उपयुक्त, मनोरंजक व बोधप्रद अशा अनेक गोष्टींची सोय तेथें असते. रशियांतील 'संस्कृति मंदिरा'ची कल्पना अशा संस्थेवरूनच सुचली असावी.

## अभ्यासाचे विषय

अभ्यासक्रमांत मुख्य भर सामाजशास्त्रें, तत्त्वज्ञान, व वाङमय यांवर असतो. जर्मन इतिहास, अर्थशास्त्र, राजकारण, तत्त्वज्ञान, आणि जर्मन, इंग्लिश, व फरेंच वाङमय, अशा स्वरूपाचे विषय शिकविले जातात. कामकरी लोकांना अशा तात्त्विक व विचारात्मक विपयांची गोडी असावी यांत विशेष आहे. पाश्चात्य औद्योगिक सुधारणेचा एक टप्पा पूर्ण झाल्यावर महायुद्ध झालें. या युद्धामुळें सामान्य जनांनाही समाजप्रश्न व जागतिक राजकारण यांविषयीं कुतूहल उत्पन्न झालें ; यंत्रें आणि उद्योगधंदे यांचे पलीकडे समाज, व्यक्ति आणि जीविताचें तत्त्वज्ञान अशा महत्त्वाच्या गोष्टी आहेत, त्यांचेंही आपणांला ज्ञान झालें पाहिजे असें वाटूं लागलें. त्यामुळें प्रौढांच्या विद्यालयांत या विषयांना अतिशय महत्त्व प्राप्त झालें. दिवसभर हातांनीं कष्ट केलेल्या कामकऱ्यांनीं तत्त्वज्ञान–वाङमयाचा अभ्यास करणें आणि केवळ धंदा किंवा व्यवसाय म्हणून या विषयांचा अभ्यास करणें यांत फरक आहे.

## अध्यापनपद्धति

अध्यापनपद्धतींत व्याख्यानापेक्षां चर्चा व वादविवाद यांना महत्त्व दिलें जातें. अध्यापकाच्या व्याख्यानांपेक्षां विद्यार्थ्यानें काय वाचलें व त्याचे स्वतःचे काय विचार आहेत यांना अधिक प्राधान्य दिलें जातें. विद्यार्थी स्वतः वाचन करून निबंध लिहून आणतात. सारांश, अध्यापनापेक्षां अध्ययन, स्वाध्याय, आणि चर्चा यांना महत्त्व अधिक आहे. शहरांतील ग्रंथालयें, वस्तुसंग्रह, व प्रदर्शनें यांना विद्यार्थी अभ्यासाच्या दृष्टीनें भेट देतात. ठराविक अभ्यासक्रमाव्यतिरिक्त मधून मधून अनेक फुटकळ व्याख्यानें होत असतात. जानपद विद्यापीठांचा विशेष हा आहे कीं त्यांनीं परीक्षा, शिफारसपत्रें, पदव्या वगैरे कांहीं ठेविलेल्या नाहींत. केवळ शिक्षणाच्या व ज्ञानाच्या हौसेनें ज्यांना यावयाचें असेल त्यांनीं यावें. पदव्या किंवा पगारवाढ यांचा अभिलाष न धरतां येणाऱ्या या प्रौढ विद्यार्थी वर्गामुळें विद्यालयाचें वातावरण गंभीर स्वरूपाचें असतें यांत नवल नाहीं.

## सामान्य जनांचे विद्याआश्रम

"जानपद विद्यापीठ गृहें" (फोकस् होकशूल हाईम) नांवाच्या वसतिगृह स्वरूपाच्या संस्थाही जर्मनींत निघाल्या होत्या. १८ ते २५ वर्षांच्या विद्यार्थ्यांनीं तीनचार महिने एकत्र राहून अध्ययन, वादविवाद, चर्चा, खेळ, करमणुकी, सहजीवन इत्यादि कार्यक्रमांच्या साहाय्यानें आपलें व्यापक शिक्षण करून घ्यावें हा या संस्थांचा उद्देश आहे. शाळेंतील शाब्दिक शिक्षण आणि जगांतील अनुभव यांची बौद्धिक दृष्टया सांगड घालून जगाकडे व समाजाकडे पाहण्याची दृष्टि तरुण पिढीला द्यावी अशी मूलभूत कल्पना.

## वाचनसंघाचें कार्य

"सायंवाचनसंघ" (रीडिंग ईव्ह्निंग्ज्) नांवाच्या संस्थांचाही बराच प्रचार मध्यंतरीं १९२४ चे सुमारास झाला होता. पुस्तकें महाग असल्यामुळें प्रत्येक गरीब माणसाला विकत घेतां येत नाहींत. म्हणून एकानें पुस्तक वाचावें व इतरांनीं ऐकावें अशा स्वरूपाचा हा उपक्रम होता. कामगार वर्गांत ग्रंथसंग्रहालयांचाही प्रसार करण्याचा पुष्कळ प्रयत्न झालेला आहे. त्याचबरोबर अश्लील आणि असभ्य वाङमयाविरुद्ध मोहीम काढण्याचें कामही या संस्थांच्या मार्फत केलें गेलें. चांगल्या ग्रंथांचीं दुकानें उघडणें आणि किताबखानेवाल्यांना अश्लील वाङमय विकण्यापासून परावृत्त करणें असें दुहेरी स्वरूपाचें हें काम होतें.

## औद्योगिक कारभारशाळा

वर निर्दिष्ट केलेलीं जानपद विद्यालयें व बहुविध शिक्षणसंस्था या लोकांनीं चालविल्या असून सरकारची त्यांना मदत आहे. सरकारनेंही प्रौढां-करितां कांहीं संस्था चालविल्या आहेत. औद्योगिक क्षेत्रांतील अधिकाराचीं व कारभाराचीं कामें करण्याकरितां पद्धतशीर शिक्षण झालेले कामगार मिळावेत हा त्यांचा उद्देश आहे. "औद्योगिक कारभार शाळा" (व्होकेशनल् स्कूल्स ऑफ इंडस्ट्री अँड मॅनेजमेंट) या नांवाखालीं ज्या संस्था निघाल्या त्यांचा अभ्यासक्रम काय असतो याची पुढील विषयांवरून कल्पना येईल; हा दोन वर्षांचा शिक्षणक्रम आहे—

(१) औद्योगिक कारभारपद्धति, (२) राजकीय अर्थशास्त्र, तात्त्विक व व्यावहारिक, (३) समाजविषयक राजकारण, (४) समाजशास्त्र, (५) कायदा, (६) सामाजिक तत्त्वज्ञान, (७) मानसशास्त्र, (८) कामगार शिक्षणशास्त्र, (९) जर्मन भाषा, आणि (१०) इंग्लिश भाषा.

वरील शिक्षणक्रमावरून एक गोष्ट लक्षांत येईल कीं औद्योगिक क्षेत्रांत काम करणाराला अर्थशास्त्र, समाजशास्त्र, राजकारण, मानसशास्त्र, शिक्षण-शास्त्र इत्यादि अनेक क्षेत्रांचें ज्ञान पाहिजे.

## तुरुंगांत शिक्षणाच्या सोयी

जर्मनीच्या तुरुंगांतही पद्धतशीर शिक्षणाची प्रथा पडलेली आहे. माणसानें गुन्हा केलेला असला तरी तुरुंगांत गेल्यावर त्याला सुसंस्कृत जीवनाची संधि मिळावी; तुरुंगांतून बाहेर पडल्यावर मनुष्य सरळ मार्गाला लागावा, हा तुरुंगांतील शिक्षणाचा उद्देश आहे. एका जर्मन तुरुंगांत ५६,००० ग्रंथांचा संग्रह होता. निरनिराळे विषय शिकण्याकरितां वर्ग, कलांच्या अभ्यासकांचे संघ, आणि इतर शिक्षणविषयक सोयी तुरुंगांत आहेत. तुरुंगांतून बाहेर पडलेलीं शेंकडा पाऊणशें माणसें पुढें सरळ मार्गानें जातात, असा अंदाज आहे.

## नाझी कारकीर्दींत प्रौढ शिक्षण

आर्थिक व राजकीय क्रांतीमुळें सामाजिक संस्थांत अनेक स्थित्यंतरें व फेरबदल होतात, तरी कायम स्वरूपाच्या अशा कांहीं चांगल्या गोष्टी राहतातच. जर्मनीतील नाझी राज्यक्रांतीमुळें कामगार वर्गाच्या अनेक चळवळींवर नियंत्रणें पडलेलीं असल्यामुळें प्रौढ शिक्षणाच्या सर्वच संस्था जोरांत काम करीत असतील असें नाहीं. शांततेच्या परिस्थितींत जर्मनीनें आपल्या स्वभावानुसार प्रौढ शिक्षणाला अत्यंत पद्धतशीर अशा प्रकारचें वळण लावलें. अशी संघटना इंग्लंडमध्येंही पाहावयास सांपडते.

नाझींच्या जर्मनींत प्रौढ शिक्षण म्हणजे राजकीय प्रचार. त्याकरितां "प्रचारखातें व प्रचारमंत्री" (मिनिस्ट्री ऑफ् प्रोपोगँडा) यांची स्थापना झालेली आहे. रेडिओ, सिनेमा, वृत्तपत्रें, व्याख्यानें, सभा इत्यादि अनेक मार्गांनीं हा प्रचार चालू आहे.

पद्धतशीर औद्योगिक शिक्षण आणि सुशिक्षित व जागृत कामगार वर्ग यांमुळें जर्मनी महायुद्धाच्या दीव्यांतून पार पडूनही पुन्हां एका पिढींत इतर पुढारलेल्या राष्ट्रांबरोबर आलेला आहे.

---

## प्रकरण एकविसावें

# इटालियन शिक्षणाची पुनर्घटना

### इटली व जर्मनी यांतील साम्य

ज्याला इतिहास आहे तें राष्ट्र मरणार नाही, ही म्हण इटलीच्या बाबतींत अगदी सार्थ झालेला आहे. इटलीनें आपल्या प्राचीन इतिहासाचा उपयोग राष्ट्राच्या आणि शिक्षणाच्या पुनर्वटनेकडे केलेला आहे. जवळ भांडवल असलें तरी त्याची जाणीव पाहिजे. त्याचा हेतुपूर्वक विशिष्ट, ध्येयांकडे उपयोग करून घेतां आला पाहिजे. जर्मनी आणि इटली या दोघानी आपल्या इतिहासाचा उपयोग राष्ट्रांत नवचैतन्य व आत्मविश्वास उत्पन्न करण्याकडे केलेला आहे. महायुद्धानंतर जर्मनी हे जित राष्ट्र समजलें जात होतें. हा पराभवाचा डाग धुवून काढावयास इतिहासाचें पाणी उपयोगी पडलें. इटली हें यूरोपमधील तिसऱ्या प्रतीचें राष्ट्र समजलें जात होतें. त्याच्या शब्दाला किंमत नव्हती. आतां इटलीचा सूत्रधार बोलूं लागला कीं सारें जग कान टवकारून ऐकूं लागतें. याचें कारण उदासीन आणि प्रसुप्त अशा राष्ट्राला त्याचा भूतकालांतील इतिहास दाखवून त्याच्या भविष्यकालीन कार्याची जाणीव करून दिली गेली. शिक्षणाचा या कामीं उपयोग झाला.

इटली व जर्मनी यांच्या राजकीय तत्त्वज्ञानांत बरेंचसें साम्य असल्या-कारणानें त्यांच्या शिक्षणाच्या तत्त्वांतही तें दिसून येतें. शिक्षणाचें वैशिष्टच शालेय अभ्यासक्रमांतील विषयांच्या यादींत दिसून येत नाहीं ; त्या विषयांच्या द्वारें काय तत्त्वें मुलांचे मनावर बिंबविलीं जातात यांत प्रत्येक राष्ट्राचें वैशिष्टच असतें. इंग्लिश भाषा हा विषय अनेक राष्ट्रांच्या शिक्षणक्रमांत आहे. परंतु

प्रत्येक ठिकाणीं या विषयाचें धोरण आणि पद्धति निराळी असते. या भाषेंतील आपल्या देशाला काय पाहिजे आहे तें नेमकें काढून प्रत्येक राष्ट्र आपल्या तरुण पिढीला देत असतें. प्रत्येक देशाची निराळी दृष्टि असते. या न्यायानें इटलीचीही स्वतःची अशी शिक्षणदृष्टि आहे. परंतु पद्धति आणि तंत्र या दृष्टीनें जर्मनीशीं त्याचें बरेंचसें साम्य आहे.

## इटली–जर्मनीची तात्त्विक भूमिका

इटलीचा फाशिस्मो आणि जर्मनीचा नाझीझम् (नॅशनल् सोशालिझम्) यांत बरेंचसें साम्य आहे. दोन्ही तत्त्वांच्या मुळाशीं राष्ट्रीयत्वाचा अभिमान आहे. राष्ट्रीय उत्कर्ष प्रथम, नंतर जगाचें कल्याण असें त्यांचें व्यावहारिक तत्त्व आहे. त्याचा अतिरेक झाल्यामुळें साम्राज्यविषयक तृष्णा दोघांच्याही ठिकाणीं वाढलेल्या आहेत. अल्प कालांत कांहीं ध्येय साध्य करावयाचें म्हणजे राष्ट्रांत एकी व बलिष्ठ एकमुखी सत्ता पाहिजे. म्हणून मतभेद व फाटाफूट होण्यासारख्या चळवळी त्यांनीं दडपून टाकल्या आहेत. पक्षभेदावर उभारलेली लोकशाही व प्रातिनिधिक राज्यपद्धति दोघांनींही त्याज्य व निरुपयोगी ठरविलेली आहे. राष्ट्रांत वर्गयुद्ध उत्पन्न करणाऱ्या समाजवादाविरुद्ध दोघेही तिलांजली घेऊन उठलेले आहेत. सर्व अधिकार राष्ट्राच्या म्हणज एका सत्ताधारी व्यक्तीच्या हातांत एकवटलेले आहेत. व्यक्तीनें राष्ट्राशीं एकरूप झालें पाहिजे ; मालक मजूर ; श्रीमंत गरीब ; सुशिक्षित अशिक्षित ; नागर आणि ग्रामीय हे सर्व भेद विसरून प्रत्येकानें आपलें काम व्यक्तीकरितां न करतां राष्ट्राकरितां करावें, अशा शिकवणुकीनें दोन्ही देशांत व्यक्तिनिष्ठेच्या ऐवजीं राष्ट्रनिष्ठा उत्पन्न करण्यांत आली आहे. बुद्धिवाद, जडवाद, वास्तववाद इत्यादि व्यक्तिस्वातंत्र्याच्या काळांत उत्पन्न झालेल्या तत्त्वांऐवजीं ध्येयवादाचा स्वीकार दोघांनींही केलेला आहे.

## राजकीय व शैक्षणिक क्रांति

प्राचीन काळीं रोमचें साम्राज्य यूरोपभर पसरलें होतें. आज जगावर ज्याचें साम्राज्य आहे असें इंग्लंड एक वेळीं रोमन साम्राज्यांतील गुलाम राष्ट्र होतें. यूरोपमधील संस्कृतीचा, विद्येचा, व कलेचा उगम ग्रीस आणि रोम यांपासून झालेला आहे. लिपी, भाषा वाङमय, कायदा, राजकारण, चित्रकला,

शिल्पकला, मूर्तिकला इत्यादि अनेक दृष्टींनीं यूरोपमधील अर्वाचीन संस्कृतीला प्रारंभ रोमपासून म्हणजे इटलीपासून होतो. एके काळीं असें साम्राज्य-वैभव आणि अशी संस्कृति असलेल्या इटलीला जगांत महत्त्वाचें स्थान नव्हतें. कनिष्ठ प्रतीचें राष्ट्र या नात्यानें त्याचेकडे जग पाहात होतें.

इटली पूर्वीं ऑस्ट्रियाचे अंमलाखालीं होता. एकोणिसाव्या शतकांत देशामध्यें स्वातंत्र्यभावना व राष्ट्रप्रेम निर्माण करून मॅझिनी–काव्हूर–गॅरी-बॉल्डी या वीरांनीं इटलीला स्वतंत्र केलें. इटली हें राष्ट्र म्हणून समजलें जाऊं लागलें. महायुद्धांत इटलीनें भाग घेतला. परंतु इतर राष्ट्रांना ज्या मानानें त्यांतून प्राप्ति झाली तशी इटलीला झाली नाहीं. ही गोष्ट त्या देशाच्या असंतोषाला कारणीभूत झाली. जग हें समर्थांचें आहे हें तत्त्व इटलीला पटलें.

स्वतंत्र झालेल्या इटलीनें इंग्लंड, व फरान्सप्रमाणें लोकशाही व प्रातिनिधिक राज्यपद्धतीचे अनेक प्रयोग करून पाहिले. अशिक्षित, अघसंटित, व राजकारणाशीं अपरिचित असा समाज असल्याकारणानें या लोकशाहींत सारी बजबजपुरी माजली. महायुद्धानंतर जर्मनींत जसे अनेक पक्षोपपक्ष झाले व बलिष्ट अशी मध्यवर्ति सत्ता राहिली नाहीं, तशीच इटलीची स्थिति झाली. रशियांत समाजवादी क्रांति झाली. इटलींतही समाजवादी पक्षानें क्रांति करण्याचा प्रयत्न केला. अशा वेळीं क्रांति होण्याचे ऐवजीं देश तिसऱ्याच राष्ट्राचे भक्ष्यस्थानीं पडेल कीं काय अशी परिस्थिति निर्माण झाली. या वेळीं मुसोलिनी पुढें आला. तो एका वेळीं समाजवादी होता, परंतु इटलीची एकंदर परिस्थिति पाहून देशाला या वेळीं राष्ट्रवादच पाहिजे असें त्यानें ठरविलें. सैनिक आणि मध्यमवर्ग हाताशीं घेऊन त्यानें फाशिस्ट क्रांति केली व सर्व सत्ता आपल्या हातांत घेतली. अशा प्रकारें १९२२ मध्यें मुसोलिनीच्या एकतंत्री अमलाखालीं फाशिस्ट राज्यपद्धति स्थापन झाली.

नवीन राज्यपद्धति आल्याबरोबर शिक्षणांतही क्रांति झाली. या शैक्षणिक क्रांतीचा प्रवर्तक गिओव्हानी जेंटिली हा होता. मुसोलिनीनें इटलीला फाशिझम्चें तत्त्वज्ञान दिलें. जेंटिलीनें त्यास शैक्षणिक तत्त्वज्ञानाची जोड दिली. 'दि रिफॉर्म ऑफ एज्युकेशन्' या जेंटिलीच्या ग्रंथांत आधुनिक इटालियन शिक्षणाचें तात्त्विक सार आहे.

## शिक्षणक्रांतीचा प्रवर्तक–जेंटिली

इटालियन शिक्षणपद्धतींत जेंटिलीच्या तत्त्वज्ञानाचें आणि फाशिझम्च्या तत्त्वांचें मिश्रण झालेलें आहे. अभ्यासक्रम व अध्यापनपद्धति यांवर जेंटिलीच्या शैक्षणिक तत्त्वांचें प्रतिबिंब पडलें आणि कारभारविषयक बाह्य शिक्षणभागावर फाशिझम्च्या तत्त्वांचा परिणाम झाला.

जेंटिलीचें आयुष्य शिक्षणकार्यांतच गेलें होतें. रोमच्या विद्यापीठांत तो तत्त्वज्ञानाचा अध्यापक होता. १९२२ मध्यें फाशिस्ट राज्यक्रांति झाल्यानंतर शिक्षणाच्या पुनर्घटनेचा प्रश्न पुढें आला, तेव्हां १९२३ मध्यें मुसोलिनीनें गिओव्हानी जेंटिलीस शिक्षणमंत्री करून शिक्षणाची आमूलाग्र पुनर्रचना करण्यास त्याला सांगितलें.

## शिक्षणाची तात्त्विक भूमिका

जेंटिलीचें तत्त्वज्ञान प्रचलित प्रवृत्तीला अगदी विरोधी असें होतें. हिंदू तत्त्वज्ञानाशीं त्याच्या विचारांचें फार साम्य आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. बुद्धिवाद, भौतिक शास्त्रांवर भर, जडवाद, आणि व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पना या उदारमतवादाचा यूरोपमध्यें एकदोन शतकें जोरानें प्रसार झाला होता. जेंटिलीनें या प्रवृत्तीला विरोध केला.

सामाजिक, नैतिक, व धार्मिक बंधनांपासून मुक्त झाल्यानें वैयक्तिक स्वातंत्र्य मिळत नाही. उच्च ध्येयांमध्यें ज्या वेळीं व्यक्ति विलीन होऊन जाते त्या वेळीं खरें स्वातंत्र्य मिळतें. म्हणून ध्येयाचे प्राप्तीकरितां जी शिस्त व बंधनें पाळावीं लागतात त्यामुळें व्यक्तीची कार्यशक्ति वाढते. आकुंचित व्यक्तित्वाच्या पलीकडे जाऊन वाटेल तो त्याग करावयास सिद्ध झालेल्या अशा व्यक्तीलाच खरें स्वातंत्र्य मिळतें. म्हणजे स्वातंत्र्य हें आध्यात्मिक स्वरूपाचें आहे, भौतिक किंवा सामाजिक स्वरूपाचें नाहीं. धर्म हा संस्कृतीचा आवश्यक भाग आहे. धर्माचें आकुंचित व विशिष्टपंथीय स्वरूप सोडून दिल्यास त्यांतील तत्त्वज्ञानात्मक जो उच्च भाग आहे त्याची व्यक्तीला व राष्ट्रीय संस्कृतीला आवश्यकता आहे. धर्म आणि नीति यांशिवाय शिक्षणपद्धति आंखणें हास्यास्पद आहे.

व्यक्ति आणि बाह्य जग यांत ऐक्य आहे. हें ऐक्य कला, धर्म, आणि

तत्त्वज्ञान या तीन मार्गांनीं व्यक्त होत असतें. म्हणून या तीन विषयांना शिक्षणांत महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे. कलेचें केवळ बाह्यस्वरूप न शिकवितां प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या स्फूर्तीनें कलानिर्मिति करण्यास प्रोत्साहन दिलें पाहिजे. धर्म आणि तत्त्वज्ञान यांचा अर्थ व्यापक दृष्टीनें केल्यास व्यक्तीच्या शिक्षणांत त्यांचें किती आवश्यक स्थान आहे तें लक्षांत येईल.

शिक्षण म्हणजे नुसती बौद्धिक वाढ नाहीं. ज्ञान आणि भाराभर माहिती दिल्यानें मुलांचें शिक्षण होतें असें नाहीं. व्यक्तीची आध्यात्मिक आणि मानसिक वाढ झाली पाहिजे. ज्ञान हें साधन आहे. ज्ञानाकरितां ज्ञान ही कल्पना वृथा आहे. ज्ञान आणि व्यक्ति या वस्तू निराळ्या नसून एकरूप आहेत. व्यक्तीच्या अनुभवांतून ज्ञान उत्पन्न होईल त्याच वेळी या एकरूपतेची जाणीव होईल, बाह्यतः दिलेल्या ज्ञानदानानें होणार नाहीं. बाहेरून पाजलेल्या ज्ञानापेक्षां अनुभवानें व आत्मस्फूर्तीनें मिळालेलें ज्ञान व्यक्तिविकासाला अधिक समर्थ होतें. शिक्षकाचें काम केवळ माहिती व बाह्य ज्ञान देणें हें नव्हे. मुलाच्या प्रसुप्त शक्ती जागृत करून, त्यांना चेतना देऊन, स्वतः अनुभव घेण्यास व अशा रीतीनें ज्ञान मिळविण्यास प्रवृत्त करणें हें शिक्षकाचें काम आहे.

व्यक्तिस्वातंत्र्य, ज्ञानाची उत्पत्ति, धर्म–तत्त्वज्ञान–कला यांचा व्यक्तीशी संबंध, आणि राष्ट्रीय संस्कृति, एतद्विषयक जेंटिलीचें शैक्षणिक तत्त्वज्ञान लक्षांत घेतलें म्हणजे इटालियन शिक्षणांतील अभ्यासक्रमाचा व अध्यापनपद्धतीचा लौकर बोध होतो. शिक्षणाचा तत्त्वज्ञानाशीं निगडित संबंध आहे. चार ठिकाणचे चार विचार व पद्धती घेऊन शिक्षणपद्धति तयार होत नाहीं. प्रत्येक राष्ट्रानें आपल्या सुसंगत तत्त्वज्ञानावर शिक्षणाची उभारणी केली पाहिजे, हें यावरून ध्यानांत येईल.

## शिक्षणाचा राजकीय दृष्टिकोण

जेंटिलीनें शिक्षणाच्या धार्मिक, आध्यात्मिक, व कलात्मक अंगांवर भर दिला तर मुसोलिनीनें राजकीय भागाकडे अधिक लक्ष दिलें.

शिक्षण हा व्यक्तीचा प्रश्न नसून राष्ट्राचा प्रश्न आहे. राष्ट्राला जरूर अशा प्रकारच्या व्यक्ती निर्माण करणें, व या धोरणानें वैयक्तिक वाढीला

वळण देणें, हें शिक्षणाचें काम आहे. अशा व्यक्ती निर्माण करण्याकरितां सर्व शिक्षणाचें नियंत्रण राष्ट्रानें केलें पाहिजे. खाजगी शिक्षणसंस्था असल्या तरी विशिष्ट राजकीय बंधनें पाळून नियोजित ध्येयांचा, तत्त्वांचा, व कार्यक्रमाचा प्रचार करण्याकरितांच या शाळांचा उपयोग होणें जरूर आहे.

राष्ट्राचें ध्येय साध्य करण्याकरितां शिक्षण हें साधन आहे. इटालियन शिक्षणाचा उपयोग इटलीचे ध्येयसिद्धीप्रीत्यर्थ झाला पाहिजे. उज्ज्वल भूतकालअसलेल्या इटलीला भविष्यकाळांतही उज्ज्वल कामगिरी करावयाची आहे. त्याकरितां राष्ट्राचें एकीकरण करून राष्ट्रीय संस्कृति वाढीस लाविली पाहिजे. इटलीचें हें भावी कार्य, ' इटालियानिटे ' (Italianita), साध्य करणें हें नवीन इटालियन शिक्षणाचें ध्येय आहे.

पहिलें काम सर्व शाळांचें व शिक्षणाचें ' फाशिस्टीकरण ' करणें हें होतें. इटलीचा इतिहास, संस्कृति, धर्म, तत्त्वज्ञान, यांना प्रमुख स्थान देऊन देशाविषयी तरुण पिढींत अभिमान उत्पन्न केला गेला. फाशिस्ट राजकारणाचें व तत्त्वज्ञानाचें सर्वांना शिक्षण देण्यांत आलें. भावी पिढीवर फाशिझम्‌ची परंपरा चालविण्याची जबाबदारी टाकली गेली.

फाशिस्ट शिक्षणाचा लोकशाहीवर विश्वास नाहीं. म्हणून सार्वत्रिक उच्च शिक्षण, शिक्षणांत समानसंधि, स्थानिक लोकमताप्रमाणें शिक्षणाचा कारभार इत्यादि तत्त्वांना इटलींत फारसें स्थान नाहीं. सर्व कारभार सरकारच्या हातांत आहे. शिक्षणमंत्र्याकडून जशा आज्ञा सुटतील त्याप्रमाणें खालपर्यंत अंमलबजावणी केली जाते. बहुजन समाजाला राजकारणांत महत्त्वाचें स्थान नसल्यानें त्याला फारशा शिक्षणाची जरूरी नाहीं. म्हणून त्यांच्याकरितां फक्त सामान्य प्राथमिक शिक्षणाची सोय आहे. उच्च शिक्षणाची सार्वत्रिक व व्यापक सोय नाहीं. फाशिझम्‌चे पुढारी निर्माण करण्याकरितां निवडक व लायक लोकांना दुय्यम व उच्च शिक्षणाची संधि ठेविलेली आहे. सामान्य वर्ग सुशिक्षित झाल्यास राजकीय असंतोष पसरतो म्हणून उच्च शिक्षण मर्यादित ठेविलें आहे. रशियाच्या आणि इटलीच्या धोरणांत या ठिकाणीं विरोध दिसून येतो. कारण फाशिझम् ही मध्यम वर्गाची चळवळ आहे आणि कम्यूनिझम् ही कामगार वर्गाची चळवळ आहे. अधिकारांत असलेला प्रत्येक वर्ग दुसऱ्या वर्गाला उच्च शिक्षणापासून अलिप्त ठेवूं पाहतो !

## शिक्षणाचा कारभार

फाशिस्ट राज्यक्रांतीनंतर १९२३ मध्यें जेंटिलीच्या देखरेखीखालीं "सार्वत्रिक शिक्षणाचें खातें" (मिनिस्ट्री ऑफ पब्लिक इंन्स्ट्रक्शन) स्थापन झालें, व जेंटिली शिक्षणमंत्री झाला. १९२९ मध्यें विद्याखात्याचें नांव बदलून "राष्ट्रीय शिक्षणाचें खातें" असें नवीन नांव देण्यांत आलें. त्यांतच शारीरिक शिक्षण आणि तरुणांची संघटना या खात्यांचा समावेश करून एक खास अधिकारी नेमण्याची व्यवस्था करण्यांत आली.

स्थानिक अधिकारी नेमून निरनिराळ्या एकोणीस जिल्ह्यांची किंवा विभागांची शिक्षणव्यवस्था पाहण्याचें काम शिक्षणमंत्रीच करतो. स्थानिक स्वराज्य किंवा शिक्षणसभा वगैरे प्रातिनिधिक कारभारपद्धति इटलींत नाहीं. शिक्षणमंत्र्याला सल्लामसलत देण्याकरितां एक सल्लागार मंडळ असतें. त्याला "सार्वजनिक शिक्षणाचें वरिष्ठ मंडळ" असें नांव आहे. यांतील शेहेचाळीस सभासद सरकारनें नेमलेले असतात. सल्लामसलत व माहिती देणें, चौकशी करून अहवाल देणें अशी सामान्य कामें या मंडळाकडे आहेत. त्याला सत्ता नाही.

देशांत सरकारी, सार्वजनिक, व खाजगी अशा सर्व प्रकारच्या संस्था आहेत. सरकारची आर्थिक स्थिति फारशी संपन्न नसल्यामुळें खाजगी व सार्वजनिक संस्थांना उत्तेजन देण्याचें धोरण विद्याखात्यानें ठेविलेलें आहे. मात्र फाशिस्ट पद्धतीच्या राजकीय चौकटींत या सर्व संस्था बसल्या पाहिजेत. शिक्षकांना राजनिष्ठेची व प्रोफेसरांना फाशिस्टनिष्ठेची शपथ घ्यावी लागते.

## शिक्षणक्रमाची रचना

सक्तीचे प्राथमिक शिक्षणास सहावे वर्षी प्रारंभ होतो. कायद्यानें हें शिक्षण सहा ते चौदा वयापर्यंत आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत तें बारापर्यंत किंवा त्याचे आधींच संपतें. सक्तीच्या कायद्याचा जारी अंमल करण्याइतकी आर्थिक परिस्थिति आलेली नाहीं. प्राथमिक शिक्षण सुरू होण्यापूर्वीं तीन ते सहा वयाच्या मुलांकरितां 'बालक मंदिरें' (स्कूला मॅटर्ना) आहेत. हें शिक्षण ऐच्छिक आहे. प्राथमिक शाळा धरून एकंदर शिक्षणाच्या चार अवस्था

अथवा पायऱ्या आहेत. यांतील प्रत्येक अवस्था पूर्ण झाल्याबरोबर, म्हणजे ११, १५, १६ किंवा १७–१८ वयाचे सुमारास मुलाला औद्योगिक शिक्षणाकडे किंवा खास अभ्यासक्रमाकडे जाण्याच्या सोयी आहेत. सर्वच विद्यार्थ्यांना प्राथमिक शिक्षणानंतर एकाच नळींतून जावें लागत नाहीं. त्या कारणानें दुय्यम शाळेकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांची गर्दी इतर निरनिराळ्या व्यावसायिक शिक्षणाच्या शाळांतून विभागली जाते. विद्यापीठाच्या शिक्षणाकडे जाणाऱ्यांची संख्या निवडक व मर्यादित होते.

चार किंवा पांच वर्षांचें प्राथमिक शिक्षण झाल्यानंतर अकरा वर्षाचे सुमारास पुढच्या शिक्षणाकरितां तीन प्रकारच्या संस्था आहेत. सामान्य बुद्धीच्या विद्यार्थ्यांकरितां औद्योगिक वळणाचें शिक्षण देण्याकरितां दोनतीन प्रकारच्या शाळा आहेत. या शाळांतून तीन वर्षाचें सर्वसामान्य औद्योगिक स्वरूपाचें शिक्षण घेऊन पुढें उद्योगधंद्यांत पडतां येतें किंवा माध्यमिक दर्जाच्या औद्योगिक शिक्षणाच्या संस्थांमध्यें प्रवेश करतां येतो. यापेक्षां वरच्या दर्जाचे, परंतु विद्यापीठ शिक्षणाकडे ज्यांना जावयाचें नाही असे विद्यार्थी नॉर्मल स्कूल किंवा टेकनिकल् स्कूलमध्यें जातात. निवडक विद्यार्थी हायस्कूलमध्यें (लीसीयो गिन्नाझिओ) जातात. नॉर्मल स्कूलचा चार वर्षांचा अभ्यासक्रम झाल्यावर पुढें तोच तीन वर्षे, आणि नंतर अधिक चार वर्षे चालू ठेवितां येतो. म्हणजे शिक्षकाचे व्यवसायांत जाण्याची तयारी होते. मुलींना मुलींच्या हायस्कूलमध्यें (लीसीयो फेमिनील) जाऊन सतरा वयापर्यंत चार वर्षांचा शिक्षणक्रम घेतां येतो. टेकनिकल् स्कूलमधील विद्यार्थ्यांना पहिलीं चार वर्षे पूर्ण झाल्यावर पंधरा वर्षाचे सुमारास दोन ऐच्छिक अभ्यासक्रम आहेत. औद्योगिक शाखेकडे जाणारांना टेक्निकल इन्स्टिटयूटमध्यें चार वर्षांचा अभ्यासक्रम अठराव्या वर्षी पूर्ण करतां येतो. यांत यांत्रिक शिक्षण, व्यापारी शिक्षण, सर्व्हेइंग इत्यादि उद्योग येतात. ज्यांना पुढें एंजिनियरिंग मेडिकल सायन्स् वगैरे विषयांचें उच्च शिक्षण घ्यावयाचें असेल त्यांना टेक-निकल्मधील पहिलीं चार वर्षे झाल्यावर पंधरावे वर्षी सायंटिफिक् लीसीयो (हायस्कूल) मध्यें जाऊन चार वर्षांचा अभ्यासक्रम अठराव्या वर्षी पुरा करतां येतो. नंतर विद्यापीठाचे शिक्षणाकडे जातां येतें. वाङ्मयात्मक हायस्कूलमध्यें गेलेल्या विद्यार्थ्यांना प्राथमिक पांच वर्षे झाल्यावर पुढें तीन

# इटालियन शिक्षणपद्धति

( संस्थांचे नांवापुढील आंकडे कालमर्यादिचे निदर्शक आहेत. )



वर्षांचा क्लासिको लीसीयोचा (प्राचीन भाषाप्रधान दुय्यम शिक्षण) अभ्यासक्रम असतो. नंतर सतरा अठरावे वर्षी विद्यापीठाकडे जातां येतें.

या शिक्षणसंस्थांच्या अभ्यासक्रमावरून असें लक्षांत येईल कीं दर तीन-चार वर्षांनीं शिक्षण सोडून देणारांकरितां आणि अभ्यासक्रम बदलणारांकरितां सोयी ठेविलेल्या आहेत. आपल्याला कोणतें शिक्षण घ्यावयाचें व तें कोणत्या उद्देशानें घ्यावयाचें तें पांच वर्षांचें प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यानंतर लगेच अकरावे वर्षी ठरवावें लागतें. टेकनिकल् शाखेकडे जाणारांची भूमिका आधीं तयार करून घेतली जाते. दुय्यम शिक्षणांत सर्वांनाच वाङमय शिक्षणाकडे न घालतां प्रथमपासूनच औद्योगिक आणि वाङमयात्मक (टेक्निकल व क्लासिकल) असा भेद केलेला आहे. सारांश, वैयक्तिक प्रवृत्ति व रुचि-वैचित्र्य यांच्या अनुरोधानें शिक्षण घेण्याकरितां शाळांची सोय इटलींत आहे.

## परीक्षा व प्रवेश

या पद्धतींत दुसरें वैशिष्टय असें आहे कीं एका अभ्यासक्रमांतून दुसऱ्या अभ्यासक्रमांत संक्रमण करतांना प्रत्येक ठिकाणीं दारावर परीक्षा ठेविलेल्या आहेत. हें परीक्षांचें बंड इटलीमध्यें इंग्लंडपेक्षांही अधिक दिसतें यांत शंका नाहीं. कारण पूर्व अभ्यासक्रम पूर्ण झाला असला तरी पुनः प्रवेशपरीक्षा झाल्याशिवाय वरच्या अभ्यासक्रमांत प्रवेश मिळूं शकत नाहीं. विद्यार्थी विद्यापीठाच्या परीक्षा पास झाला तरी वैद्यकी, वकिली इत्यादींच्या सरकारी परीक्षा पास झाल्याशिवाय धंदा करतां येत नाहीं. विद्यापीठाच्या परीक्षा व त्याशिवाय सरकारी परीक्षा अशी दुहेरी पद्धति आहे. त्यामुळें धंद्यांतील व्यक्तींची संख्या मर्यादित करतां येईल हा एक फायदा दिसतो. पण इतरांची वाट काय हा प्रश्न राहतोच. प्रवेशपरीक्षेमुळें या संख्येचें नियमन करतां येईल.

नवीन शिक्षणपद्धति सुरू होण्यापूर्वी दुय्यम शिक्षणांत व विद्यापीठ-संस्थांत पुष्कळ गर्दी झालेली होती. त्यामुळें सुशिक्षित बेकारांचीही संख्या अर्थात् वाढली होती. या परिस्थितीला आळा घालण्याकरितां दुय्यम व उच्च शिक्षणाकडे जाणाऱ्यांची संख्या प्रवेशपरीक्षेनें मर्यादित केली आहे.

वकिली, डॉक्टरी इत्यादि व्यवसायांना सरकारी परीक्षा ठेविल्या आहेत आणि औद्योगिक शिक्षणसंस्थांची अधिक सोय केलेली आहे.

## औद्योगिक शिक्षण व विद्यापीठें

महायुद्धापूर्वी आणि अद्यापही इटलीमध्यें विद्यापीठांची संख्या जरूरी-पेक्षां अधिक आहे. सरकारी दहा, सरकारी मदतीनें चाललेलीं सार्वजनिक दहा, आणि सरकारी मदतीशिवाय चाललेलीं सार्वजनिक किंवा खाजगी चार, अशीं चोवीस विद्यापीठें आहेत.

उच्च औद्योगिक शिक्षणाच्या सोयींची माहिती पूर्वी दिली आहेच. त्यापेक्षां खालच्या दर्जाच्या प्राथमिक धंदेशिक्षणाची सोय चौदापंधरा वयाच्या मुलांमुलींकरितां ट्रेड अँड लोअर टेकनिकल् स्कूल्स्मध्यें केलेली आहे. यांत यांत्रिक उद्योग, लहानसहान धंदे, व्यापारी, शेती, स्त्रियांचे धंदे, उद्योगशाळां-करितां स्त्री–शिक्षकांचा व्यवसाय इत्यादि शिक्षणाच्या तीन प्रकारच्या संस्था आहेत. याशिवाय 'पुरवणी शाळा'ही (कंटिन्यूएशन स्कूल्स्) निघाल्या असून अठरा वर्षापर्यंतच्या मुलांना आवश्यक व प्रौढ लोकांना ऐच्छिक आहेत. या सर्व प्रकारच्या शाळा १९३१ मध्यें निघाल्या असून त्यांच्या प्रवेश–परीक्षा व सर्टिफिकिटें इत्यादि व्यवस्था इतर शाळां-प्रमाणेंच आहेत.

प्रौढांच्या शिक्षणाकरितां "ऑपेरा नाझिओनाल डोपोलाव्होरो" नांवाची निमसरकारी संस्था आहे. तिच्या १२,००० शाखा व उपशाखा असून दीडदोन लाख सभासद आहेत. साक्षरताप्रसार, औद्योगिक शिक्षण, आरोग्य व व्यायाम शिक्षण, ग्रंथालयें, वाचनालयें, प्रदर्शनें इत्यादि अनेक मार्गांनीं या संस्थेचें काम चालू असतें. ज्या ठिकाणीं प्रथम शाखा स्थापन होते तेथें ती साक्षरताप्रसारापासून कार्यास प्रारंभ करून हळुहळू आपलें कार्यक्षेत्र अधिक व्यापक करिते.

## अभ्यासक्रमाचीं विशेष लक्षणें

प्राथमिक शिक्षणाचा पांच वर्षांचा अभ्यासक्रम आहे. जेंटिलीच्या तत्त्वाप्रमाणें या अभ्यासांत धार्मिक–नैतिक शिक्षण आणि ललितकला यांना प्रधान स्थान देण्यांत आलेलें आहे. धार्मिक शिक्षणांत कॅथॉलिक पंथीय

तत्त्वांचेंच शिक्षण दिलें जातें. जेंटिलीच्या योजनेंत यापेक्षां व्यापक स्वरूपाचें शिक्षण देण्याचा उद्देश होता, तो साध्य झाला नाहीं. कारण पोपचें वजन अधिक पडून धर्मपीठाला मान्य होतील अशाच शिक्षकांकडून धर्मशिक्षण देण्याचें मुसोलिनीनें १९२९ चे करारांत कबूल केलें आहे. वाङ्मय शिक्षणांत राष्ट्रीय काव्याला स्थान देण्यांत येतें. सामान्य ज्ञानांत शेतकी आणि उद्योगधंदे यांविषयीं माहिती दिली जाते. त्याचप्रमाणें इटलींत सर्वत्र पसरलेली शिल्पकला, मूर्तिकला, चित्रकला, ऐतिहासिक इमारती व इतर अवशेष यांविषयींच्या माहितीचा समावेश अभ्यासक्रमांत होतो. प्राथमिक शाळेच्या वरच्या वर्गांच्या अभ्यासक्रमांत राजकीय संस्था व कारभार, नागरिकांचीं कर्तव्यें व हक्क, अर्थशास्त्राचीं सोपीं मूलतत्त्वें इत्यादि राजकीय दृष्टचा उपयुक्त अशा माहितीचा समावेश केलेला आहे.

प्राथमिक शाळेंतील तिसरी व पांचवी या यत्तांना काय विषय आहेत, व त्यांना साप्ताहिक किती तास आहेत; याची कल्पना पुढील कोष्टका-वरून येईल.

### प्राथमिक तिसरी व पांचवी यत्तांचा अभ्यासक्रम व तास

| विषय | तिसरी | पांचवी |
|---|---|---|
| धर्म | २ | २ |
| गायन, चित्रकला, पाठांतर, इ. कलाशिक्षण | ४ | ५ |
| लेखन, वाचन, भाषा | ५ | ४ |
| शुद्धलेखन | २ | • |
| गणित, जमाखर्च, रेखाकला | ४ | ३ |
| सामान्य ज्ञान व करमणुकीचे व्यवसाय | ४ | १ |
| बागकाम, हस्तव्यवसाय, गृहकृत्य, व्यायाम इ. | ४ | ४ |
| भौतिकशास्त्रें, आरोग्यशास्त्र | २ | २ |
| इतिहास–भूगोल | ० | ३ |
| सोपें राजकारण व अर्थशास्त्र | ० | १ |
| एकूण | २७ | २५ |

अभ्यासक्रमाचीं पुस्तकें नवीन ध्येयाप्रमाणें तयार केलेलीं आहेत. त्यांत केवळ माहिती देण्यापेक्षां भावनांचें संगोपन करण्याचा उद्देश अधिक आहे. गृहजीवन, समाजजीवन, कला, इतिहास, वीरचरित्रें, राजकारण इत्यादि-विषयक माहिती या पुस्तकांत आलेली आहे.

अध्यापनपद्धतींत मुलांच्या स्वाध्यायाला, कलात्मक व्यवसायांना, आणि वैयक्तिक गुण दाखविण्याला अधिक वाव ठेविला आहे. मुलांनीं लेखनाच्या वह्यांमध्यें चित्रकला उपयोगांत आणावी अशी योजना आहे. प्रत्येक विद्यार्थ्याची एक सचित्र दैनंदिनी असते. तींत त्यानें आपले शैक्षणिक जीवनांतील अनुभव लिहून ठेवावयाचे असतात. अशा रीतीनें लेखन व चित्रकला या विषयांत वैयक्तिक विकासाला वाव ठेवलेला आहे.

## दुय्यम शिक्षणाचा अभ्यासक्रम

इटलीमध्यें दुय्यम शिक्षण अगदीं मर्यादित व निवडक विद्यार्थ्यांकरितां आहे. प्राथमिक शिक्षण मोफत असतें. पण दुय्यम शाळांत प्रवेशपरीक्षा, अखेरपरीक्षा व शिक्षण या सर्वांकरितां फी द्यावी लागते. अगदीं ऐंशी किंवा सत्तर टक्के गुण मिळविणारांना नादारी किंवा अर्धनादारी मिळू शकते.

दुय्यम शिक्षणांत वाङमयात्मक, शास्त्रीय, व औद्योगिक अशा शाखांची विविधता आहे. प्रत्येकाचा अभ्यासक्रम स्वयंपूर्ण असा आहे.

या शाळा सरकारी, सार्वजनिक व खाजगी अशा सर्व प्रकारच्या आहेत. सरकारव्यतिरिक्त इतर संस्थांचे व जनतेचे शिक्षणाकरितां जे प्रयत्न होतील त्यांना अधिकाधिक उत्तेजन द्यावयाचें, असें विद्याखात्याचें धोरण आहे. सर्व संस्थांना सरकारची मदत होते. प्रत्येक प्रकारच्या शाळेला किती व कशा प्रकारची मदत सरकारनें करावयाची त्याचें प्रमाण ठरलेलें आहे.

दुय्यम शिक्षणांतील प्रत्येक प्रकारच्या शाळेच्या अभ्यासक्रमाचें वैशिष्टय ठरलेलें आहे. इकडील शाळांशीं तुलना करून सांगावयाचें झाल्यास हायस्कूलें तीन प्रकारचीं आहेत. वाङमयात्मक, भौतिक शास्त्रात्मक, आणि कन्याशिक्षणात्मक. त्यांचे तीन प्रकारचे अभ्यासक्रम आहेत. वाङमयात्मक हायस्कूलच्या (लीसीओ गिन्नाझिओ) पांचव्या व आठव्या, म्हणजे अखेरच्या यत्तांचे विषय व साप्ताहिक तास पुढें दिले आहेत—

**दुय्यम शिक्षणाचा अभ्यासक्रम व तास**

| विषय | पांचवी | आठवी |
|---|---|---|
| इटालियन मातृभाषा | ५ | ३ |
| लॅटिन (प्राचीन भाषा) | ६ | ३ |
| ग्रीक | ४ | ३ |
| आधुनिक परदेशी भाषा | ४ | ० |
| इतिहास–भूगोल | ३ | ६ |
| तत्त्वज्ञान व राजकीय अर्थशास्त्र | ० | ३ |
| गणितशास्त्र | २ | २ |
| भौतिक शास्त्र | ० | ४ |
| कलेचा इतिहास | ० | १ |
| एकूण | २४ | २५ |

भौतिक शास्त्रात्मक हायस्कूलच्या (लीसीयो सायंटिफिको) अभ्यास-क्रमांतही विज्ञान, गणित इत्यादि विषयांखेरीज लॅटिन, तत्त्वज्ञान व राज-नीतिशास्त्र वगैरे विषय आहेत, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. दुय्यम शाळांत सर्वत्रच लॅटिन विषयाला प्राधान्य दिलेलें आहे. कारण इटलीची प्राचीन संस्कृति आणि लॅटिन भाषा या दोन गोष्टी अगदीं अविभाज्य अशा आहेत. कन्याशिक्षणाच्या शाळेंत मातृभाषा, लॅटिन, इतिहास भूगोल, तत्त्वज्ञान–कायदा–राजनीतिशास्त्र, कलेचा इतिहास, फरेंच–जर्मन किंवा इंग्लिश, चित्रकला, गायन-वादन–नर्तन, गृहजीवनशास्त्र इत्यादि विषय आहेत. वरील अभ्यासक्रमावरून हें लक्षांत येईल कीं शाळेचा उद्देश मुलींना आर्थिक जीवनाकरितां तयार करण्याचा नसून सुसंस्कृत ललितकलासंपन्न गृहिणी तयार करणें हा आहे. वैद्यकीय किंवा वाङ्मयात्मक अभ्यासक्रमाकडे जाणाऱ्या मुलींना इतर दुय्यम शाळांतून जातां येतें, बंदी नाहीं.

## शाळेचें वातावरण

शाळेंत प्रवेश केल्याबरोबर आपण एका विशिष्ट देशांतील शाळेंत आलों आहोंत असें चटकन् ओळखतां येतें. शाळेंतील प्रत्येक वर्गांत मुलांच्या समोर धर्म, राजसत्ता व फाशिझम् यांचीं तीन प्रतीकें ठेविलेलीं असतात.

मसोलिनी व इटलीचा राजा यांचीं चित्रें आणि पवित्र क्रॉस या वस्तू तेथें दिसून यतात. या तीन निष्ठांचें पालन प्रत्येक नागरिकानें केलें पाहिजे. शिक्षकांचे अंगांत फाशिस्टांचा काळा डगला असतो. मुलांना एकजात पोषाख असतो. बालिल्ला संघांत सर्व विद्यार्थी असल्यानें त्या संघाचा पोषाख—काळा सदरा, निळा गळेरुमाल व लष्करी टोपी—सर्व मुलांचे अंगावर असतो. वर्गांत शिक्षक किवा प्रेक्षक गेल्याबरोबर फाशिस्ट पद्धतीनें हात वर करून सर्वजण एकदम सलामी देतात. या सर्व वातावरणाचा व बाह्य चिन्हांचा परिणाम लहानपणापासून मुलांचे मनावर होत असतो. नवीन पिढींतून फाशिस्ट पुढारी तयार करण्याचें हें एक तंत्र आहे.

## गुणदोषपरीक्षण

इटालियन शिक्षणाचे गुणदोष पाहण्यापूर्वी इटलीच्या पूर्वीच्या व आजच्या स्थितीची तुलना करणें जरूर आहे. कारण या नवीन शिक्षणपद्धतीला अस्तित्वांत येऊन पुरी एक पिढीही गेलेली नाहीं. १९२३ पूर्वींच्या इटलीमध्यें साक्षरतेचें प्रमाण कमी होतें. सक्तीच्या शिक्षणाचे कायदे पास झालेले असले तरी ते पुष्कळ अंशीं कागदावरच होते. कांहीं प्रांतांतील लोक तर शिक्षणाला विरोधीच होते. दुय्यम शिक्षणामध्यें अभ्यासक्रमांत अनेक विषयांची व ज्ञानाची भरती झालेली होती. विद्यार्थी म्हणजे केवळ ज्ञानाचे भारवाहक अशी जुनी समजूत होती. शारीरिक शिक्षण किंवा खेळ यांकडे कोणाचें लक्षच नव्हतें. परीक्षांचा सुकाळ होता. ज्या देशांत ठायीं ठायीं उत्कृष्ट मूर्तिकला, चित्रकला, शिल्पकला आणि संगीत अशी सांस्कृतिक संपत्ति पसरून राहिलेली होती त्या देशांतील शिक्षणांत ललितकलेला मुळीं स्थानच नव्हतें; सर्व विद्यार्थी एकाच प्रकारच्या बौद्धिक अभ्यासक्रमाकडे व नंतर विद्यापीठ शिक्षणाकडे ओढले जात होते. त्या कारणानें डॉक्टर, वकील व पदवीधर यांचे निरुपयोगी तांडे देशांत फिरूं लागले. उत्पादक श्रम करण्याचें काम कमी समजण्यांत येऊं लागलें. विद्यापीठ शिक्षणांतही खूप गर्दी झाली होती. प्रौढ शिक्षणाची व औद्योगिक शिक्षणाची योग्य सोय नव्हती.

अशा या परिस्थितीमध्यें जेंटिलीसारखा अध्यापक व तत्त्ववेत्ता पुढें आला. आपल्या दोन तपांच्या शैक्षणिक अनुभवाचा उपयोग करून त्यानें इटालियन

शिक्षणाची १९२३ मध्यें पुनर्घटना केली. प्राथमिक शिक्षणाची सक्ति अंमलांत आणून शाळा वाढविल्या. दुय्यम शिक्षणांतील एकतानता काढून त्यांत विविधता आणली. विद्यापीठाकडे जाणाऱ्या तरुणांना इतर मार्ग खुले करून दिले. धर्म, तत्त्वज्ञान, ललितकला, राजकारण इत्यादि महत्त्वाच्या विषयांना अभ्यासक्रमांत प्रमुख स्थान दिलें. शारीरिक शिक्षणाला प्राधान्य दिलें. विशेष म्हणजे शिक्षणाला आणि शिक्षकाला एक विशिष्ट तत्त्वज्ञान, ध्येय व सुसंगत विचारसरणी दिली. एका तपांत आणखी काय करणें शक्य आहे? ही प्रगति लक्षांत घेऊन गुणदोष परीक्षण करणें आवश्यक आहे.

## दोषदर्शन

धर्म आणि तत्त्वज्ञान यांना वैयक्तिक व राष्ट्रीय जीवनांत आवश्यक स्थान आहे, म्हणून व्यापक दृष्टीनें त्यांचें शिक्षण दिलें पाहिजे, हें जेंटिलीचें तत्त्व व्यवहारांत उतरतांना तितकेंसें उदार राहिलें नाहीं. शेवटीं एका विशिष्ट धर्मपंथाचा अभ्यास एवढेंच त्याचें व्यावहारिक स्वरूप प्राथमिक शिक्षणांत तरी राहिलें.

दुय्यम शिक्षणांतील बुद्धिनिष्ठता काढण्याचा प्रयत्न झालेला असला तरी अद्याप ग्रीक लॅटिनवरील जोर कमी झालेला नाहीं. भौतिक शास्त्रांना जें महत्त्व द्यावयास पाहिजे तें दिलें गेलेलें नाहीं. पूर्वपरंपरेचा परिणाम अद्याप राहिलेला आहे. कलाविषयक नवीन विषयांचा समावेश झालेला असला तरी वेळेचें प्रमाण पाहिल्यास हे विषय नांवापुरतेच आहेत, असें वाटतें. त्यांचा समावेश झाल्यामुळें नवीन प्रवृत्ति व दिशा दिसते, एवढेंच.

जुन्या पद्धतीच्या परीक्षांचें स्तोम अथपासून इतिपर्यंत कायम ठेविलेलें आहे. प्रवेशपरीक्षा आणि अखेरपरीक्षा या कातरींत बिचाऱ्या विद्यार्थ्यांची दामटी वळत असावी!

प्राथमिक शिक्षणानंतरच्या शाळापद्धतींत विविधता साधली आहे. परंतु एका मार्गाला गेल्यानंतर पुढें तो बदलून दुसऱ्या मार्गांत जाण्याची सोय ठेविलेली नाहीं, हा मोठा दोष आहे. संक्रमणसुलभता हें आदर्श शिक्षणपद्धतीचें एक लक्षण आहे, तें या पद्धतींत दिसत नाहीं.

विद्यापीठाच्या शिक्षणाकडे जाण्याला फक्त एकच मार्ग ठेविला आहे. वयाच्या अकराव्या वर्षी मुलगा त्या मार्गांत गेला नाहीं, तर पुढें जन्मभर त्याला उच्च शिक्षण मिळण्याची कांहीं शक्यता नाहीं. वैयक्तिक विकासाच्या दृष्टीनें हा मोठा दोष आहे.

दुय्यम व उच्च शिक्षणाची संधि ही फक्त संपत्तिमान् वर्गाकरितांच राखून ठेविलेली आहे. अमेरिकेप्रमाणें शिक्षणाचें मुक्तद्वार नाहीं, इंग्लंड-प्रमाणें भरपूर नादारी ठेविलेल्या नाहींत, किंवा जर्मनीप्रमाणें खालच्या वर्गांतील निवडक विद्यार्थ्यांना वर जाण्याच्या खास सवलती ठेविलेल्या नाहींत. त्यामुळें ही शिक्षणपद्धति एका विशिष्ट वर्गाकरितां आहे अशी टीका होणें अगदीं रास्त आहे. समाजामध्यें जो जातिभेद किंवा वर्गभेद आहे तो सौम्य करण्याचा प्रयत्न शिक्षणाकडून न होतां, आहे तसाच टिक-विण्याचें कार्य मात्र होत आहे. या दृष्टीनें तो एक सामाजिक अन्याय आहे. बहुजन समाजास बेतानें शिक्षण देऊन वरच्या समाजवर्गांतील निवडक व्यक्तींना उच्च शिक्षण देण्याचें इंग्लंडचें धोरण होतें व तेंच येथेंही दिसतें. इंग्लंडमध्यें लोकशाहीचें स्वातंत्र्य असल्यामुळें सामान्य जनांनीं चळवळ करून दुय्यम व उच्च शिक्षणाचीं दारें खिळखिळीं करून जवळजवळ पाडलीं आहेत. परंतु अशी चळवळ करण्याचें स्वातंत्र्यही इटलींत नाहीं, ही सामान्य वर्गाची मोठी गैरसोय आहे.

सुटसुटीतपणा, विविधता, व पद्धतशीर निवड इत्यादि दृष्टींनीं ही पद्धति डौलदार दिसली तरी सामाजिक कसोटीच्या दृष्टीनें आक्षेपार्ह ठरते. राष्ट्रीय वृत्ति, संस्कृतिसंरक्षण, कलावृद्धि, व क्षात्रवृत्तिसंगोपन या सर्व गोष्टी टीक आहेत. परंतु सामान्य जनांची शैक्षणिक व सांस्कृतिक उन्नति करण्याचें जोरकस ध्येय पाठीशीं नसल्यामुळें इटालियन शिक्षणपद्धति सर्वस्वीं अनुकरणीय आहे, असें म्हणतां येत नाहीं.

---

## प्रकरण बाविसावें

# फरान्सचें संस्कृतिप्रधान शिक्षण

### पुराणमताभिमानी राष्ट्र

राजकीय आणि शैक्षणिक क्रांतीच्या मध्यभागीं राहूनही ज्या देशाच्या शिक्षणपद्धतीवर फारसा परिणाम झाला नाहीं असा फरान्स हा एक देश आहे. यूरोपमध्यें फरान्सच्या भोंवतालीं अनेक देशांत राज्यपरिवर्तनें झालीं आणि त्यामुळें तेथील शिक्षणपद्धतींमध्येंही आमूलाग्र पुनर्घटना झाल्या. इटली, जर्मनी, रशिया, ऑस्ट्रिया इत्यादि अनेक देशांत शैक्षणिक स्थित्यंतरें झालीं. पुराणमतवादी अशा इंग्लंडमध्यें देखील फिशर ॲक्टसारखे आत्यंतिक महत्त्वाचे कायदे पास झाले. परंतु फरान्समध्यें थोडाचाशा वादविवादाव्यतिरिक्त आमूलाग्र पुनर्घटनेचें असे कांहीं यशस्वी प्रयत्न झाले नाहींत. थोडचा किरकोळ सुधारणा मात्र झाल्या.

भोंवतालीं असें क्रांतीचें आणि सुधारणेचें वातावरण असतांना देखील फरान्सच्या शिक्षणांत कांहीं बदल झाला नाहीं याचें कारण त्या देशाची आपल्या जुन्या मार्गावरील श्रद्धा आणि आत्मसंतुष्ट वृत्ति हें आहे. आपली शिक्षणपद्धति अगदीं उत्कृष्ट आहे आणि तिच्यांतून योग्य असे नागरिक बाहेर पडत आहेत. या शिक्षणामुळेंच फरान्सला सांस्कृतिक जगांत उच्च स्थान मिळालेलें आहे, या शिक्षणपद्धतींतून बाहेर पडलेल्या फरेंच राष्ट्रानें महायुद्ध जिंकलें, मग तिच्यांत दोष असणें कसें शक्य आहे, अशा स्वरूपाच्या विचारसरणीचा प्रभाव फरान्समध्यें विशेष होता. त्या कारणानें शिक्षणसुधारणेचा प्रयत्न कांहीं पुरोगामी व्यक्ती आणि संस्था यांचेकडून झाला तरी त्याला एकंदर राष्ट्राचा फारसा पाठिंबा मिळालेला नाहीं.

### शिक्षणांतील दोन तट

फरान्समध्यें शिक्षणसुधारणेचे प्रयत्न अनेक वर्षांपासून चाललेले आहेत. शिक्षणाच्या प्रश्नाला राष्ट्रीय महत्त्व देऊन त्याची चर्चा कायदेमंडळांत करणारा हाच एक देश आहे. शिक्षणाचे दृष्टीनें या देशांत दोन पक्ष आहेत.

एक पुराणमताभिमानी व दुसरा अर्वाचीन ज्ञानाचा अभिमानी. जुन्या पक्षाला असें वाटतें कीं प्राचीन भाषा आणि संस्कृति यांचे अध्ययनालाच प्राधान्य द्यावें. अलीकडे वाढलेलीं शास्त्रें शिक्षणाच्या व संस्कारांच्या दृष्टीनें योग्य नाहींत. उलट अर्वाचीन मताच्या लोकांचें असें म्हणणें आहे कीं आतां ग्रीक आणि लॅटिन शिकविण्याचे दिवस गेले. अर्वाचीन भाषा आणि संस्कृति वाढलेल्या आहेत, त्याही शिक्षणाचे दृष्टीनें कांहीं कमी महत्त्वाच्या नाहींत. भौतिक शास्त्रांची वाढ झालेली आहे, त्यांचाही शिक्षणांत प्रवेश झाला पाहिजे. औद्योगिक जीवन महत्त्वाचें असून त्याला शिक्षणांत स्थान मिळणें जरूर आहे. या जुन्या नव्यांचा झगडा अनेक पिढ्या चालून अखेरीस अर्वाचीन भाषा आणि भौतिक शास्त्रें यांना हळुहळू प्राचीन भाषांच्या बरोबरीचें स्थान देण्यांत आलें. अर्वाचीन मताभिमान्यांचा हा झगडा पुढें चालू असून नवीन नवीन वाढणारें ज्ञान व शास्त्रें यांचा शिक्षणांत समावेश करावा, असा त्यांचा आग्रह चालू असतो.

शैक्षणिक झगडयाचें दुसरें स्वरूप सामाजिक आहे. यांतही जुना नवा असे दोन पक्ष आहेत. जुन्या पक्षाचें म्हणणें कीं दुय्यम आणि उच्च शिक्षण हें सरसकट सर्वत्रांच्या आटोक्यांत आणूं नये. विशेष ऐपतदार किंवा बुद्धिमान् अशा विद्यार्थ्यांपुरतेंच तें मर्यादित ठेवावें. यापेक्षां खालच्या दर्जाच्या सामान्य विद्यार्थ्यांच्या हातांत तें गेलें तर शिक्षणाचा दर्जा कमी होईल. उलट नवीन मतांच्या लोकांचें म्हणणें असें कीं शिक्षणाला अशी तटबंदी घालूं नका. त्याचे प्रवाह समाजांत मोकळे सोडा आणि सर्वसामान्य जनांच्या दाराशीं शिक्षणाची गंगा वाहूं द्या. ज्याच्या त्याच्या ऐपतीप्रमाणें आणि कुवतीप्रमाणें प्रत्येक जण विद्यार्जन करील. त्याला कृत्रिम बंधारे घालण्याची जरूरी नाहीं.

अशा रीतीनें फरेंच शिक्षणांत 'काय शिकावें' आणि 'कोणीं शिकावें' याविषयीं अनेक वर्षें झगडा चालू आहे. शिक्षणाच्या आजच्या स्वरूपावरून तरी असें दिसतें कीं नवीन मताचा फारसा परिणाम झालेला नाहीं.

## फरेंच शिक्षणाचें विशेष स्वरूप

थोडासा फरक सोडून दिल्यास इंग्लंड, जर्मनी, इटली व फरान्स यांच्या शिक्षणपद्धती सामाजिक दृष्टया एकाच वर्गांत पडतात. समाजांतील वर्ग-

भेदाची छाया त्यांच्या शिक्षणावर पडलेली आहे. लोकशाही, राष्ट्रवाद, किंवा समाजवाद यांमुळें इंग्लंड, इटली व जर्मनी यांच्या शिक्षणामध्यें थोडीशी सुधारणा झालेली आहे. परंतु अशा तऱ्हेचा कांहींच परिणाम फरेंच शिक्षणावर झालेला नाहीं. त्यामुळें जे दोष इतर शिक्षणांतून नाहीसे होत आहेत ते फरान्समध्यें दृढमूल होऊन बसल्यासारखे दिसतात.

फरान्सच्या शिक्षणांत द्विवर्गपद्धति आहे. बहुजनसमाजाकरितां निराळें शिक्षण आणि निवडक समाजवर्गाकरितां निराळें शिक्षण अशी पूर्वीपासून चालत आलेली शिक्षणपरंपरा थोड्या फार फरकानें कायम राहिलेली आहे. सामान्य जनांचीं मुलें निराळ्या शाळांत जातात आणि श्रीमंतांचीं मुलें निराळ्या शाळांत जातात. श्रीमंतांच्या मुलांना उच्च शिक्षणाची जी संधि आहे ती सामान्य लोकांतील फक्त थोड्या हुषार मुलांना आहे, बहुसंख्यांकांना नाहीं. अमेरिकेंत किंवा रशियांत शिक्षणाची सर्वत्रांना जी समान संधि आहे, ती फरान्समध्यें नाहीं.

सामान्य गरीब लोकांच्या शिक्षणाच्या सोयी फरान्समध्यें फारच कमी आहेत. इंग्लंडनें प्रौढ शिक्षणाचा प्रसार करून आणि जर्मनीनें पुरवणी शिक्षणाच्या सोयी करून आपापल्या शिक्षणांतील जातिभेदाच्या दोषाचें थोडेसें तरी परिमार्जन केलेलें आहे. परंतु इतकाही गुण फरान्सच्या शिक्षणांत नाही. तेथें पुरवणी शिक्षणाच्या शाळा (कंटिन्युएशन स्कूल्स्) सक्तीच्या नाहींत. प्रौढ शिक्षणाची वाढ झालेली नाहीं, किंवा सामान्य लोकांना उच्च शिक्षण घेण्याचें अन्य साधन नाहीं. सक्तीच्या शिक्षणाची मर्यादाही तेरापर्यंतच आहे. 'स्वातंत्र्य–समता–बंधुता' (लिबर्टी, ईक्वॉलिटी, फर्टॅर्निटी) हीं ध्येयें ज्या देशांत एके काळीं गाजलीं त्याच देशांत सामान्य जनांच्या शिक्षणाची अशी अनास्था होत असलेली पाहून तत्त्व आणि व्यवहार यांत किती अंतर आहे, तें दिसून येतें.

फरान्सच्या शिक्षणपद्धतीचें अंतरंग पाहिलें तर असें दिसतें कीं तिचा भर बौद्धिक, वाङ्मयात्मक, आणि तात्त्विक शिक्षणावर विशेष आहे. अमेरिकेचा भर व्यावहारिक शिक्षणावर, रशियाचा औद्योगिक–वैज्ञानिक शिक्षणावर, आणि इंग्लंडचा सर्वसामान्य शिक्षणावर आहे. फरेंच लोकांना प्राचीन भाषा, वाङ्मय आणि तत्त्वज्ञान या विषयांची आवड विशेष दिसते. लॅटिन आणि

ग्रीक या भाषा अभ्यासक्रमांतून कमी कराव्यात कीं ठेवाव्यात याविषयीं मधून मधून फरान्सच्या कायदेमंडळांत जोराची चर्चा चालते.

फरेंच संस्कृतीचें संरक्षण आणि संवर्धन करून देशांतील प्रत्येक नागरिकावर या संस्कृतीचे संस्कार करणें हें फरान्सच्या शिक्षणाचें ध्येय आहे. ही संस्कृति आपली मातृभाषा, वाङ्मय, तत्त्वज्ञान, कला आणि प्राचीन भाषा यांच्या साधनानें तरुण पिढीला देतां येते. म्हणून संस्कृतिसंरक्षणाच्या दृष्टीनें तात्त्विक आणि वाङ्मयात्मक विषयांना अधिक महत्त्वाचें स्थान देण्यांत आलें आहे.

कारभाराच्या दृष्टीनें विचार केला तर फरेंच शिक्षणावर सर्व नियंत्रण सरकारचें आहे. शैक्षणिक सत्ता केंद्रनिष्ठ (सेंट्रलाईझ्ड्) आहे, लोकनिष्ठ नाही. या बाबतींत इटली आणि फरान्स या दोन देशांत बरेंच साम्य आहे.

गेल्या अर्धशतकामध्यें शिक्षणशास्त्रांत अनेक प्रयोग झाले व अनेक नवीन विचार निर्माण झाले. या सर्व प्रयोगांचा व विचारांचा परिणाम प्रत्येक देशाचे शिक्षणांत थोड्या फार स्वरूपांत दिसून येतो. परंतु फरान्स मात्र या बाबतींत अपवाद आहे. नवीन शैक्षणिक मानसशास्त्र, व्यक्तिविकासाच्या कल्पना, अध्यापनपद्धति इत्यादींचा स्वीकार त्यानें केलेला नाहीं. शिक्षणविषयक जुन्या कल्पना त्यानें सोडलेल्या नाहींत आणि नव्या घेतल्या नाहींत. याला कांहीं थोडे अपवाद सोडून दिले पाहिजेत.

अशा रीतीनें शैक्षणिक कारभार, अभ्यासक्रम, सामाजिक धोरण, मानसशास्त्र, इत्यादि सर्व दृष्टींनीं विचार करतां फरान्सचें शिक्षण हें पुराणमताभिमानी आहे असें दिसतें. फरेंच संस्कृतीचें रक्षण व संवर्धन करण्याकरितां विशिष्ट विषयांचा अभ्यास आवश्यक आहे या तत्त्वावर मात्र फरेंच लोकांची अंधश्रद्धा आहे. जगाच्या दृष्टीनें कितीही सदोष असली तरी आपली शिक्षणपद्धति फार चांगली आहे, अशी आत्मसंतोषी वृत्ति फरेंच लोकांत दृढमूल झालेली आहे.

## शैक्षणिक कारभार

फरान्समध्यें शिक्षणाचा कारभार केंद्रनिष्ठ आहे. शिक्षणमंत्र्याच्या हातांत सर्व सत्ता आहे. त्याच्या हाताखालीं अनेक अधिकारी असतात, त्यांच्या-

मार्फत शिक्षणखात्याचा सर्व कारभार तो पाहूं शकतो. राष्ट्राचा मुख्य प्रधान अध्यक्षाचे संमतीनें शिक्षणमंत्र्याची नेमणूक करतो. राजकारणांत बदल होतो, त्याप्रमाणें प्रधानमंडळ बदलतें. त्याबरोबर शिक्षणमंत्र्यांतही बदल होत असतो. फरान्समध्यें शिक्षणाचा आणि राजकारणाचा फार निकट संबंध आहे. नवीन राजकीय धोरणाचा शिक्षणमंत्री आल्यास त्याच्या मनांत आलें तर तो शैक्षणिक क्रांति करूं शकतो. उलट स्वरूपाची क्रांतीही तितकीच लौकर होण्याची शक्यता असते. १९२३ सालीं बेरार्द नांवाच्या शिक्षणमंत्र्यानें अंमलांत आणलेली शिक्षणयोजना अवघ्या एकाच वर्षांत १९२४ सालीं त्याच्या नंतर आलेल्या फरांकोआ आल्बर्त या मंत्र्यानें पार बदलून टाकली !

मुख्य शिक्षणमंत्र्याच्या मदतीला एक वरिष्ठ सल्लागार मंडळ (हायर कौन्सिल) आहे. त्यांतील बावन्न सभासद हे शिक्षणक्षेत्रांतील कार्यकर्त्यांपैकींच नेमलेले किंवा निवडलेले असतात.

शिक्षणमंत्र्याच्या खात्याचे सहा विभाग केले असून त्या प्रत्येकावर एकेक प्रमुख अधिकारी आहे. उच्च, दुय्यम, प्राथमिक, औद्योगिक, कला–विषयक, शारीरिक इत्यादि शिक्षणाचीं सहा खातीं आहेत. शिक्षणमंत्र्याच्या हातांत पुष्कळ सत्ता असते. तो आपलीं फर्मानें (डिक्री) काढून शिक्षणांत वाटेल ते बदल करूं शकतो. फक्त कायदेमंडळाला व मुख्य प्रधानाला तो जबाबदार आहे. परंतु या शिक्षणमंत्र्याला शाश्वतीही तितकीच असते• प्रधानमंडळ बदलल्याबरोबर हे मंत्री अधिकारच्युत होतात. असे अनेक शिक्षणमंत्री सहा महिन्यांचे आंत आपली जागा सोडून गेले आहेत.

शिक्षणकारभाराचे सोयीकरितां फरान्स देशाचे सोळा प्रांत (ॲकॅडेमीज्) केलेले आहेत. या प्रत्येक प्रांतांत एकेक विद्यापीठ असतें. त्याच्या कुलगुरू-कडे (रेक्टर) त्या प्रांतांतील विद्यापीठाचा आणि इतरही दुय्यम व प्राथमिक शिक्षणाचा कारभार पाहण्याचें काम असतें. त्याकरितां त्याचे हाताखालीं सरतपासनीस (इन्स्पेक्टर्स् जनरल्) व तपासनीस (इन्स्पेक्टर्स्) असे अधि-कारी असतात. प्राथमिक शिक्षणाचा बहुतेक कारभार या तपासनिसांकडून पाहिला जातो.

शिक्षणमंत्री आणि प्रांतिक कुलगुरु यांनीं करून राहिलेलीं इतर बारीक

कामें करण्याकरितां विद्याधिकारी (प्रिफेक्ट) नेमले जातात. फरान्सचे एकूण नव्वद तालुके केले असून प्रत्येक तालुक्यावर एकेक विद्याधिकारी असतो. याच्या देखरेखीखालीं प्राथमिक शिक्षणाचा कारभार चालतो.

या सर्व शिक्षणकारभाराला मदत करण्याकरितां स्थानिक गांवसभा (कम्यून्स्) असतात. नगराध्यक्षाचे (मेयर) मदतीला एक शिक्षणमंडळ असतें. परंतु वरिष्ठ खात्यांमध्येंच शिक्षणाचे अधिकार इतके वांटले गेले आहेत कीं स्थानिक शिक्षणमंडळाला कांहींच काम उरत नाहीं. त्यामुळें तीं असून नसून सारखींच आहेत.

शिक्षणाचा खर्च मध्यवर्ति सरकार, प्रांतिक सरकार आणि स्थानिक स्वराज्य किंवा गांवसभा या तिघांचेकडून भागविला जातो. त्यांत कोणीं किती हिस्सा द्यावा व कोणत्या बाबींवर खर्च करावा याचीं प्रमाणें ठरलेलीं आहेत.

## सरकारी नियंत्रणें

विद्याखात्यांतील बहुतेक सर्व अधिकारी शिक्षणमंत्र्याकडून नेमले जातात. त्या बाबतींत स्थानिक अधिकाऱ्यांना अगदीं थोडी सत्ता आहे. त्याचप्रमाणें शिक्षणाच्या बाह्य आणि अंतर्गत कारभारासंबंधीं सर्व फर्मानें (डिक्रीज्) शिक्षणखात्याकडून सुटतात. वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून शाळा-चालकांना इतके तपशीलवार हुकूम येतात कीं त्यांना स्वतःला स्वतंत्र विचार किंवा योजना करण्यास वावच नसतो. क्रमिक पुस्तकें, अभ्यासक्रम, वेळापत्रक, शाळेच्या वेळा, परीक्षा इत्यादि लहान सहान गोष्टींच्या सूचनाही वरिष्ठ कचेरींतून येतात. या कारभारपद्धतीमुळें फरान्सच्या शिक्षणांत एक-तानता फार आली आहे. विविधतेला व प्रयोगाला वाव नाहीं. या बाबतींत इंग्लंड आणि फरान्स यांच्या पद्धतींतील विरोध एकदम लक्षांत येतो. इंग्लंड-मध्यें स्थानिक विद्याखात्याला आणि मुख्य अध्यापकाला जेवढें स्वातंत्र्य आहे तितकेंच फरान्समध्यें बंधन आहे. मध्यवर्ति विद्याखात्यानें आपल्या हातांत सर्व कारभार ठेवला म्हणजे शिक्षणांतील प्रयोगप्रवृत्ति आणि नवीन विचार करण्याची बुद्धि कशी मारली जाते याचें फरान्स हें एक उदाहरण आहे.

## शाळांची पद्धति

फरान्समध्यें शाळांची द्विवर्ग शिक्षणपद्धति आहे. प्राथमिक आणि औद्योगिक शिक्षण घेऊन उद्योगधंद्यांत पडणाऱ्या सामान्य जनांकरितां असलेल्या शाळांचा एक प्रकार आहे; दुय्यम आणि उच्च शिक्षण घेऊन सरकारी नोकऱ्या किंवा भद्रलोकांचे पांढरपेशे व्यवसाय करणाऱ्या समाजाकरितां शाळांचा दुसरा प्रकार आहे. पहिल्या वर्गांत गरीब लोक आणि कामगार–शेतकरीवर्ग हे येतात. दुसऱ्या वर्गात श्रीमंत लोक, पिढीजाद बुद्धिजीवी व्यवसाय करणारे, आणि गरीब लोकांपैकी विशेष बुद्धिमान् असलेले विद्यार्थी हे येतात. पहिल्या प्रकारच्या शाळांतून सामान्य रयत निर्माण होते. दुसऱ्या प्रकारच्या शाळांतून अधिकारी वर्ग आणि समाजाचे पुढारी निर्माण होतात. या दोन प्रकारच्या शिक्षणाची पूर्वतयारी म्हणून पूर्वी प्राथमिक शिक्षणाचे अभ्यासक्रमांतही दोन प्रकार असत. परंतु लोकांच्या चळवळीमुळें आतां पहिल्या पांच वर्षांचा अभ्यासक्रम सर्व देशांतील शाळांमध्यें एकसारखाच ठेविला पाहिजे असा कायदा झालेला आहे.

दोन ते सहा वर्षांपर्यंतचे बालकांकरितां मातृशाला (मदर्स स्कूल) किंवा बालोद्यान शाळा ऐच्छिक आहेत. यूरोपमधील कोणत्याच देशांत अद्याप पांचसहा वर्षाखालचें बालोद्यान–शिक्षण सक्तीनें करण्याइतकी प्रगति झालेली नाहीं. यावरून हिंदुस्थानांत या बाबतीत आपण किती पैसा व श्रम खर्च करावेत हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

सक्तीचें प्राथमिक शिक्षण सहापासून तेरा वर्षापर्यंत दिलें जातें. त्यानंतर पुरवणी शिक्षणाची (कंटिन्युएशन) सार्वत्रिक सोय किंवा सक्ति झालेली नाहीं. सहाव्या वर्षी मुलाला प्राथमिक शाळेंत घालतांना पालकांपुढें दोन शाळा असतात. दुय्यम शाळांना खालीं जोडलेली प्राथमिक शाळा (प्रेपरेटरी स्कूल) किंवा सार्वजनिक प्राथमिक शाळा. पहिल्या प्रकारच्या शाळांना फी असते म्हणून त्यांत ऐपतदार वर्ग जातो, दुसऱ्या प्रकारच्या शाळा मोफत आहेत त्यांत सामान्य लोक जातात. यांखेरीज विशिष्ट धर्मपंथीयांच्या खाजगी शाळाही आहेत. पालकाची इच्छा असल्यास त्यानें घरीं शिक्षक ठेवून मुलाला शिकवावें. मात्र सालोसाल सरकारी परीक्षेला मुलगा बसला पाहिजे. दुय्यम शाळांच्या प्राथमिक विभागांत चार किंवा पांच वर्षांचे विद्यार्थी

देखील घेतले जातात. पूर्वी या शाळांचा आणि सामान्य प्राथमिक शाळांचा अभ्यासक्रम निराळा असे, आतां तो एकच झाला आहे. त्याकारणानें सामान्य प्राथमिक शाळेंतील विद्यार्थी पांच किंवा सात वर्षांनंतर दुय्यम शिक्षणाकडे येऊं शकतात. १९२४–२५ पूर्वी ही शक्यता नव्हती. चालू पिढींतच ही सुधारणा होऊन निदान प्राथमिक शिक्षणांतील पंक्तिप्रपंच नष्ट झाला आहे.

## दुय्यम शिक्षणाच्या संस्था

प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यानंतर ऐपतदार विद्यार्थी दुय्यम शाळांत जातात व तेथून त्यांना विद्यापीठांत जातां येतें. १९३० पासून प्रवेशपरीक्षेंत शेंकडा ४५ गुण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांना दुय्यम शिक्षण मोफत करण्यांत आलेलें आहे. ज्यांना यापेक्षां कमी गुण असूनही शिकावयाचें असेल त्यांना फी द्यावी लागते. त्यामुळें हुषार अशा गरीब मुलांना दुय्यम शिक्षण मोफत मिळतें. श्रीमंतांच्या हुषार मुलांनाही तें मोफत मिळतें आणि इतरांना फी देऊन विकत घेतां येतें. प्राथमिक शिक्षणाचा समान अभ्यासक्रम आणि हुषार मुलांना मोफत दुय्यम शिक्षण या दोन सुधारणा अगदीं अलीकडे म्हणजे १९२५ व १९३३ मध्यें पूर्ण झालेल्या आहेत. फरान्समधील हायस्कूलांना लीसे व कोलेज् अशा संज्ञा आहेत. लीसे या पूर्ण सरकारी संस्था आहेत. कोलेज् या संस्था म्युनिसिपालिटयांनीं चालविलेल्या आहेत. कोलेजपेक्षां लीसेचा दर्जा वरचा समजला जातो, कारण त्यांत शिक्षक चांगले असतात. दुय्यम शिक्षणाचा अभ्यासक्रम सात वर्षांचा असतो. आठवें वर्ष ऐच्छिक असतें. ज्यांना उच्च शिक्षणाची विशेष तयारी करावयाची असेल ते एक वर्ष अधिक राहतात. नंतर विद्यापीठें किंवा उच्च व्यावसायिक शिक्षणाचीं महाविद्यालयें या शिक्षणाकडे विद्यार्थी जातात. दुय्यम शिक्षणक्रम पूर्ण करणारांना, म्हणजे पहिल्यापासून बारा वर्षे ज्यांचें शिक्षण झालें आहे अशांना बी. ए. (बॅकॅलोरिएट) ही पदवी मिळते. वर्षांचे दृष्टीनें ही पदवी आपलेकडील मॅट्रिक्युलेशनचे बरोबरीची आहे. अभ्यासाचे दृष्टीनें तिचा दर्जा वरचा आहे.

## उच्च प्राथमिक शाळा

सामान्य प्राथमिक शाळेंत जाणाऱ्या विद्यार्थ्यांना प्राथमिक शिक्षणाचा सात वर्षांचा अभ्यासक्रम तेरा वयापर्यंत पुरा करितां येतो. त्यानंतर शेंकडा

नव्वद विद्यार्थी शाळा सोडून देतात आणि दहा विद्यार्थी पुढें कोणतें तरी शिक्षण चालू ठेवितात. अगदीं थोडे हुशार विद्यार्थी दुय्यम शाळांकडे जातात. तेथें त्यांना पहिल्या किंवा दुसऱ्या यत्तेंत बसवितात. आपल्याकडे व्ह. फा. झालेलीं कांहीं थोडीं मुलें हायस्कूलकडे जातात तसाच प्रकार फरान्समध्यें आहे. कांहीं विद्यार्थी उच्च प्राथमिक शाळांमध्यें (हायर प्रायमरी स्कूल) जातात. या शाळेंत तीन किंवा चार वर्षांचा अभ्यासक्रम असतो. या अभ्यासक्रमाच्या चार शाखा असतात—सामान्य बौद्धिक, औद्योगिक, व्यापारी, आणि शेतकी. सामान्य बौद्धिक शिक्षण घेणारे दुय्यम शिक्षणाकडें जाऊं शकतात. कांहीं शिक्षक–विद्यालयांत (नॉर्मल स्कूल) जातात. तेथें तीन वर्षाचा अभ्यासक्रम झाल्यानंतर इच्छा असल्यास पुढें प्राथमिकशिक्षक–महाविद्यालयांतही (हायर एलेमेंटरी नॉर्मल स्कूल) जाऊं शकतात. बाकीच्या विद्यार्थ्यांना कांहीं सामान्य शिक्षण असतें आणि त्याचेच बरोबर औद्योगिक, शेतकी, किंवा व्यापारी शिक्षणाचा अभ्यासक्रम असतो. त्यानंतर पुढचें औद्योगिक शिक्षण घेण्याची इच्छा असल्यास माध्यमिक दर्जाच्या औद्योगिक शाळा आहेत तेथें जातां येतें.

उच्च प्राथमिक शिक्षणाची सोय नसेल ते विद्यार्थी प्राथमिक पुरवणी वर्गांत (कॉम्प्लीमेंटरी क्लासेस) जातात. प्राथमिक शाळांनाच जोडून हे वर्ग आहेत. त्यांत पूर्वींचेच विषय आणखी दोन वर्षे चालू ठेविलेले असतात. दोन वर्षे शिक्षण झाल्यावर इच्छा असल्यास प्राथमिक दर्जाच्या औद्योगिक शाळांत धंदेशिक्षणाची सोय होते.

देशांत इतस्ततः कांही पुरवणी शाळा व प्रौढ शिक्षणसंस्था आहेत. तेराव्या वर्षानंतर शाळा सोडणारे विद्यार्थी आणि प्रौढ कामगार अशा संस्थांचा फायदा घेतात. परंतु हें शिक्षण आवश्यक किंवा सार्वत्रिक नाहीं.

औद्योगिक शिक्षणाच्या प्राथमिक, माध्यमिक, व उच्च दर्जाच्या संस्था आहेत. त्यांत अनुक्रमानें प्राथमिक, उच्च प्राथमिक, आणि दुय्यम शिक्षण पूर्ण झाल्यानंतर प्रवेश मिळतो. म्हणजे मुलाला आपल्या वयाचे तेराव्या वर्षाचे पुढें धंदेशिक्षण घेण्याची सोय असते.

## परीक्षांची व पदव्यांची गिरण

शिक्षणाची प्रत्येक अवस्था पूर्ण झाल्यानंतर परीक्षा होते व शिफारस-पत्र (सर्टिफिकेट) किंवा पदवी दिली जाते. नवीन शिक्षणक्रमांत विद्यार्थी घेण्यापूर्वी प्रवेशपरीक्षा होते आणि निवडक विद्यार्थ्यांनाच दाखल करून घेतलें जातें. विशिष्ट गुणांचें प्रमाण पडलें असेल तरच विद्यार्थ्यांना नादारी किंवा मोफत शिक्षण यांचा फायदा मिळतो. उच्च प्राथमिक आणि धंदेशिक्षण शाळा मोफत आहेत. सारांश प्रत्येक पायरीवर परीक्षा, निवड, आणि प्रशस्ति-पत्र किंवा पदवी अशी फरेंच शिक्षणांत योजना आहे. त्यामुळें या शिक्षण-पद्धतीला विनोदानें "परीक्षा–पदव्यांची गिरणी" अशा विशेषणानेंही संबोधण्यांत येतें.

## सहशिक्षण नाहीं

फरान्समध्यें सहशिक्षण नाहीं. मुलांकरितां व मुलींकरितां वेगळाल्या शाळा आहेत. जेथें काटकसरीकरितां जरूरी असेल तेथेंच मुलांमुलींना एकत्र शिकविण्याची परवानगी दिली जाते. प्राथमिक शाळांचे खालचे वर्ग आणि विद्यापीठें यांत मुलेंमुली एकत्र शिकतात. हायस्कूल शिक्षणांत अगदीं जरूर तेथेंच मुलांच्या शाळेंत मुलींना परवानगी मिळते. कोणत्याही हायस्कूलमध्यें (लीसे किंवा कोलेज्) पन्नासपेक्षां मुलींची संख्या अधिक असूं नये असा नियम आहे.

## खाजगी शाळांवर निर्बंध

खाजगी शाळांना फारसें उत्तेजन दिलें जात नाहीं. सर्व शिक्षणावर सरकारचा ताबा आहे. शाळा स्थानिक सरकारच्या आहेत. दुय्यम शाळांत दोन भेद आहेत—लीसे व कोलेज्. यांपैकीं लीसे या मुख्य विद्याखात्यानें चालविलेल्या आहेत. कोलेज् या संस्था स्थानिक स्वराज्यसभांनीं सरकारचे मदतीनें चालविल्या आहेत. उच्च शिक्षणसंस्था विद्याखात्यानेंच चालविल्या आहेत. रोमन कॅथॉलिक धर्मपंथीयांनीं कांहीं खाजगी शाळा चालविलेल्या आहेत, परंतु त्यांचेवर बरींच बंधनें असतात. शाळेच्या ठराविक वेळांत व शाळेच्या इमारतींत विशिष्ट धर्मपंथाचें शिक्षण दिलें जाऊं नये. शिक्षक विशिष्ट धर्मपंथांतील दीक्षित असूं नयेत. याशिवाय देखरेख, तपासणी,

अभ्यासक्रम वगैरे संबंधीं अनेक निर्बंध आहेत. सरकारी परवानगीशिवाय कोणी खाजगी शाळा चालवूं शकत नाहीं. ज्या खाजगी शाळा आहेत त्यांत व सरकारी शाळांत बरेंच वैमनस्य आहे. अशा रीतीनें शिक्षणविषयक सर्व हक्क सरकारनें आपले हातांत ठेविलेले आहेत.

## प्राथमिक शिक्षणक्रम व पद्धति

फरेंच अभ्यासक्रमाचा एकंदर भर वाङमयीन आणि तात्त्विक विषयांवर आहे. विद्यार्थ्याला भाषा चांगली आली पाहिजे. चांगलें वाचन, लेखन, भाषण, व आकलन या गोष्टी भाषाज्ञानांत मुख्य आहेत. मुलाला भाषा चांगली आली तर त्याला विचार करतां येईल. तर्कशुद्ध विचार करतां येणें हें फरेंच संस्कृतीचें लक्षण समजलें जातें. भाषेवर चांगलें स्वामित्व मिळवितां आलें तर विचारसरणीही तर्कशुद्ध होते. म्हणून प्राथमिक शिक्षणांत भाषा-शिक्षणाचा मजबूत पाया घातला जातो.

तात्त्विक विचाराची फरेंच मनोवृत्तीला फार आवड आहे. हिंदी संस्कृति व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास फरान्समध्यें अधिक होत असावा असा अंदाज आहे. समान संस्कृती परस्परांकडे आकर्षित होतात. फरेंच विद्यार्थी किंवा सुसंस्कृत नागरिक यांची सामान्य प्रवृत्ति तत्त्वज्ञानाकडे असते असा अनुभव येतो. या तात्त्विक प्रवृत्तीचा पाया प्राथमिक आणि दुय्यम शिक्षणांत घातला जातो. प्राथमिक शाळेंत नैतिक शिक्षणाचा अभ्यासक्रम असतो. आधुनिक शिक्षणशास्त्र सांगतें कीं मुलांना तात्त्विक नीतिपाठ देऊं नयेत, अप्रत्यक्ष शिक्षण द्यावें. फरेंच शिक्षणाला हें तत्त्व मान्य नाहीं. क्रमिक पुस्तकां-तून प्रत्यक्ष व तात्त्विक नीतिपाठ दिलेले असतात.

राष्ट्रीय वृत्तीचें संगोपन करून एकराष्ट्रीयत्वाची भावना अखिल राष्ट्रांत निर्माण करणें हें शिक्षणाचें कार्य आहे. म्हणून प्राथमिक शाळांतील इतिहास व भूगोल या विषयांचे साहाय्यानें फरान्स, फरेंच विभूति, संस्कृति व वाङमय यांविषयीं अभिमान उत्पन्न केला जातो.

प्राथमिक शाळेच्या पांचव्या व सातव्या यत्तांना शिकविले जाणारे विषय व त्यांचे साप्ताहिक तास दिले आहेत. त्यांवरून इकडील अभ्यासक्रमाशीं त्यांची तुलना करितां येईल.

**प्राथमिक शिक्षणाचे विषय व साप्ताहिक तास**

| विषय | पांचवी | सातवी |
|---|---|---|
| नीतिशिक्षण व नागरिक नीतिशास्त्र | १। | १॥ |
| वाचन | ३ | २॥ |
| लेखन | १॥ | ॥ |
| फ्रेंच भाषा | ७ | ७ |
| इतिहास व भूगोल | ३ | ३ |
| गणित व भूमिती | ४॥ | ५ |
| विज्ञान व सृष्टिशास्त्र | २ | २॥ |
| रेखाकला | १ | १ |
| हस्तव्यवसाय | २ | २ |
| संगीत व गायन | १ | १ |
| शारीरिक शिक्षण | २ | २ |
| करमणूक | १॥। | १॥। |
| एकूण | ३० | ३० |

शिकविण्याची पद्धति पूर्वापार चालत आलेलीच आहे. योजनापद्धति, क्रियापद्धति वगैरे पद्धती कल्पनासृष्टींत असल्या तरी प्रत्यक्ष व्यवहारांत उतरलेल्या नाहींत. शिक्षक ज्या मानानें कमीअधिक विद्वान् असेल त्या मानानें त्याचें अध्यापन चांगलें किंवा साधारण असतें. एकंदर शिक्षणपद्धतीचें धोरण मुलाचा ज्ञानसंग्रह वाढवून त्याची विचारसरणी तर्कशुद्ध करण्याकडे असतें. तपशिलांतून तात्त्विक सार कसें काढावें या कलेचें शिक्षण विशेष दिलें जातें. अध्यापनांत इंद्रियाचे क्रियेपेक्षां बौद्धिक प्रक्रियेवर जोर विशेष असतो.

**उच्च प्राथमिक शाळा**

सामान्य प्राथमिक शिक्षणानंतर दुय्यम शिक्षणाकडे न जातां व्यावसायिक वळणाचें शिक्षण घेण्याची इच्छा असलेले, हुषार असूनही दुय्यम शिक्षणाचा खर्च झेपण्याची ऐपत नसलेले, आणि नादारी मिळविण्याइतकी बुद्धिमत्ता नाहीं असे सर्व प्रकारचे विद्यार्थी या शाळेंत येतात. त्यामुळें तिला एक विशिष्ट सामाजिक वर्गाचें स्वरूप प्राप्त होतें. या शाळेंत सामान्य आणि व्यावसायिक अशा अभ्यासक्रमांचें मिश्रण असतें आणि शिक्षकाचे

व्यवसायाकडे जाणारांना एक अभ्यासक्रम केवळ बौद्धिक स्वरूपाचा असतो. शेतकी, औद्योगिक, आणि व्यापारी अशा तीन व्यवसायांचे विषय शिकविले जातात. या शाळांना प्राथमिक शिक्षण–महाविद्यालय असें म्हणतां येईल.

सर्वांना सामान्य अशा अभ्यासक्रमांत पुढील विषय येतात—(१) नीतिशिक्षण, (२) नागरिकनीति, प्राथमिक राजकारणशास्त्र, व कायदा, (३) फरेंच भाषा व वाङ्मय, (४) एकादी परदेशी भाषा—जर्मन, इंग्लिश, स्पॅनिश, इटालियन् इ. (५) फरान्सचा व जगाचा इतिहास, भूगोल, (६) व्यावहारिक गणित व हिशेब, बीजगणित व भूमिती, (७) विज्ञान व सृष्टिशास्त्र यांची प्राथमिक माहिती, आरोग्यतत्त्वांचें व्यावहारिक ज्ञान, (८) डिझाइनिंग व मॉडेलिंग, (९) गायन व लष्करी शिक्षण, मुलींना शारीरिक शिक्षण.

वरील विषयांखेरीज शेतकी, व्यापारी, किंवा औद्योगिक या विषयांचे तास असतात. हें शिक्षण पूर्ण झाल्यावर शिक्षक विद्यालयांत (नॉर्मल स्कूल) किंवा विवक्षित धंदेशिक्षणाचे शाळांत जातां येतें.

उच्च प्राथमिक शाळांतही जाऊं शकत नाहींत असे विद्यार्थी प्राथमिक शाळांना जोडून पुरवणी वर्ग असतात त्यांतच एक दोन वर्षे शिक्षण घेतात. येथें मागील शिक्षणच पुढें चालू ठेवून त्याच विषयांचें थोडें अधिक ज्ञान देतात.

## दुय्यम शिक्षणक्रम व पद्धति

आपल्या दुय्यम शिक्षणाचा दर्जा सांभाळण्याकरितां फरेंच लोक अतोनात काळजी घेतात. या अभ्यासक्रमांत थोडा जरी फेरबदल करावयाचा झाला तरी देशांत त्यावर रणें माजतात. फरान्सच्या संस्कृतीचें संरक्षण करून जगांत तिचें वर्चस्व कायम ठेवणारा बौद्धिक पुढारीवर्ग या शिक्षणांतून तयार व्हावयाचा असतो. म्हणून अगदीं निवडक अशाच विद्यार्थ्यांना या शाळांत प्रवेश दिला जातो. या शिक्षणाचा बौद्धिक दर्जा वरच्या प्रतीचा राहावा म्हणून सामान्य जनतेच्या शिक्षणापासून ही शाळा अगदीं अलग ठेविलेली आहे. तिचा अभ्यासक्रम, पुस्तकें, परीक्षा इ. योजना मुख्य विद्याखात्याकडून केल्या जातात.

लीसे, कोलेज, व खाजगी स्वतंत्र शाळा असे दुय्यम शाळांचे तीन प्रकार आहेत. त्यांत शिक्षकांचा व शिक्षणाचा दर्जा या दृष्टीनें लीसे श्रेष्ठ आहेत.

# फरेंच शिक्षणपद्धति

(संस्थांचे नांवापुढील आंकडे कालमर्यादेचीं वर्षें दाखवितात)



दुय्यम शिक्षणाच्या सात वर्षांचे अभ्यासक्रमांत भाषाखेरीज करून पहिल्या सहा यत्तांचा अभ्यासक्रम सर्वांना सारखाच असतो. भाषांचे दृष्टीनें मात्र पहिल्या दोन यत्तांत दोन विभाग पडतात—प्राचीन भाषा व अर्वाचीन भाषा. नंतर तिसऱ्या यत्तेपासून सहाव्या यत्तेपर्यंत तीन विभाग पडतात—प्राचीन भाषा, अर्वाचीन भाषा, व प्राचीन–अर्वाचीन मिश्र अभ्यासक्रम. बाकीचे विषय सर्वांना सारखेच असतात. नंतर सातव्या यत्तेंत दोन विभाग पडतात–तत्त्वज्ञान व वाङमय या विषयांचा विशेष अभ्यास, किंवा भौतिक शास्त्रें व गणित या विषयांचा विशेष अभ्यास. या विशेष अभ्यासक्रमाला एकूण तासांपैकीं दोनतृतीयांश वेळ दिला जातो. उभय विभागांना समान अशा अभ्यासक्रमाला एकतृतीयांश वेळ दिला जातो. प्राचीन व अर्वाचीन भाषा, वाङमय, आणि संस्कृति यांच्या अभ्यासाला फरेंच दुय्यम शिक्षणांत किती महत्त्व दिलें जातें, तें शाळेच्या वेळापत्रकावरून दिसून येतें. पहिल्या व सहाव्या यत्तांचे विषय आणि विभागवार तास पुढें दिले आहेत.

## दुय्यम शिक्षणाचे अभ्यासक्रम व तास

चिन्हांचा अर्थ—१ प्राचीन विभाग, २ अर्वाचीन विभाग, ३ मिश्रविभाग.

| विषय | पहिली यत्ता | | सहावी यत्ता | | |
|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | १ | २ | ३ |
| फरेंच | ४ | ७ | ३॥ | ४॥ | ३॥ |
| लॅटिन | ६ | ० | ४ | ० | ५ |
| ग्रीक | ० | ० | ३॥ | ० | ० |
| अर्वाचीन | ३ | ६ | १॥ | ७॥ | ३॥ |
| चित्रकला | ० | ० | ० | ॥ | ॥ |
| इतिहास | १॥ | विभाग | ० | विभाग | विभाग |
| भूगोल | १ | १ | ३॥ | १ | १ |
| गणित | २ | प्रमाणें | ३॥ | प्रमाणे | प्रमाणें |
| सृष्टिशास्त्रें | १॥ | | ० | | |
| फिजिक्स व रसायनशास्त्र | ० | | ४ | | |
| रेखाकला | २ | | ० | | |
| एकूण | २१ | २१ | २३॥ | २३॥ | २३॥ |

## फरान्समधील मॅट्रिकचा अभ्यासक्रम

सातव्या यत्तेंतील विद्यार्थी तत्त्वज्ञान किंवा गणितशास्त्र–विज्ञान यांपैकीं एकादा विभाग विशेष अभ्यासाकरितां घेतात, तरी पण बाकीचे विषय सर्वांना सामान्य शिक्षणाकरितां घ्यावे लागतात. फरेंच बॅकालोरिएटचा (बी. ए.) म्हणजे आपलेकडील मॅट्रिकच्या बरोबरीचा अभ्यासक्रम काय असतो त्याची कल्पना पुढील कोष्टकावरून येईल—

### फरेंच बॅकालोरिएटचा (मॅट्रिकचा) शिक्षणक्रम

| विषय | तत्त्वज्ञान विभाग | गणित विभाग |
|---|---|---|
| तत्त्वज्ञान | ८॥ | ३ |
| इतिहास | २॥ | २ |
| वाङ्मय | २ | ० |
| गणित | १॥ | ९ |
| फिजिक्स व रसायन | ४ | ५॥ |
| सृष्टिशास्त्रें | २ | २॥ |
| भूगोल | १ | १ |
| अर्वाचीन भाषा | २ | २ |
| | २४ | २५ |

अशा रीतीनें सामान्य आणि विशेष ज्ञान यांची सांगड फरेंच दुय्यम शिक्षणांत घातलेली आहे. पहिल्या यत्तेपासून लॅटिन किंवा आर्वाचीन परदेशी भाषाशिक्षणाला प्रारंभ होतो. पहिल्या सहा यत्तांमध्यें फक्त भाषा हाच विषय ऐच्छिक आहे. त्यांतच काय ती निवड करितां येते. अखेरचे यत्तेंतही दुहेरी विभागणी असली तरी दोन्ही विभागांना समान क्षेत्रही पुष्कळच आहे.

वरील अभ्यासक्रमांत भाषाविषयाला प्रमुख स्थान दिलेलें दिसेल; भाषा याचा अर्थ वाङ्मय व संस्कृतीचा अभ्यास असा व्यापक दृष्टीनें घेतला पाहिजे. तर्कशुद्ध विचारसरणीचें भाषा हें एक साधन आहे. त्याचप्रमाणें प्राचीन आणि अर्वाचीन वाङ्मय व संस्कृति यांचें सम्यक् ज्ञान होण्याकरितां

त्या त्या भाषांचेंही ज्ञान होणें जरूर आहे अशी फरेंच पंडितांची विचारसरणी आहे. या सर्व संस्कृतींचा अभ्यास करितांना तुलनात्मक दृष्टि ठेवावयाची असते. फरेंच संस्कृति, भाषा, व वाङमय हा मुख्य विषय कल्पून त्याच्या धोरणानें इतर भाषांचें व संस्कृतींचें अध्ययन करावयाचें असतें. लॅटिन व ग्रीक या प्राचीन भाषांवर दुय्यम शिक्षणाचा विशेष भर आहे; कारण फरेंच संस्कृतीचा पाया या भाषांतील वाङमयावर व जुन्या रोमन संस्कृतीवर उभारलेला आहे. प्राथमिक शाळांत जसा नीतिशिक्षणावर भर आहे तसाच दुय्यम शिक्षणाचे अखेरचे यत्तेंत तत्त्वज्ञानावर विशेष भर आहे असें दिसतें. तात्त्विक विचाराची आणि तर्कशुद्ध विचारसरणीची फरेंच लोकांची हौस या ठिकाणीं दिसून येते. हिंदुस्थानसारख्या देशांत तत्त्वज्ञानाचा जन्म झाला. पण या संपत्तीकडे आमच्या शिक्षणाचें लक्ष गेलें नाहीं. या देशांतील तत्त्वज्ञानाचें काडीमात्रही ज्ञान न होतां विद्यार्थी विद्यापीठांच्या पदव्या घेऊन सुसंस्कृत बनूं शकतो अशी आपली चुकीची कल्पना झालेली आहे.

## अध्यापन व अध्ययनपद्धति

दुय्यम शिक्षणाच्या अभ्यासक्रमावर अशी टीका केली जाते कीं विद्यार्थ्यांना त्याचें फार ओझें होतें. त्याचा स्वाभाविक परिणाम घोकंपट्टींत आणि टिपणी पुस्तकें मुखोद्गत करण्यांत होतो हें साहजिक आहे. फरान्स-मध्येंही नोट्सचा सुळसुळाट बराच आहे. अध्यापनाची पद्धति जुनी आहे. शिक्षक व्याख्यान देतात आणि विद्यार्थी टिपणें लिहून घेऊन तीं पाठ करितात. अखेरच्या परीक्षेची तलवार त्यांचे मानेवर लटकत असते. ही परीक्षा पास होण्यावर सामाजिक मानमरातब, आर्थिक दर्जा, आणि उच्च शिक्षणाची शक्यता या गोष्टी अवलंबून असतात. सारांश, आपल्या देशांत जे शिक्षणाचे व परीक्षापद्धतीचे दोष दिसून येतात तेच फरान्समध्येंही आहेत. अखेरच्या परीक्षेचा निकालही कसोशीनें लावला जातो असें दिसतें. साधारणपणें शेंकडा तीस ते पंचेचाळीस इतके विद्यार्थी यशस्वी होतात.

## दुय्यम शिक्षणावर आक्षेप

फरान्सच्या दुय्यम शिक्षणावर आक्षेप घेणारे लोक त्याच देशांत आहेत. महायुद्धानंतर इतर देशांमध्यें दुय्यम शिक्षणाचें क्षेत्र व्यापक करून सामान्य

विद्यार्थ्याला अधिकाधिक शिक्षण घेण्याची संधि दिली जात आहे. त्या मानानें फरेंच शिक्षणाचें धोरण उदार नाहीं. विवक्षित प्रकारच्या विद्यार्थ्यांनाच तें अनुकूल आहे. बुद्धि किंवा श्रीमंती असेल तरच शिक्षण घेतां येतें; परंतु बुद्धीचा अर्थ फक्त वाङमयीन बुद्धि असा केला जातो. वाङमयक्षेत्रांत जशी बुद्धि लागते तशी कला, हस्तव्यवसाय इत्यादि क्षेत्रांत देखील बुद्धि लागते. परंतु अशा बुद्धीची सोय दुय्यम शिक्षणांत केलेली नाहीं. वाङमय व बौद्धिक क्षेत्रांत जसे पुढारी (एलीट्) पाहिजेत तसे समाजाच्या इतर क्षेत्रांतही ते पाहिजेत. या क्षेत्रांचा समावेश दुय्यम शिक्षणानें केला पाहिजे.

दिवसेंदिवस सामान्य जनांत शिक्षणाविषयीं आस्था उत्पन्न होत आहे. त्यांनाही दुय्यम शाळांत अधिकाधिक सवलती दिल्या पाहिजेत. विद्यार्थ्यांची संख्या वाढली कीं बुद्धीची विविधता वाढते. तिला अनुरूप अशी विविधता शिक्षणक्रमामध्यें देखील आणणें जरूर आहे. असा फरक झालेला नाहीं तोंपर्यंत दुय्यम शिक्षणाचा सामान्य जनांना फारसा उपयोग होणार नाहीं.

सारांश, अभ्यासक्रमांत अधिक विविधता आणावी आणि सामान्य लोकांना शिक्षणांत अधिक सवलती द्याव्यात अशी शिक्षणसुधारकांची मागणी आहे.

## शिक्षणसुधारणेचे प्रयत्न

महायुद्धांतून ज्या अनेक गोष्टी बाहेर पडल्या त्यांत शिक्षणसुधारणेची चळवळ ही एक महत्त्वाची गोष्ट आहे. या सुधारणेच्या विचारांचें वारें फरान्समध्येंही शिरलें. महायुद्धामध्यें खंदकांत श्रीमंत, मध्यम, व गरीब वर्गाचे लोक खांद्यास खांदा लावून लढले. त्यांच्यांत लोकशाहीचें आणि समानतेचें वारें उत्पन्न झालें. या लढाईच्या खंदकांतच नवीन शैक्षणिक विचारांचा जन्म झाला. श्रीमंत, गरीब हा भेद शिक्षणांत राहूं नये आणि देशांतील सर्वांना शिक्षणाची समान संधि मिळावी या दृष्टीनें प्रयत्न करण्याकरितां 'नूतन शिक्षण पुरस्कार संघ' (चँपियन्स् ऑफ दि न्यू एज्युकेशन) फरान्स-मध्यें स्थापन झाला. अशाच प्रकारचे संघ शिक्षकांनींही स्थापन केले. अलीकडच्या पिढींत जी शिक्षणसुधारणा झालेली आहे तिचें श्रेय या नवीन चळवळीला दिलें पाहिजे.

## एकवर्गी शिक्षणपद्धति

या सुधारकांच्या मागणीला त्यांनीं 'एकवर्गी शिक्षणपद्धति' (लेकोल यूनिक, कॉमन स्कूल) असें नांव दिलें. तशाच प्रकारची चळवळ जर्मनींत आणि इंग्लंडमध्यें झाली, तिला तेथें 'आईन हाईट शूल' (वन कॉमन स्कूल) आणि 'सेकंडरी एज्युकेशन फॉर ऑल' अशीं नांवें मिळालीं. शिक्षणांतील जातिभेद नाहींसा करून टाकावा. सामान्य जनांना निराळें शिक्षण आणि उच्च वर्गीयांकरितां स्वतंत्र शिक्षण हा पक्षपात राहूं नये. दुय्यम व उच्च शिक्षणाची संधि केवळ श्रीमंत वर्गालाच न देतां सर्वसामान्य समाजाचे आटोक्यांत, तें येईल इतकें त्याचें क्षेत्र व्यापक करावें. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला जास्तींत जास्त शिक्षणाची संधि द्यावी. पुरवणी शिक्षणाच्या आणि औद्योगिक शिक्षणाच्या संस्था वाढवाव्यात. सक्तीच्या शिक्षणाचें वय वाढवावें. गरीब विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण घेतां यावें म्हणून शिष्यवृत्त्या व पोटगीवृत्त्या अधिक वाढवाव्यात. सारांश शिक्षणाचे क्षेत्रांत संपूर्ण लोकशाही करून सर्वांना समान संधि द्यावी (इक्वॉलिटी ऑफ अपॉर्च्युनिटी) अशी या नवीन शिक्षणसुधारकांची मागणी होती.

या नवीन चळवळीचा परिणाम इतर देशात जितका आला तितका फरान्समध्यें झाला नाहीं. तरी पण युद्धानंतरच्या काळांत ज्या थोड्या सुधारणा झाल्या त्यांचें श्रेय या 'एकवर्गी शिक्षणाच्या' मागणीला आहे. प्राथमिक शिक्षणाचा पांच वर्षांचा कार्यक्रम सर्व देशभर सारखा ठेवणें, दुय्यम शाळांत बुद्धिमान गरीब विद्यार्थ्यांना मोफत प्रवेश देणें, एका शिक्षणक्रमांतून दुसऱ्या शिक्षणक्रमांत संक्रमण करण्यास परवानगी ठेवणें, औद्योगिक शिक्षणसंस्था काढणें इत्यादि अनेक सुधारणा फरान्समध्यें अलीकडे झालेल्या आहेत.

यापुढें सुधारणेची दिशा म्हणजे एकवर्गी शिक्षणाचें हें तत्त्व असेंच पुढें दुय्यम शिक्षणांत ढकलणें ही आहे. सध्यां शिक्षणसंस्थांत उच्च प्राथमिक आणि दुय्यम असा जो पंक्तिप्रपंच ठेविलेला आहे त्याचे ऐवजीं सर्वच शिक्षण दुय्यम करून त्यांत विविध प्रकारचे अभ्यासक्रम ठेविल्यास अनेक विद्यार्थ्यांना त्यांच्या त्यांच्या प्रवृत्तीप्रमाणें दुय्यम शिक्षण घेण्याची संधि मिळेल. या शिक्षणानें प्राप्त होणारा मोठेपणा आज एका विवक्षित वर्गाला मिळतो आहे

त्याचेऐवजीं तो अधिक लोकांना मिळूं शकेल. पुढील पिढींत या मार्गानें फरेंच शिक्षणांत सुधारणा होईल असें वाटतें.

## गुणदोषनिरीक्षण

फरान्सच्या शिक्षणपद्धतीमधील दोष स्पष्टच दिसत आहेत. दोषांचे बाबतींत या पद्धतींत आणि हिंदी शिक्षणांत बरेंचसें साम्य आहे असें वाटूं लागतें. शिक्षणमंत्र्याच्या आणि विद्याखात्याच्या हातांत सर्व शिक्षणसत्ता केंद्रीभूत झालेली असल्यामुळें शिक्षणांतील विविधता नाहींशी झालेली असून देशांतील सर्व शाळांत एकसारखेपणा आला आहे. नवीन प्रयोगाला व विचारांना वाव नाहीं. संस्कृति आणि शिक्षण हें ग्रीक व लॅटिनसारख्या ठराविक विषयांतच आहे, त्यांचेबाहेर इतर विषय शिकल्यानें मनाला सुसंस्कृतता येणार नाहीं अशी आकुंचित व्याख्या या शिक्षणानें करून घेतलेली आहे. त्यामुळें नवीन विषयांचा समावेश अभ्यासक्रमांत होत नाहीं. अभ्यासक्रमाचें ओझें आणि परीक्षेचा कांच याखालीं विद्यार्थी दडपून गेलेले आहेत. त्याचे स्वाभाविक दुष्परिणाम झाले आहेत. विद्यार्थ्यांची संख्या वाढत आहे पण अभ्यासक्रमांत विविधता नाहीं, म्हणून शिक्षणाचा पूर्वीचा दर्जा कमी होत आहे. जगांत शिक्षणशास्त्र व मानसशास्त्र वाढत आहे. परंतु स्वतःच्या कल्पनाच बरोबर आहेत अशी आत्मसंतुष्ट वृत्ति पुढाऱ्यांचे ठिकाणीं असल्यामुळें जगांतील या प्रगतीचा शिक्षणावर फारसा अनुकूल परिणाम झालेला नाहीं. पूर्वापार समाजपद्धतीमधील वर्गभेद शिक्षणामध्येंही उतरलेला होता, त्याचे बरेच अवशेष अद्यापही फरेंच शिक्षणपद्धतींत राहिलेले आहेत. आजच्या काळाला अनुसरून अशी शिक्षण क्षेत्रांतील समान संधि अद्याप फरान्सनें निर्माण केलेली नाहीं.

हे सर्व दोष फरेंच शिक्षणपद्धतींत आहेत, तरीही ती टिकली आहे. याचें कारण तिच्यांत कांही चांगले गुण आहेत. तिकडेही लक्ष देणें जरूर आहे. फरान्सच्या शिक्षणाकडे फरेंच लोकांच्या दृष्टिकोणांतून पाहिलें पाहिजे. कारण प्रत्येक राष्ट्राला स्वतःची अशी कांहीं विचारसरणी असते. तिला अनुसरून शिक्षणाची रचना होते.

## राष्ट्रीय स्वभाववैशिष्य

फरेंच स्वभाव हा बुद्धिप्रधान, तार्किक, आणि विचारशील असा आहे. व्यवहारापेक्षां त्याला तात्त्विक विचारांची आवड अधिक आहे. यूरोपमधील सर्व राष्ट्रें औद्योगिक दृष्टया पुढें गेलीं तरी फरान्स हा शेतकऱ्यांचा देश राहिला आहे. भौतिक संस्कृति आणि उपयुक्ततावाद यांपेक्षां बौद्धिक जीवन आणि ध्येयवाद या गोष्टी त्याला अधिक प्रिय आहेत. सीबर्ग नांवाच्या जर्मन लेखकानें फरेंच स्वभावाचें एका वाक्यांत वर्णन केलें आहे--" त्याला प्रगतीच्या कल्पनेपेक्षां कल्पनेच्या प्रगतीत अधिक मौज वाटते. " (More interested in the progress of ideas rather than in the idea of progress.) म्हणून फरेंच शिक्षणांत उपयुक्ततेपेक्षां बौद्धिक संस्कारांवर अधिक भर दिलेला आहे. विचारसंपत्ति आणि प्राचीन वाङमय हा संस्कृतीचा ठेवा आहे. तो हस्तगत केल्याशिवाय मनुष्य सुसंस्कृत होत नाहीं. वाङमय आणि तत्त्वज्ञान यांचें ज्ञान असलेला मनुष्य सुसंस्कृत होतो. त्यामुळें विचाराला वळण लागतें, बुद्धिविकास होतो, आणि तर्कशुद्ध विचार करितां येतो. फरेंच संस्कृतीचें हें वैशिष्य आहे. तें वैशिष्य प्रत्येक नागरिकाला देणें हें शिक्षणाचें कर्तव्य आहे. अशा स्वरूपाची फरेंच शिक्षणतज्ज्ञांची विचारसरणी आहे. या विचारांवर शिक्षणाची रचना झालेली आहे.

फरेंच शिक्षणांत विद्वत्ता आणि ज्ञानाची सखोलता यांवर विशेष भर आहे. निवडक विद्यार्थी घेऊन त्यांना उत्कृष्ट बौद्धिक संस्कार देणें हें उच्च शिक्षणाचें ध्येय आहे. बौद्धिक संस्कार व सामान्य शिक्षण (जनरल् कल्चर) यावर फरेंच शिक्षणाचा कटाक्ष आहे. दुय्यम शिक्षणांतून बाहेर पडलेला विद्यार्थी तत्त्वज्ञान किंवा गणित या विषयांचा उच्च तात्त्विक अभ्यास करून प्रगल्भ बुद्धीचा झालेला दिसतो. विद्वत्तेच्या दृष्टीनें यूरोपमध्यें फरेंच विद्यार्थी श्रेष्ठ ठरेल.

व्यक्तीला केवळ पोटभरू करण्यापेक्षां सुसंस्कृत करण्याकडे या शिक्षणाचें विशेष लक्ष आहे. सुसंस्कृततेची कांहीं विशिष्ट व्याख्या फरेंच लोकांनीं केलेली आहे. त्या कल्पनेप्रमाणें प्रत्येक विद्यार्थ्याला संस्कार देण्याचा शिक्षणाचा प्रयत्न आहे.

प्राचीन संस्कृतीच्या रक्षणाची काळजी फरेंच शिक्षणानें विशेष घेतलेली आहे. फरान्सची संस्कृति लॅटिन व ग्रीक संस्कृतींवर उभारलेली आहे म्हणून त्याही संस्कृतीचें संगोपन करण्याचें काम शिक्षणानें आपले अंगावर घेतलेलें आहे.

बाहेरच्या देशांत चालू असलेल्या नवीन शिक्षणविचारांचें अंधानुकरण फरान्सनें केलेलें नाही. या बाबतीत त्याचा स्वाभिमान अस्थानीं होतो असें वाटतें. परंतु स्वतःच्या मार्गावर आणि संस्कृतीवर फरेंच लोकांची निष्ठा आहे. आपला मार्ग आपण काढूं असें त्यांना वाटतें. त्यामुळें स्वतःच्या राष्ट्रीय स्वभावाला अनुरूप असा मार्ग त्यांना सांपडण्याचा संभव आहे. जगांत सर्वच देशांत एकाच प्रकारची शिक्षणपद्धति आणि विचारसरणी असण्यापेक्षां राष्ट्रीय वैशिष्ट्यानुसार विविधता असलेली अधिक चांगली.

सर्वांत महत्त्वाचें म्हणजे राष्ट्रीयत्वाच्या वृत्तीचें संगोपन करण्याचें काम फरान्सनें आपल्या शिक्षणाकडे दिलेलें आहे. त्यानें आपल्या संस्कृतीची व्याख्या व्यापक केली आणि या राष्ट्रीय संस्कृतीचा प्रसार शिक्षणामार्फत केला. अशा रीतीनें शिक्षण हें राष्ट्रीय एकीकरणाच्या व धारणेच्या उपयोगी पडत आहे.

सामाजिक आणि शैक्षणिक दृष्टीनें पाहतां फरेंच शिक्षणांत अनेक दोष आहेत. परंतु संस्कृतीचा आणि बौद्धिक संस्कारांचा आग्रह व राष्ट्रीय वृत्तीची जोपासना या कार्याकडे शिक्षणाला लावलेलें असल्यामुळें राष्ट्र आणि संस्कृति या दोघांनाही त्याचा उपयोग होत आहे. नवीन काळांत आणि नवीन पिढींत लोकशाहीचे व समानतेचे तत्त्वांचा हल्ला या शिक्षणावर होत आहे. त्याचा परिणाम आतांपर्यंत झालेला आहे. यापुढेंही तो अधिक प्रमाणावर झाल्याशिवाय राहणार नाहीं.

---

विभाग पांचवा

# जग व हिंदुस्थान--हिंदी दृष्टीनें निरीक्षण

## प्रकरण तेविसावें

## कारभारविषयक प्रश्न व परीक्षापद्धती

शिक्षणाचे कारभारांत अनेक तपशिलाचे प्रश्न उपस्थित होतात. प्रत्येक राष्ट्रानें हे प्रश्न कसे सोडविले आहेत त्यांचे थोडक्यांत निरीक्षण केल्यास या माहितीचा उपयोग आपल्या शिक्षणालाही पुष्कळ होईल.

### धर्म व नीतिशिक्षण

धार्मिक शिक्षणाचे बाबतींत प्रत्येक राष्ट्राचें निरनिराळें धोरण आहे. एकंदरीत सार असें दिसतें कीं धर्मातच अनेक मतभेद व धर्मपंथ असल्यामुळें धार्मिक शिक्षणाची आदर्शपद्धति पाश्चिमात्यांनाही अद्याप सांपडलेली नाहीं. आपल्या मुलांना धर्मशिक्षण पाहिजे असें पालकांना वाटतें, परंतु अनिष्ट धर्मपंथांचा ठसा मुलांचे मनावर बसेल कीं काय ही भीति त्यांना वाटते. त्याचप्रमाणें शिक्षकाच्या विशिष्ट धर्ममताचें प्रतिबिंब मुलांच्या शिक्षणांत पडेल कीं काय अशीही दुसरी शंका त्यांना वाटते.

अमेरिकेनें राजकारणांत व शिक्षणांत धर्माची भांडणें नकोत असें प्रथमपासूनच धोरण ठेविलें आहे. सार्वजनिक शाळांत धार्मिक शिक्षण द्यावयाचें नाहीं असा सर्वसामान्य कायदा आहे. पण एकाद्या शाळेंत बहुसंख्य मुलें एकाच धर्मपंथाचीं असतील तर "चर्चा न करितां बायबलचें वाचन" करण्याची परवानगी आहे. कांहीं विशिष्ट धर्मपंथीय खाजगी शाळा आहेत तेथें त्या त्या धर्मपंथांच्या तत्त्वांचें पद्धतशीर शिक्षण दिलें जातें. उच्च धर्माचा व तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्याकरितां खाजगी विद्यापीठांना जोडून

किंवा स्वतंत्र 'धर्ममहाविद्यालयें' (थिऑलॉजिकल् सेमिनरीज्) आहेत. तेथें उपाध्यायवर्ग तयार होतो.

इंग्लंडमध्यें धर्मपंथीय खाजगी शाळा आणि सार्वजनिक शाळा अशी दुहेरी पद्धत आहे. त्यांत पहिल्या प्रकारच्या शाळांतून विशिष्ट धर्मपंथांचें शिक्षण दिलें जातें. या शाळा अगदीं जुन्या आहेत. सार्वजनिक म्हणजे स्थानिक स्वराज्याच्या शाळांत १८७० च्या कौपर टेंपल कायद्याअन्वयें विशिष्ट धर्मपंथीय शिक्षण देण्याची मनाई आहे. शाळेंत पहिला अर्धा तास फक्त बायबलमधील कांहीं भागांचें चर्चाविरहित वाचन होतें. त्यांत प्रामाणिक मताच्या पालकांना (कॉन्शन्स् क्लॉज्अन्वयें) मुलें न पाठविण्याची परवानगी आहे.

जर्मनीत प्रॉटेस्टंट, कॅथॉलिक व मिश्र अशीं तीन प्रकारचीं विद्यालयें आहेत. प्रत्येक विद्यालयांत त्या त्या पंथाचें धर्मशिक्षण आवश्यक दिलें जातें. प्राथमिक शाळेच्या वेळापत्रकांत साप्ताहिक चार तास व दुय्यम शाळेंत साप्ताहिक दोन तास धार्मिक शिक्षणाला दिले जातात. मिश्र शाळेमध्यें विद्यार्थी ज्या पंथाचे असतील त्याच पंथाचे शिक्षकाकडून धर्मशिक्षण दिलें जातें. नवीन राजवटींत नास्तिकपणा व अनादर या भावना तरुण पिढींत उत्पन्न होऊं नयेत याविषयीं दक्षता बाळगली जाते.

फरान्समधील शाळा अमेरिकेप्रमाणेंच धर्मात तटस्थ आहेत. या धोरणाला १८३१ पासून ऐतिहासिक परंपरा आहे. मात्र सार्वजनिक शाळांतून नैतिक व नागरिकविषयक शिक्षण आठवड्यांतून सव्वा ते दीड तास दिलें जातें. याव्यतिरिक्त धर्मशिक्षण देण्याची ज्या पालकांना इच्छा असेल त्यांचेकरितां गुरुवारीं शाळा बंद असतात. त्या वेळीं पालकांनीं आपापले इच्छेप्रमाणें आपल्या धर्मगुरूकडून शिक्षण देण्याची व्यवस्था करावी. त्याकरितां सार्वजनिक शाळांच्या इमारती किंवा शिक्षक यांचा उपयोग करूं नये.

इटलीमध्यें धार्मिक शिक्षण हा आवश्यक अभ्यासक्रमापैकीं एक भाग आहे. हें शिक्षण देणारे शिक्षक व धार्मिक शिक्षणाचीं क्रमिक पुस्तकें यांना धर्मोपाध्यायाची मंजुरी मिळवावी लागते. शाळांत मुख्यतः रोमन कॅथॉलिक पंथाचें शिक्षण दिलें जातें. इटालियन सरकार आणि पोप यांत धार्मिक

शिक्षणाचे तपशिलांविषयीं बरेच मतभेद होऊन शेवटीं दोघांत समेट झाला व धार्मिक शिक्षणावर पोपचें अप्रत्यक्ष नियंत्रण बसलें आहे.

रशियांत धर्म हा समाजवादाला विरोधी असल्यामुळें नास्तिक पिढी तयार करण्याचें शिक्षणाचें ध्येय आहे. कम्यूनिझम्‌लाच तेथें धर्माचें स्वरूप आलें आहे.

निरनिराळ्या धर्मपंथीयांना व शिक्षकांना एकत्र आणून एक सर्व-सामान्य धर्मशिक्षणाचा अभ्यासक्रम कांहीं इंग्लिश शिक्षणखात्यांनीं आंखलेला आहे. तो कांहीं शाळांतून प्रचारांत आहे. धर्मांतील पंथभेदाचें अनिष्टत्व टाळून नीतिशिक्षणाचा सर्वमान्य अभ्यासक्रम ठेवल्यामुळें सर्व देशांतील पद्धतींत फरान्समधील पद्धति अधिक सयुक्तिक दिसते.

## शारीरिक शिक्षण

अमेरिकेंत आणि यूरोपमधील सर्व देशांतून शारीरिक शिक्षण आवश्यक व सक्तीचें आहे. अमेरिकेंत साप्ताहिक दोन तास व्यायामशाळेंत किंवा मैदाना-वर विद्यार्थी व्यायाम घेतात. अनेक शाळांतून पोहण्याची व्यवस्था असते. याशिवाय फूटबॉल व बेसबॉलचें तर त्या लोकांना वेडच लागलें आहे. इंग्लंड-मध्यें शारीरिक शिक्षण सर्वत्र आवश्यक आहे. त्यांत सुधारणा करण्याकरितां आणखी प्रयत्न चालेले आहेत. अधिक क्रीडांगणें निर्माण करणें, चांगले शिक्षक तयार करणें आणि शाळेंत जाणारीं व न जाणारीं मुलें व्यायामाच्या क्षेत्रांत आणणें या दिशेनें चळवळ चालू आहे. शिक्षकांना पद्धतशीर व्यायामशास्त्राचें शिक्षण देण्याकरितां १९३३ मध्यें लीडस् येथें कार्नेगी ट्रस्टमधून एक शारीरिक शिक्षण महाविद्यालय सुरू करण्यांत आलें आहे. ‘कार्नेगी हॉल’ असें त्याचें नांव असून लीडस् ट्रेनिंग कॉलेजला जोडूनच ही संस्था चालली आहे.

जर्मनी, इटली, आणि रशिया या देशांत शारीरिक आणि लष्करी शिक्षण विद्यार्थ्यांना आवश्यक आहे. जर्मनींत नाझी राजवट आल्यापासून तिचें या खात्याकडे विशेष लक्ष गेलें आहे. व्यायामाला लष्करी पद्धतीचें वळण दिलें जातें. वेळापत्रकांत साप्ताहिक चारपर्यंत तास या विषयाला आहेत. शिवाय वननिवास, ग्रामनिवास, इत्यादि विविध कार्यक्रमरूपानें

या शिक्षणाला महत्त्वाचें स्थान दिलेलें आहे. मुलांना व मुलींना निरनिराळे व्यायाम शिकविले जातात.

इटलींत साप्ताहिक दोन ते चार तास या शिक्षणाला आहेत. याशिवाय दोन वेळां मुख्य स्टेडियममध्यें सर्वांनीं व्यायामाला जावयाचें असतें. वर्षांतून एक आठवडयाचा वननिवासाचा कार्यक्रम असतो. शारीरिक वाढीच्या दृष्टीनें समाधानकारक प्रगति असल्याशिवाय विद्यार्थ्याला वरच्या वर्गांत घातलें जात नाहीं. ही परीक्षा ठराविक ठिकाणीं अधिकारी घेतात.

रशियांत तर शारीरिक शिक्षणाकडे सरकारचें फारच लक्ष आहे. साधा व्यायाम व खेळ यांचें शिक्षण शाळांत होतें. दुय्यम शाळांतील विद्यार्थ्यांना लष्करी शिक्षण आवश्यक असतें. याशिवाय वार्षिक मिरवणुकी (परेड) उत्सव इत्यादि मार्गांनीं या विषयाकडे लोकांचें लक्ष वेधलें जातें. विमानांत उंच जाऊन तेथून छत्रीचे साहाय्यानें खालीं उडया मारण्याचेंही शिक्षण विद्यार्थ्यांना दिलें जात आहे. लष्करी शिक्षणांतील हा एक भाग आहे.

फरान्समध्यें विद्याखात्यांत शारीरिक शिक्षणाकरितां स्वतंत्र अधिकारी आहे. त्याचे देखरेखीखालीं सर्व व्यवस्था होते. सारांश, साधें शारीरिक शिक्षण हें सर्वत्र आवश्यक आहे. लष्करी शिक्षणावर रशिया, जर्मनी व इटली या देशांचा विशेष जोर आहे.

## शाळांची फी

प्राथमिक शिक्षण सर्व देशांत सार्वत्रिक आणि मोफत असल्यामुळें फीचा प्रश्न फक्त दुय्यम शिक्षणांत उद्‌भवतो. अमेरिकेंत बालवर्गापासून विद्यापीठापर्यंत सर्व शिक्षण मोफत आहे. खाजगी संस्थांमधून निरनिराळ्या प्रमाणांत फी आहे. फरान्समध्यें १९३० पर्यंत दुय्यम शिक्षणाला फी होती परंतु ती हळुहळू कमी करण्यास प्रारंभ झाला. १९३३ पासून दुय्यम शिक्षणही सर्वत्र मोफत झालें आहे. मात्र निवडक विद्यार्थीच दुय्यम शाळांत दाखल करून घेतले जातात. प्रवेश परीक्षेंत ज्यांची निवड झाली नाहीं अशांना दुय्यम शाळेंत जावयाचें असेल तर मात्र फी द्यावी लागते.

जर्मनीमध्यें दुय्यम शिक्षणाला अंदाजें २५० मार्क (२५० ते ३०० रुपये) फी आहे. शेंकडा तीस विद्यार्थी नादार असतात. एकाद्या पालकाला

अनेक मुलें असलीं तर पहिल्या तीन मुलांना अनुक्रमें पूर्ण, पाऊण, व अर्धी फी असे ; चवथा मुलगा नादार घेतला जाई. आतां १९३६ मध्यें नवीन झालेल्या नियमाप्रमाणें पहिल्या दोन, तीन, चार किंवा पांच मुलांना अनुक्रमें शेंकडा २०, ४०, ५० किंवा ५५ इतकी सूट फीमध्यें दिली जाते. फीच्या उत्पन्नापैकीं एक चतुर्थांश भाग नादार विद्यार्थ्यांकरितां खर्च केला जातो.

इंग्लंडमध्यें दुय्यम शाळांतून कायद्यानें शेंकडा २५ नादारी ठेविलेल्या आहेत. प्रत्यक्ष व्यवहारांत ५०–६० पर्यंत नादारी दिल्या जातात. पालकाचें उत्पन्न आठवड्याचें तीन चार पौंड असल्यास पूर्ण नादारी मिळते. त्यापुढें उत्पन्नाप्रमाणें विद्यार्थी अर्धनादार किंवा दार ठेविले जातात. फी घेतली तर ती वार्षिक ९ पौंड ९ शिलिंग घ्यावी अशी विद्याखात्याची सूचना आहे. ही गरीब व मध्यम पालकांची सोय झाली. पब्लिक स्कूलमध्यें जाणारांना २००० ते ४००० रुपयांपर्यंत फी असते !

इटलीमध्यें दुय्यम शिक्षणाला वार्षिक १६० ते ३०० लिरा (१ लिरा म्हणजे ४ आणे) फी आहे. शिवाय प्रवेश फी, प्रवेश परीक्षा फी, इत्यादि फीचे अनेक प्रकार आहेत. शेंकडा ८० गुण मिळविणारांना नादारी व ७० गुण मिळविणारांना अर्धनादारी मिळते.

रशियांत अगदीं कमी उत्पन्नाच्या पालकांचे मुलांना फी माफ आहे. इतरांना उत्पन्नाचे प्रमाणांत कमी अधिक फी ठेविलेली आहे. सर्वांना एकाच आकाराची फी नाही.

## मुलामुलींचें सहशिक्षण

अमेरिका व रशियाखेरीज निर्भेळ सहशिक्षणाची प्रथा इतर देशांत नाहीं. अमेरिकेंतही कांहीं जुन्या शाळा व कॉलेजें आहेत, तेथें सहशिक्षण नाहीं. नवीन निघालेल्या संस्थांतून सहशिक्षण मान्य झालेलें आहे. रशियामध्यें सर्वत्र सहशिक्षणाचे तत्त्वाचा पुरस्कार केलेला आहे. अमेरिकेंत मुलामुलींना कांहीं अभ्यासक्रम स्वतंत्र ठेविले आहेत, तो भेदही रशियांत ठेविलेला नाहीं.

इंग्लंडमध्यें दोन्ही प्रकार आहेत. कांहीं शाळा सहशिक्षणाच्या आहेत तर कांहीं मुलांमुलींकरितां निरनिराळ्या आहेत. १९३१ मध्यें १३६७ हाय-

स्कलांपैकीं ३८२ मध्यें सहशिक्षण होतें, व ५०० मुलांच्या आणि ४८५ मुलींच्या अशा स्वतंत्र शाळा होत्या. आर्थिक परिस्थितीमुळें लहान गांवांतून मिश्र शाळा ठेवाव्या लागतात. शहरांत मुलामुलींच्या स्वतंत्र शाळा व स्वतंत्र कॉलेजें आहेत. स्वतंत्र आणि मिश्र शाळांत जाणाऱ्या मुलांचें प्रमाण ५ : २ असें आहे.

जर्मनीमध्यें सहशिक्षणाचें तत्त्वच मान्य नाहीं. मुलामुलींच्या प्राथमिक व दुय्यम शाळा अलग आहेत. अगदीं जरूरीच असेल तेथें विद्याखात्याचे, शिक्षकांचे, व पालकसंघाचे परवानगीनें मुलींना मुलांचे शाळेंत घेतलें जातें. ही संख्या शेंकडा ३ पेक्षां अधिक असतां कामा नये. कॉलेजमध्यें मुलींचें प्रमाण शेंकडा १० पर्यंत ठेविलें आहे. मुलींचा अभ्यासक्रमही स्वतंत्र असतो.

इटलीमध्येंही मुलींचेकरितां स्वतंत्र हायस्कूल व स्वतंत्र अभ्यासक्रम यांची योजना झालेली आहे. मुलींनीं उद्यागधंद्याचे क्षेत्रांत न पडतां गृहजीवनांत पडावें या हेतूनें अभ्यासक्रमाची आंखणी झालेली आहे.

फरान्समध्यें मुलांमुलींकरितां स्वतंत्र हायस्कूलें आहेत. कांहीं मुलींच्या शाळांतून अभ्यासक्रमही स्वतंत्रपणें आंखलेला आहे. अलीकडे मुलींच्या कांहीं शाळांत मुलांच्या अभ्यासक्रमाची व्यवस्था झालेली आहे.

स्वतंत्र व सहशिक्षणाचें आपापलें तत्त्व प्रत्येक राष्ट्र प्राथमिक शिक्षणांतही पाळतें. परंतु वरच्या शिक्षणाइतकें कडकपणें तें अंमलांत आणलें जात नाहीं. अलीकडे प्रत्येक देशांत ज्या प्रागतिक शाळा निघाल्या आहेत त्यांच्या अनेक प्रयोगविषयांपैकीं सहशिक्षण हा एक भाग आहे. इटली, फरान्स, जर्मनी हे देश सोडून दिले तर एकंदरींत प्रवृत्ति सहशिक्षणाकडे दिसते. परंतु समाजांत स्त्री–पुरुषांचे संबंध मोकळेपणाचे असतांनाही यूरोपियन देशांतून शिक्षणपुढारी अतिशय सावधपणें पाऊल टाकीत आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

## सक्तीच्या शिक्षणाची योजना

अमेरिकेंत आणि जर्मनींत सक्तीच्या शिक्षणाची अधिकाधिक मुदत आहे. अमेरिकेंत ६ ते १४ वयापर्यंत मुलांची संपूर्ण दिवस शाळेंत हजेरी

पाहिजे असते. कांहीं संस्थानांतून ही वयोमर्यादा १३ ते १५–१६ पर्यंतही आहे. हें वय पूर्ण होईपर्यंत कारखान्यांत काम करितां येत नाहीं. प्राथमिक शिक्षणाचीं आठ वर्षें झालीं म्हणजे मग ' नोकरीचा परवाना ' (वर्किंग पेपर्स) मिळतो. परंतु १४ ते १८ वयापर्यंत रात्रींच्या पुरवणी शाळेंत साप्ताहिक ६ ते ९ तास सक्तीनें जावें लागतें. अशाच प्रकारची पद्धति जर्मनीमध्येंही आहे, या दोन्ही देशांतील नागरिकांना ८ वर्षें पूर्ण शिक्षण आणि ३।४ वर्षें अंशतः शिक्षण मिळतें.

इंग्लंडमध्यें मुलाला ५ वे वर्षी शाळेंत घालून १४ वयापर्यंत ठेविलें पाहिजे असा कायदा आहे. कांहीं जिल्ह्यांतून ही मर्यादा १५ पर्यंतही आहे. या वयानंतर कारखान्यांत पूर्ण नोकरी धरतां येते. १५ ते १८ वयांतील पुरवणी शाळांची सार्वत्रिक सोय नसल्याकारणानें या शिक्षणाची सक्ति नाहीं. फिशर ॲक्टमध्यें ही योजना होती, पण ती अमलांत आली नाहीं. सुधारलेल्या राष्ट्रांत हा मोठा दोष समजला जातो. आज पुढारलेल्या राष्ट्रांत ६ ते १८ वयापर्यंत सक्तीच्या संपूर्ण शिक्षणाची व पुरवणी शिक्षणाची सोय असतांना इंग्लंडमध्यें मात्र फक्त ५ ते १४–१५ वयापर्यंत ही सोय आहे.

इटलीमध्यें ६ ते १४ हें सक्तीच्या शिक्षणाचें वय कायद्यानें आहे. पण याची पूर्ण अंमलबजावणी आर्थिक परिस्थितीमुळें होत नाहीं. बाराव्या वर्षानंतर मुलांना नोकरीधंदा करितां येतो. फरान्समध्यें सक्तीच्या शिक्षणाचें वय ६ ते १३ आहे.

रशियांत शहरामध्यें ८ ते १५ वयापर्यंत आणि खेड्यांत किंवा शेतावर ८ ते १२ अशी सक्तीच्या शिक्षणाची मर्यादा आहे. कालांतरानें सर्वत्र ८ ते १८ असें दहा वर्षांचें सक्तीचें शिक्षण करण्याचा रशियाचा विचार आहे.

इतर देश इतके पुढें जात असतांना हिंदुस्थानांत अद्याप ६ ते १० असें चार वर्षांचेंही सक्तीचें शिक्षण झालेलें नाहीं हें पाहून मनाला खंति वाटते.

## वर्गांतील मुलांची संख्या

अमेरिकेंत सार्वत्रिक शिक्षण असल्यानें सर्व समाजाचीं मुलें शाळेंत जातात. म्हणून शहरांतील शाळा अतिशय मोठ्या आहेत. परंतु खेड्यां-मध्यें ५०।१०० मुलांच्या लहान शाळाही पुष्कळ आहेत. सार्वत्रिक शिक्षणाचा

हा एक अपरिहार्य परिणाम आहे ही गोष्ट लक्षांत ठेवून लहान मोठ्या शाळांकडे पाहिलें पाहिजे. अमेरिकेंतील शाळांत प्रत्येक वर्गांत किती मुलें असावींत यासंबंधीं संशोधन करून अनेक प्रयोग झालेले आहेत. आज प्रत्येक संस्थानांत विविधता दिसून येते. साधारणपणें प्राथमिक व दुय्यम शाळेंत ३० ते ४० मुलें एकेका वर्गांत असतात.

इंग्लंडमध्यें विद्याखात्याची शिफारस अशी आहे कीं प्राथमिक शाळांचे वर्गांत ४० पर्यंत मुलें असावींत. प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहिली तर ही संख्या कमींत कमी २० व अधिकाधिक ६० पर्यंत जाते. लंडनमधील शाळांतही एकेक वर्गांत ५० मुलें आहेत. कांही कांहीं भागांतील शेंकडा वीस वर्गांत ५० पेक्षां अधिक मुलें आहेत. दुय्यम शिक्षणाच्या शाळेंतील वर्गांत ३० मुलें असावींत असा विद्याखात्याचा नियम आहे. दुय्यम शिक्षण सध्यां मर्यादित आहे. तें वाढल्यावर ही संख्या वाढविणें भाग पडेल असें वाटतें.

जर्मनीतील प्राथमिक वर्गांतून ४५ ते ५० मुलें असावींत अशी योजना आहे. १९२२ साली ही संख्या ८० पर्यंत गेलेली होती! १९३२।३३ मध्यें पूर्वप्रशिया प्रांतांतील १४० वर्गांत ६० पेक्षां अधिक मुलें होतीं आणि कांहीं वर्गांत तर ८०।९० पर्यंत संख्या गेलेली होती. दुय्यम शिक्षणाच्या शाळेंत पहिल्या तीन यत्तांत ५०, मधल्या तीन यत्तांत ४० व वरच्या तीन यत्तांतून ३० अशी परवानगी आहे. या संख्येमध्यें शेंकडा दहानें मागेंपुढें फरक झाला तरी चालतो.

इटलींतील प्राथमिक वर्गांत प्रत्येकीं ६० मुलें ठेवण्याची परवानगी आहे. दोन वर्षें साठपेक्षां अधिक मुलें आलीं तर दुसरा शिक्षक मिळतो किंवा त्या वर्गाचे दोन विभाग करून एकच शिक्षक निम्मानिम वेळ त्यांना शिकवितो. दुय्यम शिक्षणाचे शाळेंत प्रत्येक वर्गांत ३५ विद्यार्थी असतात. फरान्समध्यें दुय्यम शाळांचे वर्गांत ३०।३५ विद्यार्थी असतात व वरच्या वर्गांत ४० पर्यंत परवानगी आहे. इतिहास व विज्ञान अशा विषयांचे वर्ग ४५ ते ५० विद्यार्थ्यांचेही असले तरी चालतात.

प्रत्येक देशांत शहरांतील शाळा मोठ्या व भरपूर वर्गाच्या असल्यामुळें त्या एक वर्ग व एक शिक्षक अशी योजना करूं शकतात. परंतु शहरें सोडून आडगांवें पाहिलीं तर तेथें एकेका शिक्षकाचे हाताखालीं दोन, तीन, किंवा चार वर्ग

दिलेलेही आढळतात. चारी यत्तांच्या शाळेवर एकच शिक्षकाची योजना अशा प्रकारची व्यवस्था प्रत्येक देशांतील लहान लहान गांवांतील शाळांतून देखील आहे.

## शाळांच्या वेळा

बहुतेक देशांतून शाळा भरण्याची वेळ सकाळीं ८ किंवा ९ वाजतां असते. मुलें घरीं न्याहारी करून येतात. १२ चे सुमारास कोठें एक किंवा कोठें दोन तासांची सुटी असते. अमेरिकन शाळांत मधली सुटी एक तासाची असते. त्या वेळीं शाळेंतील भोजनगृहांत (कॅफिटेरियांत) मुलांना अगदीं थोड्या खर्चांत आरोग्याला हितावह असें भोजन व स्वच्छ दूध मिळतें. ९ ते १२, व १ ते ३ अशा साधारणपणें शाळेच्या वेळा असतात. शनिवारीं रविवारीं सुटी असते. प्राथमिक शाळेंत घरचे अभ्यास फारसे नसतात. इंग्लंडमध्यें विद्यार्थी व शिक्षक मधल्या सुटींत शक्य तर आपापल्या घरीं जातात. प्राथमिक शाळेंत गृहपाठ सहसा देत नाहीत. जर्मनींत सकाळीं ८ ला शाळा भरतात. मधल्या सुटींत विद्यार्थी घरीं जातात. रशियांत मधल्या वेळच्या खाण्याची व्यवस्था अमेरिकेप्रमाणें शाळेंतच केलेली असते. इटलीमध्यें नवीन नियम असा झाला आहे कीं प्राथमिक शिक्षणांतील खालचे वर्गाची शाळा तीन तासांपेक्षां अधिक ठेवूं नये.

## शारीरिक शिक्षा

बर्नार्ड शॉ रशियांत प्रवास करून परत आल्यावर तेथील शिक्षणांतील एक विशेष सुधारणा त्यानें इंग्लिश लोकांना सांगितली की, रशियानें आपल्या शाळांतून छडी किंवा शारीरिक शिक्षा अजीबात बंद केली आहे. अमेरिकेंतही शाळांतून शारीरिक शिक्षेला बंदी केलेली आहे.

जर्मनींत मध्यंतरीं ही शिक्षेची पद्धत बंद होती. परंतु नाझी कारकीर्द आल्यापासून एकदोन संस्थानांनी पुनः शारीरिक शिक्षेचें पुनरुज्जीवन केलें आहे.

इंग्लंडमध्यें प्राथमिक व दुय्यम शाळेंत छडीची परवानगी आहे. प्रत्येक मुलाला झालेल्या शिक्षेची नोंद त्याचे नांवापुढें करावयाची असते. परंतु पूर्वींपेक्षां शिक्षेचें प्रमाण कमी आहे. तसेंच शिक्षा देण्याचेही कांहीं नियम ठरले आहेत. छडीचा आकार काय असावा, गुन्हा झाल्यापासून किती वेळ

गेल्यानंतर शिक्षा करावी, कोणाचे समक्ष करावी इत्यादि नियम पाळून शिक्षा करावी लागते. १९३३ मध्यें एकदां मन्मथशायर येथील स्थानिक विद्याखात्यानें दोन शिक्षकांना छडीचा उपयोग केल्याबद्दल बडतर्फ केलें. त्याविरुद्ध शिक्षकसंघांनीं चळवळ करून त्या शिक्षकांना पुन: कामावर घेणें विद्याखात्यास भाग पाडलें व स्थानिक नियमांत दुरुस्ती करवून शिक्षेची परवानगी पुन: मिळविली !

## दुय्यम शिक्षणांतील गळती

दुय्यम शिक्षणाच्या संस्थांत दाखल झालेल्या विद्यार्थ्यांपैकीं किती विद्यार्थी शिक्षण पूर्ण करितात याचें संशोधन जीनीव्हा येथील , इंटरनॅशनल ब्यूरो ऑफ एज्युकेशननें केलेलें आहे. त्यांतील कांहीं आंकडे तुलनेचे दृष्टीनें दिलेले आहेत. दुय्यम शाळांत दाखल होऊन शिक्षण पूर्ण करणारांची शेंकडेवारी इंग्लंड १०, इटली ६५, जर्मनी ४०, व अमेरिका ३१ याप्रमाणें असते. इंग्लंडमध्यें प्रथम व द्वितीय अशा दोन परीक्षा असतात. प्रथम परीक्षा झाल्यावर पुष्कळ विद्यार्थी शिक्षण सोडतात. म्हणून वर दिलेला आंकडा लहान दिसतो. अखेर परीक्षेंत पास होणारांचें प्रमाण शेंकडा ७०।७५ असें असतें.

## वार्षिक हजेरीचे दिवस

वर्षांकांठीं शाळा किती दिवस भरते त्याचें प्रमाण प्रत्येक देशांत थोडें फार मागेंपुढें आहे. पुढील तुलनात्मक कोष्टकावरून त्याची कल्पना येईल.

| देश | प्राथमिक शाळा | दुय्यम शाळा |
|---|---|---|
| इंग्लंड | २००–२१० | १९५ |
| फरान्स | २०० | १८८ |
| जर्मनी | २२८ | २२५ |
| इटली | १८० | १९५ |
| अमेरिका | १७१ | – |
| हिंदुस्थान | | |
| बंगाल | २२८ | २२८ |
| मुंबई | २१०–२२० | १८० |
| मद्रास | १८० | १५० |
| सं. प्रांत | २१५ | २१५ |

जर्मनींत व बंगालमध्यें शाळेचें वर्ष अधिकाधिक मोठें म्हणजे २२५ते २२८ दिवसांपर्यंत दिसतें.

## क्रमिक पुस्तकांची मोफत सोय

पाश्चिमात्य देशांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें व सार्वत्रिक झाल्यानंतर लगेच पुढचा खर्चाचा प्रश्न आला. गरिबांची शिक्षणाची सोय झाली पण त्यांनी पुस्तकें कोठून आणावीत ? म्हणून अनेक देशांत पुस्तकांचीही सोय प्राथमिक शाळेकडूनच मोफत करण्यात आलेली आहे.

अमेरिकेमध्ये सर्व प्राथमिक शाळांतून पुस्तकें मोफत पुरविली जातात. हा नियम अद्याप दुय्यम शिक्षणाच्या शाळाना मात्र सर्वत्र लागू नाही. कांहीं संस्थानांत आणि शहरांत दुय्यम शाळांनीही मोफत क्रमिक पुस्तकें देण्यास प्रारंभ केलेला आहे.

रशियामध्यें मुलांचेकडून पुस्तकांकरितां एकदम थोडी रक्कम घेतली जाते व मग शाळेकडूनच सर्व पुस्तके पुरविली जातात. त्याच पुस्तकांचा उपयोग पुढच्या वर्षाचे मुलांकरितां केला जातो. पुस्तकें काळजीपूर्वक वापरली जावींत याकरितां देखरेख ठेवण्याचें काम विद्यार्थ्यांपैकीच कांहीं नेमलेले अधिकारी व संघ करितात.

इंग्लंडमध्यें सार्वजनिक (कौन्सिलच्या) शाळा मोफत पुस्तकें पुरवितात. हीं पुस्तकें शाळेंतच ठेविलीं जातात. त्यामुळें त्याचे आयुष्य वाढतें व ती अधिक मुलांना उपयोगी पडतात. प्राथमिक शाळेंतील मुलाना फारसे गृहपाठ नसल्यानें त्यांचें पुस्तकांवाचून अडत नाही.

फरान्समध्यें प्रत्येक पालकाला मुलाकरितां पुस्तके विकत घ्यावी लागतात. आवश्यक अशा किमान पुस्तकांची यादी विद्याखातें प्रसिद्ध करतें. तीं पुस्तकें मुलाजवळ नसल्यास शाळेंत बसतां येत नाही.

जर्मनींत विद्यार्थी आपापली क्रमिक पुस्तकें व साहित्यसामुग्री स्वखर्चानें विकत घेतात. गरीब विद्यार्थ्यांना पुस्तकें मोफत पुरविण्याकरितां शाळेंत किंवा बाहेर इतर संस्था असतात. त्याचप्रमाणें इटलीतही विद्यार्थी स्वतः पुस्तकें विकत घेतात. गरीब मुलांना वापरण्यापुरतीं पुस्तकें मिळण्याची सोय आहे.

देशाची आर्थिक ऐपत असेल तर मोफत क्रमिक पुस्तकें पुरविणें आणि अगदीं गरीब मुलांना पोटगीवृत्ति देणें यांचा समावेश सार्वत्रिक शिक्षणांत

केला जातो. इंग्लंड व फ्रान्स या देशांमध्यें गरीब व हुषार विद्यार्थ्यांना पोटगी देण्याची पद्धति आहे.

### खाजगी शिकवण्या व वर्ग

इंग्लंडमध्यें व अमेरिकेंत खाजगी शिक्षकांवर फारसें नियंत्रण दिसत नाहीं. जर्मनींत मात्र खाजगी शिकवणी करणाराला सरकारी परवानगी लागते. कोणत्याही कारणाकरितां नोकरीवरून कमी झालेल्या शिक्षकाला खाजगी शिकवण्या करितां येत नाहींत. सरकारी परवानगीची जाहिरात करून शिकविण्या मिळविणें अयोग्य समजलें जातें. खाजगी शाळा किंवा वर्ग काढण्यालाही परवानगी लागते. एकाद्या विशिष्ट सामाजिक किंवा आर्थिक वर्गाकरितां स्वतंत्र शाळा काढतां येत नाहीं. जरूरच असेल तेथें सर्व मुलांकरितां शाळा काढण्याची परवानगी मिळते. परंतु खाजगी शाळांवर सरकारी शाळेइतकेंच नियंत्रण असतें. खाजगी शाळांत शिक्षकांना सरकारी नोकरांचाच दर्जा असतो. सारांश, शिक्षण ही सर्वस्वी सरकारी बाब समजली जाते. इंग्लंडमध्यें अगदीं उलट आहे.

फ्रान्समध्यें शिक्षण ही सरकारी बाब असली तरी जर्मनीसारखें नियंत्रण खाजगी शाळांवर नाहीं. प्रारंभीं परवानगी वगैरे लागते. पण अंतस्थ बाबतींत शाळांना स्वातंत्र्य असतें. शिक्षकांना खाजगी शिकवण्या करितां येतात. इटलीमध्येंही प्रत्येक शिक्षकाला फक्त एक तासपर्यंत खाजगी शिकवण्या करण्याची सरकारी परवानगी आहे. खाजगी शाळांना उत्तेजन दिलें जातें, पण त्यांचेवर पूर्ण सरकारी नियंत्रण असतें.

## *परीक्षापद्धती व वर्गसंक्रमण*

### अमेरिका

अमेरिकेंत दर सहा महिन्यांनीं म्हणजे वर्षांतून दोन वेळां वर्गसंक्रमण (प्रमोशन्) होतें. कांहीं ठिकाणीं तर तीन महिन्यांनीं होतें आणि कांहीं थोड्या शाळांतून मुलाच्या प्रगतीप्रमाणें तो न थांबतां वर जातो किंवा मंद गतीनें सावकाशपणें शिक्षण पूर्ण करितो. सारांश, प्रत्येक मुलाच्या कमाल प्रगतीला वाव आहे, बंधन नाहीं.

परीक्षेकरितां अमेरिकेंत निबंधात्मक प्रश्नपत्रिकांपेक्षां व्यक्तिनिरपेक्ष कसोटयांचा (ऑब्‌जेक्टिव्ह टेस्ट्‌स्) उपयोग अधिक प्रमाणांत केला जातो. प्रत्येक संस्थानांतील विद्याखात्यांनीं या कसोटया तयार करण्याकरितां स्वतंत्र शाखा निर्माण केलेल्या आहेत. शिक्षकाच्या किंवा परीक्षकाच्या वैयक्तिक लहरीवर मुलाचें भवितव्य अवलंबून राहूं नये हा या नवीन पद्धतींचा उद्देश आहे.

कांहीं ठिकाणीं या कसोट्या, निबंधात्मक जुन्या पद्धतीच्या परीक्षा, आणि मुलानें वर्षभर केलेला अभ्यास या तिन्ही गोष्टी जमेस धरून त्याच्या प्रगतीचें मापन केलें जातें. प्रत्येक शाळेंत विद्यार्थ्यांची सार्वांगिक प्रगति नोंदवून ठेवण्याची पद्धतशीर व्यवस्था असते. मुलगा वरच्या वर्गांत किंवा दुसऱ्या शाळेंत जातांना ही पूर्वप्रगतीची नोंद त्याच्या बरोबर दिली जाते.

## इंग्लंड

इंग्लंडमध्यें सध्यां जुन्या परीक्षा पद्धतीवर फारच टीका होत आहे. या विषयावर बरेंच संशोधनात्मक वाङ्मय निर्माण झालें असून परीक्षा या विश्वासार्ह आहेत किंवा नाहींत या दृष्टीनें पुष्कळ ऊहापोह चालला आहे.

प्राथमिक शाळेंत वार्षिक परीक्षा मुख्य अध्यापकच घेतात. प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यानंतर मात्र दुय्यम शाळेंत जाऊं इच्छिणाऱ्या किंवा नादारी मिळवूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां सांघिक बाह्य परीक्षा (एक्स्टर्नल मास एक्झामिनेशन्) होते. या परीक्षेंतही केवळ लेखी प्रश्नपत्रिकांवरून निकाल होत नाहीं; त्यांचे जोडीला बौद्धिक कसोट्या (इंटेलिजन्स टेस्टस्) व विद्यार्थ्याच्या वार्षिक प्रगतीची नोंद जमेस धरून अखेर निर्णय दिला जातो. ही दुसरी मिश्र पद्धति विशेष प्रचारांत येत आहे.

दुय्यम शाळांत मात्र जुन्या पद्धतीच्याच परीक्षा आहेत. हायस्कूलच्या प्रथम व द्वितीय परीक्षा विद्यापीठांकडून किंवा विद्यापीठसंघांकडून घेतल्या जातात. अशा आठ प्रकारच्या परीक्षक संस्था इंग्लंडमध्यें आहेत. त्यांचे निकाल शेंकडा ६० चे वर असतात. १९३१ मध्यें ते शेंकडा ६७ ते ६९ याप्रमाणें होते.

## फरान्स

फरान्समध्यें प्राथमिक शाळेंतील वार्षिक निकाल विद्यार्थ्यांचे प्रगतिपत्रकांतील नोंद जमेस धरून वर्गशिक्षक व मुख्य अध्यापक हेच लावतात. वार्षिक परीक्षा नाहींत. प्राथमिक शिक्षणाच्या अखेर वर्गाची मात्र बाह्य-परीक्षा होते, व यशस्वी उमेदवारांना प्राथमिक शिक्षणाचा दाखला दिला जातो. या परीक्षा प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणीं सामुदायिक रीतीनें होतात. त्यांत तोंडी व लेखी असे दोन विभाग असतात. सामान्यपणें शेंकडा ८० चे सुमारास विद्यार्थी पास होतात. या परीक्षेकरितां मुलें घोकंपट्टी फार करितात अशी तिकडेही तक्रार आहे.

दुय्यम शाळांच्या अखेरवर्गाची परीक्षा विद्याखात्याकडून घेतली जाते. लेखी व तोंडी परीक्षा अत्यंत कसोशीनें होते. अखेर निकाल लावतांना मुलाच्या वार्षिक अभ्यासाची नोंद जमेस धरली जाते.

## इटली

इटली व फरान्स या देशांच्या शिक्षणांत पुष्कळ साम्य आढळतें. इटलींत प्राथमिक शाळेंत दरवर्षी परीक्षा होते आणि अखेर निकालाचे वेळीं वार्षिक प्रगतीची नोंद लक्षांत घेतली जाते. प्राथमिक व दुय्यम शाळांच्या अखेर परीक्षा फरान्सप्रमाणेंच लेखी व तोंडी अशा दोन विभागांत होतात.

## जर्मनी

जर्मनी आणि रशिया या देशांनीं मात्र जुन्या परीक्षापद्धतींत सुधारणा केली आहे.

जर्मनीनें प्राथमिक शाळांतील वार्षिक व अखेर परीक्षा कमी केलेल्या आहेत. वर्गशिक्षकाच्या शिफारशीनें आणि शिक्षकमंडळाच्या सल्ल्यानें वार्षिक निकाल लावले जातात. त्याच पद्धतीनें अखेर यत्तांचाही निकाल लावला जातो व शाळेचा दाखला मुलाला मुख्य अध्यापकाकडून मिळतो. तो दाखवून दुय्यम शाळेंत प्रवेश मिळवितां येतो.

दुय्यम शाळा नवीन विद्यार्थी दाखल करितांना प्राथमिक शाळेचा दाखला पाहून प्रवेश देतात. कांहीं शाळा मुलांची पुन: परीक्षा घेतात. त्यांत

लेखी परीक्षा, बौद्धिक कसोट्या. आणि वार्षिक प्रगतीची नोंद या तिन्ही गोष्टी जमेस धरून अखेर निकाल लावला जातो.

दुय्यम शाळांत वार्षिक परीक्षा होत नाहींत. वर्गशिक्षक व मुख्य अध्यापक मुलाची वार्षिक अभ्यासाची नोंद जमेस धरून अखेर निकाल जाहीर करितात. दोनदां लागोपाठ नापास होणाराला शाळा सोडावी लागते. त्यापूर्वी तीन महिने शाळेनें सावधगिरीची सूचना द्यावयाची असते. दुय्यम शाळेची अखेर परीक्षा घेण्याकरितां विद्याखात्याचा प्रतिनिधि, वर्गशिक्षक, व मुख्य अध्यापक अशा तिघांचें एक मंडळ नेमलें जातें. त्यांचेपुढें प्रत्येक मुलाच्या सार्वांगिक प्रगतीची नोंद असते. बौद्धिक प्रगति, शारीरिक व्यायामाची व खेळांची हौस, अभ्यासेतर कार्यक्रमांत पुढाकार घेण्याचा उत्साह व इतर विशेष गुण हे जमेला धरले जातात. विद्यार्थ्यानें लिहिलेल्या निबंधांची पाहणी होते. विशेष अभ्यास करून एकादा उत्कृष्ट निबंध लिहिलेला असेल तर लेखी परीक्षेंत मुलाला सूट मिळते.

अखेरपरीक्षा लेखी व तोंडी होते. वर्गशिक्षक लेखी परीक्षेचे अनेक प्रश्न काढून विद्याखात्याकडे पाठवितात. त्यांतील कांही थोडे प्रश्न मान्य होऊन परत येतात ते मुलांना लिहावे लागतात. अनेक प्रश्न घालून मुलाच्या ज्ञानसंग्रहाची परीक्षा घेण्यापेक्षां थोडेच प्रश्न लिहावयास सांगून त्याच्या बुद्धीची परिपक्वता पाहण्याचा परीक्षकांचा उद्देश असतो. कांहीं उत्तरपत्रिका तर चारपांच पानांच्याच असतात, व प्रश्नपत्रिकेंत दोनतीन प्रश्नच घातले जातात. सारांश, संख्येपेक्षां व संग्रहापेक्षां गुणाकडे विशेष लक्ष दिलें जातें. विद्यार्थ्यानें ज्या विषयाचा विशेष अभ्यास केला असेल त्या विषयांत त्याची तोंडी परीक्षा होते. त्यांतही माहितीपेक्षां विचार करण्याची व ते स्पष्टपणें मांडण्याची पात्रता या गुणांना अधिक महत्त्व दिलें जातें.

रशियानें जर्मनीचेंच अनुकरण केलेलें आहे असें दिसतें. परीक्षा घेण्याकरितां विद्याखात्याचा एक प्रतिनिधि, पालकांच्या संघाचा एक प्रतिनिधि, व मुख्य अध्यापक यांचे मंडळादेखत वर्गशिक्षक मुलांची परीक्षा घेतो. परीक्षेंत माहितीच्या संग्रहापेक्षां बुद्धीची परिपक्वता पाहण्याकडे विशेष दृष्टि असते.

## आदर्श परीक्षापद्धती

जुन्या परीक्षापद्धती अत्यंत सदोष, अविश्वसनीय, आणि मानसिक दृष्टीनें अनिष्ट आहेत, याविषयीं आतां सर्व देशांतील विचारी शिक्षणतज्ज्ञांचें एकमत झालेलें आहे. परंतु बुद्धीचें आणि अभ्यासाचें मापन करण्याकरितां कांहीं तरी साधन जरूर पाहिजे. त्याकरितां अमेरिकेनें बौद्धिक व अभ्यासिक (इंटेलिजन्स अँड अकॉम्प्लिशमेंट) कसोट्यांवर भर दिलेला आहे. त्यामुळें परीक्षकाची वैयक्तिक पक्षपाती दृष्टि कमी होते, पण मुलांच्या ठिकाणीं केवळ माहिती स्मरणांत ठेवण्याची प्रवृत्ति वाढते. मनाच्या इतर शक्तींचा उपयोग होत नाहीं. म्हणून वार्षिक अभ्यासाची नोंदही जमेस धरावी अशी प्रथा पडूं लागली आहे. इंग्लंडमध्यें जुन्या परीक्षा, नव्या कसोट्या, आणि वार्षिक नोंद या तिन्हींचा उपयोग करून घेण्याचें धोरण वाढत्या प्रमाणांत आहे. परंतु लेखी परीक्षेंत फारशी सुधारणा झालेली नाहीं. जर्मनीनें मात्र या सर्व अनुभवांचा उपयोग करून परीक्षापद्धतीमधील दोष टाळले आहेत. जर्मनीनें सांघिक बाह्य परीक्षा नाहींशा केल्या ही फार मोठी सुधारणा आहे. हजारो विद्यार्थ्यांना एकाच मापनपट्टीनें मोजणें हें अत्यंत शास्त्रविरुद्ध आहे. परंतु यूरोपमध्यें अद्याप याच पद्धतीचा जारी अंमल आहे. लेखी परीक्षेचें यांत्रिक स्वरूप जर्मनीनें नाहीसें केलें असून वैयक्तिक गुणप्रकटीकरणाला पुष्कळ वाव ठेविला आहे. परीक्षकमंडळांत वर्गशिक्षक व मुख्य अध्यापक यांचा समावेश होत असल्यामुळें या परीक्षेला माणुसकीचें स्वरूप येतें. परीक्षा म्हणजे कसाई-खाना ही कल्पना जर्मनीनें काढून टाकली आहे. तोंडी परीक्षेमुळें विद्यार्थ्यांच्या खऱ्या गुणांची पारख होण्याची संधि राहते. लेखी व तोंडी परीक्षेबरोबर विद्यार्थ्यांच्या वर्षभर झालेल्या सार्वांगिक वाढीची नोंद जमेस धरल्यामुळें वर्षभर झोंपा काढून अखेर अभ्यासाची घाई करण्याची विद्यार्थ्यांची प्रवृत्ति कमी करण्याचा प्रयत्न झालेला आहे.

इंग्लंड, इटली, आणि फरान्स या देशांत मात्र अद्याप जुन्या परीक्षा-पद्धतीचा मोह सुटल्यासारखा दिसत नाहीं. अमेरिका आणि जर्मनी या दोन देशांतील पद्धतींचें मिश्रण केल्यास आदर्श परीक्षापद्धति निर्माण करितां येईल.

## प्रकरण चोविसावें

# शिक्षकांचा आर्थिक व सामाजिक दर्जा

### शिक्षक व्यवसायाचा इतिहास

यूरोप अमेरिकेंतील शिक्षकांनीं स्वतःच्या प्रयत्नांनीं आपला दर्जा वाढवून घेतलेला आहे. शिक्षकांच्या व्यवसायाचा इतिहास पाहिला तर त्यांत चढउतार झाल्यासारखा दिसतो. शिक्षण प्रारंभीं धर्मपीठाचे (चर्चचे) हातांमध्यें होतें. सर्व शिक्षणालाच धार्मिक स्वरूप होतें. त्यामुळें जो मान धर्माला मिळे तोच या शिक्षकांनाही मिळत असे. पुढें हळुहळू राजसत्तेनें धर्मपीठांचें बंधन तोडून टाकलें व राज्यव्यवस्था ऐहिक स्वरूपाची (सेक्युलर) केली. त्याबरोबर शिक्षणाचेंही धार्मिक स्वरूप पालटून तें पूर्ण किंवा अंशतः ऐहिक होऊं लागलें. फरान्स, अमेरिका व रशिया या देशांतील शिक्षण-पद्धतींनीं धर्माशीं संबंध तोडून टाकला आहे, इंग्लंड व जर्मनीनें तो अंशतः ठेविला आहे. इटालियन शिक्षणावर धर्मपीठाचा चांगला पगडा आहे. सारांश, बहुतेक देशांत शिक्षणाचें धार्मिक स्वरूप जाऊन तें ऐहिक झालें त्या-बरोबर धर्माच्या अनुषंगानें शिक्षकांना मिळणारा सन्मान व दर्जा हळुहळू नाहींसा झाला. याच सुमारास शिक्षणाचें क्षेत्रही खूप मोठें झालें. पूर्वीं समाजांतील मूठभर मुलें शिक्षण घेत ; आतां सर्व बालसमाज शाळेंत जाऊं लागला, त्यामुळें शिक्षकांचीही संख्या वाढली. गरिबांचे मुलांना स्वस्तांत शिक्षण देणें जरूर होतें. म्हणून या शिक्षकांनाही प्रारंभीं बेतावाताचेच पगार मिळत. म्हणून आर्थिक स्थितीमुळें जो दर्जा मिळावा तोही शिक्षकांना मिळत नसे. एक वेळ अशी होती कीं सामान्य मजूरांना जी प्राप्ति होत असे तेवढीच किंवा थोडी आगेमागें शिक्षकांची आर्थिक प्राप्ति असे. त्या कारणानें समाजांत शिक्षकांना मजुरांपेक्षां फारसा उच्च दर्जा नव्हता.

### पाश्चात्य व हिंदी शिक्षकांचा दर्जा

शिक्षकवर्गाची संख्या हळुहळू वाढली तसतशी त्यांची संघटना होऊं लागली. आपल्या परिस्थितीची जाणीव त्यांना झाली. आपला दर्जा काय

असावा व आहे ही गोष्ट त्यांचे लक्षांत आली. त्यामुळें संघटित रीत्या त्यांनीं चळवळ केली, आणि स्वतःचा आर्थिक, सामाजिक, आणि शैक्षणिक दर्जा वाढवून घेतला.

हिंदुस्थानांतील शिक्षकांचा दर्जाही आज फार कमी प्रकारचा आहे. पाश्चात्य शिक्षकांनीं संघटित रीत्या आपली स्थिति कशी सुधारली आहे याचें निरीक्षण करून स्वतःचाही शैक्षणिक आणि सामाजिक दर्जा त्यांनीं वाढविला पाहिजे. 'शिक्षणाचें पवित्र काम' आपण करीत आहोंत एवढ्यावरच समाधान न मानतां हें पावित्र्य समाजाला पटवून दिलें पाहिजे, आणि त्याला अनुरूप असा दर्जा मिळविला पाहिजे. ज्या 'मास्तर' ला पूर्वींच्या 'तात्या पंतोजी' इतक्या आदरानें, किंवा अनादरानें, समाज वागवितो त्याचेविषयीं विद्यार्थ्यांना तरी काय आदर वाटेल ?

इतर देशांतील शिक्षकांची स्थिति सुधारण्याला जीं अनेक कारणें झालीं त्यांत मुख्य हें कारण आहे कीं शिक्षकांनीं आपला शैक्षणिक दर्जा वाढविला. पाश्चात्य देशांतील प्राथमिक व दुय्यम शाळांत शिकविणाऱ्या शिक्षकांचे पूर्वशिक्षणाची इकडील शिक्षकांच्या पूर्वशिक्षणाशीं तुलना केली म्हणजे ही वस्तुस्थिति लक्षांत येईल.

## अमेरिकन शिक्षकांचा शैक्षणिक दर्जा

अमेरिकेंतील प्राथमिक शिक्षणाचा शैक्षणिक दर्जा हळुहळू वाढत आहे. ह्या देश हिंदुस्थानच्या दुप्पट आहे, आणि त्याची लोकसंख्या अंदाजें तेरा कोटी आहे. त्यांत अनेक संस्थानें आहेत. त्यामुळें प्रत्येक ठिकाणचे नियम व पद्धती निराळ्या आहेत. सर्व प्रकारची विविधता तेथें आढळून येते. कांहीं ठिकाणीं दुय्यम शिक्षण झालेले शिक्षक दिसतील, तर कोठें पीएच. डी. ची पदवी घेऊन प्राथमिक शिक्षकाचें व बालोद्यान वर्गांचें काम हौसेनें करणारे शिक्षकही दिसून येतील. सर्वसामान्यपणें असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं बहुतेक प्राथमिक शिक्षकांचें प्राथमिक व दुय्यम मिळून बारा वर्षांचें पूर्व-शिक्षण झालेलें असतें, आणि त्यानंतर दोन, तीन किंवा चार वर्षें त्यांनीं शिक्षक-विद्यालयांत (नॉर्मल स्कूल व ट्रेनिंग कॉलेज) किंवा विद्यापीठांत घालविलेलीं असतात. शहरांत शिकविणाऱ्या बहुतेक शिक्षकांचें दुय्यम

शिक्षणानंतर दोन चार वर्षे तरी अध्यापन–व्यवसायाचें शिक्षण झालेलें असतें. अशा रीतीनें कामाला लागण्यापूर्वी शिक्षकाचें एकूण शिक्षण चौदा ते सोळा किंवा अधिक वर्षांचें होतें. प्रत्येक संस्थानांत हळूहळू अधिकाधिक उच्च शिक्षणाचा दर्जा असलेल्या शिक्षकांची मागणी होऊं लागलेली आहे. प्रत्येक विद्यापीठांत अध्यापनशास्त्राचें शिक्षण दिलें जातें. वाङमय, विज्ञान वगैरे विषय घेऊन त्याचेबरोबर अध्यापनशास्त्राचें शिक्षण घेणारांना विद्यापीठाची पदवी मिळते व शिक्षक म्हणून बाहेर काम करितां येतें.

शिक्षक–विद्यालयांतील किंवा महाविद्यालयांतील अभ्यासक्रमाचे तीन भाग पडतात. वाङमय, इतिहास, गणित इत्यादि विषय, अध्यापनशास्त्रांतील विषय, आणि प्रत्यक्ष निरीक्षण व अनुभव. अध्यापन शास्त्रांत–शिक्षणशास्त्र, अध्यापनपद्धती, बालमानसशास्त्र, शिक्षणाचा इतिहास, अध्यापनकला इत्यादि विषयांचा समावेश होतो.

शिक्षणशास्त्राचें एकदांच शिक्षण घेऊन भागत नाहीं. सालोसालची पगारवाढ शिक्षकाच्या अध्यापनविषयक ज्ञानावर अवलंबून असते. म्हणून प्रत्येक शिक्षक उन्हाळ्याच्या सुटींत मोठमोठ्या विद्यापीठांत अध्यापनशास्त्राचे निरनिराळे अभ्यासक्रम (कोर्सेस) घेत असतात. कांहीं संस्थानांतून या हेतूनें सप्तवार्षिक रजा (सॅबॅटिकल् लीव्ह) दिली जाते. शिक्षकांनीं मोठ्या विद्यापीठांत जाऊन अभ्यास करावा, किंवा प्रवास करून प्रत्यक्ष निरीक्षणानें आपलें ज्ञान वाढवावें असा या रजेचा उद्देश असतो.

दुय्यम संस्थांत काम करणाऱ्या शिक्षकांनीं अध्यापन विषय घेऊन बी. ए. किंवा एम्. ए. ही पदवी घेतलेली असते. यांत दोन प्रकार आहेत. कांहीं शिक्षक विद्यापीठांतील इतर विषयांबरोबरच अध्यापनशास्त्र हा एक विषय घेऊन बी. ए. पदवी घेतात. कांहीं शिक्षक केवळ वाङमयात्मक किंवा विज्ञानात्मक अशा बौद्धिक विषयांत प्रथम बी. ए. ची पदवी घेतात आणि नंतर केवळ अध्यापन व शिक्षणशास्त्र हा विषय घेऊन पुढें एम्. ए. किंवा पीएच्. डी. च्या पदव्यांकरितां अभ्यास करितात. दुय्यम शिक्षकांची संख्या अलीकडेच अधिक वाढल्यामुळें अद्याप सर्वच शिक्षकांचें इतकें शिक्षण झालेलें नाहीं. तरी पण सर्वसामान्य शहरांतून एम्. ए. ची पदवी घेतलेले शिक्षक नेमण्याकडे अधिकाधिक प्रवृत्ति आहे.

अगदीं खेड्यापाड्यांतून फार लहान हायस्कूलें आहेत तेथें अद्याप शिक्षक मिळण्याची अडचण पडते. त्या ठिकाणीं मात्र कमी शिकलेल्या शिक्षकांची योजना होते. परंतु सामान्यपणें दुय्यम शाळांतून विद्यापीठाची दुहेरी पदवी (डबल डिग्री) असलेले शिक्षक नेमण्याकडे प्रवृत्ति आहे.

## रशियांतील कामकरी शिक्षक

रशियांतील शिक्षणपद्धति नवीनच स्थापन झाली आहे. तिचें ध्येय नवीन असल्यामुळें स्वतंत्र पद्धतीनें शिक्षक तयार करणें जरूर आहे. जुने शिक्षक साधे विषय शिकवूं शकतील, परंतु ते समाजवादी शिक्षणांतील मुख्य ध्येय मुलांचे मनावर पटवूं शकणार नाहीत. राजकीय क्रांति होऊन नवीन समाजपद्धति अस्तित्वांत आल्यानंतर जुन्या राजवटींतील शिक्षकांनीं विशेष मनोभावानें काम केलें नाहीं; संप वगैरे करून अडथळा आणण्याचा प्रयत्न केला. म्हणून हळुहळू जुने शिक्षक काढून त्यांचे जागीं कामकरी वर्गांतूनच निर्माण झालेले शिक्षक नेमणें हें रशियानें धोरण ठेविलें. हा वर्ग नुकताच शिक्षणक्षेत्रांत पडलेला असल्यामुळें ज्ञान व विद्वत्ता या दृष्टीनें अद्याप त्याची वाढ व्हावयाची आहे. अशा परिस्थितीत शिक्षकांचें अधिकाधिक शिक्षण करण्याचा रशियाचा प्रयत्न चालला आहे.

प्राथमिक चार वर्षे व दुय्यम तीन वर्षे शिक्षण झाल्यानंतर अध्यापन विद्यालयांत (पेडॅगॉजिकल् टेकनिकम्) चार वर्षांचा अभ्यासक्रम उमेदवार शिक्षकांना घ्यावा लागतो. त्यानंतर प्राथमिक शाळांत शिक्षकाचें काम करितां येतें. दुय्यम शाळांत काम करूं इच्छिणारांना प्राथमिक शिक्षणानंतर दुय्यम शिक्षण सहा वर्षे घ्यावें लागतें; नंतर अध्यापनमहाविद्यालयांत (पेडॅगॉजिकल् ॲकॅडेमी) प्रवेश मिळतो. या ठिकाणीं चार वर्षांचा अभ्यासक्रम पूर्ण झाल्यावर दुय्यम शाळांत काम करितां येतें. याप्रमाणें प्राथमिक शिक्षकाचें एकूण अकरा वर्षें व दुय्यम शिक्षकाचें चौदा वर्षें असें शिक्षण होतें.

शिक्षणविद्यालयांतील किंवा महाविद्यालयांतील अभ्यासक्रमांत तीन विभाग असतात—शिक्षणशास्त्र व अध्यापनकला; समाजशास्त्रें, राजकारण, अर्थशास्त्र इत्यादि बौद्धिक व राजकीय विषय; आणि औद्योगिक जीवनाचा प्रत्यक्ष कारखान्यांतील काम करून अनुभव. इतर देशांतील शिक्षकांपेक्षां

रशियांतील शिक्षकाचे पूर्वतयारींत राजकारण आणि औद्योगिक काम हे अभ्यासक्रम विशेष आहेत. समाजवादी विचारसरणीचा पद्धतशीर अभ्यास शिक्षकानें केला पाहिजे. त्याचप्रमाणें अनेक कारखान्यांत आणि शेतावर कामें करून उत्पादनक्रियेच्या विविध पद्धतींचा अनुभव त्याला दिला जातो. बहुजन समाजाचें जें आर्थिक व औद्योगिक जीवन आहे त्याचा प्रत्यक्ष अनुभव मिळाल्याशिवाय मनुष्य खरा शिक्षक होऊं शकणार नाहीं व झाला तर तो नुसता पोषाखी राहील. त्यामुळें त्याच्या उदाहरणानें विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं देखील हा पोषाखीपणा उतरेल, व ते शारीरिक कष्ट कमी प्रकारचे मानूं लागतील. इतर देशांतील शिक्षकांत व रशियाचे शिक्षकांत शिक्षणाचे व अनुभवाचे दृष्टीनें असलेला हा फरक लक्षांत ठेवणें जरूर आहे. एकाचें शिक्षण केवळ शाळेच्या आवारांत होतें; तर दुसऱ्याचें शिक्षण शाळेंत होऊन शिवाय समाजांत, जेथें लोक निढळाचा घाम काढून काम करीत असतात त्या ठिकाणींही होतें. जीवनाकडे आणि समाजाकडे पाहण्याच्या दृष्टीमध्यें या शिक्षणामुळें फरक पडतो. या दृष्टीभेदामुळें शिक्षकाकडून विद्यार्थ्याला जें ज्ञान मिळतें त्यांतही स्वाभाविकपणें अंतर पडतें.

## इंग्लंडमधील शिक्षक-विद्यालयें

प्राथमिक शिक्षकांचा शैक्षणिक दर्जा वाढत असल्यामुळें हळुहळू प्राथमिक व दुय्यम शिक्षक यांतील अंतर कमी होत आहे ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. अमेरिकेंतील कांहीं शहरांत प्राथमिक व दुय्यम शिक्षकांना पगाराचें प्रमाण सारखेंच आहे. दोन्ही प्रकारच्या शिक्षकांच्या संघटनाही एकच आहेत., इंग्लंड, जर्मनी इत्यादि देशांतही शिक्षणामुळें या दोन्ही विभागांतील शिक्षकांत बरीच समता येऊं लागलेली आहे.

इंग्लंडमध्यें प्राथमिक शिक्षकाचें किमान शिक्षण प्राथमिक सहा यत्ता, दुय्यम पांच यत्ता आणि त्यानंतर व्यावसायिक शिक्षण दोनतीन किंवा चार वर्षें इतकें झालेलें असतें. अगदीं थोडया शिक्षकांना लहान खेडयांतून दुय्यम पांच यत्ता झाल्यावर शिकविण्याची परवानगी मिळते. परंतु सामान्यपणें बहुतेकांचें शिक्षक-विद्यालयांत (ट्रेनिंग कॉलेज) अध्यापनविषयक शिक्षण झालेलें असतें. या विद्यालयांत सामान्यपणें दोन वर्षांचा शिक्षणक्रम असतो.

तो पूर्ण झाल्यावर शिक्षकाचा दाखला (सर्टिफिकेट) मिळतो. कांहीं शिक्षक दोनचे ऐवजीं चार वर्षें शिक्षण घेतात; त्यांना विद्यापीठ शिक्षणाकडे जातां येतें व तेथील पदवी घेऊन शिवाय अध्यापकाचेंही प्रशस्तिपत्र (टीचर्स डिप्लोमा किंवा टी. डी.) मिळूं शकतें.

इंग्लंडमधील शिक्षकविद्यालयें स्थानिक स्वराज्य संस्थांनीं, विद्यापीठांनीं, किंवा धार्मिक संस्थांनीं चालविलेलीं आहेत. प्राथमिक शिक्षकांच्या विद्यालयांत धार्मिक संस्थांची संख्या अधिक आहे.

शिक्षक विद्यालयाच्या अभ्यासक्रमांत पुढील विषयांचा समावेश होतो-- शिक्षणशास्त्राची तत्त्वें, अध्यापनशास्त्र, आरोग्यशास्त्र, शारीरिक शिक्षण शास्त्र व प्रात्यक्षिक ; शाळेंत शिकविले जाणारे सर्व बौद्धिक विषय; आणि हस्तकला व ललितकलादि विषय (गायन, चित्रकला, बागकाम, शिवणकाम, विविध हातकामें इत्यादि).

दुय्यम शाळांतील शिक्षकांच्या शिक्षणाची व व्यवसायाची सोय कांहीं प्रमाणांत आपल्या देशाप्रमाणेंच आहे. विद्यापीठाची पदवी घेतल्यानंतर एकदम शिक्षकाचें काम करावें; किंवा शिक्षणशास्त्राचें शिक्षण घेण्याकरितां विद्यापीठांत जावें; अथवा शिक्षकाचें काम करीत असतां खाजगी अभ्यास करून शिक्षणशास्त्राचे परीक्षेस बसावें. तिन्ही प्रकार सध्यां प्रचारांत असले तरी दुसऱ्या प्रकाराला विशेष प्राधान्य देण्यांत येतें. इंग्लंडमध्यें दुय्यम शाळांतील शिक्षकांत शेंकडा ७३ पदवीधर आहेत व त्यांत शेंकडा ५६ शिक्षकांनीं व्यावसायिक शिक्षण (ट्रेनिंग) घेतलेलें आहे. यावरून शिक्षणशास्त्र न शिकलेलेही अनेक शिक्षक आहेत हें लक्षांत येईल.

पदवी घेतल्यानंतर विद्यापीठांत शिक्षणशास्त्र शिकणारांना दोन प्रकारचे अभ्यासक्रम आहेत. एक वर्षाचा अभ्यासक्रम पूर्ण करून प्रशस्ति पत्र (टीचर्स डिप्लोमा) मिळतें; दोन किंवा अधिक वर्षांचा अभ्यास करून पदवी मिळते.

एक वर्षाचे अभ्यासक्रमांत स्वतःच्या आवडीच्या विषयांखेरीज व्यवसायाचे दृष्टीनें पुढील विषय शिकावे लागतात---शिक्षणाचीं तत्त्वें, सामान्य व विशेष अध्यापनपद्धति, शैक्षणिक मनोविज्ञान, शिक्षण इतिहास, आरोग्य-

शास्त्र इत्यादि. शिक्षक–महाविद्यालयास जोडलेल्या किंवा स्थानिक शाळांतून साठ दिवस प्रत्यक्ष अध्यापनाचा अनुभव घ्यावा लागतो. हा कार्यक्रम पूर्ण झाल्यावर अध्यापकाचें प्रशस्तिपत्र (टी. डी.) मिळतें. पदवी (एम्. ईडी.) करितां अधिक अभ्यास करावा लागतो.

## जर्मनींतील विद्वान् शिक्षक

सर्व जगांत अत्यंत विद्वान् असे शिक्षक जर्मनींत तयार होतात. या देशांत शिक्षक व्यवसायाच्या अभ्यासक्रमाचा पाया फार पूर्वींपासून, म्हणजे एका शतकापूर्वीच घातलेला आहे. जर्मन शिक्षकाचा मुख्य गुण म्हणजे विद्वत्ता. या दृष्टीनें शिक्षक तयार करण्याकरितां प्राथमिक व दुय्यम शिक्षकांचा अभ्यासक्रम आंखलेला आहे.

प्राथमिक शिक्षकाचा दर्जा विद्यापीठाच्या पदवीधराइतका असतो. प्राथमिक चार व दुय्यम नऊ असें तेरा वर्षांचें शिक्षण झाल्यानंतर आणखी दोन वर्षे शिक्षण–विद्यालयांत शिक्षणशास्त्राचा अभ्यास करावा लागतो. एकूण शिक्षण पंधरा वर्षे होतें.

अभ्यासक्रमाचे तीन विभाग पडतात—शिक्षणशास्त्र, शिक्षणसाहाय्यक शास्त्रें, आणि विविध कला. शिक्षणशास्त्रांत तत्त्वज्ञान, इतिहास, आरोग्य-शास्त्र, समाजशास्त्र, शिक्षणकारभार, साहित्यसामुग्रीचें ज्ञान इत्यादि विषयांचा शिक्षणाचे दृष्टीनें अभ्यास केला जातो. शिक्षणसाहाय्यकशास्त्रांत धर्म, मानसशास्त्र, तत्त्वज्ञान, मानववंशशास्त्र, राजकीय–सामाजिक अर्थशास्त्र, जीवनशास्त्र व भूगोल इत्यादि विषय येतात. कलाविभागांत संगीत, चित्र-कला, शारीरिक शिक्षण, शिवणकाम, हातकाम इत्यादि कला येतात. वरील अभ्यासक्रमांवरून जर्मनींतील सामान्य प्राथमिक शिक्षकाची तात्त्विक ज्ञानाचे दृष्टीनें किती तयारी होत असेल याची चांगली कल्पना येईल. समाजविषयक शास्त्रांचा शिक्षणाशीं किती निकट संबंध आहे तेंही दिसून येतें.

प्राथमिक शिक्षकापेक्षां दुय्यम शिक्षकाला याहीपेक्षां कठिण अशा अभ्यासक्रमांतून व अनुभवांतून जावें लागतें. विद्यापीठाचा तीनचार वर्षांचा अभ्यासक्रम पूर्ण करणारांना एक सरकारी प्रवेशपरीक्षा असते. विद्यापीठाच्या अभ्यासांत तत्त्वज्ञान, शिक्षणशास्त्र आणि इतर विषयांचा

अभ्यास होऊन शारीरिक शिक्षण पूर्ण व्हावें लागतें. सरकारी प्रवेशपरीक्षेचे तीन विभाग असतात. त्याकरितां दोन विषयांचा विशेष अभ्यास व एका विषयाचा सामान्य अभ्यास करावा लागतो. शिवाय आवश्यक विषयांत तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, तर्क, ज्ञानशास्त्र व मानसशास्त्र यांचा समावेश होतो. या लेखी परीक्षेखेरीज विद्यार्थ्यानें दोन विस्तृत निबंध सादर करावयाचे असतात. या एकेका निबंधाच्या तयारीला चारपांच महिने लागतात. स्वतः प्रकाशित केलेला एकादा ग्रंथ सादर केला तर निबंधांची सूट मिळते. या परीक्षेंत उत्कृष्ट गुण मिळविणारांना नेमलेल्या दुय्यम शिक्षणशाळेंत दोन वर्षे उमेदवारी करावी लागते. तेथें मुख्य अध्यापकाचे व अनुभविक शिक्षकाचे हाताखालीं प्रत्यक्ष अध्यापनाचा अनुभव घ्यावा आणि चर्चारूपानें शिक्षणाचा इतिहास, मानसशास्त्र, जर्मन शिक्षणपद्धति, अध्यापनकला इत्यादि विषयांचा अभ्यास करावा. हें सर्व झाल्यानंतर पुनः अखेरपरीक्षा होते. एक विस्तृत निबंध, आदर्शपाठ, आणि तोंडी परीक्षा असा या अखेरपरीक्षेचा त्रिविध कार्यक्रम असतो. ही परीक्षा पास झाली म्हणजे सरकारी विद्यार्थ्याचें नांव शिक्षकांचे यादींत पडतें व जागा रिकामी झाली कीं नोकरी मिळते.

जर्मनींत पूर्वी दुय्यम शिक्षकांकरितां शिक्षण-महाविद्यालयांची (ट्रेनिंग कॉलेज) सोय व सक्ति नव्हती. परंतु १९३६ पासून एक वर्ष अशा विद्यालयांत शिकणें आवश्यक झालेलें आहे.

नाझी राजवट सुरू झाल्यापासून शिक्षकांवर राजकीय बंधनें आलेलीं आहेत. नाझी विचाराच्या व पक्षाचा सभासद असलेल्या शिक्षकांना मान्यता मिळते. शारीरिक व लष्करी शिक्षण, आणि राजकीय शिक्षण इत्यादि कार्यक्रमांतून त्याला जावें लागतें. विद्वत्तेबरोबरच मुलांत मिळून मिसळून त्यांना शारीरिक आणि लष्करी खेळांची गोडी लावील, वननिवासाला आणि प्रवासाला नेईल, देशप्रेमाचे ध्येयानें भारून टाकील अशा गुणांचा शिक्षक निवडण्याकडे विद्याखात्याचा कल आहे.

प्राथमिक शिक्षक-विद्यालयें शहरांतून खेडेगांवांत नेण्याचे प्रयोग जर्मनींत चालू आहेत, त्या योजनेचा उल्लेख पूर्वी आलेला आहेच.

## फरान्समधील शिक्षकांची तयारी

शैक्षणिक तयारी आणि त्या मानानें योग्य आर्थिक मोबदला या दृष्टीनें फरेंच शिक्षक सुखी आहेत. तेथें प्राथमिक आणि दुय्यम शिक्षकांची तयारी अगदीं स्वतंत्रपणें होते. इतर देशांतील प्राथमिक शिक्षक दुय्यम शिक्षणाचा अनुभव घेऊन मग प्राथमिक शाळेंत काम करितात. परंतु फरान्समध्यें प्राथमिक शिक्षकांचा दुय्यम शिक्षणाशी संबंध येत नाहीं. पूर्व प्राथमिक शिक्षण सहा वर्षें झाल्यानंतर उच्च प्राथमिक शाळेंत तीन वर्षे शिक्षण होतें. हें नऊ वर्षे शिक्षण झालें म्हणजे 'पहिला दाखला' (ब्रेव्हे एलेमेंतेर) मिळतो. हंगामी व तात्पुरत्या शिक्षकांना एवढ्या शिक्षणावर नोकरी मिळू शकते. कायम स्वरूपाच्या नोकरीकरितां त्रैवार्षिक अभ्यासक्रमाच्या शिक्षणविद्यालयांचा (नॉर्मल स्कूल) दाखला लागतो; याला 'वरिष्ठ दाखला' (ब्रेव्हे सुपेऱ्यूर) म्हणतात. या विद्यालयांत प्रवेश मिळण्यापूर्वी प्रवेशपरीक्षा होते. तींत शेंकडा २५ ते ३५ उमेदवार यशस्वी होतात इतकी ती कठीण असते. या विद्यालयांतील अभ्यासक्रमाचा दर्जा इकडील इंटरमीजिएट किंवा प्रथम बी. ए. च्या वर्गांतील अभ्यासाइतका असतो. अभ्यासक्रमाच्या बौद्धिक विषयांत एक परदेशी भाषा असते. इतर विषय नेहमींप्रमाणेंच असतात; परंतु ते अध्यापनशास्त्राचे दृष्टीनें शिकविले जातात. शिक्षणशास्त्रविषयक अभ्यासक्रमांत नीतिशास्त्र, शैक्षणिक मानसशास्त्र, समाजशास्त्र, शिक्षणशास्त्राचीं तत्त्वें इत्यादि विषय असतात. शिक्षक–विद्यालयाची परीक्षा पास होणारांना कायम नोकरी मिळते. त्यापेक्षां उच्च शिक्षण घेणारांकरितां शिक्षक–महाविद्यालय (हायर एलिमेंटरी नॉर्मल स्कूल) असतें. शाळाधिकारी, मुख्य अध्यापक व तपासनीस या संस्थेंत तयार होतात. या प्रत्येक संस्थेंत प्रवेश होतांना आणि नंतर अगदीं कसोशीनें परीक्षा घेतल्या जातात. साधारण बुद्धीच्या विद्यार्थ्याला त्यांतून पार पडण्याची शक्यता नसते.

दुय्यम शाळांत शिक्षक निवडण्याकरितां सरकारी परीक्षा होतात. विद्यापीठांत किंवा शिक्षक–महाविद्यालयांत ज्यांचें शिक्षण झालें आहे अशांना या परीक्षा देतां येतात. दुय्यम शिक्षकांकरितां असें स्वतंत्र अध्यापक-विद्यालय नाहीं. सरकारी परीक्षेंत पास होणारे उत्कृष्ट शिक्षक लीसेमध्यें नेमले जातात. बाकीचे कोलेजमध्यें (निमसरकारी हायस्कूलें) काम करूं शकतात.

### इटलींतील ध्येयवादी शिक्षक

फरान्स आणि इटलींतील शिक्षक–विद्यालयांची योजना सारखीच आहे. दुय्यम शिक्षकांकरितां स्वतंत्र विद्यालयें नाहींत. फक्त सरकारी परीक्षा होतात. त्यांत ज्यांना शेंकडा सत्तरपेक्षां अधिक गुण मिळतात त्यांना सरकारी जागा दिल्या जातात. इतरांना खाजगी शाळांतून काम करितां येतें. पुढें शाळेंत जे विपय शिकवावयाचे त्यांचीच परीक्षा घेतली जाते. त्या विपयांचा दाखल्यांत उल्लेख केला जातो. इतर विषय शिकवितां येत नाहींत.

प्राथमिक शिक्षकांचें चार वर्षें प्राथमिक शिक्षण झाल्यावर, शिक्षक-विद्यालयांत त्यांचा प्रवेश होतो. या ठिकाणी प्राथमिक चार आणि उच्च तीन वर्षांचा असा सप्तवार्षिक अभ्यासक्रम असतो. त्यापेक्षां उच्च शिक्षण घेणारांना चार वर्षे शिक्षक–महाविद्यालयांत (हायर नॉर्मल स्कूल) जातां येतें.

इटालियन शिक्षकांच्या अभ्यासक्रमांत अध्यापनकला आणि शिक्षण-शास्त्र यांपेक्षां तत्त्वज्ञानावर विशेष भर आहे. जेंटिलीनें १९२३ सालीं या अभ्यासक्रमांची पुनर्घटना केली. त्याचें तत्त्व असें होतें कीं शिक्षकाला तत्त्व-ज्ञानाचें आकलन झालें आणि त्याचे ठिकाणीं ध्येयवाद निर्माण झालेला असला म्हणजे पुरे. त्याला कृत्रिम शिक्षणशास्त्राचें किंवा अध्यापनपद्धतीचें बंधन घालूं नये.

प्रत्यक्ष व्यवहारांत या तत्त्वाचा उपयोग होत नाहीं असा अनुभव येतो.

## *शिक्षकवर्गाची आर्थिक स्थिति आणि शाश्वति*

### अमेरिका

अमेरिकेंत शिक्षकांच्या पगारांचें प्रमाण प्रत्येक संस्थानांत निरनिराळें आहे. त्याचप्रमाणें लहान मोठ्या शहरांतील आणि खेडेगांवांतील पगारांत फरक पडतो. सर्व देशाला लागूं पडेल असें एकच प्रमाण (स्केल) नाहीं. लोकसंख्या आणि शिक्षकपगार यांचें सामान्य प्रमाण पुढें दिलें आहे, त्यावरून ठोकळ कल्पना येईल.

**विविध लोकसंख्येच्या शहरांतील शिक्षकांचे वार्षिक पगार**

(आंकडे डॉलरचे आहेत. एका डॉलरची किंमत तीन रुपये)

| लोकसंख्या | प्राथमिक शिक्षक पगार | | दुय्यम शिक्षक पगार | |
|---|---|---|---|---|
| २॥ ते ५ हजार | ११६२ | डॉलर | १५८४ | डॉलर |
| ५ ते १० ,, | १३०३ | ,, | १७२९ | ,, |
| १० ते ३० ,, | १४२८ | ,, | १८६९ | ,, |
| ३० ते १ लाख | १६०९ | ,, | २१२० | ,, |
| १ लाखपेक्षां अधिक | २११८ | ,, | २६८० | ,, |

इकडील चलनाच्या हिशेबानें हा पगार अवाढव्य दिसेल. लंकेंत सोन्याच्या विटा ; अमेरिकेंतील राहणीच्या मानानें हे पगार फार मोठे नाहींत. साधारणपणें कारखान्यांत यंत्रापाशीं काम करणारा कामगार रोजीं पांच ते आठ दहा डॉलर म्हणजे वर्षाचे अंदाजें १८०० ते ३६०० डॉलर मिळवितो. त्या मानानें हे शिक्षकांचे पगार बेताचेच आहेत. इकडल्या शिक्षकांपेक्षां अमेरिकन शिक्षकांची स्थिति पुष्कळच चांगली आहे. तुलना करण्याची सोय नाहीं. न्यूयॉर्क, न्यूजर्सी, इत्यादि कांहीं संस्थानांत पगार चांगले आहेत. तेथें शिक्षक स्वतःची मोटारही ठेवूं शकतात अशी स्थिति आहे.

नोकरीची शाश्वति, निवृत्तवेतन (पेन्शन) आणि वार्धक्यनिधि (प्रॉव्हिडंट फंड) या बाबतीत अमेरिकेंमध्यें अद्याप सर्वत्र सोयी झालेल्या नाहींत. कांहीं संस्थानांतून व मोठ्या शहरांतून या सोयी आहेत. इतरत्र शिक्षकांची नेमणूक एक वर्षापुरती केली जाते. कांहीं ठिकाणीं अनिश्चित मुदतीनें नेमणूक केली जाते. शिक्षकाची कायम नेमणक असावी कीं अनिश्चित नेमणूक असावी याबाबत अमेरिकेंत दुमत आहे. शेंकडा तीस शिक्षकांच्या कायम नेमणुका (पर्मनंट टेन्युअर) आहेत. नोकरीची मुदत तीस वर्षे असते. साठावे किंवा सत्तरावे वर्षी सेवानिवृत्त होतां येतें.

अमेरिकेंतील समाज प्रवाही असल्यामुळें शिक्षकवर्ग हाही नेहमीं बदलता असतो. त्या कारणानें कायम नोकरीच्या व शाश्वतीच्या दृष्टीनें इतर सोयींची वाढ झालेली नाहीं.

### रशिया

रशियांत प्राथमिक शिक्षकाला साधारणपणें ९० रूबल (१ रूबल = १॥ रुपया) मासिक पगार मिळतो. या प्रमाणांत शिक्षकाचे दर्जाप्रमाणें व स्थानिक परिस्थितीमुळें थोडाफार फरक होतो. याशिवाय शिक्षकाला वसतिगृहाची जागा दिली जाते, वैद्यकीय मदत मोफत मिळते, आणि वार्धक्य व आजारीपण इत्यादीमुळें असमर्थता आली तरी पोटगीची व्यवस्था होते.

### इंग्लंड

इंग्लंडमध्यें विद्याखात्यानें पगाराविषयीं किंवा कायम नोकरीबाबत सक्तीचे नियम केलेले नाहींत. मालक आणि नोकर यांनीं परस्परांच्या सोयीनें पाहून घ्यावें, असें तटस्थतेचें धोरण ठेविलेलें आहे. त्यामुळें स्थानिक संस्थांचे सोयीप्रमाणें सर्व व्यवहार होतात. शिक्षकांच्या संघटना प्रभावी असल्यामुळें त्यांनीं चळवळ करून पगार आणि कायम नोकरी यांबाबत नियम करवून घेण्याचे प्रयत्न चालविले आहेत. 'नॅशनल् यूनिअन ऑफ टीचर्स' या संस्थेनें या बाबतींत पुढाकार घेतलेला आहे. आर्थिक मंदी आणि काटकसर यांमुळें अद्याप हा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटलेला नाहीं. मधून मधून तात्पुरती तडजोड होऊन कांहीं प्रमाण (स्केल) ठरविलें जातें.

साधारणपणें प्राथमिक आणि दुय्यम शिक्षकांच्या पगाराचें प्रमाण काय असतें त्याची कल्पना पुढील आंकड्यांवरून येईल.

**प्राथमिक शिक्षकांच्या वार्षिक पगारांचें प्रमाण—१९३०**

| | |
|---|---|
| पुरुष शिक्षक | ३२४ ते ३३४ पौंड |
| स्त्री शिक्षक | २१७ ते २५४ पौंड |

**दुय्यम शिक्षकांच्या वार्षिक पगारांचें प्रमाण—१९३५**

| | |
|---|---|
| बिनपदवीधर पुरुष शिक्षक | १८६ ते ३८४ पौंड |
| ,, स्त्री शिक्षक | १७४ ते ३०६ ,, |
| पदवीधर पुरुष शिक्षक | २३४ ते ४८० ,, |
| ,, स्त्री शिक्षक | २१६ ते ३८४ ,, |

वार्धक्यनिधि (पेन्शनफंड) करितां यांतून पांच टक्के कपात केली जाते. बहुतेक सर्व शिक्षकांकरितां निवृत्तवेतनाची (पेन्शन) सोय झालेली आहे.

## जर्मनी

जर्मनीमध्यें प्राथमिक शिक्षकांच्या वार्षिक पगाराला साधारण मानानें २८०० मार्कपासून प्रारंभ होऊन वीस वर्षात तो ५००० मार्कपर्यंत पोंचतो. (मार्क = १ रुपया) सेवानिवृत्त झाल्यावर शिक्षकाला निवृत्त–वेतन (पेन्शन) मिळतें, मृत्यूनंतर त्याच्या पत्नीला या वेतनाच्या शेंकडा साठ पोटगी मिळते. आणि अनाथ मुलांना पुन: त्याचा पंचमांश पोटगीदाखल दिला जातो.

दुय्यम शाळांतील शिक्षकांना ४,४०० पासून ९,६०० मार्कपर्यंत वार्षिक पगार असतो. सर्वत्र शिक्षकांना निवृत्तवेतन आणि मृत्यूनंतर स्त्रियांची व मुलांची पोटगी यांव्यतिरिक्त इतरही अनेक सवलती मिळतात. प्रत्येक अपत्यामागें जादा भत्ता मिळण्याचें प्रमाण ठरलेलें आहे. पहिल्या दोन अपत्यांना महिना २० मार्क, पुढें चार अपत्यांपर्यंत २५ मार्क, आणि त्याचे-पुढें प्रत्येक मुलामागें ३० मार्क याप्रमाणें मुलाच्या सोळाव्या वयापर्यंत भत्ता मिळतो ; शिक्षण चालू असल्यास एकविसाव्या वयापर्यंतही तो चालूं राहतो. सर्व प्रकारचे भत्ते मिळून पगारांत वाढ कशी होते तें पाहण्यासारखें आहे. बर्लिनमध्यें दोन मुलांसह राहणाऱ्या दुय्यम शाळेंतील शिक्षकानें सहा वर्षे काम केल्यानंतर त्याला मासिक पगार व भत्ते पुढीलप्रमाणें मिळतात— (आंकडे मार्क नाण्याचे आहेत) पगार ४०१॥, घरभाडें ८०, दोन मुलांचा भत्ता ३६, पत्नीकरितां भत्ता १२, स्थानिक भत्ता २६॥, एकूण ५५६ मार्क सारांश, आर्थिक दृष्टीनें जर्मन शिक्षक सुखी आहे.

## फ्रान्स

सर्व देशांत आर्थिक दृष्टीनें फरेंच शिक्षक अधिक सुखी आहेत. त्यांच्या पगाराचें प्रमाण ठरलेलें आहे आणि त्याशिवाय अनेक प्रकारचे भत्ते व सवलती त्यांना मिळतात.

**प्राथमिक शिक्षणखात्यांतील पगारांचें प्रमाण**

(फरैंकची अंदाजें किंमत आठ आणे)

| | |
|---|---|
| सात यत्तांचे शिक्षक | ९००० ते १६,००० फरैंक |
| उच्च प्राथमिक शाळांतील अध्यापक | १२,००० ते २६,००० फरैंक |
| उच्च प्राथमिक मुख्य अध्यापक | १४,००० ते २६,००० फरैंक |

**दुय्यम शाळांतील शिक्षकांच्या पगारांचें प्रमाण**

| | |
|---|---|
| लीसेमधील शिक्षक (पॅरिस) | १८,००० ते २६,००० फ्रँक |
| ,, ,, बाहेरगांवीं | १५,००० ते २१,००० फ्रँक |
| कोलेजमधील शिक्षक | ११,००० ते १६,००० फ्रँक |

दुय्यम व उच्च प्राथमिक शाळांतील अध्यापकांना प्रोफेसर म्हणण्याची प्रथा फरान्समध्यें आहे.

वरील पगाराशिवाय विवाहित शिक्षकांना कुटुंब-भत्ता, अपत्य-भत्ता (पहिल्या मुलापासून अनुक्रमें ६६०, ९६०, १५६० व १९२० फ्रँक या प्रमाणांत), घरभाडें भत्ता, बदली खर्च भत्ता इत्यादि मिळून पगारांत भर पडते. याशिवाय रेल्वेभाड्यांत सवलती, विद्यापीठांत स्वतःचें मोफत शिक्षण, शाळेंत मुलांचें मोफत शिक्षण इत्यादि सवलती असतात. मृत्यूनंतर पत्नीला आणि अपत्यांना पोटगी मिळण्याची व्यवस्था केलेली आहे. पति–पत्नी शिक्षक एकाच गांवांत नोकरी करीत असतील तर भत्ता मिळतो. स्त्रीशिक्षकांना बाळंतपणाची दोन महिन्यांची पगारी रजा मिळते. स्त्री–पुरुषांना पगार सारखाच आहे. पंचवीस वर्षें नोकरी करून पंचेचाळिसावे वर्षी निवृत्त होतां येतें. वार्धक्य वेतनाची सोय झालेली आहे. शिक्षक मध्यंतरीच पंगू झाला तरी त्याची सर्व सोय आहे.

## इटली

इटलीमध्यें १९२३ सालीं जेंटिलीनें जी पुनर्घटना केली त्या वेळी शिक्षकांची स्थिति सुधारून त्यांना समाजांत सन्मान्य स्थान देण्याकरितां त्यानें पगारांचें प्रमाण एकदम दुप्पट केलें. सध्यां प्राथमिक शिक्षकांना साधारणपणें ५,९०० लिरेपासून प्रारंभ होऊन अठ्ठावीस वर्षात १०,००० लिरेपर्यंत पगारवाढ होते. (लिरा = चार आणे) कांहीं शाळांतून दुबार सत्राची व्यवस्था झाली आहे. तेथें ८०० लिरे अधिक दिले जातात. वार्धक्य–निधी (प्रॉव्हिडंड फंड) करितां आठ टक्के कपात करून सरकार तितकीच भर घालतें. शिक्षकांचे विधवांच्या आणि मुलांच्या पोटगीची सोय केलेली आहे. याव्यतिरिक्त इतर सवलती फारशा नाहींत.

## स्त्रिया आणि विवाहित शिक्षकांच्या सोयी

अमेरिकेंत प्राथमिक शिक्षणक्षेत्र स्त्रियांनींच व्यापिलें आहे आणि दुय्यम शिक्षणांत निम्मीअधिक संख्या स्त्रियांचीच आहे. इतकें प्रमाण यूरोपियन राष्ट्रांत आढळत नाहीं, म्हणून स्त्रीशिक्षकांच्या परिस्थितींत या दोन खंडांत कांहीं भेद आढळून येईल.

बहुसंख्य अमेरिकन शहरांतून विवाहित स्त्रियांना शिक्षकाची नोकरी देण्याची सहसा प्रवृत्ति नाहीं. अविवाहित स्त्रीशिक्षक नोकरींत असतांना विवाहबद्ध झाल्यास शेंकडा साठ शिक्षणखातीं त्यांना ताबडतोब अथवा वर्षाअखेर कमी करतात ; आणि शेंकडा चाळीस विद्याखातीं त्यांना कामावर चालू ठेवितात. विवाहित स्त्रियांना बाळंतपणाची बिनपगारी रजा दिली जाते.

स्त्री–पुरुष शिक्षकांना त्याचप्रमाणें प्राथमिक आणि दुय्यम शाळांतील शिक्षकांना समान वेतनाचें प्रमाण करण्याकडे अमेरिकन विद्याखात्यांची प्रवृत्ति आहे.

इंग्लंडमध्यें स्त्री–पुरुषांच्या पगाराच्या प्रमाणांत फरक आहे. स्त्रियांना पुरुष–शिक्षकांच्या वेतनापेक्षां साधारणपणें एकतृतीयांश पगार कमी असतो. हा पक्षपात कमी करण्याविषयीं चळवळ चालू आहे. अमेरिकेंत दुय्यम शाळांमध्यें स्त्रियांचें प्रमाण आहे तितकें इंग्लंडमध्यें नाहीं. मिश्र शाळांत व मुलींच्या शाळांत स्त्रीशिक्षक आहेत.

रशियामध्यें स्त्री आणि पुरुप दोन्ही शिक्षकांची नेमणूक निःपक्षपातीपणें केली जाते. सर्वत्र मिश्र–शिक्षण आहे. स्त्री–पुरुष शिक्षकांच्या पगारांचें प्रमाण समान आहे. स्त्रियांना बाळंतपणापूर्वी व नंतर पगारी रजा दिली जाते.

जर्मनीमध्यें बहुसंख्य शिक्षक पुरुषच आहेत. नाझी विद्याखात्यानें महाविद्यालयांत व विद्याखात्यांत जाणाऱ्या स्त्रियांचें प्रमाण शेंकडा दहा ठेविलें आहे. स्त्री आणि पुरुष उमेदवारांत पुरुषांना प्रथम नोकरी देण्याचें धोरण आहे. स्त्री शिक्षक विवाहित झाल्यानंतर पतीला कायम नोकरी असेल तर किंवा स्त्री–शिक्षकाच्या कुटुंबांत मिळवता पुरुष असेल तर स्त्रियांच्या नोकऱ्या कमी केल्या जातात. आधीं पुरुषाला नोकरी मिळावी, मग जागा असेल तर स्त्रीला, असा नवीन दंडक आहे. मुलामुलींच्या मिश्र संस्था नाहींत,

स्वतंत्र आहेत. मुलींच्या शाळेंतही पुष्कळ पुरुष शिक्षकच असलेले दिसून येतात. बालवर्ग व खालचे प्राथमिक शिक्षणाचे वर्ग यांकरितां स्त्रीशिक्षक आहेत.

फरान्समध्यें विवाहामुळें स्त्री-शिक्षकांना आडकाठी येत नाही. उलट स्त्री–पुरुष उभयतां शिक्षक एकत्र असल्यास जादा कुटुंबभत्ता मिळतो. बाळंतपणापूर्वी व नंतर मिळून दोन महिन्यांची पगारी रजा मिळते. सारांश, सर्व देशांपेक्षां फरान्समध्यें विवाहित स्त्रीशिक्षक सुखी आहेत.

शिक्षकांच्या निधनानंतर त्यांच्या विधवांच्या व मुलाबाळांच्या पोटगीची सोय फरान्स, जर्मनी व इटली या देशांनीं केलेली आहे. ज्या देशांत शिक्षणसत्ता सरकारचे हातांत केंद्रीभूत झालेली आहे तेथें शिक्षकांच्या कौटुंबिक स्थितीकडे विशेष लक्ष दिलेलें दिसून येतें.

## सामाजिक दर्जा व संघटना

अमेरिकेची औद्योगिक प्रगति गेल्या दोन पिढ्यांमध्यें झपाट्यानें झाली. त्यामुळें व्यापार व उद्योगधंद्यांत लोकांना चांगला पैसा मिळूं लागला. इतर धंद्यांत व व्यवसायांत जी कमाई होई त्या मानानें शिक्षकाचे व्यवसायांत प्राप्ति कमी होती. त्या कारणानें बहुसंख्य पुरुषवर्ग हा उद्योगधंद्यांत ओढला गेला. स्त्रिया व शिक्षणाचे हौशी लोक किंवा ज्यांना इतरत्र वाव नाहीं असे लोक शिक्षकाचे व्यवसायांत शिरले. याचा परिणाम स्वाभाविकपणेंच शिक्षकांचे सामाजिक दर्जावर झालेला आहे. इतर व्यवसायांत जी प्राप्ति होते त्या मानानें या व्यवसायांत वेतन कमी. अलीकडे न्यूयॉर्क, न्यूजर्सी, वगैरे संस्थानांनीं पगाराचें प्रमाण चांगलें ठेविलें आहे. त्यामुळें चांगलीं माणसें या धंद्यांत पडत आहेत. मध्यंतरीं आलेल्या व्यापारमंदीमुळेंही पुष्कळ लोक पुनः या व्यवसायाकडे वळले आहेत. दुसऱ्या व्यवसायांत पडण्यापूर्वीं किंवा विवाहबद्ध होण्यापूर्वी कांहीं वर्षे हा पेशा पत्करून पुढें तो सोडून देणाऱ्या शिक्षकांचें प्रमाण पूर्वी बरेच होतें. आतां तें कमी कमी होत आहे.

शिक्षकांची सर्वांत मोठी संघटना म्हणजे 'राष्ट्रीय शिक्षण संघटना' (नॅशनल् एज्युकेशन ॲसोसिएशन) आहे. या संस्थेनें शिक्षकांचे पगार, नोकरीचा कायमपणा इत्यादि अनेक उपयुक्त मुद्यांवर मधून मधून अधिकार-

युक्त असें वाङ्मय निर्माण करून शिक्षकांचा आर्थिक व शैक्षणिक दर्जा वाढविण्याचे कामीं पुष्कळ मदत केली आहे. याशिवाय प्रत्येक प्रांतांतील शिक्षकांच्या अनेक संघटना आहेत. स्वतःच्या आर्थिक दर्जाबरोबरच शैक्षणिक आणि बौद्धिक लायकी वाढविण्याचा त्यांचा प्रयत्न असतो.

अमेरिकन शिक्षक हे स्थानिक शिक्षणखात्याचे नोकर समजले जातात.

इंग्लंडमध्येंही शिक्षकांच्या संघटना अनेक आहेत. १९१० सालीं तेथील 'शिक्षक संघा'नें (ॲसिस्टंट मास्टर्स ॲसोसिएशन्) एक पत्रक प्रसिद्ध करून इंग्लंड व इतर देशांतील शिक्षकांच्या वेतनांची तुलना केली व इंग्लिश शिक्षकांचें दैन्य समाजापुढें आणलें. त्यानंतर या परिस्थितीमध्यें पुष्कळ सुधारणा झालेली आहे. 'राष्ट्रीय शिक्षक संघ' (नॅशनल् यूनियन ऑफ टीचर्स) ही इंग्लंडमधील मोठी संघटना असून तिच्यामार्फत शिक्षकांच्या हक्कांचें संरक्षण केलें जातें. अशा संघटनांच्या चळवळीमुळें पगाराचें निश्चित प्रमाण, वार्धक्यवेतन इत्यादि सुधारणा होत आहेत.

इंग्लिश शिक्षक हे स्थानिक स्वराज्यसंस्था किंवा शाळांचे चालक यांचे नोकर आहेत.

रशियन शिक्षक हे सरकारी नोकर समजले जातात. त्यांचेपैकी वहुतेक कम्यूनिस्ट पक्षाचे सभासद किंवा साहाय्यक असतात. शिक्षक हा भोंवतालच्या समाजाचा शैक्षणिक, सांस्कृतिक, सामाजिक, व राजकीय दृष्टया पुढारी समजला जातो. विद्याखातेंही शिक्षकांना मोठा मान देतें. 'शिक्षक कामगार संघ' (एज्युकेशनल् वर्कर्स यूनियन) नांवाची प्रचंड संस्था आहे. वहुतेक शिक्षक तिचे सभासद असतात. वर्गणी म्हणून पगारांतून शेंकडा दोन टक्के या संस्थेला दिली जाते. विद्याखात्याला कांहीं नवीन करावयाचें झाल्यास या संस्थेची संमति घेतली जाते. वार्षिक शिक्षणाचा सरकारी अहवाल या संस्थेपुढें सादर केला जातो. अशा रीतीनें जनतेंत आणि सरकारांत शिक्षकांना मोठा मान आहे.

जर्मनी व फरान्स या देशांत शिक्षक हे सरकारी नोकरांप्रमाणें समजले जातात. जर्मनींत खाजगी शाळेंतील शिक्षकांनाही सरकारी नोकरांचाच दर्जा आहे, आणि सर्व प्रकारच्या सवलती सरकारी व खाजगी शिक्षकांना सारख्याच मिळतात. एकदां नोकरी लागली म्हणजे ती कायम असते. सरकारी

परवानगीशिवाय कोणाला खाजगी शिकवण्या करतां येत नाहींत. जर्मन शिक्षक नाझी पक्षाचा सभासद असावा असें विद्याखात्याचें धोरण आहे. १९३३ ची राज्यक्रांति झाल्यानंतर नाझी धोरणाला प्रतिकूल असलेल्या अनेक शिक्षकांना कमी करण्यांत आलें.

जर्मनीप्रमाणें इटलींतही फाशिस्ट पक्षाचे सभासद किंवा साहाय्यक यांचीच शिक्षक म्हणून नेमणूक होऊं शकते. त्यांना राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागते. विद्यापीठांतील अध्यापकांना फाशिस्टनिष्ठेची शपथ घ्यावी लागत असे. इटलींतील शिक्षकांचाही सरकारी नोकरांप्रमाणें दर्जा आहे.

फरान्स, इटली आणि जर्मनी या देशांत शिक्षकांना सरकारी नोकरांचा दर्जा मिळाल्यामुळें ऐहिक दृष्टचा जितकें सुख तितकें त्यांचें सार्वजनिक जीवनांतील स्वातंत्र्यही कमी होतें ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. त्या मानानें अमेरिका–इंग्लंडमधले शिक्षक अधिक स्वतंत्र आहेत. परंतु सरकारी नोकरांना प्रस्थापित सत्तेविषयी प्रत्यक्ष–अप्रत्यक्ष रीतीनें निष्ठाप्रदर्शन तेथेंही करावें लागतेंच.

फरान्समध्यें आर्थिक दृष्टचा शिक्षकवर्ग सुखी आहे. त्यांना सरकारी कामगारांचा दर्जा असून सर्व प्रकारच्या सवलती मिळतात. परंतु शिक्षकवर्ग जागृत व चळवळचा आहे. शिक्षणसुधारणेंत हा वर्ग पुढाकार घेत असतो. उदारमतवादी सुधारणांचें नेतृत्व शिक्षकांचे संघटनेकडेच आहे. 'एकवर्गी शिक्षणपद्धती' करितां (एकोल् यूनिक–कॉमन् स्कूल) झगडणारा 'नव शिक्षण पुरस्कार संघ' (चँपियन्स ऑफ् न्यू एज्युकेशन) मुख्यतः शिक्षकांचाच होता. सिंडिकेट ऑफ् टीचर्स आणि जनरल् फेडरेशन् ऑफ एज्युकॅशनिस्टस् अशा अनेक प्रकारच्या शिक्षकांच्या संघटना आहेत. शिक्षकांना अधिक स्वातंत्र्य मिळावें, शाळापद्धतीमधील वर्गभेद नष्ट व्हावा, शिक्षणाची पुनर्घटना करावी, आणि विद्याखात्याकडे केंद्रीभूत झालेली सत्ता कमी करून लोकशाहीला अधिक वाव द्यावा अशा प्रकारच्या शिक्षकांच्या मागण्या आहेत. यावरून शिक्षणसुधारणेची जबाबदारी शिक्षकवर्गानें आपल्या शिरावर किती घेतली आहे तें लक्षांत येईल.

## पाश्चात्य व हिंदी शिक्षकवर्ग

पाश्चात्य देशांतील शिक्षकांची आर्थिक आणि सामाजिक स्थिति पाहून इकडील शिक्षकांना हेवा वाटेल. परंतु ही परिस्थिति आपोआप आलेली नसून शिक्षकवर्गानें आपल्या परिश्रमानें आणली आहे हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. जर्मनी, फरान्स, व इटलीसारख्या देशांत शिक्षण व शिक्षक सरकारतंत्र आहेत. तरी देखील तेथील शिक्षकांनीं आपली स्थिति सुधारण्याचे प्रयत्न चालविले. इंग्लंड व अमेरिकेंत लोकशाही असल्यामुळें शिक्षणाची स्थिति सुधारण्याची जबाबदारी सरकारकडे न येतां शिक्षकांकडेच येते. तेथेंही शिक्षकांनी किती राष्ट्रव्यापक संघटना केलेल्या आहेत त्या पाहण्यासारख्या आहेत.

दुसरा लक्षांत ठेवण्यासारखा मुद्दा असा कीं या शिक्षकांच्या संस्थांनीं आपली केवळ आर्थिक स्थिति सुधारण्याचाच प्रयत्न केला असें नाहीं शिक्षकाचा बौद्धिक आणि शैक्षणिक दर्जा वाढविण्याचाही त्यांनी प्रयत्न केला. त्यामुळें हे दोन्ही प्रयत्न परस्परांना उपकारक झाले

आजच्या लोकशाही युगांत संघटनेवाचून मार्ग नाहीं, हें तत्त्व. शिक्षकव्यवसायाचे भूत आणि वर्तमान इतिहासावरून लक्षांत येईल.

---

### प्रकरण पंचविसावें

# विद्यार्थ्यांच्या संघटना व नागरिकत्वाचें शिक्षण

## दोन पिढ्यांतील विरोध

विद्यार्थी आणि शिक्षक यांमध्यें किंवा तरुण पिढी आणि वयस्क पिढी यांत कायमचा विरोध असावयाचाच, अशी एक सर्वसाधारण कल्पना आहे. तरुण पिढी बिघडली असा लोकप्रवाद बहुतेक समाजांत ऐकू येतो. परंतु इतर देशांतील वस्तुस्थितीकडे पाहिलें तर हा मानलेला विरोध सर्वत्रच दिसतो असें नाहीं. ज्या देशांत विद्यार्थीवर्गाला अज्ञान आणि लहान असें

समजून वागविण्यांत येतें तेथें असा विरोध दिसतो. परंतु जेथें विद्यार्थ्यांवर जबाबदारी टाकून सामाजिक ध्येय दिलें जातें तेथें विद्यार्थ्यांकडूनही किती महत्त्वाची कामगिरी होते तें पाहण्यासारखें आहे. या दृष्टीनें रशिया, जर्मनी व इटली या देशांतील विद्यार्थ्यांच्या संघटना आणि त्यांचें कार्य याविषयींची माहिती बोधप्रद आहे.

## रशियांतील विद्यार्थ्यांची संघटना

रशियांतील वयस्क पुढाऱ्यांनीं राज्यक्रांति केली आणि ती पुरी करण्याची जबाबदारी तरुण पिढीवर टाकली. म्हणून कम्यूनिस्ट पक्षाच्या खालोखाल जर कोणाला महत्त्व असेल तर तें तरुणांच्या संघटनेला. विद्यार्थ्यांच्या पद्धतशीर संघटनेचा कित्ता रशियानें घालून दिला आणि निरनिराळ्या ध्येयांच्या सिद्धीप्रीत्यर्थ तो जर्मनी आणि इटली या देशांनीं उचलला.

### संघटनेचीं तत्त्वें

रशियानें विद्यार्थ्यांकरितां ज्या संघटना केलेल्या आहेत त्यांच्या मुळाशीं कांहीं महत्त्वाचीं तत्त्वें आहेत. ज्या तत्त्वांवर समाजांत क्रांति झाली त्या तत्त्वांचें पद्धतशीर ज्ञान नवीन पिढीला झालें पाहिजे. जुने पुढारी नाहींसे झाल्यानंतर त्यांच्या तालमींत तयार झालेले व विचारपरंपरेंत वाढलेले असे पुढारी निर्माण होऊन नेतृत्वाची व कार्याची परंपरा राहिली तर पूर्वींच्या पिढीनें केलेलें कार्य टिकाऊ होईल. राष्ट्रांतील तरुण पिढी ही एक वाफेची शक्ति आहे. तिला वयस्क पिढीनें दिशा आणि ध्येय देणें जरूर आहे. तरच या शक्तीचा विधायक उपयोग होईल. विद्यार्थ्यांचें शिक्षण केवळ घराच्या आणि शाळेच्या सावलींत न होतां जिवंत समाजजीवनाशीं त्याचा संबंध यावा. शाळेंतील ज्ञानाला कार्याची जोड मिळणें जरूर आहे. विद्यार्थी-दशेपासून ज्ञान आणि कर्म यांची सांगड घालण्याचें शिक्षण मुलांना मिळालें पाहिजे. वयस्क पिढी आणि तरुण यांच्यांत जो विरोध दिसतो तो नाहींसा व्हावयाचा असेल तर या दोन पिढ्यांचे निगडित संबंध आले पाहिजेत. याकरितां देशांत अशी संघटना असावी कीं जिच्यांत पांचसहा वर्षांच्या

मुलापासून वरच्या दर्जाच्या पुढाऱ्यांपर्यंत सर्व लोक एकत्र गोंवलेले आहेत. असें झालें म्हणजे वरच्या थरांत उत्पन्न होणारे विचार आपोआप खालच्या थरांत पसरतील. तरुण पिढी ही समाजाची बाल्यावस्था आहे. तिला अमूर्त तत्त्वांपेक्षां प्रत्यक्ष वस्तूंनीं लौकर बोध होतो. म्हणून तरुण पिढीच्या शिक्षणांत विशिष्ट अर्थाच्या बाह्य चिन्हांचा भरपूर उपयोग केला पाहिजे.

अशा स्वरूपाच्या तत्त्वांचे आधारावर रशियांतील विद्यार्थिवर्गाची संघटना उभारलेली आहे.

## संघटनेचें स्वरूप

रशियांतील विद्यार्थ्यांच्या संघटनेचें सूत्रधारकत्व कम्यूनिस्ट पक्षाचे हातात आहे. विद्यार्थी स्वत: आपापली संघटना करीत आहेत असें दिसले तरी या कार्याची पद्धति अशी आहे की वर कम्यूनिस्ट पक्षांत जो विचार चालेल तोच आपोआप खाली तरुण पिढींत उतरावा.

सहा वर्षांपासून तेवीस वर्षांचे विद्यार्थ्यांपर्यंत मुलें व मुली या संघटनेंत येतात. मुलांच्या वयाप्रमाणें या संघटनेचे तीन विभाग केलेले आहेत. परंतु हे विभाग सुटे किंवा अगदी अलग नाहीत, सांखळीप्रमाणें एकमेकांत त्यांचे दुवे अडकलेले आहेत. मुलांचें वय आणि विभागांचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेत.

| वय | संघटना विभाग |
|---|---|
| ६ ते १४ | आक्टोब्रिस्टस् (क्रांतिबालक संघ) |
| १० ते १७ | पायोनियर्स (अरुण संघ) |
| १४ ते २३ | कोम्सोमोल् (तरुण कम्यूनिस्ट संघ) |

वरील विभागांतील सभासदांचीं वयें लक्षांत घेतलीं म्हणजे त्यांचें नेतृत्व कसें चालतें तें कळेल. कोम्सोमोल तरुणांचें पुढारीपण कम्यूनिस्ट पक्षांतील जबाबदार सभासदांचेकडे असतें; पायोनियर्सचें पुढारीपण कोम्सोमोल तरुणांकडे असतें, आणि आक्टोब्रिस्टस् संघाचें नायकत्व पायोनियर्स संघांतील तरुण करतात. अशा रीतीनें अगदीं लहान संघाचा दुवा अप्रत्यक्ष रीतीनें कम्यूनिस्ट पक्षांतील सभासदांशीं घालून दिलेला आहे.

या युवकसंघांमध्यें जाण्याची विद्यार्थ्यांना सक्ति नसते, सभासद होणें

हें प्रत्येकाच्या इच्छेवर अवलंबून आहे. इतकेंच नाहीं तर सभासद होण्यापूर्वी विवक्षित कसोटींतून पार पडल्याशिवाय विद्यार्थी दाखलच होऊं शकत नाहीं. विशेषत: पायोनियर्स आणि कोम्सोमोल या वरचे दोन विभागांत विद्यार्थी घेतांना चांगले पारखून घेतले जातात, कारण यांतूनच भावी कम्यूनिस्ट पुढारी निर्माण व्हावयाचे असतात. सार्वजनिक काम करण्याची आस्था, शारीरिक श्रम करण्याची तयारी व संवय, आणि कम्यूनिस्ट राजकारणाचें ज्ञान या तीन दृष्टींनीं विद्यार्थ्याची तयारी पाहून मग त्याला योग्य त्या विभागांत दाखल करून घेतलें जातें. दरवर्षी एकदां सभासदांची छाननी होते आणि त्यांतून लायक नसलेल्यांना कमी केलें जातें.

संघांत सभासद झालेल्या विद्यार्थ्यांना विवक्षित चिन्हें धारण करावीं लागतात. तांबडी गळेपट्टी, एकरंगी पोषाख, पांच बोटांचा सलाम इत्यादि चिन्हपद्धती व विशिष्ट आचार पाळले जातात. 'संनद्धो भव' (ऑल्वेज रेडी) असें त्यांचें ब्रीदवाक्य आहे. सर्व सभासदांना शपथ घ्यावी लागते, त्यांत कम्यूनिझमचीं तत्त्वें, शारीरिक श्रम, आणि ज्ञानार्जन या तत्त्वांना आपण एकनिष्ठ राहूं अशी प्रतिज्ञा विद्यार्थी करतात.

### कार्यक्रम

युवकसंघाच्या कार्यक्रमांचा मुख्य भर सामाजिक कार्य आणि राजकीय शिक्षण या दोन गोष्टीवर आहे. लहान मोठ्या विभागांना त्यांच्या वयाला अनुरूप अशा प्रकारचीं उपयुक्त कामें करावीं लागतात. या कामाचें क्षेत्र शाळेपासून सुरू होऊन वयाचे मानानें पुढें मोठें होत जातें. लहान वयाचे विद्यार्थी शाळेंतीलच उपयुक्त कामें करतात. प्रौढ विद्यार्थी शाळेबाहेरील समाजांत जाऊन उपयुक्त कामें करतात.

त्यांतले त्यांत नवीन संघटना करण्याचें काम कोम्सोमोल या विभागाकडे असतें. शाळेंत निर्माण झालेल्या संघटना चालविणें हें काम पायोनियर्सकडे दिलें जातें.

अगदीं लहान वयाचे (आक्टोब्रिस्ट) क्रांतिबालक सभासदांना शाळेंतील सामुदायिक कामें दिलीं जातात. त्यांच्यापुढें तीन ध्येयें ठेविलेलीं

आहेत. ज्ञानार्जन करा, कामकरी–शेतकरी वर्गाला त्यांच्या कार्यांत मदत करा, आणि आपली संघटना मजबूत करा.

पायोनियर्सकडे शाळेंतील विविध संघांचें नेतृत्व करण्याचें काम असतें. मुलांची स्वराज्यसंस्था, आरोग्यशाखा, अभ्यासखातें, व्यायामखातें इत्यादि अनेक ठिकाणीं पायोनियर्सनीं मुख्य पुढाकार घेऊन इतरांना शिक्षण दिलें पाहिजे. अभ्यास, सार्वजनिक कार्य, आणि नेतृत्व या बाबतींत पायोनियर सभासद हा इतर विद्यार्थ्यांपुढें आदर्श असावा. सामान्य विद्यार्थ्यांना राजकीय शिक्षण देण्याची जबाबदारी पायोनियर्सवर असते.

कोम्सोमोल विभागांतील सभासद वयानें प्रौढ असल्यामुळें अधिक जबाबदारीचीं अशीं समाजसेवेचीं कामें त्यांचेकडे येतात. साक्षरता प्रसाराच्या कामांत या तरुणांची रशियाला पुष्कळ मदत झाली. मॉस्कोमध्यें १९३३ सालीं जमिनीखालून आगगाडी जाण्याचा रस्ता करावयाचा होता, परंतु सरकारजवळ पैसा नव्हता. त्या वेळीं या तरुणांनीं पुढें होऊन रस्त्याचा (सब्वेचा) एक भाग पूर्ण करून दिला. त्यानिमित्त रशियन तरुणाचा एक भव्य पुतळा मॉस्कोच्या प्रमुख चौकांत उभा केलेला आहे.

राजकीय समारंभांत भाग घेऊन मदत करणें, खेड्यांतील मुलांना कामें शिकविणें, वयस्क माणसांना राजकीय शिक्षण देणें, नास्तिकपणाची मोहीम चालविणें, लष्करी शिक्षणांत मदत करणें, लहान मुलांना शिक्षण देणें, त्यांना शारीरिक खेळ शिकविणें, कारखान्यांत कामगारांना मदत करणें इत्यादि अनेक प्रकारचीं कामें युवकसंघांचे सभासदांना करावीं लागतात.

वरील माहितीवरून एक मुद्दा लक्षांत येईल कीं या कार्यक्रमाचा भर केवळ खेळ, करमणुकी, सामने, आणि शेकोटीभोंवतीं बसून शिळोप्याच्या गप्पा मारणें, एवढ्यावरच नाहीं ; भोंवतालच्या समाजाकरितां उपयुक्त काम करण्यावर आहे.

## ज्ञानार्जनावर लक्ष

युवकसंघांत प्रत्यक्ष कामाला जितकें प्राधान्य दिलें जातें तितकेंच ज्ञानार्जनालाही दिले जातें ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. 'Only by acquiring the accumulated culture of mankind can you

hope to become a perfect communist.' 'मानवजातीनें निर्माण केलेला ज्ञानसंग्रह हस्तगत केल्यानंतरच मनुष्य खरा कम्यूनिस्ट होतो' असे लेनिनचें वाक्य आहे; त्याला युवकसंघानें वेदाप्रमाणें मानलें आहे. 'एकसारखा अभ्यास करा, थांबू नका' असें लेनिनचें सारखें सांगणें असे.

चर्चामंडळें, स्वाध्यायसंघ, वाचन केंद्रें, इत्यादि प्रकारच्या ज्ञानसंवर्धक कार्यक्रमांकडे युवकसंघाचें विशेष लक्ष असतें. अर्थात् या वाचनांत व विचार-विनिमयांत राजकारण, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, समाजवादाचीं तत्त्वें, मार्क्सदर्शन इत्यादि विषयांना विशेष महत्त्व दिलें जातें. समाजवादी राजकारणाचीं आद्य तत्त्वें (पोलिटिकल् ग्रामर) प्रत्येक सभासदाला मुखोद्गत पाहिजेत. खालच्या विभागांतून वरच्या विभागांत जाण्यापूर्वीं राजकीय विचाराच्या दृष्टीनें सभासदाची किती तयारी आहे तें पाहून मग त्याला वरिष्ठ विभागांत घेतलें जातें; तो केवळ वयामुळें किंवा इच्छेमुळें आपोआप वर जाऊं शकत नाही.

१९३६ सालापासून या संघाचे सभासदत्वाच्या मर्यादा अधिक व्यापक करण्यांत आलेल्या आहेत. यापूर्वीं एकूण विद्यार्थीवर्गापैकीं फक्त शेंकडा वीसपंचवीसपर्यंत सभासद संघांत येऊं शकत, त्याचेऐवजीं यापुढें अधिक विद्यार्थी संघांत येऊं शकतील.

## अभ्यास व अभ्यासेतर शिक्षण

रशियांतील युवकांच्या या संघटनेला इतर बौद्धिक शिक्षणाइतकेंच महत्त्व आहे. शिक्षण केवळ पुस्तकी न ठेवतां व्यावहारिक आणि क्रियाप्रधान ठेविलें पाहिजे या तत्त्वाचें आचरण करण्याचे भरांत रशियन पुढाऱ्यांकडून प्रारंभीं अतिरेक झाला; त्याचा मुलांच्या बौद्धिक अभ्यासावर अनिष्ट परिणाम झालेला दिसून आला. त्यामुळें आतां अभ्यासेतर कार्यक्रमाला योग्य मर्यादा घालून अभ्यास व इतर कार्य यांचें योग्य प्रमाण विद्याखात्यानें बसविलें आहे. हा अनुभव मॉस्को येथील शिक्षणतज्ज्ञ प्रो. शाट्स्की यांनीं स्पष्ट शब्दांत बोलून दाखविला. रशियाच्या विद्यार्थीवर्गाच्या संघटनेंत राजकारण आहे हें स्पष्टच दिसत आहे. परंतु राजकारणापेक्षां समाजाला उपयोगी कार्य आणि

विद्यार्थ्याला व्यापक शिक्षणाची संधि या कामांत किती आहे तेंही पाहणें जरूर आहे.

## जर्मनींतील युवक संघटना

जर्मनीमध्यें तरुण विद्यार्थ्यांच्या चळवळी गेल्या दोन पिढ्या चालल्या आहेत. शिक्षणाचे दृष्टीनें त्यांचें महत्त्व फार आहे. शिक्षणाचा अर्थ व्यापक घेतल्यास, तें शाळेंत जितकें होते तितकेंच, किंवा त्यापेक्षां अधिक, शाळेच्या बाहेर होत असतें. जर्मन शिक्षणाचा विचार करितांना शाळेच्या बाहेर, विद्यार्थ्यांच्या इच्छेनें किंवा वडील पिढीनें त्यांना घालून दिलेल्या संघटनेमुळें त्यांचें काय शिक्षण होत असतें याचाही विचार केला पाहिजे. शाळेंत मुलाचें बौद्धिक शिक्षण होतें. परंतु तितकेंच महत्त्वाचें जें शारीरिक, मानसिक, आणि भावनाविषयक शिक्षण हें बाहेर होत असतें. या दृष्टीनें जर्मनींतील तीन संघटनांची माहिती महत्त्वाची आहे.

### प्रवासी विद्यार्थी व युवक धर्मशाळा

महायुद्धानंतर जर्मन शिक्षणांत सुधारणा झाली, परंतु तत्पूर्वी कांहीं दृष्टींनीं तें बरेंच सदोष होतें. शिक्षणांत एकंदर भर बुद्धीच्या वाढीवर आणि ज्ञानसंग्रहावर अधिक होता. परीक्षा, अभ्यास, आणि शिस्त यांचे दडपणाखालीं विद्यार्थी राहात. विद्यापीठें व दुय्यम शाळा ज्या शहरांत होत्या तेथें आधुनिक सुधारणेमुळें विद्यार्थ्यांना मोकळेपणाला वाव राहिला नाहीं, गुदमरल्यासारखें झालें होतें. विद्यार्थीवर्गांत कृत्रिम राहणी, नटवेपणा, छचोरपणा, आणि व्यसनें यांचा प्रसार झालेला होता.

या परिस्थितीविरुद्ध एका विद्यार्थ्यानें बंड पुकारलें. १८९८ सालीं कार्ल फिशर नांवाचा एक हायस्कूल विद्यार्थी एकटाच अरण्यामध्यें प्रवासाला निघाला. हळुहळू त्याचे भोंवतालीं बरेच विद्यार्थी जमले. सुटीचे दिवसांत शहर आणि शाळा सोडून लांब वनांत किंवा खेडेगांवांत जाऊन राहावें, तेथें खेळ खेळावेत, पोहावें, गाणीं म्हणावींत, शेकोटीभोंवतीं गप्पागोष्टी कराव्यात, लोकगीतें गावींत, जानपदनृत्यें करावींत आणि सुटीनंतर पुनः शहरांत परत यावें असा कार्यक्रम त्यांनीं आंखला. प्रवासाचे दृष्टीनें जर्मन देश पाहण्या-

सारखा आहे. प्रत्येक ठिकाणीं कांहीं ऐतिहासिक अवशेष, निसर्गरमणीय स्थान किंवा प्रेक्षणीय संस्था आहे. जुने किल्ले, देवळें, निबिड अरण्यें; सुंदर वनश्री, पर्वतांच्या रांगा, नद्या, खोरीं इत्यादि गोष्टी पाहण्यासारख्या आहेत. शाळेच्या अभ्यासामुळें विद्यार्थी या मातृभूमीच्या संपत्तीला पारखे झाले होते. ती त्यांनीं पुनः स्वप्रयत्नानें मिळविली. हे विद्यार्थी स्वतःला "फिरते पक्षी" (वॉंडरिंग बर्ड्स्) असें म्हणवू लागले.

मुलांची प्रवास करण्याची प्रवृत्ति वाढली त्याबरोबर वाटेंत ठिकठिकाणीं उतरण्याच्या सोयींचीही जरूरी भासूं लागली. याकरितां युवक–धर्मशाळा (यूथ होस्टेल) काढण्याचें काम १९१० सालीं रिचर्ड शिर्मान या शिक्षकानें केलें. ज्या ज्या भागांत कांहीं पाहण्यासारखें आहे तेथें तेथें या धर्मशाळा निघाल्या आहेत. आज जर्मनींत अशा ५००० पेक्षां अधिक युवक-धर्मशाळा आहेत. सार्वजनिक किंवा नगरपालिकेच्या खर्चानें या धर्मशाळा बांधलेल्या आहेत. अगदीं अलीकडे बांधलेल्या अशा संस्थांमध्यें अद्ययावत् सर्व सोयी आहेत. स्वयंपाकाची साधनसामुग्री, स्नानाला नळें किंवा फवारे, निजण्याला चौपाई आणि अंथरूणपांघरूण इत्यादि सर्व प्रकारची सोय अगदीं थोड्या खर्चामध्यें होते. माणशीं दीड ते पांच आण्यांपर्यंत हा खर्च येतो.

या धर्मशाळेंत एक 'आई' किंवा 'बाबा' कोणी तरी देखरेखीकरितां असतो. उतारू विद्यार्थ्यांचे वर्तनावर ती किंवा तो देखरेख ठेवितो व त्यांची सर्व व्यवस्था करितो. धर्मशाळेंत दारू पिण्याची किंवा तमाखू ओढण्याची सक्त मनाई असते. धर्मशाळेची किल्ली गांवअधिकाऱ्याजवळ ठेवितात. त्याचे परवानगीनें तेथें उतरतां येतें. वैद्यकीय अधिकाऱ्यांची या संस्थेवर देखरेख असते. सारांश, सोयी, आरोग्य, आणि नैतिक जबाबदारी या गोष्टींची पूर्ण काळजी घेतली गेलेली आहे.

जर्मन लोक प्रवासाचे फार हौशी आहेत. सुटीचे दिवसांत सारे रानावनांतून, डोंगरावर, समुद्रकांठीं, किंवा नदीकिनाऱ्यावर भटकत असतात. विद्यार्थी एकटा दुकटा किंवा संघाबरोबर पाठीवर आपलें सामान बांधून, सायकलवर किंवा पायीं चालू लागतो. अकरा वर्षांपासून पुढें सर्व वयाचीं मुलें आपल्या जबाबदारीवर प्रवास करीत असतात. अशा रीतीनें शहरांतील विद्यार्थ्यांचा निसर्गाशीं, मातृभूमीशीं, आणि ग्रामीय जनतेशीं संबंध येतो.

विद्यार्थ्याला व्यापक शिक्षणाची संधि या कामांत किती आहे तेंही पाहणें जरूर आहे.

## जर्मनींतील युवक संघटना

जर्मनीमध्यें तरुण विद्यार्थ्यांच्या चळवळी गेल्या दोन पिढ्या चालल्या आहेत. शिक्षणाचे दृष्टीनें त्यांचें महत्त्व फार आहे. शिक्षणाचा अर्थ व्यापक घेतल्यास, तें शाळेंत जितकें होतें तितकेंच, किंवा त्यापेक्षां अधिक, शाळेच्या बाहेर होत असतें. जर्मन शिक्षणाचा विचार करितांना शाळेच्या बाहेर, विद्यार्थ्यांच्या इच्छेनें किंवा वडील पिढीनें त्यांना घालून दिलेल्या संघटनेमुळें त्यांचें काय शिक्षण होत असतें याचाही विचार केला पाहिजे. शाळेंत मुलाचें बौद्धिक शिक्षण होतें. परंतु तितकेंच महत्त्वाचें जें शारीरिक, मानसिक, आणि भावनाविषयक शिक्षण हें बाहेर होत असतें. या दृष्टीनें जर्मनीतील तीन संघटनांची माहिती महत्त्वाची आहे.

### प्रवासी विद्यार्थी व युवक धर्मशाळा

महायुद्धानंतर जर्मन शिक्षणांत सुधारणा झाली, परंतु तत्पूर्वी कांहीं दृष्टींनीं तें बरेंच सदोष होतें. शिक्षणांत एकंदर भर बुद्धीच्या वाढीवर आणि ज्ञानसंग्रहावर अधिक होता. परीक्षा, अभ्यास, आणि शिस्त यांचे दडपणाखालीं विद्यार्थी राहात. विद्यापीठें व दुय्यम शाळा ज्या शहरांत होत्या तेथें आधुनिक सुधारणेमुळें विद्यार्थ्यांना मोकळेपणाला वाव राहिला नाही, गुदमरल्यासारखें झालें होतें. विद्यार्थीवर्गांत कृत्रिम राहणी, नटवेपणा, छचोरपणा, आणि व्यसनें यांचा प्रसार झालेला होता.

या परिस्थितीविरुद्ध एका विद्यार्थ्यानें बंड पुकारलें. १८९८ सालीं कार्ल फिशर नांवाचा एक हायस्कूल विद्यार्थी एकटाच अरण्यामध्यें प्रवासाला निघाला. हळुहळू त्याचे भोंवतालीं बरेच विद्यार्थी जमले. सुटीचे दिवसांत शहर आणि शाळा सोडून लांब वनांत किंवा खेडेगांवांत जाऊन राहावें, तेथें खेळ खेळावेत, पोहावें, गाणीं म्हणावींत, शेकोटीभोंवतीं गप्पागोष्टी कराव्यात, लोकगीतें गावींत, जानपदनृत्यें करावींत आणि सुटीनंतर पुनः शहरांत परत यावें असा कार्यक्रम त्यांनीं आंखला. प्रवासाचे दृष्टीनें जर्मन देश पाहण्या-

सारखा आहे. प्रत्येक ठिकाणीं कांहीं ऐतिहासिक अवशेष, निसर्गरमणीय स्थान किंवा प्रेक्षणीय संस्था आहे. जुने किल्ले, देवळें, निबिड अरण्यें; सुंदर वनश्री, पर्वतांच्या रांगा, नद्या, खोरीं इत्यादि गोष्टी पाहण्यासारख्या आहेत. शाळेच्या अभ्यासामुळें विद्यार्थी या मातृभूमीच्या संपत्तीला पारखे झाले होते. ती त्यांनी पुनः स्वप्रयत्नानें मिळविली. हे विद्यार्थी स्वतःला "फिरते पक्षी" (वाँडरिंग बर्डस्) असें म्हणवू लागले.

मुलांची प्रवास करण्याची प्रवृत्ति वाढली त्याबरोबर वाटेंत ठिकठिकाणीं उतरण्याच्या सोयींचीही जरूरी भासूं लागली. याकरितां युवक–धर्मशाळा (यूथ होस्टेल) काढण्याचें काम १९१० सालीं रिचर्ड शिर्मान या शिक्षकानें केलें. ज्या ज्या भागांत कांहीं पाहण्यासारखें आहे तेथें तेथें या धर्मशाळा निघाल्या आहेत. आज जर्मनीत अशा ५००० पेक्षां अधिक युवक-धर्मशाळा आहेत. सार्वजनिक किंवा नगरपालिकेच्या खर्चानें या धर्मशाळा बांधलेल्या आहेत. अगदीं अलीकडे बांधलेल्या अशा संस्थांमध्यें अद्ययावत् सर्व सोयी आहेत. स्वयंपाकाची साधनसामुग्री, स्नानाला नळें किंवा फवारे, निजण्याला चौपाई आणि अंथरूणपांघरूण इत्यादि सर्व प्रकारची सोय अगदीं थोड्या खर्चामध्यें होते. माणशीं दीड ते पांच आण्यांपर्यंत हा खर्च येतो.

या धर्मशाळेंत एक 'आई' किंवा 'बाबा' कोणी तरी देखरेखीकरितां असतो. उतारू विद्यार्थ्यांचे वर्तनावर ती किंवा तो देखरेख ठेवितो व त्यांची सर्व व्यवस्था करितो. धर्मशाळेंत दारू पिण्याची किंवा तमाखू ओढण्याची सक्त मनाई असते. धर्मशाळेची किल्ली गांवअधिकाऱ्याजवळ ठेवितात. त्याचे परवानगीनें तेथें उतरतां येतें. वैद्यकीय अधिकाऱ्यांची या संस्थेवर देखरेख असते. सारांश, सोयी, आरोग्य, आणि नैतिक जबाबदारी या गोष्टींची पूर्ण काळजी घेतली गेलेली आहे.

जर्मन लोक प्रवासाचे फार हौशी आहेत. सुटीचे दिवसांत सारे रानावनांतून, डोंगरावर, समुद्रकांठीं, किंवा नदीकिनाऱ्यावर भटकत असतात. विद्यार्थी एकटा दुकटा किंवा संघाबरोबर पाठीवर आपलें सामान बांधून, सायकलवर किंवा पायीं चालू लागतो. अकरा वर्षांपासून पुढें सर्व वयाचीं मुलें आपल्या जबाबदारीवर प्रवास करीत असतात. अशा रीतीनें शहरांतील विद्यार्थ्यांचा निसर्गाशीं, मातृभूमीशीं, आणि ग्रामीय जनतेशीं संबंध येतो.

जर्मनींत युद्धोत्तर शिक्षणसुधारणा झाली त्यांत या 'फिरते पक्षी' आणि 'युवक धर्मशाळा' चळवळींचीं तत्त्वें गोंविलेलीं आहेत. निसर्गसान्निध्य, ग्रामीय जीवनाशी ऐक्य, शारीरिक स्वातंत्र्य, आणि चौरस शिक्षण ही तत्त्वें नवीन शिक्षणपद्धतीमध्यें घेतली गेली.

## हिटलर युवक संघ

युद्धापूर्वी जी विद्यार्थ्यांची चळवळ झाली त्यांत तयार झालेल्या तरुणांनीं राष्ट्रीय समाजवादी (नाझी) राज्यक्रांति घडवून आणली. राष्ट्राच्या घडामोडीत विद्यार्थ्यांचे अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे, हें ओळखून हिटलरनें एक प्रचंड संघटना निर्माण केली. 'तरुणांचें नेतृत्व तरुणांनींच घ्यावें' असें सांगून त्यानें बाल्डूर फॉन शिराक् या तरुणाकडे या संघटनेचें कार्य दिलें. त्याला 'जर्मन राज्यांतील युवक पुढारी' अशी पदवी देऊन 'हिटलर युवक संघाचें' एक स्वतंत्र राष्ट्रीय खातें हिटलरनें सुरू केलें. बर्लिनमध्यें या खात्याचें केंद्र आहे. तेथील कार्यालयांत देशांतील प्रत्येक तरुणाची तपशीलवार नोंद आहे. पूर्वीची 'फिरते पक्षी' आणि 'युवक धर्मशाळा' संघटना या नवीन संघटनेमध्यें विलीन झाल्यासारखीच आहे; कारण जुन्या संस्थेचे सभासद नव्या संस्थेला येऊन मिळाले.

विद्यार्थ्यांचें आरोग्य, गरीब मुलाना मदत, शारीरिक खेळ, वैमानिक विद्येचें शिक्षण इत्यादि अनेक कामें या संघाकडून होतात. युवक धर्मशाळांची व्यवस्था याच खात्याकडे आहे. या कार्याचा खर्च सरकारी मदत, सार्वजनिक देणग्या आणि सभासदाची वर्गणी यांतून भागविला जातो.

सहापासून अठरा वयापर्यंतच्या मुलांना व मुलींना संघाचे सभासद होतां येतें. सभासदत्व ऐच्छिक असलें तरी शेंकडा ८० पेक्षां अधिक मुलांनीं यांत नांवें नोंदविली आहेत. १९३३ मध्यें संघाचे पंधरा लाख सभासद होते. वयमानपरत्वें ६ ते १०, १० ते १४ व १४ ते १८ असे निरनिराळे विभाग या संघांत पाडलेले आहेत. मुलांचा व मुलींचा समावेश या संघटनेंत झाला असून दोघांचीं पथकें स्वतंत्र असतात. अठरानंतर सभासद आपोआप नाझीपक्षामध्यें दाखल होतो. अशा रीतीनें विद्यार्थीवर्गांतून नाझी पुढारी आपोआप तयार होण्याची योजना झालेली आहे.

प्रत्येक गांवांत, तालुक्यांत, जिल्ह्यांत व प्रांतांत ही संघटना आहे. तिची घटना अत्यंत पद्धतशीर केलेली असल्यामुळें खालपासून वरपर्यंत एक-सूत्रीपणानें काम चालतें. प्रत्येक ठिकाणीं संघाचें नेतृत्व व मार्गदर्शित्व नाझीपक्षापैकीं एकाद्या तरुण सभासदाकडे दिलेलें असतें.

आठवड्यांतील पांच दिवस सर्वस्वीं अभ्यासाला, रविवार आपल्या घरीं आईबापाजवळ राहून कौटुंबिक जीवन अनुभवण्याला, आणि शनिवार हिटलर युवक संघाच्या कार्याला अशी आठवड्याच्या सात दिवसांची वांटणी झालेली आहे.

प्रत्येक संघाची साप्ताहिक सभा भरते. त्या ठिकाणीं प्रथम राजकीय विषयावर चर्चा होते. नंतर मर्दानी खेळ, सामुदायिक गीतें, जानपद नृत्यें इत्यादि कार्यक्रम होतात. शाळेंत, तालमींत किंवा संघनायकाचे घरीं सभा भरतात. महिन्यांतून एका शनिवारीं सर्व शाळांना सुटी असते. त्या दिवशीं ठिकठिकाणीं संघाचे सभासद एकत्र येऊन सामुदायिक कार्यक्रम करतात. पायी प्रवास, छावणी, खेळ, ऐतिहासिक व्याख्यानें इत्यादि गोष्टींचा त्यांत समावेश होतो. वर्षांतून एकदां सर्व राष्ट्रांत 'नॅशनल् फील्ड डे' पाळला जातो. सर्वत्र युवकसंघाच्या टोलेजंग सभा होऊन राष्ट्रीय पुढाऱ्यांचीं तेथें भाषणें होतात. प्रत्येक राजकीय समारंभांत युवकसंघाच्या सभासदांचे प्रेक्षणीय कार्यक्रम होतात. अशा रीतीनें राष्ट्राचे जीवनांत आपणाला फार महत्त्वाचें स्थान आहे, अशी जाणीव विद्यार्थ्यांना करून दिली जाते. त्यामुळें मुलांच्या जीवनांत एक प्रकारची गंभीरता व ध्येयबुद्धि जागृत होते.

पूर्वीच्या युवक चळवळींत आणि या संघाचे कार्यांत उद्देशाचे दृष्टीनें महत्त्वाचा फरक आहे. 'व्यक्तीपेक्षां सामुदायिक हिताचें महत्त्व अधिक आहे' असें या संघाचें ब्रीदवाक्य आहे. संघवृत्ति, राष्ट्रीय ऐक्य, आणि राजकीय जागृति या गोष्टी संघामध्यें विशेष आहेत. पूर्वीच्या चळवळींत त्या नव्हत्या. या संघापैकीं विली कर्बर या पुढाऱ्यानें संघाचे उद्देश स्पष्ट केले आहेत.

"The Hitler–Jugend is no purely political organisation, nor merely for sport; it is the voice of the entire young generation in Germany calling for a new social order and a new era."

"हिटलर युवकसंघ ही केवळ राजकारणाकरितां किंवा केवळ खेळ करमणुकीकरितां निघालेली संस्था नाहीं. नवीन युग आणि नवी समाजरचना निर्माण करणाऱ्या तरुण जर्मनीच्या हृदयांतील ती हांक आहे".

**विद्यार्थी कामगार छावणी**

जर्मन शिक्षणांतील तिसरी महत्त्वाची संघटना म्हणजे 'कामगार छावणी' (लेबर कँप) ही आहे. १९३३ मध्यें नाझी कारकीर्दीत तिला मूर्त स्वरूप मिळालेलें असलें तरी तिचा प्रारंभ १९२३ मध्येंच कांहीं समाजसेवक तरुणांनीं केलेला होता. कामगार, शेतकरी, आणि विद्यार्थी यांनीं एकत्र येऊन देशाला उपयुक्त अशीं शारीरिक श्रमाचीं कामें खांद्यास खांदा लावून करावींत. तेथें शिक्षित अशिक्षित, मालक मजूर, कामकरी महाजन, गरीब श्रीमंत वगैरे सर्व भेद विसरून जावेत, आणि मातृभूमीकरितां समाजोपयोगी काम तरुणांनीं करावें अशी या छावणीची कल्पना आहे.

अरण्यें तोडून तेथें वसतियोग्य मैदान करणें, पुढील पिढीला उपयुक्त असे वृक्ष लावणें, रस्ते करणें, कालवे खणणें, नद्यांना पूर येतात तेथें बांध घालणें—अशीं अनेक प्रकारचीं कामें या छावणींतील स्वयंसेवक करीत असतात. विद्यार्थ्यांचें दुय्यम शाळेंतील शिक्षण पूर्ण झाल्यावर विद्यापीठांत जाण्यापूर्वी किंवा नोकरीधंद्यांत शिरण्यापूर्वी सहा महिने अथवा एक वर्ष या छावणींत सक्तीनें सर्वांना राहावें लागतें. अठराएकोणीस वयाची सर्व पिढी या छावणीच्या संस्कारांतून जावी अशी योजना आहे. या छावणींत शेंकडा तीसचाळीस विद्यार्थी असावेत व बाकीचे लोक कामकरी—शेतकरी असावेत असा नियम आहे. खालच्या वर्गांत मिसळून विद्यार्थ्यांनीं शारीरिक कष्ट करावेत असा मुख्य उद्देश आहे.

छावणींतील कार्यक्रमांत सात तास शारीरिक काम, एकदोन तास लष्करी व शारीरिक शिक्षण, एक तास राष्ट्रविद्येचा (नॅशनॉलॉजी) वर्ग इत्यादि कार्यक्रम असतो. एकंदर वातावरणांत शिस्त, साधेपणा, गांभीर्य आणि ध्येयनिष्ठा या गोष्टींची जाणीव प्रेक्षकाला होते.

मुलांप्रमाणें मुलींच्या करतांही स्वतंत्र छावण्या आहेत. तेथें मुलींना योग्य अशा प्रकारचा कार्यक्रम असतो. १९३६ मध्यें या छावण्यांत १२,००० विद्यार्थिनी होत्या.

विद्यार्थ्यांना कामगार छावणी सक्तीची करण्यांत नाझींचे दोनतीन उद्देश आहेत. जर्मनींत शिकलेले तरुण श्रमाला कमी दर्जाचे मानूं लागले. "हातानें काम करणारा मूर्ख आहे" अशी म्हण पडली होती. अशा तरुणांना श्रमाचें महत्त्व अनुभवानें पटवून देणें हा त्यांत उद्देश आहे. देशांत समाजवाद्यांच्या चळवळीमुळें कामगार मालक, मजूर भांडवलवाले, खालचा वर्ग आणि वरचा वर्ग इत्यादि वर्गभेद पडले होते. ते नाहीसे करून सर्व समाजवर्ग एक आहेत, अशी सामाजिक भावना कामकरी, सुशिक्षित, आणि श्रीमंत तरुण पिढींत उत्पन्न करणें हा दुसरा उद्देश आहे. नाझींचें विशेष लक्ष सध्यां खेडीं आणि शेती यांकडे आहे. म्हणून तरुण पिढीला शेतकरी आणि शेती यांच्या सान्निध्यांत आणण्याचे शक्य तितके प्रसंग आणण्याचा प्रयत्न नाझी पुढाऱ्यांकडून केला जातो. याखेरीज बेकार तरुणांना कामांत गुंतविणें, विद्यापीठांत होणारी विद्यार्थ्यांची गर्दी कमी करणें वगैरे इतर अनेक फायदे या छावणीमुळें साध्य होतात. परंतु नाझींच्या मतानें ते गौण आहेत. मुख्य हेतु सामाजिक वृत्तींत क्रांति घडवून आणणें हा आहे.

### शाळेच्या भिंती पाडल्या

वरील संघटनांच्या योजनेवरून हें दिसून येईल कीं जर्मन तरुणाचें शिक्षण केवळ शाळेच्याच आवारांत होत नाहीं. सर्व देश आणि समाज हीच शाळा झाली आहे. शाळेच्या भिंती पडून गेल्या आहेत. त्याचप्रमाणें तरुण पिढीमध्यें ध्येयाची आणि कार्याची परंपरा कायम राहण्याच्या दृष्टीनें संघटना करणें किती जरूर आहे हें हिटलर युवक संघावरून दिसून येईल. युवक धर्मशाळा, कामकरी छावणी, आणि युवकसंघ या तिन्ही संघटनांचे मुळाशीं महत्त्वाचीं शिक्षणतत्त्वें आहेत. त्यांचा पुढेंमागें इतर देशांच्याही शालेय शिक्षणांत समावेश झाल्याखेरीज राहाणार नाहीं.

## *इटलींतील युवक संघटना*

### इटलींतील रविवार

इटलीमधील रोमसारख्या मोठमोठ्या शहरांतून फिरणाऱ्या प्रेक्षकाला प्रत्येक नाक्यावर व चौकाच्या जागेंत मोठ्या कांचेच्या तावदानांच्या आंत

अनेक चित्रें लावलेलीं दिसतात. त्यांवर 'ऑपेरा नाझिओनाले बालिल्ला' असा मथळा असतो. लहान आणि मोठ्या विद्यार्थ्यांच्या शारीरिक, लष्करी, आणि इतर शिक्षणविषयक कार्यक्रमांचीं चित्रें त्यांत लाविलेलीं असतात. रस्त्यांतून जाणारा येणारा नागरिक चित्रें पाहतो व पुढें चालू लागतो.

रविवारचा किंवा सुटीचा दिवस असला म्हणजे रोमचे रस्ते लहान मुलांच्या पलटणींनीं भरून गेलेले दिसतात. काळा खमीस, निळी गळेपट्टी, लष्करी टोपी, आणि भुरकी विजार अशा प्रकारचा लष्करी ऐटीचा पोषाख केलेलीं हीं बालकें शिस्तवार चालीनें आपल्या नायकाच्या देखरेखीखालीं चाल करीत असतात. इटलीच्या शाळेंत गेल्यानंतर हींच बालकें फाशिस्ट पद्धतीचा सलाम करून राष्ट्रीय गाणीं गातांना प्रेक्षकाला दिसतात. हीं मुलें देशभर पसरलेल्या बालिल्ला संघाचे सभासद आहेत.

## ही केवळ बाललीला नाहीं

बालिल्ला संघाचें कार्य केवळ मुलांच्या खेळाकरितां आणि करमणुकीकरितां नाहीं. या चळवळीचा संबंध खालीं प्रत्येक घरातील लहान मुलापर्यंत पोंचतो, आणि वर फाशिस्ट पक्षाचे अध्वर्यूपर्यंत जाऊन भिडतो. त्यामुळें वरपासून खालपर्यंत एका विचारसरणीचा, एका ध्येयाचा, आणि एका कार्यपद्धतीचा प्रसार पद्धतशीर रीतीनें होत असतो. फाशिस्ट पक्षाला भावी तरुण पिढी तयार करावयाची आहे. तें कार्य बालिल्ला संघामार्फत चालू असतें. नवीन राजकीय धोरणानुसार सर्व इटलींतील तरुण प्रजा एका विचारानें आणि जोमाने भारून टाकण्याकरितां ही कार्यप्रधान संघटना स्थापन झालेली आहे. जें आवश्यक शिक्षण शाळेच्या सांप्रदायिक सांच्यांत बसूं शकत नाहीं तें देण्याकरितां शाळेला समांतर अशी ही दुसरी शिक्षणपद्धति आहे. या दृष्टीनें तिचें महत्त्व विशेष आहे.

## पद्धतशीर संघटना

बालिल्ला संघाच्या कार्याला आरंभ १९२२ मध्यें झाला. परंतु फाशिस्ट पक्षाचे कार्याचा महत्त्वाचा भाग या दृष्टीनें 'ऑपेरा नाझिओनाले बालिल्ला' या संघटनेची प्रतिष्ठापना १९२६ मध्यें झाली. १९२९ पर्यंत तिचें कार्य स्वतंत्रपणें झालें, आणि नंतर तिचा सरकारी विद्याखात्यांत समावेश

करण्यांत आला. शिक्षणमंत्र्याचे हाताखालीं एक दुय्यम मंत्री (अंडर सेक्रेटरी) असतो. तो या खात्याची व्यवस्था पाहतो. शिक्षणपद्धतीपैकीं शारीरिक शिक्षणाच्या विभागाचें काम या खात्याकडे सोंपविण्यांत आलेलें आहे. बालिल्ला संघाची मध्यवर्ती संघटना विद्याखात्याचे देखरेखीखालीं असून तिच्या शाखा खालीं प्रांत, जिल्हा, तालुका व गांवें यांतून पसरल्या आहेत. ठिकठिकाणच्या संघांचें नेतृत्व प्राथमिक व दुय्यम शिक्षकांचेकडे आहे. कांहीं ठिकाणीं फाशिस्ट सैन्यांतले अधिकारीही या संघांचे नायक आहेत.

या संघटनेवरून एक गोष्ट लक्षांत येईल कीं संस्था स्थापन करून तिला नेते आणि नायक पुरविण्याचें काम वयस्क पिढीनें केलेलें आहे. तिचे मार्गदर्शित्वाखालीं तरुण पिढी कामें करीत आहे.

### विद्यार्थीवर्गाची पद्धतशीर संघटणा

सहा वर्षांपासून पुढची मुलांमुलींची सर्व तरुण पिढी बालिल्ला संघटनेच्या संस्काराखालीं आलेली आहे. एका टोंकांतून शिरलेला मुलगा दुसऱ्या टोंकांतून पूर्ण फाशिस्ट होऊन बाहेर पडतो. तो अठरावे वर्षीं फाशिस्ट उमेदवार होऊन एकविसावे वर्षी पक्षाचा सभासद बनतो. अशा रीतीनें तरुण पिढींतून आपल्या पक्षाचे व सांप्रदायाचे भावी अनुयायी तयार करण्याकरितां, आणि पुढाऱ्यांची अखंड परंपरा कायम ठेवण्याकरितां फाशिस्ट पक्षानें बालिल्ला संघटना निर्माण केली आहे. ती केवळ बाललीला नाहीं, राजकीय लीला आहे.

सहावे वर्षीं या संघांत शिरल्यापासून मुलगा तीन अवस्थांमधून जातो. आणि एकविसावे वर्षीं फाशिस्ट पक्षाचा सभासद होण्यास लायक बनतो. मुलांच्या संघटना व त्यांत १९३४ मध्यें असलेली संख्या पुढें दिली आहे.

| वय | संघाचें नांव | संख्या |
|---|---|---|
| ६ ते १४ | बालिल्ला | १४३०४०३ |
| १४ ते १८ | अव्हान गार्दिस्ती | ४३०८७१ |
| १८ ते २१ | यंग फाशिस्टस् | १०१०२७ |
| | कॅडेटस् | ११९६ |
| ६ ते २१ | नाविक शाखेंतील बालिल्लासंघ | २८२९२ |

शहरांतून बालिल्ला संघटना आहे तशीच नाविक विद्येला अनुकूल अशा ठिकाणींही ती आहे तिला 'मरीनारेती' (नाविक संघ) असें नांव आहे.

मुलांप्रमाणेंच मुलींचेकरितांही संघटना आहे तिची योजना अशी—

| वय | संघाचें नांव | संख्या |
|---|---|---|
| ६ ते १४ | पिकोले इतालिआने | ११,८६,५६९ |
| १४ ते १८ | गिओव्हानी इतालिआने | १,१९,७६९ |

बालिल्ला संघांत नांव दाखल करणें हें मुलांना ऐच्छिक असलें तरी शेंकडा नव्वदपेक्षां अधिक मुलें त्यांत आहेत. सभासद होण्यापूर्वी पालकांची परवानगी लागते.

मुलांना आणि मुलींना विशिष्ट प्रकारचा पोषाख असतो. सगुण भक्तीमध्यें प्रत्यक्ष चिन्हांचा जसा उपयोग होतो तसाच येथेंही तो करून घेतला जातो. पोषाख, विवक्षित सलाम पद्धति, निशाण, विशिष्ट गाणीं, विशिष्ट आचार सांप्रदाय इत्यादि योजनेमुळें मुलांचे मनावर फार परिणाम होतो. या संघाचें ब्रीदवाक्य दोन शब्दांत आलें आहे— "पुस्तक आणि बंदूक असली कीं उत्तम फाशिस्ट झाला" ('ए बुक अँड ए मस्केट, ए पर्फेक्ट फाशिस्ट.)

प्रत्येक बालसभासदाला शपथ घ्यावी लागते तिचा मायना असा आहे.—

'In the name of God and of the Fatherland, I swear to follow the orders of the Duce and to serve with all my energy the cause of the Fascist revolution.'

'परमेश्वर आणि पितृभूमि यांना स्मरून मी अशी शपथ घेतों कीं पुढाऱ्याची (मुसोलिनी) आज्ञा पाळीन आणि फाशिस्ट क्रांतीच्या तत्त्वांकरितां उत्साहपूर्वक काम करीन."

बालिल्ला हें नांव बंडवाचक आहे. इटलीनें ऑस्ट्रियाच्या जुलुमाविरुद्ध जेव्हां १७४६ मध्यें बंड पुकारलें तेव्हां ज्या एका मुलानें पुढाकार घेतला त्याचें टोपणनांव बालिल्ला असें होतें.

## संघटनेचें उद्दिष्ट

तरुण पिढीच्या शारीरिक आणि मानसिक शिक्षणाची काळजी घेऊन

इटलीच्या नवीन कार्याला लायक असे तरुण निर्माण करणें हें या संघटनेचें स्थूल स्वरूपाचें उद्दिष्ट आहे. परंतु फाशिस्ट पक्षाचा व विद्याखात्याचा तो एक भाग असल्यामुळें फाशिझम्चीं जीं तत्त्वें आहेत तींच याही संघटनेचीं आद्यतत्त्वें आहेत हें निराळें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. राष्ट्रांत एकी घडवून आणावी, इटलीचें साम्राज्य पसरावें, आणि इटली हें एक जोमदार राष्ट्र बनवावें हा या चळवळीचा अंतिम हेतु आहे. त्याकरितां तरुण पिढी हें साधन आहे. म्हणून विशिष्ट वृत्तीचे आणि बाण्याचे युवक आणि युवती निर्माण करण्याचे दृष्टीनें सर्व कार्यक्रमाची आंखणी झालेली आहे. बालिल्ला म्हणजे इटलीचा आदर्श नागरिक आहे. धार्मिक वृत्तीचे, नीतिशुद्ध आचरणाचे, कर्तव्यदक्ष असलेले, आज्ञापालन करणारे, कडवट राष्ट्रीय वृत्तीचे, लष्करी बाण्याचे, शरीरानें बळकट आणि सेवातत्पर असे तरुण लोक निर्माण करणें हें बालिल्ला चळवळीचें स्पष्ट ध्येय आहे. त्यांत संदिग्धपणा नाहीं. आपल्याला कशा प्रकारचे नागरिक पाहिजेत याविषयीं इटलीचा निश्चय झालेला आहे.

बालिल्ला संघाचें मुख्य उद्दिष्ट प्राथमिक लष्करी शिक्षण देऊन शिपाईगिरीचा बाणा असलेले नागरिक निर्माण करणें असें आहे. १९३४ मध्यें आंठपासून पंचावन्न वयाच्या नागरिकांच्या लष्करी शिक्षणाची योजना जाहीर करितांना मुसोलिनी म्हणाला, 'फाशिस्ट राज्यांत नागरिक आणि सैनिक यांचीं कर्तव्यें सारखींच आहेत. ❁ ❁ मूल शिकण्यासारखें झालें कीं त्याचें लष्करी शिक्षण सुरू झालें पाहिजे आणि हातांत बंदूक धरतां येत आहे तोंपर्यंत नागरिकानें सैनिकाचें शिक्षण चालू ठेविलें पाहिजे.' लष्करी शिक्षण हा बालिल्लाचा प्रधान भाग असला तरी इतर उपयुक्त व बिनलष्करी अंगेंही त्याला आहेत.

## कार्यपद्धति

बालिल्ला संघाचें कार्यक्षेत्र व्यापक असलें तरी त्याचें मुख्य काम शारीरिक आणि लष्करी पद्धतीचें शिक्षण देणें हें आहे. शाळेंतील शारीरिक शिक्षण या संघाकडे असतें. सुटीचे दिवशीं जादा कार्यक्रम असतात. लहान व मोठ्या मुलांना लष्करी कवायत, बंदूक व मशिनगन् मारण्यास शिकविणें, मर्दानी खेळांचे सामने भरविणें, शारीरिक शिक्षणाचे शिक्षक तयार करणें, मुलांना विमानविद्येचा परिचय करून देणें, मधून मधून छावण्या सभा व

समारंभ घडवून आणणें, कांहीं तरुण जलप्रवासाला पाठविणें इत्यादि अनेक प्रकारचे कार्यक्रम वर्षभर चालू असतात. याशिवाय प्रौढ जनतेच्या शिक्षणाकरितांही बालिल्लाचे सभासद अनेक कामें करितात. ग्रंथालयें चालविणें, शैक्षणिक चित्रपट दाखविणें, नाटचप्रयोग करणें, प्रवासाच्या तुकडचा काढणें, धंदेशिक्षणाची व्यवस्था करणें, कलाशिक्षणाला प्रोत्साहन देणें इत्यादि शैक्षणिक कार्यक्रम चालू असतात. या सर्व शिक्षणांत राजकीय हेतु प्रमुख असतो.

शहराप्रमाणें खेडयांतही ही चळवळ पसरली असून तिला 'ग्रामीय बालिल्ला' असें नांव आहे. दर महिन्याचे अखेरचे शनिवारीं विद्यार्थी व शिक्षक एकरंगी पोषाख घालून एकत्र जमतात व संघाची शपथ घेतात. नंतर फाशिझमच्या तत्त्वांवर व कार्यावर प्रवचन होते. मग दिवसभर स्थानिक नायकाच्या योजनेप्रमाणें कार्यक्रम होतात. वर्षअखेर एक मोठी छावणी व समारंभ होत असतात.

वर्षअखेर रोममध्यें बालिल्लासंघाच्या सभासदांची मोठी छावणी पडते आणि राष्ट्रीय समारंभ होतो. त्या वेळीं सर्व विभागांतून सभासद रोमला आणून कांहीं दिवस सरकारी पाहुणे म्हणून ठेविले जातात. तेथें ते मुसोलिनीचीं भाषणें ऐकतात, रोममधील इटलीचें प्राचीन वैभव पाहतात, तेथील मोठ्या शारीरिक शिक्षण महाविद्यालयांत शिक्षण घेतात आणि हे सर्व संस्कार घेऊन आपापल्या गांवीं परत जातात. दरसाल हजारों सभासद हे संस्कार आपल्या बरोबर नेऊन देशाचे कानाकोंपऱ्यांतून उधळतात आणि विशिष्ट भावनांनीं सर्व इटलीचें वातावरण भरून टाकतात. अशा प्रकारें इटलीच्या भावी नागरिकांचें शिक्षण होत असतें.

अठराव्या वर्षानंतर सभासद 'तरुण फाशिस्ट' संघांत जातो किंवा 'कॅडेट्' म्हणून रोममधील व्यायामशास्त्राच्या महाविद्यालयांत दाखल होतो. या ठिकाणीं शारीरिक विद्या आणि फाशिझमचें राजकीय तत्त्वज्ञान शिकून तो तयार झाला म्हणजे शाळांमध्यें त्याची व्यायाम शिक्षक म्हणून नेमणूक होते. एकविसावे वर्षी निवडक सभासदांचा फाशिस्ट पक्षांत समावेश होतो.

## गुणदोषपरीक्षा

बालिल्ला संघाचें गुणदोषपरीक्षण करितांना इटलीची वस्तुस्थिति

जमेस धरली पाहिजे. यूरोपमध्यें पुढारलेल्या राष्ट्रांपेक्षां सर्व दृष्टींनीं मागासलेल्या इटालियन जनतेला थोड्या काळांत जागृत करून पुढें आणावयाचें आहे. व्यायामाची हौस, क्षात्रवृत्ति, आरोग्यदृष्टि, राष्ट्रीय भावना, ऐक्याची जाणीव, सामुदायिक हिताची दृष्टि, इत्यादि गुणांचा अभाव असलेल्या अखिल राष्ट्रांत हे गुण आणणें कांहीं सोपें काम नाहीं. त्याकरितां प्रचंड संघटना पाहिजे, व ती निश्चित ध्येयानें चालणें जरूर आहे. अशा प्रकारची संघटना इटलीनें निर्माण केली आहे. तिच्यांत साम्राज्यवाद आणि अतिरिक्त राष्ट्रवाद हे दोष आहेत. पण त्याबरोबरच पुष्कळ चांगले गुणही आहेत.

## दोन प्रकारच्या विद्यार्थी–संघटना

अमेरिका, इंग्लंड, इत्यादि देशांतही 'बालवीर' (बॉय स्काऊट) सारख्या चळवळी आहेत. आपल्या देशापेक्षां तिकडे त्यांचा प्रचार व प्रसार बराच झालेला आहे. परंतु त्यांत आणि इतर युवक संघटनेंत फरक आहे.

रशिया, जर्मनी आणि इटली या देशांतील विद्यार्थ्यांच्या संघटनेला सामाजिक आणि राजकीय ध्येयवाद आहे, निश्चित कार्य करण्याला प्रोत्साहन आहे, आणि विद्यार्थीवर्गावर खरीखुरी जबाबदारी टाकलेली आहे. असें स्वरूप इंग्लंड–अमेरिकेसारख्या देशांतील विद्यार्थ्यांच्या संघटनेला अद्याप नाहीं. हें सत्य तेच लोक स्वतः कबूल करितात. रशिया, जर्मनी, इटली इत्यादि राष्ट्रांच्या विद्यार्थीविषयक संघटनेंत राजकारण फार भरलें आहे असा आक्षेप येईल. परंतु त्याला हीं राष्ट्रें असें उत्तर देतील कीं, देशांतील तरुण पिढीला जागृत करून तिला समाजकार्यप्रवण करण्याचा अन्य मार्ग आम्हांला दाखवा !

---

## प्रकरण सविसावें

# औद्योगिक शिक्षण व आपलें धोरण

### धंदेशिक्षणाची हिंदी व पाश्चात्य दृष्टि

औद्योगिक शिक्षणाबाबत तात्त्विक चर्चा, विचार, आणि लेखन पाश्चात्य देशांत जितकें झालें आहे त्याचा अंशही अद्याप हिंदुस्थानांत दिसून येत नाहीं. असें जरी असलें तरी हिंदुस्थानचा उद्योगशिक्षणविषयक जो विशिष्ट प्रश्न आहे त्याला उत्तर मात्र पाश्चात्यांच्या वाङ्मयांत अथवा विचारांत सांपडत नाहीं. अमेरिका, इंग्लंड, जर्मनी, व रशिया या देशांतील औद्योगिक शिक्षणाच्या संस्था पाहून तेथील प्रमुख चालकांशीं विचारविनिमय केल्यानंतर हिंदी दृष्टीनें विचार करणाराच्या बुद्धीला पाश्चिमात्य व हिंदी औद्योगिक शिक्षणाचीं धोरणें अगदीं भिन्न आहेत असें वाटूं लागतें.

पाश्चात्य देशांतून उद्योगधंद्यांची वाढ प्रथम झालेली आहे, आणि या उद्योगधंद्यांना लागणारीं माणसें पुरविण्याकरितां व तयार करण्याकरितां औद्योगिक शिक्षणपद्धतीचा अवतार नंतर झालेला आहे. म्हणजे उद्योगधंद्यांत ज्या जागा व नोकऱ्या तयार आहेत त्या भरून काढण्याकरितां ते लोक औद्योगिक शिक्षण देतात, शिक्षण काय द्यावें असा विचार करून डोकें खाजविण्याची पाळी त्यांचेवर येत नाहीं. समाजांत जे उद्योगधंदे जोरानें चाललेले आहेत त्याच धंद्यांना लागणाऱ्या विशिष्ट कामाचें शिक्षण दिलें म्हणजे त्यांचीं माणसें तयार होतात.

आपल्या हिंदुस्थानचा प्रश्न अगदीं निराळा आहे. पाश्चात्य देशांप्रमाणें औद्योगिक वाढ हिंदुस्थानांत झालेली नाहीं. उद्योगधंद्यांत अशा जागा रिकाम्या नाहींत कीं शिक्षणसंस्थांतून मुलें बाहेर पडल्याबरोबर त्या लगेच त्यांना मिळतील. आमचेकडील उद्योगधंदे अद्याप वाढावयाचे आहेत व कांहीं उद्योगधंदे अजून सुरूही झालेले नाहींत. नवे धंदे काढून ते चालवूं शकतील अशीं माणसेंही अद्याप तयार झालेलीं नाहींत. तेव्हां हिंदी औद्योगिक शिक्षणाचा मुख्य प्रश्न हा आहे कीं, अशा प्रकारचे नवीन उद्योगधंदे निर्माण

करूं शकतील अशीं माणसें शिक्षणसंस्थांमध्यें तयार करितां येतील किंवा नाहीं. पाश्चात्य देशांत पूर्वींच निघालेल्या उद्योगधंद्यांना औद्योगिक शिक्षणानें मदत केली; हिंदुस्थानांत औद्योगिक शिक्षणाचे सहाय्यानें नवीन उद्योगधंद्यांचें जग निर्माण करावयाचें आहे. ही गोष्ट हिंदी धंदेशिक्षण करूं शकेल काय ?

अर्थात् वरील प्रश्नाचें उत्तर देण्याइतका विचार पाश्चात्य लोकांनीं केलेला नसल्यामुळें त्यांच्या विचार व वाङ्मयक्षेत्रांत वरील प्रश्नाचें उत्तर नाहीं यांत विशेष नवल नाहीं. आश्चर्य हें आहे कीं आमचेकडील शिक्षण-तज्ज्ञांनीं देखील अद्यापि या प्रश्नाचा विशेष विचार केलेला नाहीं.

## अमेरिकेंतील औद्योगिक शिक्षण

अमेरिकेंत उच्च प्रकारच्या औद्योगिक शिक्षणाला प्रारंभ १८६२ चे सुमारास म्हणजे पाऊण शतकापूर्वीं झाला. प्रत्येक प्रांतामध्यें सरकारी खर्चानें उच्च शेतकी शिक्षणाची व यांत्रिक कला शिकविण्याची सोय झाली पाहिजे असा कायदा मान्य झाला. या कायद्यामुळें उच्च औद्योगिक शिक्षणाची सोय झाली व उद्योगधंद्यांतील वरच्या दर्जाचीं कामें करणारीं माणसें तयार होऊं लागलीं परंतु खालच्या प्रकारचीं कामें शिकविण्याची सोय पुढें पुष्कळ वर्षें झाली नव्हती. ती लोकांच्या चळवळीमुळें १९१७ पासून झाली. या वर्षीं स्मिथ ह्यूजेस कायदा पास होऊन सर्व प्रकारच्या लहान सहान औद्योगिक शिक्षणाची सोय व्हावी व त्याला मध्यवर्ती सरकारनें निम्मा खर्च द्यावा असें ठरलें. या वेळेपासून आतांपर्यंत म्हणजे गेल्या पिढींतच अमेरिकेंत धंदे-शिक्षणाचें जाळें पसरलें आहे व विद्यार्थ्यांची संख्या पुष्कळ वाढली आहे. दहा वर्षांतच ही वाढ किती झाली त्याची कल्पना पुढील आंकड्यावरून येईल.

**औद्योगिक शिक्षणसंस्थांतील विद्यार्थ्यांची वाढ**

| | १९१८ सालीं | १९२८ सालीं |
|---|---|---|
| उद्योगधंद्यांच्या शाळांतील विद्यार्थी | १२०००० | ५४०००० |
| गृहशास्त्र शिक्षणाचे ,, ,, | ३०००० | १८०००० |
| शेतकी शिक्षणाचे ,, ,, | १५००० | १४५००० |

अमेरिकेंतील धंदेशिक्षणाचें असें वैशिष्ट्य आहे कीं तेथें प्रत्येक लहान

सहान धंद्याकरितां शिक्षणसंस्था आहे आणि प्रत्येक व्यवसायांत त्या धंद्याचें शिक्षण घेतलेल्या इसमांनाच प्रथम काम मिळतें. यांत्रिक उद्योगधंद्यांत हें तत्त्व आहे यांत नवल नाहीं. परंतु खाणावळी, नापिताचा धंदा, विक्री व्यवसाय इत्यादि लहानसहान धंद्यांच्याही शिक्षणसंस्था आहेत. विशेष म्हणजे या संस्थांनीं आपापलीं प्रशस्तिपत्रें व पदव्या देण्याचा प्रघात पाडला आहे. त्यामुळेंच हें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्याला त्या धंद्याची लाज न वाटतां अभिमान वाटतो.

अमेरिकेंत मोठमोठे उद्योगधंदे वाढल्यानंतर धंदेशिक्षणाच्या संस्था निघाल्या व संस्थांतून उत्तम रीतीनें तयार झालेलीं माणसें मिळाल्यामुळें उद्योगधंदे सुधारले. ज्या भागांत जो धंदा चालतो त्याच भागांत त्याच धंदेशिक्षणाची सोय केली जाते. कांहीं कांहीं कारखान्यांनीं स्वतःच्याच शिक्षणसंस्था काढलेल्या आहेत. फोर्डच्या कारखान्याला जोडून मेकॅनिकल एंजिनियरिंगचें शिक्षण देणारी एक उत्कृष्ट संस्था आहे. या शाळेंतून तयार झालेल्या मुलांपैकीं चांगलीं चांगलीं मुलें फोर्डच्या कारखान्यांत कामाला लावून घेतलीं जातात. सारांश, कोणताही धंदा म्हटला कीं त्याला शिक्षण पाहिजे अशी परंपरा अमेरिकेंत पडली आहे. अशा शिक्षणसंस्था चालविण्याचे कामीं कारखान्यांचे मालकांकडून आर्थिक दृष्टीनें साहाय्य होत असतें. म्हणजे कारखान्यांची व उद्योगधंद्यांची गरज भागविण्याकरितां शाळा निघाल्या, आणि उलट शाळांचा खर्च चालविण्यास कारखान्यांनीं मदत करण्याची रूढी पडली.

## इंग्लंडची पद्धतशीर शिक्षणयोजना

इंग्लंडमध्येंही औद्योगिक वाढ झाल्यानंतरच धंदेशिक्षण निघालें व या शिक्षणामुळें उद्योगधंदे चांगले सुधारले. प्रथम उद्योगधंदे वाढले आणि त्यांचेकरितां चांगलीं माणसें तयार करण्यासाठीं औद्योगिक शिक्षणसंस्था निघाल्या. इंग्लिश लोक उद्योगधंद्यांत पुष्कळ वर्षांपासून पुढें आहेत, तरी पण त्यांचे धंदेशिक्षणाची वाढ अगदीं अलीकडची म्हणजे गेल्या पन्नास वर्षांतील आहे. १८८८ सालीं टेकनिकल् इन्स्ट्रक्शन कायदा मंजूर झाला व औद्योगिक

शिक्षणाकरितां सरकारी मदतीची सोय झाली. १९०२ पासून पुढें धंदेशिक्षणाच्या संस्था निघाल्या.

विणकामाचे कारखाने, खाणी, कातड्याचे धंदे, इत्यादि व्यवसाय ज्या भागांत होतात तेथेंच धंदेशिक्षणाच्या संस्था आहेत. खुद्द लंडनमध्यें औद्योगिक संस्थांची योजना पद्धतशीर केलेली असून त्याच नमुन्यावर इतर शहरांतीलही संस्थांची मांडणी केलेली आहे. शहरांत कामकरी वर्गाची वस्ती ज्या भागांतून आहे तेथें निरनिराळ्या धंद्यांच्या संस्था स्थापन केल्या आहेत. या सर्व धंद्यांचें उच्च शिक्षण देणारी एक मध्यवर्ती संस्था शहराचे मध्यभागीं स्थापन केलेली आहे. या सर्व शाळांतून यंत्रसामुग्री अगदीं उत्कृष्ट प्रकारची आहे. आणि प्रत्यक्ष कामाचा अनुभव देण्यावर शिक्षकांचा विशेष कटाक्ष असतो.

इकडे जे शिक्षणाधिकारी येतात त्या सर्वांना ही इंग्लंडची औद्योगिक शिक्षणपद्धति माहिती असते. त्यांनीं मनांत आणिलें तर त्याच धर्तीवर ते येथेंही तशाच प्रकारची योजना अंमलांत आणूं शकतील.

## जर्मनीचें यूरोपला उदाहरण

जर्मनींतील धंदेशिक्षणाच्या संस्था सर्व जगांत उत्कृष्ट आहेत, कारण इतर राष्ट्रांच्या आधीं त्यानें या क्षेत्रांत कामाला प्रारंभ केला बर्लिनमधील कांहीं कांहीं संस्था पन्नाससाठ वर्षांपूर्वींच स्थापन झालेल्या आहेत. औद्योगिक शिक्षणसंस्थांना उत्तेजन व आश्रय देण्याचें धोरण राष्ट्रीय वृत्तीच्या सरकारनें प्रथमपासून स्वीकारलें. आज सर्व जर्मनीत निरनिराळ्या उद्योगधंद्यांच्या अशा ८०० शिक्षणसंस्था आहेत

या शिक्षणसंस्थांपैकीं कांहीं संस्था अशा आहेत कीं प्रत्यक्ष कारखान्यांत दोनतीन वर्षें कामाचा अनुभव ज्यांना मिळालेला आहे अशाच विद्यार्थ्यांना तेथें प्रवेश मिळतो. कांहीं संस्थांतून तात्त्विक शिक्षणावरच विशेष भर दिला जातो. प्रात्यक्षिक शिक्षण हें बाहेरच्या कारखान्यांत झालें आहे किंवा होईल अशी अपेक्षा असते. अमेरिकेप्रमाणें जर्मनींतही कांहीं कारखान्यांनीं आपल्या स्वतःच्या धंदेशिक्षणाच्या संस्था चालविल्या आहेत. शहरानें चालविलेल्या शिक्षणसंस्थांना कारखाने द्रव्याची व यंत्रसामुग्रीची मदत करतात. देशांत

उद्योगधंदे व कारखाने वाढलेले आहेत त्यांना माणसें पुरविण्याकरितां आपल्या शिक्षणसंस्था चालवावयाच्या आहेत हें धोरण इंग्लंड–अमेरिकेप्रमाणे जर्मनीमध्येंही दिसून येतें.

## रशियांतील नवें औद्योगिक शिक्षण

रशियाची स्थिति वरील तीनही देशांपेक्षां अगदी निराळी आहे. या देशांत पंधरा वर्षांपूर्वी उद्योगधंद्यांची फारशी वाढ झालेली नव्हती. आपले उद्योगधंदे वाढीला लावणें आणि पद्धतशीर औद्योगिक शिक्षणसंस्थांचा पाया घालणें या दोन्ही गोष्टी रशियाला एकदमच कराव्या लागल्या. समाजांत चालू असलेल्या उद्योगधंद्यांकरितां माणसें तयार करणें, व या कामाबरोबरच देशांत नवीन उद्योगधंदे निर्माण करणें हेंही काम रशियानें चालू ठेविलें आहे. त्यानें अमेरिकन, जर्मन, व इंग्लिश एंजिनियर आणि तज्ज्ञ माणसें मुदतबंदीने आणविलीं व त्यांचे साहाय्यानें मोठमोठ्या उद्योगधंद्यांचा पाया घातला. या परदेशीय तज्ज्ञांचे हाताखालीं तयार होण्याकरितां रशियानें आपलीं स्वतःचीं माणसें दिलीं. उद्देश असा कीं कालांतरानें परदेशीयांनीं आपापल्या घरीं परत जावें व या कारखान्यांचें चालकत्व रशियन माणसांकडे यावें.

उद्योगधंदे आणि औद्योगिक शिक्षण यांना एकाच वेळी आरंभ केल्यामुळें व या उद्योगधंद्यांची मालकी सरकारकडे असल्यामुळें कारखाने आणि उद्योग-शाळा यांची सांगड घातली गेली. ज्या ज्या ठिकाणीं कारखाना निघाला त्या त्या ठिकाणीं त्यालाच जोडून प्राथमिक, माध्यमिक व उच्च औद्योगिक शिक्षणाच्या शाळा स्थापन करण्यांत आल्या. या शिक्षणसंस्थांमधून श्रेष्ठ आणि कनिष्ठ दर्जाच्या धंदेशिक्षणाच्या सोयी झालेल्या आहेत. या पद्धतीचा शिक्षणाचे दृष्टीनें पुष्कळ फायदा होतो. विद्यार्थ्यांचे दृष्टीपुढें मोठ्या प्रमाणावर उद्योगधंदा चालू राहिल्यामुळें त्यांतील तपशीलवार गोष्टींची प्रत्यक्ष माहिती त्यांना घेतां येते, केवळ कल्पनाशक्तीवरच अवलंबून राहावें लागत नाहीं.

## शिक्षण व औद्योगिक उत्कर्ष

औद्योगिक ध्येय ठेवणाऱ्या देशाची शिक्षणपद्धति कशी असावी या दृष्टीनें रशियांतील बौद्धिक शिक्षणाच्या शाळांचा अभ्यासक्रम हिंदी शिक्षण-

तज्ज्ञांनीं लक्षांत घेण्यासारखा आहे. या देशांत बालवर्गापासून वरच्या वर्गापर्यंत सर्व विद्यार्थ्यांना हस्तव्यवसायाचें शिक्षण सक्तीचें आहे. सर्वांना शारीरिक कष्ट करण्याची संवय प्रथमपासूनच लाविली जाते. त्यामुळें समाजांतील पोषाखीपणा नाहींसा होऊन सर्व लोक श्रम करूं लागतात. शिक्षण हें श्रमाचे आड येत नाहीं. हायस्कूलमध्यें विद्यार्थी असतात त्या वेळींच त्यांचा आणि कारखान्यांचा संबंध घडवून आणला जातो. प्रत्येक विद्यार्थी हायस्कूल शिक्षण पूर्ण करीत असतां निदान तीनचार कारखान्यांतून तरी कामाचा अनुभव मिळवीत असतो. त्यानंतर स्वत:ला लागणारें विशिष्ट धंदेशिक्षण तो स्वतंत्र रीतीनें घेईल तें निराळेंच. तिसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे, अर्थशास्त्र हा विषय हायस्कूलमधूनही शिकविला जातो. आपल्या समाजाची आर्थिक योजना काय आहे याबद्दल विद्यार्थीवर्गाला माहिती करून दिली जाते.

## हिंदुस्थानचा विशिष्ट प्रश्न

अशा प्रकारचा हा रशियन धंदेशिक्षणाचा कार्यक्रम कितीही आकर्षक आणि पद्धतशीर असला तरी हिंदुस्थानची आणि रशियाची औद्योगिक शिक्षणक्षेत्रांत तुलना होऊं शकत नाही. रशिया देश स्वतंत्र असून त्यानें आपले सर्व उद्योगधंदे, कारखाने व शेतीचे धंदे सरकारी केलेले आहेत, आणि औद्योगिक शिक्षणाची सर्व जबाबदारी सरकारनें पत्करलेली आहे. त्या कारणानें उद्योगधंद्यांच्या अथवा धंदेशिक्षणाच्या वाढीकरितां त्याला दुसऱ्याचे तोंडाकडे पाहावें लागत नाहीं. उद्योगधंदे वाढल्यानंतर औद्योगिक शिक्षण सुरू करू, किंवा भरपूर औद्योगिक शिक्षण प्रथम देऊं म्हणजे उद्योगधंदे आपोआप वाढतील अशा दोन्ही धोरणांवर अवलंबून न राहतां रशियानें दोन्ही गोष्टी एकदम सुरू केल्या. सत्ता हातांत असेल तर रशियाचें धोरण अनुकरण करण्यासारखें आहे.

परंतु हिंदुस्थानची परिस्थिति अगदीं निराळी आहे. येथील धंदे हे खाजगी व बिनसरकारी प्रयत्नानें वाढणार आहेत. रशियांत सरकारनें आपल्या हातांत सर्व उद्योगधंदे घेऊन कारखाने काढले व वाढविले, आणि इटली व जपानसारख्या देशांत खाजगी कारखान्यांना सरकारनें पाठिंबा देऊन

पुढें आणलें. तशी परिस्थिति हिंदुस्थानांत कदापीही येणार नाहीं. ही वस्तुस्थिति व हा मनुष्यस्वभाव आपण गृहीत धरून चाललें पाहिजे. या देशांतील उद्योगधंदे पुढें वाढतील व नंतर आपण त्यांना माणसें पुरविण्याकरितां औद्योगिक शिक्षणसंस्था काढूं असें धोरण आपण ठेविलें तर या संस्था निघण्याकरितां आणखी अर्धशतक–शतक तरी दम धरला पाहिजे ! पाश्चात्य देशांत सरकारी उत्तेजन असतां औद्योगिक वाढ होण्यास जवळजवळ एक शतक लागलें. यदृच्छेवर विसंबून राहिलों तर हिंदुस्थानांतही आपणांस तितकाच काळ लागेल. या अवधींत पाश्चात्य देश किती पुढें जातील ती कल्पनाच केली पाहिजे. हिंदुस्थान आणि पाश्चात्य देश यांच्या औद्योगिक प्रगतींतील अंतर नेहमीं सारखेंच राहील किंवा वाढेल, कमी होणार नाहीं. दुसरा मार्ग म्हणजे रशियाप्रमाणें कारखाने व औद्योगिक शिक्षण यांची एकदम व समांतर वाढ करणें हा आहे. परंतु सत्तेचा अभाव आणि राजकीय तत्त्वाचा भेद यामुळें हेंही धोरण अंमलांत येणें शक्य नाहीं. राहतां राहिला तिसरा मार्ग; तो म्हणजे औद्योगिक शिक्षणसंस्था आधीं सुरू करून त्यांचे साहाय्यानें राष्ट्राची औद्योगिक प्रगति घडवून आणणें हा आहे.

## हिंदी औद्योगिक शिक्षणाचें धोरण

या मार्गावर येथील यूरोपियन अधिकारी प्रतिकूल टीका करतात व त्याच मताची सांथ आपल्यापैकीही कांहीं लोक करीत असतात. परंतु आजच्या स्थितीत हिंदुस्थानला अन्य मार्गच शक्य नाहीं हें वर दाखविलें आहे. अशा परिस्थितींत आमच्या व पाश्चात्यांच्या औद्योगिक शिक्षणाचे धोरणांत काय फरक राहिला पाहिजे हा महत्त्वाचा प्रश्न आहे. दोघांच्या औद्योगिक शिक्षणाच्या ध्येयांत मूलतःच फरक आहे. त्यांना समाजांत झालेली औद्योगिक प्रगति शिक्षणाचे जोरावर कायम ठेवावयाची आहे ; आम्हांला या शिक्षणाचे जोरावर एक नवीन औद्योगिक जगच निर्माण करावयाचें आहे. त्यांच्या शिक्षणसंस्थांचा उद्देश औद्योगिक क्षेत्रांतील नोकऱ्यांकरितां माणसें तयार करण्याचा आहे ; उलट अशा प्रकारच्या नोकऱ्या देणारे उद्योगधंदे स्वतःच्या हिंमतीवर काढणारीं माणसें तयार करण्याचा आपल्या शिक्षणाचा उद्देश असावयास पाहिजे. हिंदी औद्योगिक शिक्षणांतून अशीं माणसें बाहेर पडलीं

पाहिजेत कीं, जीं स्वतःच पुढाकार घेऊन भांडवल उभारतील, कारखाने काढतील, व स्वतःचे ज्ञानाचे जोरावर ते चालवूं शकतील. या शिक्षणांतून बाहेर पडणाऱ्या माणसांकरितां बाहेर उद्योगधंदे व कारखाने तयार नाहींत ; नोकऱ्याही तयार नाहींत. त्यांनीं आपलें औद्योगिक विश्व निर्माण करावयास पाहिजे. पाश्चात्य व हिंदी औद्योगिक शिक्षणांचे धोरणामध्यें हा महत्त्वाचा फरक राहिला पाहिजे.

## कार्यक्रमाचें धोरण बदलणें जरूर

आपल्याकडील औद्योगिक शिक्षणसंस्थांचे चालकांना अद्याप ही दृष्टि आलेली नाहीं हें स्पष्टच दिसत आहे. औद्योगिक शिक्षणाच्या ध्येयासंबंधीं या देशांत एकंदर विचारच कमी, त्याचा हा परिणाम आहे. आपल्याकडे शेतकींतून तयार झालेले बहुतेक सर्व पदवीधर नोकर झालेले आहेत. फार थोड्यांनीं स्वतःचे जबाबदारीवर कृषिविषयक धंदे काढून चालविले आहेत. जी गोष्ट शेतकीशिक्षणाची तीच इतरही औद्योगिक शिक्षणाची आहे. औद्योगिक क्षेत्रांत पुढाकार घेऊन संघटना करण्याच्या दगदगीपेक्षां बिन-जबाबदारीची व शांतपणाची आपली नोकरी बरी अशी विद्यार्थ्यांची प्रवृत्ति होते. मनुष्यस्वभावानुरूप याला कांहीं अपवाद आहेत हीच समाधानाची गोष्ट आहे.

आपल्या औद्योगिक शिक्षणाचें ध्येय व धोरण याप्रमाणें निश्चित केलें म्हणजे शिक्षणपद्धतीमध्येंही फेरफार करावे लागतील. पहिली गोष्ट प्रवेशासंबंधींची. मठ्ठ मुलें औद्योगिक शिक्षणाकडे चालतात हा समज समाजानें आधीं काढून टाकला पाहिजे. बौद्धिक दृष्टीनें हीन व दुसरीकडे कोठें न चालणारीं माणसें औद्योगिक क्षेत्रांत घालून कोणत्या देशाचा आर्थिक उत्कर्ष झाला आहे ? बौद्धिक शिक्षणाकडे जातात त्याच तोलाचीं पण अधिक तडफ असलेलीं माणसें औद्योगिक शिक्षणांत घेतलीं पाहिजेत. शिक्षण देतांना त्यांचा कार्यक्रम अशा रीतीनें आंखला पाहिजे कीं स्वतंत्र रीतीनें उद्योगधंदा कसा उभारावा याची माहिती त्यांना होईल व आत्मविश्वास वाढेल. औद्योगिक क्षेत्रांत संघटना करण्याकरितां व पुढाकार घेण्याकरितां जे गुण व जें ज्ञान व्यक्तीच्या ठिकाणीं असावयास पाहिजे त्यांचा लाभ विद्यार्थ्याला या औद्योगिक

शिक्षणसंस्थांमधून झाला पाहिजे. या माणसांनीं बाहेर पडून देशांत नसलेले कारखाने व उद्योगधंदे काढले पाहिजेत. आज चालू असलेल्या व यापुढें निघणाऱ्या औद्योगिक संस्थांच्या चालकांनी आपणांवर असलेली ही जबाबदारी ओळखली पाहिजे.

औद्योगिक शिक्षणाचें हें नवीन तत्त्व व धोरण आमच्या संस्था ओळखतील तरच या शिक्षणाचा उपयोग देशाचा औद्योगिक उत्कर्ष घडवून आणण्याकडे होईल. नाहीं तर पदवीधर बेकारांत औद्योगिक बेकारांची आणखी भर पडेल !

---

## प्रकरण सत्ताविसावें

# समाजध्येय आणि शिक्षणपद्धती

### शाळेंत जाणारें राष्ट्र--अमेरिका

सकाळचे वेळी अमेरिकन शहरांतून लहान मुलें घराबाहेर पडून भराभर शाळेकडे चाललेलीं दिसतात. मुंग्यांप्रमाणें मुलांच्या रांगा चाललेल्या असतात. दुपारीं आणि सायंकाळीं पाहावें तर प्रौढ विद्यार्थी व मोठीं माणसें शाळेंत जात असतात. खेडेगांवांतून पाहिलें तर मुलांच्या मोटार बसेस् भरभरून शाळेकडे चाललेल्या दिसतात. सारांश, सर्व राष्ट्रच शाळेला चाललें आहे कीं काय असा भास होतो. हें झालें अमेरिकन शिक्षणाचें एक चित्र.

### आबालवृद्धांना शिक्षण--रशिया

भांडवलशाहीच्या अमेरिकेंतून समाजसत्तावादाच्या रशियांत आल्याबरोबर एकदम दुसरें चित्र दिसूं लागतें. शाळेंत जाणाऱ्या व्यक्तींचें प्रमाण तर येथें अमेरिकेपेक्षांही अधिक आहे. सकाळीं, दुपारीं लहान मुलें शाळेला जातात, तर सायंकाळीं प्रौढ व म्हातारीं माणसें हातांत पाकिटें

घेऊन शाळेकडे चाललेलीं दिसतात. रात्रीचे वेळीं शहरांतून प्रौढ माणसांच्या शाळा चालू असलेल्या दिसतात. शाळेची इमारत लहान असल्यामुळें कांहीं वर्ग सकाळीं व कांहीं दुपारीं असे भरविले जातात. एकदोन महिन्यांच्या तान्हया अर्भकापासून सर्व रशियन मुलें शिक्षण घेत असलेलीं दिसतात. विद्यार्थी दुपारचे वेळीं फॅक्टरींत काम करीत आहेत, व रात्रीचे वेळीं शाळेंत जमून आपापल्या सभा चालवीत आहेत किंवा आपल्या गांवांतील रात्रींच्या शाळा चालवीत आहेत अशीं दृश्यें दिसतात. रशियन शाळेंतील शिक्षक पाहिला तर प्रथमदर्शनीं त्याच्या पोषाखावरून तो एकादा मजूर असल्यासारखा वाटेल. पण तुम्ही त्याच्याशीं बोलूं लागलां कीं तो तुमच्याशीं गांधींच्या व टागोरांच्या तत्त्वज्ञानापासून तों 'या जीविताचा उगम काय आहे ?' येथपर्यंत सर्व विषयांवर चर्चा करील. हें रशियन शिक्षणाचें चित्र.

## काळा गाऊन घालणारे शिक्षक--इंग्लंड

त्याच्या अगदीं उलट टोंकाला इंग्लंडमधील शाळामास्तर. हायस्कूलमधील शिक्षक असले तरी एकाद्या प्रोफेसराप्रमाणें काळा गाऊन घालून, शाळेंत गंभीरपणें आपलें काम करीत असतांना दिसतात. अमेरिकन शाळांत दोनतीन हजार मुलें दिसतील तर इंग्लंडमधील शाळांत दोनतीनशेंच विद्यार्थी दिसतील ; फार तर पांचशें. अमेरिकेंत एकाच शाळेंत सर्व विषयांची विविधता पाहावयास सांपडेल, तर इंग्लंडमध्यें ही विविधता पाहण्याकरितां तुम्हांस अनेक शाळांतून गेलें पाहिजे. अमेरिकन आणि रशियन शिक्षक तुम्हांस शाळा दाखविल्यानंतर पुष्कळ वेळ बोलत आणि चर्चा करीत बसतील. इंग्लिश शिक्षक तुमचें काम झाल्याबरोबर तुम्हांस निरोप देऊन आपल्या कामाला लागतील. शैक्षणिक चर्चेंत त्यांना विशेष आवड नसावी किंवा त्यांचा स्वभाव तितका मोकळा नसावा. गरीब आणि श्रीमंतांकरितां अगदीं स्वतंत्र अशा शाळा इंग्लंडमध्यें दिसतात. तेथील पब्लिक स्कूलमध्यें पाहिलें तर शाळेचा विशिष्ट पोषाख केलेलीं श्रीमंतांचीं मुलें राजवाड्यांसारख्या इमारतींतून इकडे तिकडे जातांना आढळतील. या शाळेच्या आंत गेल्याबरोबर तेथें तीनचार शतकांची परंपरा

आढळेल. तेथें एक वेळ विद्यार्थी असलेल्या इंग्लिश कवींचीं आणि थोर पुरुषांचीं नांवें त्यांनीं आपल्या हातांनी लांकडी भिंतींवर कोरलेलीं दिसतील. हें इंग्लिश शिक्षण.

## लष्करी पेशाचे विद्यार्थी—जर्मनी

जर्मनीत आल्यावरोबर या सर्वापेक्षां निराळाच देखावा दिसतो. बर्लिनच्या युनिव्हर्सिटीत पाय ठेवल्याबरोबर लष्करी पोषाख केलेले, नाझी पद्धतीची टोपी घालून खांद्यापर्यंत हात नेऊन सलाम करणारे, आणि गुडघ्यापर्यंत बूट घातलेले असे विद्यार्थी येथें दिसून येतील. रात्रींच्या वेळीं शहरांतून फिरणाराला विद्यार्थ्यांच्या लष्करी परेड्स् आणि कवायती चाललेल्या दिसतील. शहरापासून पांचपन्नास मैलांवर असलेल्या अरण्यांत जाऊन विद्यार्थी झाडें तोडीत आहेत, रस्ते करीत आहेत, कालवे खोदीत आहेत, बोगदे करीत आहेत आणि मजुरांबरोबर वाटेल ते शारीरिक कष्ट करीत आहेत असा देखावा दिसून येईल. हें जर्मन शिक्षण.

## वैशिष्ट्याची मीमांसा

अमेरिका, रशिया, इंग्लंड, व जर्मनी यांच्या शिक्षणांत ही जी बाह्य विविधता दिसते, तिच्या मुळाशी कांही तरी तत्त्वें आहेत. प्रत्येक राष्ट्राची कांहीं विशिष्ट मनोरचना आहे, प्रत्येक समाजाला कांही विशिष्ट ध्येयें आहेत. या मनोरचनेला आणि ध्येयांना अनुसरून प्रत्येक देशाच्या शिक्षणपद्धतींत वैशिष्ट्य उत्पन्न झालेलें आहे. ऐहिक आणि पारलौकिक जीवन, समाजरचना, वैयक्तिक ध्येय, इत्यादि गोष्टींबाबत हिंदी तत्त्वज्ञानांत वैशिष्ट्य आहे. त्याचप्रमाणें पाश्चात्य समाजांतही राजकीय ध्येय, आर्थिक व्यवहार, समाजरचना, संस्कृति, इत्यादि गोष्टींमध्यें वैशिष्ट्य आहे. समाजाच्या राजकीय, सामाजिक, आर्थिक, आणि सांस्कृतिक विचारांच्या भूमींतून राष्ट्राची शिक्षणपद्धति उगवत असते. म्हणून प्रत्येक समाजाच्या शिक्षणांत कांही तरी वैशिष्ट्य असतें. अगदीं समान परिस्थितींत दोन समाज असल्याखेरीज एका राष्ट्राची शिक्षणपद्धति दुसऱ्या राष्ट्राला अनुकूल होऊं शकणार नाहीं.

## महायुद्धानंतर शिक्षणाची घडामोड

सामाजिक आणि राजकीय परिस्थितीत फेरबदल होण्यापूर्वी आणि त्यानंतर देशाच्या शिक्षणपद्धतीत क्रांति होते. महायुद्धानंतर यूरोपांतील देशांत राजकीय स्थित्यंतरें झाल्याकारणानें त्या देशाच्या शिक्षणपद्धतींत पुष्कळ फेरबदल झालेले आहेत. १९१४ नंतरच्या काळांत मजूर वर्गांत आणि बहुजन समाजांत राजकीय जागृति झाली असल्याकारणानें या वर्गाला अधिक राजकीय महत्त्व प्राप्त झालें व त्याचा परिणाम बहुजन समाजाच्या शिक्षणावर झाला. श्रीमंत लोकांच्याच आटोक्यांत जें शिक्षण पूर्वी असे, तें हळुहळू गोरगरिबांच्याही आटोक्यांत येऊं लागलें. फरान्स, इंग्लंड, जर्मनी इत्यादि देशांतील शिक्षणपुढारी, शिक्षणक्षेत्रांत समता असावी व सर्वांना सारखी संधि असावी असें तत्त्व प्रतिपादन करूं लागले. राजकीय क्षेत्रांत उत्पन्न झालेलें समतातत्त्व शिक्षणक्षेत्रांत खेळविलें गेल्यामुळें पूर्वप्रस्थापित शिक्षणपद्धतीमध्यें पुष्कळ क्रांति झाली. प्राथमिक शिक्षण सर्वांच्या आटोक्यांत आलें. प्राथमिक शिक्षणाकरितांही श्रीमंतांच्या शाळा निराळ्या व गरिबांच्या शाळा निराळ्या अशी जी जातिभेदपद्धति यूरोपमध्यें पूर्वी होती ती जर्मनी-सारख्या कांहीं देशांतून मोडली जाऊन सर्व शाळा सर्व मुलांना मोकळ्या ठेवण्यांत आल्या. दुय्यम शिक्षण महाग असल्यामुळें फक्त कांहीं धनिक लोकांच्या मुलांबाळांकरितांच राखून ठेविलेलें असे, तें हळुहळू सर्वसामान्य जनतेच्या मुलांबाळांच्या आटोक्यांत आणण्याचा प्रयत्न झाला. सारांश, महायुद्धानंतरच्या काळांत बहुजन समाजांत राजकीय जागृति झाली, व तिचा परिणाम असा झाला कीं, समाजांत मानमान्यता मिळण्याचें साधन जें दुय्यम व उच्च शिक्षण तें बहुजन समाजाच्या आटोक्यांत आलें.

## राष्ट्रीयत्वाचा शिक्षणावर परिणाम

यूरोपांत राष्ट्रीयत्वाच्या भावनेची वाढ ही गेल्या पिढीमध्यें अधिक जोरानें झाली. प्रत्येक राष्ट्रामध्यें स्वतःच्या वैशिष्टयाची आणि महत्त्वाकांक्षेची जाणीव उत्पन्न झालेली आहे. आपला समाज निराळा असून त्याला कांहीं तरी विशिष्ट ध्येय आहे, आपल्या राष्ट्राची विशिष्ट अशी संस्कृति पूर्वपरंपरेला धरून वाढविली पाहिजे, आपल्या राष्ट्राची आर्थिक व औद्योगिक

परिस्थिति सुधारली पाहिजे आणि राजकीय दृष्ट्या त्याला इतर मोठ्या राष्ट्रांच्या बरोबरीनें दर्जा प्राप्त करून दिला पाहिजे. अशा प्रकारची जाणीव यूरोपांतील लहानमोठ्या राष्ट्रांत उत्पन्न झालेली आहे. जर्मनी आणि इटली हे दोन देश वरील विधानाचीं चांगली उदाहरणें आहेत. राष्ट्र या नात्यानें आपला देश पुढें आला पाहिजे, या महत्त्वाकांक्षेनें दोन्ही देशांचे प्रयत्न चालू आहेत. राष्ट्रीयत्वाची आपली कल्पना या देशांनीं निश्चित केली, आणि ती मूर्तस्वरूपांत सिद्ध करून घेण्याकरितां त्यांनी इतर साधनांबरोबर शिक्षणाचाही उपयोग करून घेतला. राष्ट्राची सर्व तरुण पिढी ज्या एका संस्थेंतून संस्कार घेऊन जाते ती संस्था म्हणजे शाळा. या शाळांतून आपल्या राष्ट्र-संवर्धनाच्या कल्पना मुलांना कशा रीतीनें देतां येतील, त्यांना आपल्या संस्कृतीची व वैशिष्ट्याची जाणीव कशी करून देतां येईल, आणि राष्ट्र-संवर्धनाच्या कामी या तरुण पिढीचा उपयोग कसा करून घेतां येईल, या दृष्टीनीं यूरोपियन शिक्षणतज्ज्ञांनीं विचार केला व आपली नवीन शिक्षणाची घडी बसविली.

## नवीन राजकीय व सामाजिक वेदांत

राजकीय विचाराच्या दृष्टीनें विसावें शतक महत्त्वाचें ठरेल. कारण या शतकाचीं पहिलीं पन्नास वर्षेही गेलीं नाहीत तोंच जगांतील विचारांत खळवळ करून सोडणारी राजकीय तत्त्वें व नवीन राज्यपद्धती अस्तित्वांत आल्या आहेत. या सर्वांचा परिणाम यूरोपमधील शिक्षणावर झालेला आहे. महायुद्धापूर्वीं राजसत्ता ( मॉनर्की ) व लोकशाही ( डेमॉक्रसी ) अशा दोन राज्यपद्धती अस्तित्वांत होत्या. स्वार्थी व सत्ताधारी लोकांनीं या पद्धतींचा उपयोग स्वतःच्या स्वार्थाकडे करून घेतल्यामुळें त्यांच्याविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली. या प्रतिक्रियेंतून रशियांतील कम्यूनिझम, जर्मनींतील नॅशनल सोशालिझम आणि इटलींतील फाशिझम असे नवे राजकीय वेदांत निर्माण झाले. राज्यपद्धतीच्या तंत्रांच्या दृष्टीनें या तिन्ही पद्धतींत बरेंचसें साम्य असलें तरी देशाच्या व समाजाच्या आत्यंतिक व तात्कालिक ध्येयांच्या दृष्टीनें तिन्ही पद्धतींत फार फरक आहे. जगांतील सर्व श्रमजीवी लोकांचा एक वर्ग निर्माण करून जगांत आर्थिक वैपुल्य वाढवावें हा रशियन लोकांचा अंतिम हेतु आहे. जर्मन संस्कृतीची वाढ करून जर्मन देशाला जगांत वैभव प्राप्त

करून द्यावें असा हिटलरच्या नॅशनल-सोशालिझमचा उद्देश आहे. आणि इटलीच्या पूर्ववैभवाला व संस्कृतीला अनुसरून इटलीची भावी वाढ करावी व इटालियन बुद्धिमत्तेस आणि कर्तबगारीस जगांत वाव करून द्यावा हा फाशिझमचा उद्देश आहे. इटलीची आणि जर्मनीची चळवळ ही राष्ट्रीयत्वाचे पायावर उभारलेली आहे. आपापल्या देशाच्या आणि समाजाच्या आत्यंतिक भवितव्यासंबंधीं प्रत्येक देशाचीं निरनिराळीं ध्येयें आहेत. इंग्लंड, फरान्स, आणि अमेरिका हीं राष्ट्रें आपल्या पूर्वीच्याच ध्येयाला धरून बसलेलीं आहेत. परंतु जगांत चाललेल्या विचारांच्या चळवळींचा परिणाम त्यांच्याही राज्य-पद्धतीवर होत आहे. या सर्व गोष्टींचें प्रतिबिंब त्या त्या देशाच्या शिक्षणांत पडलेलें आहे. समाजांतील ध्येयें आणि कल्पना तरुण पिढीला देण्याचें साधन म्हणून समाजानें 'शिक्षण' नांवाची कृत्रिम संस्था निर्माण केली आहे. म्हणून समाजाची ध्येयें बदलत जातात त्याप्रमाणें शिक्षणसंस्थांत फेरबदल होणें अपरिहार्य आहे. विशिष्ट ध्येयांचा आग्रह धरून बुद्धिपुरःसर समाजाची प्रगति करण्याचा प्रयत्न जेथें होतो तेथें या ध्येयसिद्धीकरितां अनेक साधनां-बरोबर शिक्षणाचाही उपयोग केला जातो. अशा परस्थितींत शिक्षण-पद्धतीमध्यें सहेतुक फेरबदल व सुधारणा केल्या जातात. ज्या समाजाची प्रगति यदृच्छेवर सोंपविली जाते त्या समाजांत शिक्षण हें समाजप्रगतीच्या मागें राहतें. देशाच्या आणि समाजाच्या ध्येयांना पोषक असें कार्य शिक्षणा-कडून होत नाहीं. सारांश, समाजध्येयाप्रमाणें शिक्षणांत सुधारणा होणें न होणें हें ध्येयाच्या जोरदारपणावर व समाजांतील जागृतीवर अवलंबून राहतें.

## लोकशाहीचें आदर्श शिक्षण

इंग्लंडपासून स्वतंत्र झाल्याबरोबर अमेरिकेंत नवीन शिक्षणाला प्रारंभ झाला. राजकीय ध्येय बदलल्याबरोबर शिक्षणपद्धति बदलली. इंग्लंड आणि अमेरिका यांच्यांत जो झगडा झाला त्यांत अमेरिकेचीं दोन विशिष्ट तत्त्वें होतीं, व त्या तत्त्वांची छाया अमेरिकेच्या पुढील इतिहासावर, समाजावर, व शिक्षणावर पसरलेली आहे. समता आणि व्यक्तिस्वातंत्र्य या तत्त्वांकरितां अमेरिकन लोकांनीं आपला देश स्वतंत्र केला, आणि हीं तत्त्वें आपल्या समाजसंस्थांमध्यें अमलांत आणण्याचा प्रयत्न केला. या सर्व

तत्त्वांना व ध्येयांना लोकशाही (डीमॉक्रसी) असें समुच्चयवाचक नांव अमेरिकन लोकांनीं दिलेलें आहे. अमेरिकन शिक्षणाचें ध्येय डीमॉक्रसी हें आहे.

राजकीय क्षेत्रांत लोकशाहीचें तत्त्व यशस्वी करावयाचें असेल तर बहुजन समाजाला शिक्षण दिलें पाहिजे, हें तत्त्व अमेरिकन पुढाऱ्यांनीं ओळखून आपल्या शिक्षणाचा पाया लांबरुंद असा घातला. अशिक्षित आणि अडाणी लोक राज्यकारभार करूं शकणार नाहींत, किंवा शहाणपणानें काम करणारीं माणसेंही निवडूं शकणार नाहीत ; त्यांच्या अज्ञानाचा फायदा स्वार्थी लोक घेतील याकरितां आपल्या समाजाचे व राजकारणाचे प्रश्न समजतील इतकें शिक्षण सर्व समाजाला दिलें पाहिजे. म्हणून अमेरिकेनें प्राथमिक, दुय्यम, आणि कॉलेज असें सर्व प्रकारचें शिक्षण मोफत करून टाकिलें. शिक्षणाचे बाबतींत इतकी उदार व दूरदर्शी प्रवृत्ति लोकशाहीला जन्म देणाऱ्या किंवा तिचा अभिमान बाळगणाऱ्या दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रानें दाखविली नाही.

## व्यक्तिविकासाला पूर्ण वाव

अमेरिकन डीमॉक्रसीचें व शिक्षणाचें दुसरें असें ध्येय आहे कीं समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या विकासाला शक्य तितकी संधि दिली पाहिजे. वर्गभेद किंवा वर्णभेदावर उभारलेल्या समाजरचनेंत प्रत्येक व्यक्तीची वाढ त्या त्या क्षेत्रापुरती मर्यादित असते. प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणी प्रसुप्त स्थितींत असलेल्या कर्तबगारीस व बुद्धीस समाजानें वाव द्यावा आणि केवळ सामाजिक परिस्थितीमुळें एकाद्याचे वाढीस व्यत्यय येऊं नये. पूर्वीच्या यूरोपियन शिक्षणपद्धतींत वर्गभेद होता. श्रेष्ठ आणि कनिष्ठ वर्गांचें शिक्षण निरनिराळें असे. ही पद्धत अमेरिकेनें मोडून टाकली व शिक्षणाचें मुक्तद्वार ठेविलें. केवळ आर्थिक परिस्थितीमुळें कोणाचें शिक्षण बुडूं नये म्हणून सर्व शिक्षणसंस्था मोफत ठेविल्या. सामान्य माणसासही उच्च शिक्षण घेण्याची व आपली कर्तबगारी दाखविण्याची संधि मोकळी ठेविली. त्यामुळें समाजाच्या खालच्या तळांत असलेल्या व्यक्तीलाही शिक्षणाच्या साधनानें समाजाच्या वरच्या थरांत येण्याची संधि मिळाली. "अमेरिकेचा प्रेसिडेंट कोणालाही

होतां येते " ही कल्पना अमेरिकेंत आहे. तिचा अर्थ असा कीं, सर्व लहानथोर व्यक्तींना शिक्षणाची पूर्ण संधि असल्यानें कोणालाही आपली कर्तबगारी दाखविण्यास वाव आहे.

राजकीय आणि सामाजिक डीमॉक्रसीचें हें ध्येय अमेरिकेच्या शिक्षण-पद्धतींत पदोपदीं आढळतें. शहरांत आणि खेड्यांत, लहान मुलांना आणि प्रौढ माणसांना, दिवसा आणि रात्रीं, वर्षभर आणि उन्हाळ्याच्या सुटींत, धडधाकट आणि पंगू लोकांना, बौद्धिक शिक्षण देणाऱ्या आणि औद्योगिक शिक्षण देणाऱ्या, अशा सर्व प्रकारच्या शिक्षणसंस्था अमेरिकेंत आहेत. ज्यास जो विषय शिकण्याची इच्छा असेल त्यास तो त्याच्या सोयीप्रमाणें शिकतां येतो. गरीब माणसांच्या शिक्षणास जीं कृत्रिम बंधनें इतरत्र दिसतात तीं अमेरिकेंत दिसत नाहींत. सारांश, राजकीय दृष्ट्या लोकशाही राज्यपद्धति यशस्वी करणें आणि सामाजिक दृष्ट्या प्रत्येक व्यक्तीला तिच्या पराकाष्ठ वाढीला वाव देणें हें अमेरिकन शिक्षणपद्धतीचें ध्येय आहे.

## समाजसत्तावादी शिक्षणपद्धति

विशिष्ट तत्त्वज्ञान डोळ्यांपुढें ठेवून शिक्षणाचा व्यापक कार्यक्रम आंखण्याचें काम अमेरिकेनंतर रशियानें केलें. पंधरा कोटींचा समाज, बहुजन समाजाला शिक्षण नाहीं, संपत्ति नाहीं, उच्च संस्कृतीचीं साधनें नाहींत, झारशाहीच्या आणि तिच्या नोकरशाहीच्या चरकांतून पिळून निघालेली प्रजा. अशा परिस्थितीत १९१८ सालीं रशियांत राज्यक्रांति झाली आणि समाज-सत्तावाद्यांची नवीन राज्यपद्धति सुरू झाली.

या नवीन राज्यक्रांतीमुळें रशियाच्या सर्व जीवनांत आमूलाग्र क्रांति सुरू झाली, कारण प्रस्थापित झालेल्या नवीन सत्तेचा राजकीय व सामाजिक वेदांत पूर्वींच्या पद्धतीहून अगदीं निराळा आहे. हें नवीन तत्त्वज्ञान तरुण पिढीच्या आणि प्रौढ समाजाच्या मनोभूमिकेंत चांगलें रुजलें तरच आपली नवप्रस्थापित सत्ता व समाजपद्धति कायम राहील अशी रशियन पुढाऱ्यांची खात्री झाली आहे. म्हणून त्यांनीं आपल्या ध्येयांना अनुरूप अशी आपल्या शिक्षणाची पुनर्घटना केली.

कम्यूनिझम अथवा समाजसत्तावादी पद्धति निर्माण करणें हें रशियाच्या

समाजाचें आणि शिक्षणाचें आत्यंतिक ध्येय आहे. प्रत्येक व्यक्तीनें समाजाचे हिताकरितां काम करावें आणि त्या मार्गानें स्वतःचें अप्रत्यक्ष हित साधावें. समाज आणि व्यक्ति यांत विरोध आला असतां समाजहिताला प्राधान्य द्यावें. जरूर असेल तेथें समाजहिताकरितां व्यक्तिसुख व इच्छा यांचा त्याग केला पाहिजे. साराश, डीमॉक्रमीमध्यें व्यक्तित्वाला प्राधान्य दिलें जातें ; व समाजसत्तावादांत व्यक्तीला गौणत्व दिले जातें. त्या कारणानें या दोन्ही शिक्षणपद्धतींत स्वभावतःच फरक राहतो. व्यक्तीनें पुढें काय करावें तें लोकशाहीत स्वतः व्यक्ति ठरवूं शकते ; समाजसत्ताक पद्धतींत ही गोष्ट समाजाचे पुढारी ठरवितात. सारांश, समाजाचें आत्यंतिक हित हें साध्य दोन्ही पद्धतींत असलें तरी दोघांचे मार्ग भिन्न आहेत, त्यामुळें दोघांचें शिक्षण भिन्न आहे.

## शिक्षणांत श्रमाचा गौरव

समाजांतील प्रत्येक व्यक्तीने स्वतः श्रम केले पाहिजेत. शारीरिक श्रम करणाऱ्या व्यक्ती या जगांत श्रेष्ठ आहेत, कारण त्यांच्याच जोरावर जगांत धनोत्पादन होत असतें. दुसऱ्याच्या श्रमावर कोणीं फायदा मारूं नये ; व स्वतः काम केल्याशिवाय समाजांत राहूं नये. सर्व व्यक्तींनीं आपापल्या सामर्थ्याप्रमाणें व बुद्धीप्रमाणें समाजांत काम करावें व तें समाजास अर्पण करावें. त्यांतून स्वतःच्या प्रपंचाला लागेल तेवढाच भाग उचलावा. संपत्तीवरील ममत्वबुद्धि काढून टाकून ती समाजाची आहे अशी मनोवृत्ति बनवावी. श्रम करून समाजाच्या संपत्तींत भर घालावी. अशा प्रकारचा विचार व आचारसरणी प्रत्येक व्यक्तीची असावी, हें समाजवाद्यांचें आत्यंतिक ध्येय आहे. पूर्वीच्या शिक्षणपद्धतीमुळें हें सिद्ध होणें शक्य नव्हतें. याकरितां रशियन पुढाऱ्यांनीं आपली स्वतंत्र शिक्षणपद्धति स्थापन करून तिच्या द्वारें तरुण पिढीला या नवीन तत्त्वज्ञानाचें आचारविचारात्मक शिक्षण देण्याचा उपक्रम केला आहे. बालवर्गापासून उच्च शिक्षणापर्यंत सर्व शिक्षणक्रमांत शारीरिक श्रम आणि यांत्रिकशाळेंतील व कारखान्यांतील ( वर्कशॉप व फॅक्टरी ) काम यांचा समावेश केला आहे. त्याचप्रमाणें व्यक्तीच्या ठिकाणीं समाजहितबुद्धि निर्माण व्हावी याकरितां प्रत्यक्ष सार्वजनिक कामाचा

अनुभव प्रत्येक विद्यार्थ्यास लहानपणापासून मिळावा अशी व्यवस्था केलेली आहे.

### सायन्स व उद्योगधंदे यांवर भर

समाजवाद्यांचा ऐहिक जीवनावर विशेष भर आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला भौतिक सुखसोयींचा लाभ व्हावा याकरितां सायन्स आणि उद्योगधंदे यांची प्रगति होणें आवश्यक आहे. रशियाच्या पंचवार्षिक योजना आंखल्या जातात, त्यांत आर्थिक कार्यक्रमावर विशेष जोर असतो. ऐहिक जीवनावरील हा भर रशियाच्या शिक्षणपद्धतीतही दिसून येतो. सायन्स आणि उद्योगधंदे यांच्या शिक्षणाची योजना रशियानें चांगल्या तऱ्हेनें केलेली आहे.

विचार आणि आचार यांत क्रांति करण्याच्या उद्देशानें रशियानें आपली नवीन शिक्षणपद्धति अमलांत आणली आहे. ही क्रांति शीघ्र गतीनें व्हावी याकरितां बालवर्गापासून प्रौढवर्गापर्यंत सर्वांच्याकरितां शाळा उघडलेल्या आहेत. त्या कारणानें रशियांत आज गुणाच्या व संख्येच्या दृष्टीनें जितकी शिक्षणाची प्रगति होत आहे तितकी कोणत्याच अन्य देशांत दिसून येत नाहीं.

### नॅशनल सोशॅलिझम्‌चें ध्येय

रशिया आणि जर्मनी यांच्या परिस्थितींत अत्यंत फरक आहे. अज्ञ, अशिक्षित, दरिद्री आणि संस्कृतिहीन अशा समाजाला शिक्षण देऊन त्याला जागृत करणें हें रशियन शिक्षणाचें कार्य आहे. त्याच्या अगदीं उलट जर्मनीची स्थिति होती. शिक्षण, उद्योगधंदे, राहणीचा दर्जा, संस्कृति इत्यादि दृष्टींनीं जर्मन लोक पुढें गेलेले आहेत. अशा लोकांच्या ठिकाणीं एक-राष्ट्रीयत्वाची भावना जागृत करून त्यांना कार्यप्रवृत्त करणें हें जर्मन शिक्षणाचें ध्येय आहे.

१९१८ सालीं महायुद्धांत जर्मनीचा पराभव झाला. या पराभवा-मुळें जर्मन लोकांच्या ठिकाणीं एक प्रकारची कनिष्ठ भावना व पराजित वृत्ति उत्पन्न झाली होती. जर्मनीविषयीं व जर्मन संस्कृतीविषयीं त्यांचा विश्वास कमी झाला होता. रशियांत समाजसत्ता स्थापन झाल्यामुळें त्याचा प्रति-ध्वनि जर्मनींतही उठूं लागला होता. तेथें वर्गकलहाला प्रारंभ होऊन

समाजांत फाटाफूट उत्पन्न झाली. जर्मनीचें लष्करी सामर्थ्य आणि लष्करी शिक्षणाचा हक्क विजयी राष्ट्रांनीं हिरावून घेतल्यामुळें जर्मन लोकांतील क्षात्रवृत्ति लोपून जाते कीं काय अशी पुढाऱ्यांना भीति वाटूं लागली. जर्मन लोकांच्या ठिकाणीं आत्मविश्वास उत्पन्न करणें, त्यांच्यांतील लुप्त होत असलेलें क्षात्रतेज पुन: जागृत करणें, वर्गकलहाचें बीज मोडून टाकून समाजांत ऐक्य प्रस्थापित करणें, आणि जर्मन संस्कृतीविषयी लोकांच्या ठिकाणीं अभिमान उत्पन्न करणें, या ध्येयांच्या पूर्तीकरितां नॅशनल-सोशालिझमचा व नाझी शिक्षणपद्धतीचा उदय झाला.

## नाझींची शिक्षणयोजना

जर्मनींतील नवीन शिक्षणपद्धति नुकतीच १९३३।३४ मध्यें अमलांत आली आहे. तिच्या सर्व तपशीलवार योजना हळुहळू अमलांत येत आहेत. परंतु ठोकळ रूपरेषा आणि ध्येयें मात्र ठरलेलीं आहेत. शारीरिक आणि लष्करी शिक्षणाला सर्व अभ्यासक्रमांत महत्त्वाचें स्थान देण्यांत आलेलें आहे. जर्मन भाषा, जर्मन तत्त्वज्ञान, व जर्मन संस्कृति या विषयांच्या अभ्यासाकडे अधिक लक्ष दिलें जातें. देशाबद्दल प्रेम उत्पन्न व्हावें म्हणून प्रवास करणें, खेड्यापाड्यांत विद्यार्थ्यांनी जाऊन राहणें, जर्मनींतील नैसर्गिक भव्य देखावे पाहणें इत्यादि गोष्टींचा अभ्यासक्रमांत समावेश करण्यांत आलेला आहे. मजूर, व मालक ही भावना नष्ट व्हावी आणि समाजैक्याची भावन वाढीस लागावी म्हणून गरीब आणि श्रीमंत अशा सर्व विद्यार्थ्यांना मजूरांबरोबर वर्ष-सहा महिने शारीरिक कष्टाचीं व मजूरीचीं आणि देशाला उपयुक्त अशीं कामें करावीं लागतात. सारांश, ज्या योगानें लोकांत एकराष्ट्रीयत्वाची वृत्ति, समाजैक्याची भावना, आणि क्षात्रतेज हीं निर्माण होतील अशा प्रकारचें शिक्षण देण्याचा जर्मनीचा प्रयत्न चाललेला आहे.

## इटलीची मनोभूमिका

इटलीची नवीन शिक्षणपद्धति पुष्कळ अंशीं जर्मनीच्या तत्त्वांवर उभारलेली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. इटलीचा वैभवशाली इतिहास तरुण पिढीपुढें ठेवून भावी इतिहास तितकाच वैभवशाली करण्याची महत्त्वाकांक्षा त्यांच्यांत उत्पन्न करणें, आणि अशा मार्गानें इटालियन लोकांत

एकी व क्षात्रतेज निर्माण करणें हें त्या देशांतील शिक्षणाचें राजकीय दृष्टचा ध्येय आहे. वर्गकलहाचे ऐवजीं वर्गसहकारितेची भावना समाजांत निर्माण करणें हें शिक्षणाचें सामाजिक ध्येय आहे. व्यक्ति आणि समाज यांच्या संबंधांत व्यक्तीनें समाजाच्या हिताकरितां आपलें सर्वस्व अर्पण केलें पाहिजे, त्यांतच व्यक्तीचा मोक्ष आहे, अशी श्रद्धा विद्यार्थ्यांत उत्पन्न करणें हें इटालियन शिक्षणाचें तात्त्विक दृष्टचा अंतिम ध्येय आहे.

## शिक्षणध्येयांची निश्चितता

रशिया, इटली आणि जर्मनी यांच्या शैक्षणिक तत्त्वांत आणि ध्येयांत बाह्यतः कांहीं विरोध दिसला तरी मूलतः कांहीं गोष्टी समान आहेत. लोकशाहीच्या नांवाखालीं वाढलेल्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या व व्यक्तिसुखाच्या तत्त्वांचा या तिन्ही राष्ट्रांनीं त्याग केला असून त्यांच्याऐवजीं समाजनिष्ठेच्या तत्त्वाची स्थापना केलेली आहे. समाजांत ऐक्य निर्माण करण्याच्या दृष्टीनें सर्व विरोधी मतांचें निराकरण करून एकाच ध्येयाचा व एकाच मताचा पुरस्कार करण्याचें कार्य प्रत्येक देशांतील शिक्षणपद्धति करीत आहे. त्यामुळें रशियाच्या शिक्षणपद्धतींतून कम्यूनिस्टच तयार होतील, जर्मनीच्या शिक्षण-पद्धतीमधून राष्ट्रीय वृत्तीचे जर्मन नागरिक तयार होतील, आणि इटलीच्या शिक्षणपद्धतींतून फाशिस्ट तयार होतील. राष्ट्रीयत्वाचे वृत्तीवर विशेष भर देण्यांत जर्मनी आणि इटली यांतील शिक्षणपद्धती सारख्याच आहेत.

## इंग्लिश शिक्षणांतील व्यवहारदृष्टि

इंग्लंडमधील समाजांत आणि राजकारणांत आज नवीन राजकीय तत्त्व किंवा वेदांत निर्माण झालेला नाहीं. त्या कारणानें तेथील शिक्षणांत विशेष खळबळ दिसून येत नाहीं. मजूर पक्ष ठिकठिकाणीं अधिकारांत येऊं लागल्यापासून बहुजन समाजाच्या शिक्षणाकडे व सामान्य जनांच्या मुलांबाळांकरितां दुय्यम शिक्षणाच्या सोयी करण्याकडे सरकारचें विशेष लक्ष जाऊं लागलें आहे. स्वतःच्या साम्राज्याचें संरक्षण आणि लोकशाही तत्त्वाच्या संस्थांचें संगोपन हें इंग्लिश समाजाचें ध्येय आहे ; त्यालाच पोषक असें कार्य शिक्षणसंस्था करीत आहेत. इंग्लंड ही व्यक्तिस्वातंत्र्याची भूमि असल्यामुळें कोणीं काय शिकवावें हें सरकार सांगत नाहीं. प्रस्थापित सत्तेला जोंपर्यंत

विशेष बाध येत नाहीं तोंपर्यंत कोणीं कांहींही शिकविलें तरी हरकत नाहीं. तात्त्विक दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास चारित्र्यसंपन्न व्यक्ती निर्माण करणें मग त्यांचीं राजकीय व सामाजिक मतें कांहीं असलीं तरी हरकत नाहीं हें इंग्लिश शिक्षणाचें ध्येय आहे. व्यावहारिक दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास ठराविक विषयांची तयारी करून घेऊन परीक्षांकरितां विद्यार्थी तयार करणें याकडे शाळांचें विशेष लक्ष असतें. अमेरिका, रशिया, जर्मनी अथवा इटली या देशांतून जो शैक्षणिक ध्येयवाद दिसून येतो तो इंग्लंडमध्यें नाही. ते व्यवहारी लोक आहेत. परिस्थितीप्रमाणें जमवून घेऊन आपला उद्देश ते साध्य करून घेतात.

## हिंदी शिक्षणाची ध्येयशून्यता

हिंदुस्थानच्या शिक्षणपद्धतीचा विचार केला तर आज काय दिसतें? नोकरी मिळण्याकरितां परीक्षा पास झाल्या पाहिजेत. परीक्षा पास होण्याकरितां कोणीं तरी ठराविक विषय शिकविले पाहिजेत. तें काम आमच्या शिक्षणसंस्था करीत आहेत. त्यांच्या ठिकाणी समाजाच्या परिस्थितींतून निर्माण झालेला ध्येयवाद नाही. आजच्या समाजाच्या काय गरजा आहेत या गोष्टीकडे शिक्षणानें पूर्ण डोळेझांक केलेली आहे. कांहीं ठराविक विषय शिकविण्यापलीकडे शाळांकडून विशेष कार्य होत नाहीं. त्या विषयांतही समाजोपयोगी ज्ञानाचा समावेश करण्यांत आलेला नाहीं. आजच्या हिंदी समाजापुढील जे प्रश्न आहेत व जी ध्येयें आहेत, त्यांना पोषक असा कार्यक्रम शिक्षणपद्धतीत नाहीं. हिंदी समाजाच्या आत्यंतिक जिव्हाळ्याचे आजचे प्रश्न म्हणजे आर्थिक पुनर्घटना, समाजांतील वर्गांचें ऐक्य, राष्ट्रीय वृत्तीचें संगोपन, व हिंदी संस्कृतीचें संवर्धन हे आहेत. त्यांच्या विचारांचा स्पर्शही विद्यमान शिक्षणाला झालेला नाहीं. शिक्षण आणि समाज यांमध्यें झालेली ही काडीमोड देशाला अपायकारक आहे आणि होईल. पाश्चात्य शिक्षणापासून जर कांहीं बोध घ्यावयाचा असेल तर तो हाच कीं, हिंदी समाजानें आपलीं ध्येयें निश्चित करावींत आणि तीं साध्य करून घेण्याकरितां व्यापक शिक्षणसंघटना घडवून आणावी.

## शिक्षणाचा समाजाशीं संबंध

प्रत्येक समाजाला कांहीं ध्येयें असतात. तीं साध्य करून घेण्याच्या

अनेक साधनांपैकीं शिक्षण हें एक साधन आहे. प्रौढ पिढीनें आपला अनुभव, आपले विचार आणि आपलीं ध्येयें, हीं शिक्षणाच्या द्वारें तरुण पिढीला देऊन, ध्येयपरंपरा व ज्ञानपरंपरा टिकवावयाची असते. समाज आणि प्रस्थापित सत्ता हीं एकजीव असतात. शिक्षण हें सत्तेला पोषक असें असतें. समाजांत नवीन मत अथवा नवीन सत्ता निर्माण होऊं लागली कीं, ती शिक्षणसंस्थेला आपल्या हातांत घेऊं पाहते. अशा रीतीनें प्रस्थापित सत्ता आणि उदयोन्मुख सत्ता यांच्यामध्यें शिक्षणसंस्थेचा ताबा घेण्याविषयीं चुरस चालू होते. एकाद्या समाजांत नवीन मताची सत्ता स्थापन झाली म्हणजे शिक्षणपद्धति आपणांस अनुकूल अशी बनवून घेणें हें तिला आवश्यक होऊन बसतें. नवीन सत्तेच्या दृढीकरणाकरितां शिक्षणसाधनाचा चांगला उपयोग होतो. दृढ स्थापित सत्तेला पोषक असलेली शिक्षणपद्धति समाजाच्या वाढत्या गरजांविषयीं उदासीन राहूं शकते. ज्या समाजाला आपल्या परिस्थितीमध्यें बुद्धिपुरःसर फेरबदल घडवून आणावयाचा आहे, त्यानें आपल्या शिक्षणाच्या पुनर्घटने-विषयी उदासीन राहून चालणार नाहीं. आपल्या ध्येयांप्रमाणें शिक्षणांत सुधारणा घडवून आणणें हें त्याचें आद्य कर्तव्य आहे.

## हिंदुस्थानची सुवर्णसंधि

वरील विवेचनावरून असें दिसून येतें कीं, राष्ट्रीय ध्येयाप्रमाणें शिक्षण-पद्धतीमध्यें फेरबदल होत जातो. प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, देश-काल-समाज-निरपेक्ष शाश्वत शिक्षणतत्त्वें आणि राष्ट्रीय ध्येयानुकूल विशिष्ट शिक्षणपद्धति यांतील विरोध कसा मिटवावा. सर्व समाजाला सामान्य असें विश्वव्यापक, शाश्वत तत्त्वावर उभारलेलें, आणि दिक्कालाद्यनवच्छिन्न असें शिक्षण निर्माण करतां येणार नाहीं काय ? समाजाची परिस्थिति बदलणार त्याप्रमाणें समाजाचीं ध्येयें बदलणार. आणि ध्येयें बदलणार तर शिक्षणही बदलणार. यूरोपमधील राष्ट्रीय शिक्षणपद्धतींकडे पाहिलें तर त्यांत तात्कालिक महत्त्वाचे परंतु पुढें नष्ट होणारे असे अनेक भाग दिसतात. हिंदी समाजाला व शिक्षणाला आज आपत्तीतून आपला मार्ग काढावयाचा आहे. त्याला उपाय एकच आहे. आपल्या समाजाचीं व देशाचीं ध्येयें ठरवितांना प्रथमच जर विशाल पायावर सुरुवात केली आणि व्यापक ध्येयें ठेविलीं तर

हा विशालपणा व व्यापकपणा शिक्षणपद्धतीमध्येंही प्रतिबिंबित झाल्याखेरीज राहणार नाहीं. रशिया, जर्मनी, इटली आणि इंग्लंड यांच्या शिक्षणांकडे पाहिलें तर असें दिसून येतें कीं, त्यांनीं ध्येयदृष्टीनें स्वतःला एक वर्ग, एक वर्ण, एक प्रांत अथवा एक राजकीय कल्पना अशा संकुचित कल्पनेनें बांधून घेतलें आहे. हा ध्येयवादाचा संकुचितपणा टाळला तर सर्व देशांना अनुकरणीय अशी शिक्षणपद्धति निर्माण करण्याचें कार्य हिंदुस्थानलाही करतां येईल. व्यापक कल्पनेनें व ध्येयवादानें आमच्या शिक्षणखात्यांनीं, शिक्षणसंस्थांनीं, व शिक्षकांनीं काम केल्यास हिंदुस्थान हेंही जगाला एक शैक्षणिक तीर्थयात्रेचें स्थान होईल.

---

## प्रकरण अठ्ठाविसावें

# शिक्षणांतील राष्ट्रभावना व नागरिकत्व

### शिक्षणापुढील प्रश्न

प्रत्येक राष्ट्रांत अनेक समाज आणि त्यांच्या अनेक भावना असतात. या भावनांच्या कलहांतून एक प्रभावी निष्ठा निर्माण कशी करावी हा शैक्षणिक मानसशास्त्राचा प्रश्न आहे. इतर राष्ट्रें तो कसा सोडवितात त्याचें समालोचन केल्यास त्यापासून आपल्या येथील परिस्थितीविषयीं कांहीं विधायक कल्पना आपणांस सुचतील.

गेल्या वीस वर्षांत यूरोपियन राष्ट्रांनीं शिक्षणाकडे जितकें लक्ष दिलें तितकें त्यांनीं त्यापूर्वीं कधींच दिलें नव्हतें. यूरोपमध्यें राज्यक्रांत्या होऊन विविध राज्यपद्धती स्थापन होण्याचा आणि शिक्षणाच्या प्रगतीचा काळ एकच आला, ही गोष्ट केवळ काकतालीय न्यायानें झालेली नाहीं. शिक्षण आणि राजकारण यांचा संबंध किती निकट आहे हें तत्त्व यूरोपच्या अलीकडील शिक्षण–इतिहासावरून चांगलें प्रत्ययास येतें. राज्यपद्धति, समाजाचें

ध्येय, राजकीय वेदांत, आर्थिक तत्त्वज्ञान इत्यादि क्षेत्रांत क्रांति अथवा उत्क्रांति झाली म्हणजे तिचा शिक्षणावर आपाततः परिणाम होतोच; कारण शिक्षण हें समाजनियंत्रणाचें एक साधन आहे. समाजाची मनोवृत्ति विशिष्ट मार्गानें नेण्याचें तें वाहन आहे. समाजाचें गाडें ज्या वेळीं सुरळीत चालूं असतें त्या वेळीं, या साधनाकडे समाजधुरीणांचें विशेष लक्ष जात नाहीं. परंतु ज्या वेळीं समाजांत खळबळ होऊन विशेष दिशेनें त्याला नेण्याची जरूरी भासते त्या वेळीं अनेकांपैकीं एक साधन म्हणून शिक्षणाकडे पुढाऱ्यांचें लक्ष जातें. अमेरिका, फरान्स, रशिया, इटली इत्यादि राष्ट्रांच्या उदाहरणांवरून वरील सिद्धांताची सत्यता पटते.

समाजाला अथवा राष्ट्राला एका विशिष्ट ध्येयाकडे न्यावयाचें असलें तर त्या समाजांत एकसूत्रता पाहिजे. ज्या मार्गानें जावयाचें त्यावर बहुजन समाजाची श्रद्धा असणें आवश्यक आहे. ही श्रद्धा निर्माण करण्याचें शिक्षण हें एक साधन आहे. अशा तऱ्हेनें ज्या समाजाला श्रद्धेचें व निष्ठेचें एक स्थान असतें व त्याकरितां जो समाज एकदिलानें झगडूं शकतो त्याला राष्ट्र अशी संज्ञा योग्य आहे. अखिल राष्ट्राला एकत्र खेचून धरणाऱ्या या निष्ठेचीं स्वरूपें निरनिराळीं असूं शकतील. व्यक्तिपूजा, ध्येयनिष्ठा, परचक्राची भीति, अंधश्रद्धा, विशिष्ठ राज्यपद्धति इत्यादि अनेक कारणांनीं समाज एकत्र निगडित होतो व एका कार्यास प्रवृत्त केला जातो. अशी एकनिष्ठा असलेल्या देशांत राष्ट्रीयत्व आहे, असें आपण म्हणतों.

## निष्ठांचा विरोध

या राष्ट्रीयत्वाची एकमेव भावना प्रत्येक समाजांत नैसर्गिकच असती तर शिक्षणाकडे राष्ट्रसंवर्धनाचे दृष्टीनें कोणीं लक्ष दिलें नसतें. परंतु ही भावना शिथिल करणारीं अनेक कारणें असतात. म्हणून राष्ट्रनिष्ठा सतत जागृत ठेवण्याचें काम शिक्षणाकडे दिलेलें असतें. प्रत्येक समाजांत अनेक लहान लहान घटक असतात आणि त्यांच्या निष्ठेचीं स्थानें निरनिराळीं असतात. एकाच राष्ट्रांत विविध वंश, धर्म, भाषा, संस्कृती व हितसंबंध असलेले अनेक समूह असतात. त्यांतील व्यक्तींना आपापल्या गटांतील व्यक्तींबद्दल अधिक आपलेपणा वाटतो व या समूहाचा जो समान गुणधर्म असेल त्याबद्दल विशेष निष्ठा व प्रेम वाटतें. ज्या वेळीं राष्ट्रनिष्ठेची भावना शिथिल होते त्या

वेळीं या दुय्यम दर्जाच्या भावना जोरावतात आणि समाजांत कलह उत्पन्न होतात. ज्या समाजांत दुय्यम निष्ठांना प्राधान्य देऊन राष्ट्रनिष्ठेला गौणत्व दिलें जातें त्या समाजावर परकीय सत्तेचें आक्रमण होतें; म्हणून राष्ट्रपुढाऱ्यांचा नेहमीं असा प्रयत्न चाललेला असतो की समाजानें राष्ट्रभावनेला प्राधान्य द्यावें व इतर भावनांना गौण मानावें. ही गोष्ट जेव्हां सहज साध्य होऊं शकत नाहीं तेव्हां ती शिक्षणाचे मार्गानें साध्य केली जाते. पाश्चात्य देशांत सार्वत्रिक शिक्षण असल्यानें प्रत्येक नागरिक शाळेच्या वातावरणांतून अवश्य जातोच. विद्यार्थ्यांच्या भावनाप्रधान वयांत त्यांचेवर राष्ट्रनिष्ठेचा व तत्पोषक भावनांचा ठसा मारला म्हणजे तो जन्मभर टिकतो. दुय्यम निष्ठा आणि राष्ट्रनिष्ठा यांच्यांत ज्या वेळीं विरोध येतो त्या वेळी हे शिक्षण-संस्कार व्यक्तीला व राष्ट्राला उपयोगी पडतात.

सारांश, अनेक भावनांच्या व निष्ठांच्या झंझावातांतून राष्ट्रनिष्ठेची भावना प्रभावी व जागृत कशी ठेवावी हा राष्ट्रधुरीणांचा व शिक्षणपुढाऱ्यांचा नेहमीं प्रयत्न असतो. या ठिकाणी राष्ट्रनिष्ठा हा शब्द व्यापक अर्थानें उप-योगांत आणिला आहे. कोणत्याही एका देशांतील समाज ज्या ध्येयामुळें अथवा तत्त्वामुळें एकत्र येतो त्याला राष्ट्रनिष्ठा अशी संज्ञा दिली आहे. अमेरिकन लोकांची ‘डीमॉक्रसी’, ब्रिटिशांचे ‘एंपायर’, फरेंच लोकांचें ‘फरेंच कल्चर’, जर्मनांचा ‘नॅशनल सोशालिझम’, इटालियनांचा ‘फाशिझम्’ व रशियन लोकांचा ‘कम्यूनिझम्’ या विविध निष्ठास्थानांना राष्ट्रनिष्ठा असें मोघम संबोधन दिलेलें आहे.

## ऐक्यसंवर्धक व विध्वंसक भावना

समाजांत एकनिष्ठा उत्पन्न होण्याला अनेक कारणें असतात. ज्या देशांतील लोक एकाच वंशाचे, धर्माचे, भाषेचे, संस्कृतीचे आणि परंपरेचे असतात त्या देशांत राष्ट्रनिष्ठा सहज आणि लौकर निर्माण होऊं शकते व टिकते. कारण समान निष्ठा उत्पन्न करणारीं हीं साधनें अगदीं स्वाभाविक व सहसा विकार न पावणारीं अशीं आहेत. वंश, भाषा, संस्कृति व परंपरा यांच्यांत फरक पडूं शकत नाहीं. किंबहुना अधिक काल जातो तसतशीं हीं बंधनें अधिकच दृढ होतात व राष्ट्रनिष्ठेला जोरकस करतात. परंतु असे पुष्कळ देश आहेत कीं ज्यांना वरील ऐक्यसंवर्धक साधनें उपलब्ध नसतात. अमेरिक

रशिया व हिंदुस्थान हे देश असे आहेत कीं ज्यांत वंश, भाषा, धर्म, संस्कृती आणि परंपरा यांची फार विविधता आहे. अशा समाजांत वंश-भाषा-धर्म-संस्कृति इत्यादि भावनांवर मुख्य भर दिल्यास राष्ट्रभावना गौण होते. म्हणून अशा ठिकाणीं एकनिष्टेची व राष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न करण्याकरितां कृत्रिम साधनांचा उपयोग करावा लागतो. मुत्सद्दी राजकारण आणि शिक्षण यांचीं क्षेत्रें या ठिकाणीं येऊन भिडतात. निसर्गतःच एकरूप असलेल्या समाजापेक्षां अशा मिश्र समाजांना समान निष्ठा उत्पन्न करण्याचे कामीं शिक्षणाचा उपयोग करावा लागतो. इंग्लंडचा समाज (वेल्स सोडून दिल्यास) वंश, भाषा, संस्कृति इत्यादि दृष्टींनीं एकात्मक असल्यानें त्याला अमेरिके-प्रमाणें कृत्रिम साधनांचा उपयोग करण्याची जरूरी पडत नाहीं. म्हणून प्रत्येक वेळी इंग्लिश शिक्षणपद्धतीचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून वागणारे आपले शिक्षणपुढारी चुकतात. शाळेंत शुद्ध ज्ञान द्यावें व व्यक्तिविकासात्मक (इंडिव्हिज्युअॅलिस्टिक) शिक्षण असावें, हें शैक्षणिक तत्त्वज्ञान इंग्लंडच्या परिस्थितीला योग्य असलें तरी तें हिंदुस्थानच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीत लागूं पडत नाहीं. इंग्लिश शिक्षणपद्धतीतून निघालेला इंग्लिश मनुष्य राष्ट्रनिष्ठ असतो, आणि हुबेहूब त्याच स्वरूपाच्या हिंदी शिक्षणांतून बाहेर पडलेला हिंदी मनुष्य आकुंचित मनोवृत्तीचा, स्वार्थपरायण, आणि राष्ट्राविषयी उदासीन असा निघतो. म्हणून भावी नागरिकांत राष्ट्रनिष्ठा उत्पन्न करण्याकरितां आपल्या शिक्षणपद्धतीनें कृत्रिम साधनांचा आश्रय घेतला पाहिजे. ही साधनें किती विविध प्रकारचीं असूं शकतात तें अमेरिका, इटली, व रशिया या देशांच्या उदाहरणांवरून दिसून येईल.

## दोषाची परंपरा

प्राचीन हिंदी शिक्षणांत जो एक दोष राहून गेला तो आपल्या अर्वाचीन शिक्षणानें मुळीच सुधारला नाहीं. हिंदु विद्यार्थ्याला त्याचे गुरू तीन ऋणांची जाणीव करून देत, जायमानो हि पुरुषः त्रिभिर्ऋणमान् जायते। जन्माला आलेल्या माणसानें आपली सामाजिक ऋणें फेडणें आवश्यक असतें. या ऋणांच्या यादींत मातापिता, देव, गुरु इत्यादींचा समावेश झाला पण राष्ट्राचा समावेश झाला नाहीं. त्या वेळीं या ऋणाच्या जाणीवेची गरज

नसेल पण आजचें काळांत ती आहे हें जाणून आधुनिक शिक्षणपद्धतीनें तिचा समावेश करावयास पाहिजे होता. परंतु आपली शिक्षणपद्धति कोणाचेंच ॠण जुमानीत नाहीं तेथें राष्ट्राचें काय मानणार! याचा परिणाम असा झाला कीं आपल्याकडील शिक्षणपद्धतींतून बाहेर पडलेलीं मोठमोठीं विद्वान् व कर्तबगार माणसें राष्ट्रनिष्ठा या कसोटीच्या दृष्टीनें कमकुवत निघालीं. दुय्यम दर्जाच्या इतर निष्ठा आणि राष्ट्रनिष्ठा यांच्यांत विरोध आला असतां आकुंचित, गौण, आणि स्वार्थी निष्ठांना प्रामुख्य देणाऱ्या व्यक्ती देशांत कशा निघतात याचें आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. कारण भावनाप्रधान अशा विद्यार्थी अवस्थेंत राष्ट्रभावनेचें संवर्धन त्यांच्या शिक्षणानें केलें नाहीं. अशाही परिस्थितींत अनेक राष्ट्रनिष्ठ व्यक्ती बाहेर पडल्या हेंच आश्चर्य! परंतु त्याचें श्रेय शालेय शिक्षणाकडे नसून त्याव्यतिरिक्त बाहेरच्या वातावरणांतून जें शिक्षण मिळतें त्याकडे, किंवा स्वपरिश्रमानें व्यक्ती जें शिक्षण घेतात त्याकडे आहे. आज हिंदुस्थानच्या शैक्षणिक तत्त्वज्ञानाचा प्रश्न असा आहे कीं राष्ट्र-निष्ठेपुढें इतर दुय्यम निष्ठा गौण मानणाऱ्या व्यक्ती कशा निर्माण होतील. या प्रश्नाचा विचार आपल्या शिक्षणनेत्यांनीं आज केला नाहीं तर आपला समाज आणखी दोनतीन पिढ्या तरी आहे त्यापेक्षां फारसा पुढें जाणार नाहीं. जगाच्या वेगामुळें 'बलादिव नियोजितः' होऊन यदृच्छेनें जी कांहीं प्रगति होईल तेवढीच.

## निष्ठासंवर्धनार्थ शिक्षण

निष्ठासंवर्धनाचे दृष्टीनें पाश्चात्त्य राष्ट्रांच्या शिक्षणपद्धतींचा विचार करतांना त्यांचे दोन भाग पाडावे लागतात. इंग्लंड, फरान्स, जर्मनीसारखीं राष्ट्रें एका गटांत पडतात, आणि अमेरिका, रशिया, स्वित्झरलंड, व हिंदुस्थान यासारखीं राष्ट्रें दुसऱ्या गटांत पडतात. समाजरचना आणि राष्ट्रैक्याचीं साधनें या दृष्टींनीं या दोन राष्ट्रसमूहांत फरक आहे. इंग्लंड, फरान्स व जर्मनी हीं राष्ट्रें बरींच जुनीं आहेत. त्यांच्यांतील बहुसंख्यांक लोक वंश, भाषा, संस्कृति, परंपरा, इतिहास, पूज्य विभूति इत्यादि साधनांनीं एकत्र बांधले गेले आहेत. वंश, भाषा, धर्म व संस्कृति या बाबतींत त्यांच्यांत परस्पर कलह उत्पन्न होण्याची शक्यता नाहीं. अशा समाजाला एक ध्येय देणें व एकत्र ठेवणें फार

सोपें असतें. समाजैक्य व राष्ट्रनिष्ठा कायम राहण्याला या देशांत नैसर्गिकच अनुकूल परिस्थिति आहे. परंतु हा फायदा रशिया, अमेरिका व स्विझरलंड यांसारख्या देशांना नाहीं. या देशांत अनेक वंशांचे, वर्णांचे, धर्मांचे, भाषांचे व संस्कृतींचे लोक आहेत. त्यामुळें त्यांना एकत्र आणणारीं अशीं इतर साधनें निर्माण करणें देशांतील तत्त्वज्ञानी, पुढारी, राजकारणी आणि शिक्षणतज्ज्ञ यांना भाग पडलें. निसर्गानें जे लोक एकजीव झालेले नाहींत त्यांना ध्येयनिष्ठा एकजीव करूं शकते. राष्ट्रीयत्वाची कल्पना, एकादें उदात्त राजकीय अथवा सामाजिक ध्येय, अथवा एकादा काल्पनिक शत्रु इत्यादि कारणांमुळें मिश्र समाजांतील लोकही एकत्र येऊं शकतात. ज्यांना अमूर्त ध्येयवाद समजत नाहीं अशा अजाण विद्यार्थीवर्गाकरितां व सामान्य जनांकरितां या ध्येयवादाचीं मूर्तिमंत, दृश्य, व जड स्वरूपांचीं प्रतीकें (सिंबॉल्स) निर्माण करावीं लागतात. अथांग समाजामध्यें एक विशिष्ट भावना निर्माण कशी करावी, त्याला कोणतीं साधनें उपयोगांत आणावींत, आणि शिक्षणाचा या ध्येयसाधनाकडे विधायक दृष्टीनें उपयोग कसा करून घ्यावा याचा पाश्चात्त्य मानसशास्त्रज्ञांनीं व शिक्षणपुढाऱ्यांनीं पुष्कळ विचार केलेला आहे. या ज्ञानाची आपल्या देशाला फार आवश्यकता आहे.

## राष्ट्रनिष्ठेचें इंग्लिश वातावरण

इंग्रजींत म्हण आहे कीं 'दि हेल्दी नो नॉट ऑफ देअर हेल्थ', तशी इंग्लंडची स्थिति आहे. इंग्लिश लोकांना आपल्या मुलांना राष्ट्रनिष्ठा शिकविण्याची जरूर पडत नाहीं कारण ती त्यांचें रक्तांतच आहे. शिक्षणशास्त्राचा असा सिद्धांत आहे कीं समाजांतील नैसर्गिक जीवनांत जें शिक्षण कमी पडतें तें भरून काढणें हें शाळांचें काम आहे. इंग्लंडमधील वातावरण इतकें राष्ट्रप्रेमाचें आहे कीं त्या हवेंत राहणाऱ्या मुलांचे ठिकाणीं स्वाभाविकच व नकळत तो गुण उतरतो. शिवाय इंग्लंडची समाजघटनाही या वाढीला ोषक अशी आहे. वंश, भाषा, संस्कृति, परंपरा इत्यादि बंधनांमुळें ऐक्याची व समाजनिष्ठेची भूमिका अधिक.इंग्लंडचा मागील शतकांचा इतिहास हा स्वातंत्र्यप्रेरणेनें व राष्ट्रप्रेमानें भरलेला आहे. ठिकठिकाणीं स्मारकें व पुतळे उभे करून हा इतिहास मूर्तिमंत स्वरुपांत तरुण पिढीपुढें ठेविलेला आहे. प्रतीकांचा उपयोग

कसा करून घ्यावा हें इंग्लिश पुढाऱ्यांनीं चांगलें जाणलें आहे. त्यांचे उत्सव, समारंभ, मिरवणुकी इत्यादि सार्वजनिक कार्यक्रम पाहिले म्हणजे त्यांत जुन्या इंग्लिश इतिहासाचें नव्या पिढीला स्मरण करून देणाऱ्या किती तरी गोष्टी दिसतात ! जुन्या पद्धतीचे पोषाख केलेले सैनिक, ऐतिहासिक गाड्यांतून मेयरच्या व राजाराणीच्या निघणाऱ्या मिरवणुकी, स्टेजवर दाखविले जाणारे ऐतिहासिक देखावे, व रोजच्या व्यवहारांत कायम टिकविलेल्या अशा ऐतिहासिक परंपरा या तिऱ्हाईताला अर्थशून्य व जुनाट वाटतात. परंतु मानसशास्त्राचे नियमानें त्याचा परिणाम कोंवळ्या व सामान्य मनावर होत असतो. अशा रीतीनें समाजांतील वातावरणाचे साहाय्यानें राष्ट्रप्रेमाचें शिक्षण दिलें जातें.

## हिंदुस्थानला तीन धडे

इंग्लिश शिक्षणपद्धतीपासून हिंदुस्थाननें दोनतीन गोष्टी घेण्यासारख्या आहेत. आपल्या शाळेंतून निघालेला हिंदी तरुण काय ठशाचा असावा याचा आपण विचार केला पाहिजे. यामुळें सगळीं माणसें सारखी निघून व्यक्तित्व मारलें जाईल अशी भीति मुळीच नको. कांहीं गुणांचा ठसा उठावा हा आग्रह शाळांनीं धरला पाहिजे इतकेंच. दुसरी गोष्ट, शाळांमध्यें राष्ट्राचे दृष्टीनें कल्पना येईल असें विशिष्ट वातावरण ठेविलें पाहिजे. स्मारकें, चित्रें, देखावे, नाटकें व उत्सव या साधनांचा पूर्ण उपयोग करून घ्यावा. तिसरी गोष्ट, क्रमिक पुस्तकें लावतांना व विषय शिकवितांना अप्रत्यक्षपणें राष्ट्रनिष्ठा उत्पन्न होईल अशा प्रकारची योजना असावी.

## फ्रेंच शिक्षणाची योजना

इंग्लंडमध्यें अप्रत्यक्ष शिक्षणावर भर आहे. पण फरान्समध्यें प्रत्यक्ष शिक्षणाकडे विशेष लक्ष आहे. राष्ट्रनिष्ठा शिकविण्याकरितां इतिहास आणि भूगोल या विषयांचा पूर्णपणें उपयोग करून घेतला जातो. फरान्समध्यें व यूरोपमधील इतर देशांत एक वेळीं अशी कल्पना होती कीं स्वतःच्या राष्ट्रा-विषयीं प्रेम व निष्ठा उत्पन्न करण्याकरितां इतर राष्ट्रांचा द्वेष मुलांचे ठिकाणीं उत्पन्न केलाच पाहिजे. ही स्थिति परवांपरवांपर्यंत फरान्समध्यें होती आणि इतर राष्ट्रांत अद्यापही आहे. पण १९२६ सालीं फरेंच शिक्षकसंघानें अशीं

द्वेषमूलक क्रमिक पुस्तकें शिकविण्याचें नाकारलें व स्वत: कांहीं पुस्तकें तयार केलीं. सारांश, ऐतिहासिक सत्य न सोडतांही फरान्समध्यें इतिहास–भूगोलाचे साहाय्यानें देशनिष्ठा शिकविली जाते. आपल्या देशानें गतकालांत काय पराक्रम केले आहेत, फरेंच, योद्धे, वीर, व विभूति यांनीं काय कर्तबगारी केली, फरान्सचे इतर राष्ट्रांशीं संबंध कसे आहेत या गोष्टी शाळांमधून शिकविल्या जातात. फरान्समध्यें शिक्षणाचा अधिकार मध्यवर्ती सरकारचे हातांत केंद्रित झालेला आहे. विशेष पद्धतीनें इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र व राज्यशास्त्र हे विषय शिकवावयाचे असे त्या ठिकाणीं एकदां ठरलें कीं सर्व राष्ट्रांत त्याप्रमाणें शिक्षण दिलें जातें व एकच भावना निर्माण करतां येते.

## अमेरिकन शिक्षणाचा दूरदर्शीपणा

अमेरिकेची समाजघटना इंग्लंड व फरान्सपेक्षां अगदी निराळी आहे. हा देश गेल्या तीनशें वर्षांत नवीन स्थापन झालेला आहे. यूरोप खंडांतील निरनिराळ्या देशांतून धार्मिक व आर्थिक कारणांकरितां गेलीं तीन शतकें या देशांत रहिवासी आलेले आहेत व अद्यापही दरवर्षी येत आहेत. या लोकांत अनेक धर्मपंथ होते, अनेक भाषा होत्या, अनेक संस्कृती व परंपरा होत्या. प्रॉटेस्टंट, कॅथॉलिक, व ज्यू असे विविध पंथांचे धर्म, इंग्लिश, जर्मन, फरेंच, रशियन, इटालियन, डच अशा निरनिराळ्या भाषा व संस्कृती, आणि नॉर्डिक ॲंग्लो सॅक्झन्, स्लाव्ह, सेमिटिक असे निरनिराळे वंश, अशी सर्व भाषा–संस्कृती–वर्ण यांची खिचडी अमेरिकेंत झाली. पण या सर्वांची एक मोट बांधून अमेरिकेनें त्यांतून जगांतील अव्वल दर्जाचें राष्ट्र कसें निर्माण केलें तो इतिहास हिंदी शिक्षणपुढाऱ्यांनीं वाचण्यासारखा आहे. आज जो प्रश्न हिंदुस्थानपुढें आहे तोच गेलीं दोनतीन शतकें अमेरिकेपुढें होता, कीं मिश्र संस्कृतीच्या लोकांतून एकराष्ट्रीयत्वाची भावना कशी निर्माण करतां येईल.

अमेरिकेच्या दूरदर्शी पुढाऱ्यांनीं आपली अडचण जाणून या कार्याचे कामीं शिक्षणाचा पूर्ण उपयोग करून घेण्याचें ठरविलें. विविध संस्कृतींचे लोक एकत्र आले तरी त्यांतून उत्कृष्ट घटक घेऊन एक अमेरिकन संस्कृति निर्माण करावी अशी महत्त्वाकांक्षा त्यांनीं आपल्या शिक्षणांत ठेविली. सर्वांनीं घरीं आपापली भाषा बोलावी, परंतु शाळेंत आणि समाजांत इंग्रजी भाषा आवश्यक असावी असे कायदे झाले. वंश बदलतां येणें शक्य नाहीं, परंतु

अमुक वंशाचे लोक श्रेष्ठ व अमुक वर्णाचे लोक कनिष्ठ ही भावना काढून टाकून त्या ठिकाणीं वैयक्तिक लायकी व कर्तबगारीची कसोटी ठेविली गेली. बापजादे जरी यूरोपांत व इतर देशांत जन्मलेले असले तरी आतां आपण अमेरिकेचे नागरिक आहोंत, आणि वेळप्रसंगी अमेरिकेच्या वतीनें, वाडवडील जेथें जन्मले त्या देशांशींही लढलें पाहिजे, अशी भावना लोकांत निर्माण करण्याचा प्रयत्न झाला. महायुद्धांत अमेरिकन–जर्मन लोक जर्मनीविरुद्ध लढले, यावरून हें 'अमेरिकनायझेशन्' किती पूर्ण झालें आहे हें उघड होतें. अशा रीतीनें हे सर्व परकीय लोक आपल्या संस्कृतींत व राष्ट्रांत पचविण्याची प्रक्रिया अमेरिकेंत अद्याप चालू आहे.

## कांहीं पद्धती, मार्ग व तंत्रें

अमेरिकन शाळांतून राष्ट्रनिष्ठेचें शिक्षण प्रत्यक्ष स्वरूपांत दिलें जातें. तसें तें दिलें गेलें पाहिजे असे प्रांतिक सरकारचे कायदे आहेत. प्रत्येक शाळेंत अमेरिकेचें राष्ट्रीय निशाण ( स्टार स्पँगल्ड् बॅनर ) असतें. त्याला प्रणाम करून सर्वांनींराष्ट्रीय गीत म्हणावयाचें असा नियम आहे. शाळेंतील अगदी मठ्ठ आणि अर्धवेडीं मुलें असलीं तरी त्यांना राष्ट्रीय गीत हें म्हणतां आलेंच पाहिजे व शिकविलें गेलें पाहिजे. इतिहास शिकवितांना अमेरिकन वीरांचा व विभूतींचा गौरव केला जातो. त्यांना कमीपणा आणणारीं पुस्तकें असली तर तीं क्रमिक पुस्तकांच्या यादींतून कमी केली जातात. अमेरिकेचे इतर राष्ट्रांशीं संबंध कसे आहेत याची पूर्ण कल्पना दिली जाते. देशाची राज्यव्यवस्था व राज्य-घटना काय आहे याची माहिती प्रत्येक नागरिकाला असणें आवश्यक आहे. नवीन नागरिकांना देशांत घेतांना त्यांची परीक्षा होते. त्यांत इंग्रजी भाषा, राज्यघटना आणि अमेरिकन विभूतिपुरुषांविषयीं माहिती हे विषय आवश्यक असतात. शतकानुशतकें हिंदुस्थानांत राहून, येथील अन्न खाऊन, परक्या देशाला मायभूमि मानणाऱ्या अराष्ट्रीय हिंदी लोकांना ही अमेरिकेसारखी नागरिकत्वाची परीक्षा ठेवणें आवश्यक नाहीं काय ?

## शाळेंत राष्ट्राचे प्रश्न

अमेरिका इंग्लंडपासून फुटून स्वतंत्र देश झाला, तेव्हांपासून आपल्या मिश्र समाजांत एकराष्ट्रीयत्वाची वृत्ति कशी निर्माण होईल याचा विचार

पुढाऱ्यांनीं व मुत्सद्यांनीं चालविला आहे. त्या सर्वांनीं एकमतानें असें ठरविलें आहे कीं शिक्षणाचे साहाय्यानेंच ही राष्ट्रभावना उत्पन्न होऊं शकेल. राष्ट्रवृत्तीला पोषक संस्था म्हणून शिक्षणाचा जन्म झाला.

" The purpose of such an educational system was regarded to be the promotion of national solidarity and homogeneity of all people " ( Kandel, I. L. Comparative Education. P. 77.) 'राष्ट्रांत व समाजांत ऐक्य व समानत्व निर्माण करणें हें शिक्षणपद्धतीचें ध्येय मानलें गेलें.'

अमेरिकन राष्ट्रीयत्वाचें मुख्य ध्येय डीमॉक्रसी हें आहे. देशांत व्यापक अर्थाची लोकसत्ता स्थापन करणें हें राष्ट्राचें उदिष्ट. या राष्ट्रीय ध्येयाचें आकलन विद्यार्थ्यांना व तरुण पिढीला व्हावें म्हणून दुय्यम शाळांतून 'प्रॉब्लेम्स् ऑफ अमेरिकन डीमॉक्रसी' असा एक अभ्यासक्रम ठेविलेला आहे. मिश्र अशा अमेरिकन समाजांत एकीची भावना कशी निर्माण होऊं शकेल, स्वतःची पूर्वीची भूमि, भाषा, संस्कृति इत्यादि दुय्यम लेखून अमेरिकन संस्कृतिसंवर्धनाकडे लोक अधिक लक्ष कसें देतील, अशा प्रश्नांची चर्चा या अभ्यासक्रमांत केली जाते. राष्ट्रीय एकीकरण हें जर हिंदी शिक्षणपद्धतीचें ध्येय असेल, आणि तें नसेल तर आमच्या शिक्षणपुढाऱ्यांचा तो दोष आहे, तर दुय्यम शिक्षणाचें शाळांतून 'प्रॉब्लेम्स ऑफ इंडियन नॅशनॅलिझम्' अशा स्वरूपाचा एक आवश्यक अभ्यासक्रम ठेवावयास पाहिजे. तुलनात्मक शिक्षणापासून याच गोष्टी घ्यावयाच्या असतात, तिकडे कानाडोळा करून उपयोगी नाहीं. खाजगी शाळांनीं या बाबतींत उदाहरण घालून दिलें पाहिजे.

## दोन ध्रुव—जर्मनी व हिंदुस्थान

राष्ट्रीय निष्ठा शिकविण्याकरितां शिक्षणाचा उपयोग करावा या तत्त्वाचा अतिरेक जर्मनींत पाहावयास सांपडतो. जर्मन शिक्षणाची व विश्वविद्यालयाची शिक्षणस्वातंत्र्याविषयीं पुष्कळ ख्याति असे. शिक्षकानें वाटेल तें शिकवावें व विद्यार्थ्यानें पाहिजे तें शिकावें असें अध्यापन आणि अध्ययनस्वातंत्र्याचें जर्मनीचें तत्त्व प्रसिद्ध असे. परंतु अशा काळांतही राजकारण, अर्थशास्त्र, आणि इतिहास या शिक्षणावर सरकारचें नियंत्रण असे. मध्यंतरीं

सोशल डीमॉक्रसीच्या अमदानींत हें नियंत्रण ढिलें झालें होतें, परंतु नाझी कारकीर्द आल्यापासून पुनः सर्व शिक्षणाला राष्ट्रनिष्ठेचें वळण लागलें आहे. यूरोपियन राष्ट्रांच्या चष्म्यांतून आजचा जर्मनी कितीही वाईट दिसत असला तरी त्याच्यापासून हिंदुस्थानला पुष्कळ गोष्टी घेण्यासारख्या आहेत. त्याचे अतिरेक मात्र सोडून द्यावेत.

इंग्लंडप्रमाणेंच जर्मनी हा देश वर्ण, भाषा, संस्कृति, आणि परंपरा या दृष्टीनीं एकरूप आहे. भिन्नवर्णाचे जे थोडे ज्यू देशांत होते त्यांना दुर्बल करण्यांत आलें. हेतु हा कीं समाजांत राष्ट्रनिष्ठा वाढविण्याचें काम सोपें जावें. ज्यूंचा छळ न करतांही ही गोष्ट साध्य झाली असती, पण हिटलरला तितका पोंच नव्हता. समाजांत राष्ट्रनिष्ठा उत्पन्न करण्याचे दृष्टीनें नाझी लोकांनीं शिक्षण व शाळा आपल्या हातांत घेऊन त्यांत आपल्या माणसांची योजना केली. या लोकांच्या हातांत शिक्षण गेल्याबरोबर त्यांनीं सर्व विषय आणि कार्यक्रम यांना राष्ट्राच्या दृष्टीनें वळण देण्यास सुरवात केली. परंतु याचा अतिरेक त्यांनीं इतका केला कीं शिक्षण म्हणजे नाझींच्या राष्ट्रीय आणि लढाऊ मतांचा प्रचार अशीच स्थिति झालेली आहे. म्हणजे हिंदुस्थान आणि जर्मनी हीं दोन टोकें आहेत. एकांत राष्ट्र या शब्दाला स्थान नाहीं. दुसऱ्यांत राष्ट्र या ॐकार शब्दाशिवाय कोणतीच ऋचा म्हटली जात नाहीं! मधला मार्ग काढला पाहिजे. राष्ट्रवृत्तीला पोषक असें सत्य शिकविण्यास हरकत नाहीं असत्याचा व वृथाभिमानाचा प्रचार करण्याची जरूरी नाहीं.

## नवीन विषयांचा जन्म

इतिहास, भूगोल, भाषा, तत्त्वज्ञान व विज्ञान या विषयांच्या साधनांनीं जर्मन देश व संस्कृती यांबद्दल निष्ठा उत्पन्न केली जाते. त्याकरितां नवीन क्रमिक पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. राष्ट्रवृत्ति व ध्येयनिष्ठा उत्पन्न करण्याकरितां जर्मनीनें दोन नवीन विषयांचा शिक्षणांत समावेश केलेला आहे— वंशशास्त्र (रेस सायन्स) आणि राष्ट्रशास्त्र (नॅशनॉलजी). जर्मन राष्ट्राचे व लोकांचे राजकीय प्रश्न काय आहेत आणि ते कसे सोडवितां येतील या गोष्टींबद्दल चर्चा वरील अभ्यासक्रमांतून केली जाते. जर्मनीच्या शिक्षणाचा प्रारंभच राष्ट्रनिष्ठ नागरिक निर्माण करण्याकरितां झाला. तीच परंपरा आज पुनः सुरू झाली आहे.

## पोप मुसोलिनीच्या देशांत

इटलीमध्येंही एकजिनसी समाज असल्यानें तेथें निष्ठांचा विरोध नाहीं. पोपची गादी तेथेंच असल्यानें धर्मनिष्टा आणि राज्यनिष्ठा यांत विरोध येण्याचा संभव. परंतु मुसोलिनीनें पोपशीं तडजोड केली आणि तोही विरोध नाहींसा केलेला आहे. आज इटलींतील शाळांच्या प्रत्येक वर्गांत पोप, मुसोलिनी, व राजा यांचीं चित्रें व राष्ट्रीय निशाण या वस्तू असतात. सर्व विद्यार्थ्यांचा एकजात पोषाख असतो. वर्गात राष्ट्रगीत म्हटलें जातें. इतिहास व भाषा विषय शिकवितांना इटलीचें पूर्वीचें वैभव काय होतें व पुढें राष्ट्राला काय साध्य करावयाचें आहे याची जाणीव करून दिली जाते. हें सर्व अप्रत्यक्ष व संस्कारमय शिक्षण झालें. याशिवाय फाशिझमचें प्रत्यक्ष शिक्षणही स्वतंत्र अभ्यासक्रमाचे मार्गानें तरुण पिढीला दिलें जातें.

## हिंदुस्थान–रशियाचा समान प्रश्न

इटली आणि जर्मनी या देशांपेक्षां रशियाचा प्रश्न अधिक अवघड व अमेरिका–हिंदुस्थानच्या प्रश्नासारखाच आहे. रशियांतही समाज, वंश, भाषा, व संस्कृति यांची विविधता आहे. उत्तर रशियांत जे लोक दिसतात त्यांपेक्षां क्रिमिया, यूक्रेनिया व जॉर्जिया या प्रांतांतील लोकांची संस्कृति भिन्न आहे. या सर्वांचें एक राष्ट्र करून त्यांच्यांत एक निष्ठा व एक ध्येय निर्माण करणें हें कार्य रशियानें चालविलें आहे. अमेरिकेनें विविध संस्कृतींच्या लोकांना एका भट्टींत घालून त्यांतून एक निराळीच अशी अमेरिकन संस्कृति निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा पुढें ठेविली आहे. रशियानें यापेक्षां निराळें धोरण स्वीकारलें. त्यानें प्रत्येक प्रांताला सांस्कृतिक स्वायत्तता देऊन टाकली. प्रत्येक समाजानें आपली भाषा, संस्कृति, व परंपरा यांचें रक्षण करावें, परंतु राजकीय दृष्ट्या मात्र सर्व प्रांतांचें ध्येय एकच राहिलें पाहिजे. समाजवादी राजसत्ता मान्य केल्यानंतर मग इतर बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य आहे. विविध संस्कृतींचे समाज एका देशांत असले तरी ते एका राजकीय ध्येयानें कसे बांधून टाकतां येतात याचें रशिया हें एक उदाहरण आहे. या राजकीय ध्येयाच्या

आड येणाराची मात्र मुळींच गय केली जात नाहीं. राजकीय निष्ठा आणि इतर दुय्यम प्रतींच्या निष्ठा यांत विरोध आला तर व्यक्तीनें इतर भावनांना गौण लेखून राजकीय ध्येयांना प्राधान्य दिलें पाहिजे.

## रशियाचे मार्ग

ही राजकीय निष्ठा अखिल जनतेंत निर्माण करण्याकरितां रशियानें शिक्षणाला प्राधान्य दिलें आहे. राजकीय ध्येयासाठीं शिक्षणाचा एवढया मोठ्या प्रमाणावर उपयोग करणारें दुसरें राष्ट्र जगांत नाही. इतर देशांत 'राष्ट्र' या कल्पनेला जो मान दिला जातो तो रशियांत 'समाजसत्ता' या ध्येयाला दिलेला आहे. म्हणून रशियाविषयीं बोलतांना राष्ट्रनिष्ठा या शब्दाऐवजीं समाजनिष्ठा या शब्दाचा प्रयोग केला पाहिजे. ही समाजवादी ध्येयनिष्ठा विद्यार्थ्यात निर्माण होण्याचे दृष्टीनें बाह्य चिन्हांचा व प्रतीकांचा भरपूर उपयोग केलेला आहे. प्रत्यक्ष शिक्षणाचे व अभ्यासक्रमाचे मार्गानेंही समाजनिष्ठा उत्पन्न करण्याची योजना केलेली आहे. इतर राष्ट्रें आपापल्या राष्ट्राचे दृष्टीनें इतिहास शिकवितात, तर समाजवादाचा विकास कसकसा होत गेला, मजूर वर्गाची स्थिति कसकशी पालटत गेली, वर्गकलह कसा वाढत आहे, या दृष्टींनीं रशियन इतिहास शिकविला जातो. इतर विषय शिकवितांनाही कामकरी वर्गाचें जीवन हा मुख्य विषय असतो. याशिवाय राजकारण असा स्वतंत्र विषय सर्व शाळांत असतो. त्यांत पोलिटिकल ग्रामर म्हणजे समाजवादी राजकारणाचीं मूलतत्त्वें सर्व नागरिकांना शिकविली जातात. किंबहुना राजकारण हा रशियन लोकांचा आवडता विषय आहे असें म्हटलें तरी चालेल. प्रत्येक व्यक्ति कोठल्या तरी राजकीय संघाचा सभासद असते.

अशा रीतीनें विविध संस्कृती कायम ठेवूनही सतरा कोटी समाज एका ध्येयानें निगडित करण्याकरितां रशियानें शिक्षणाची योजना केली आहे.

## हिंदुस्थानचा प्रश्न

वरील कोणत्याच देशाशीं हिंदुस्थानची तुलना करतां आली नाहीं तरी आपला भावी मार्ग काय आहे तो तरी त्यांतून दिसूं शकेल. राष्ट्र आणि समाज या गोष्टींचा आपल्या शिक्षणानें आजपर्यंत विचार केला नाहीं. त्यामुळें

परंपरागत चालत आलेले कांहीं विषय शिकवावयाचे हें चालकांचें ध्येय असतें व परीक्षा पास व्हावयाच्या हें विद्यार्थ्यांचें ध्येय असतें. सरकारी नियमाप्रमाणें बिनबोभाट कारभार चालला आहे कीं नाहीं एवढें अधिकारी पाहतात. नागरिक व राष्ट्राचे घटक या दृष्टीनें विद्यार्थ्याला काय आलें पाहिजे व त्याच्या मनावर कोणत्या भावना ठसविल्या पाहिजेत याचा व्यापक विचार करण्याची जबाबदारी कोणाकडेच नाहीं.

## एकतर्फी पुनर्घटना

राष्ट्र व समाज या दृष्टीनें शिक्षणाचा भर कोणत्या तत्त्वांवर असावा याचा निर्णय शिक्षणतज्ज्ञांनीं केला पाहिजे. आजपासून पंचवीस वर्षांनीं तयार होणारी पिढी जर एकनिष्ठेची निर्माण व्हावयास पाहिजे असेल तर आजच्या शिक्षणांत त्या ध्येयाचा समावेश केला पाहिजे. शिक्षणाची पुनर्घटना करावी म्हणून आज जी ओरड चालली आहे त्यांत आर्थिक बाबीवर जितका भर आहे तितका नागरिककर्तव्य अथवा राष्ट्रनिष्ठा या तत्त्वावर नाहीं. किंबहुना या प्रश्नाचा निर्देशही या पुनर्घटनेच्या वादांत केला जात नाहीं ही गोष्ट उदासीनतेची व आकुंचित दृष्टीची द्योतक आहे. हिंदी राष्ट्र आणि राष्ट्रीय साध्य या बाबतींत जी मर्यादा सर्वमान्य झालेली असेल तिच्यावर शिक्षणानें भर दिला पाहिजे. समाजांत दुय्यम प्रकारच्या भावनांवर ज्या निष्ठा विखुरलेल्या आहेत त्या राष्ट्रीयत्वाचे ध्येयावर केंद्रीभूत केल्या पाहिजेत. अशी योजना करितांना देशांतील विविध संस्कृती व परंपरा नष्ट केल्या पाहिजेत असें नाहीं. त्या कायम ठेवूनही सर्व समाज एकनिष्ठ व एका ध्येयाशीं बद्ध करितां येतो हें रशियाचे उदाहरणावरून दिसतें. मोठ्या ध्येयापुढें दुय्यम निष्ठा गौण मानण्याला मनुष्य तयार होतो हें अमेरिकेच्या उदाहरणावरून स्पष्ट होतें.

## पुढाकार कोण घेईल ?

शिक्षणाच्या वाढीचा इतिहास पाहिला तर असें दिसून येतें कीं नवीन प्रयोग व उपक्रम खाजगी व्यक्ती व संस्था करितात, आणि ते यशस्वी झाले कीं मग हलकेहलके सरकारमान्य शाळांतही रूढ होतात. त्या न्यायानें या नवीन ध्येयाचा खल व प्रयोग प्रथम शिक्षक, चालक, शिक्षणपुढारी, शैक्षणिक

परिषदा व सभा आणि शिक्षणविषयक वाङ्मय यांतून झाला पाहिजे. या विचाराचें वातावरण एकदां निर्माण झालें म्हणजे आपोआप कांहीं ठिकाणीं प्रयोग होतील, त्यांतून निश्चित व यशस्वी योजना बाहेर पडतील, आणि मग त्या सर्वमान्य होतील.

मुख्य गोष्ट 'राष्ट्राला' आम्हीं आज शाळेचे बाहेर ठेविलें आहे तें आंत घेतले पाहिजे.

---

प्रकरण एकोणतिसावें

# पाश्चिमात्य शिक्षणाचें महत्त्वमापन

## जागतिक अनुभव व पुनर्घटना

प्राचीन संस्कृति, इतिहास आणि परंपरा यांचा प्रत्येक समाजाला अभिमान वाटत असतो. या जुन्या भांडवलाचा स्फूर्तीचे दृष्टीने उपयोग करून घेतां येतो हें इटली–जर्मनी या देशांच्या उदाहरणांवरून चांगलें दिसून येतें. स्वतःची संस्कृति व इतिहास यांविषयी आदर वाटत असला तरी इतर देशांच्या किंवा समाजांच्या संस्कृतीविषयीं आणि इतिहासाविषयीं एक प्रकारचा उदासीनपणा वाटण्याचा संभव असतो. ज्यांच्या पाठीशी पुराण संस्कृतीचा ठेवा असतो ते स्वतःचाच अभिमान बाळगून इतरांपासून काय घेतां येईल याविषयीं उदासीन राहतात. उलट नवीन उदयास आलेल्या कांहीं समाजांना संस्कृति आणि परंपरा हे शब्द उच्चारल्याबरोबर तिरस्कार वाटूं लागतो. दहापांच वर्षांतलें असेल तें सर्व अर्वाचीन आणि बाकी सर्व प्राचीन, अतएव निरुपयोगी अशी नवीन प्रवृत्ति उदयास येत असलेली दिसते. आजच्या जागतिक परिस्थितीमुळें सर्व राष्ट्रांचे संबंध इतके निगडित झालेले आहेत कीं परस्परांविषयीं उदासीन असणें आतां शक्य राहिलेलें नाहीं. शेजारच्या प्रत्येक राष्ट्राचें प्राचीन आणि आजचें जीवन यांची माहिती करून

घेणें व त्या अनुभवाचा उपयोग स्वतःचे जीवनांत करणें हें सर्वच देशांना जरूर झालें आहे. त्यामुळें कोणत्याही समाजाचा प्राचीन इतिहास किंवा संस्कृति हें भांडवल केवळ त्याच समाजाच्या मालकीचें नसून उपयोगाचे दृष्टीनें इतर समाजांचाही त्यावर हक्क आहे. पुढें येणाऱ्या पिढीला जगाचा अनुभव हा एक पैतृक ठेवा आहे. सर्व देशांतील समाजांचा पूर्व अनुभव जमेस धरून आपलें भवितव्य ठरविण्याची संधि नवीन पिढीला लाभलेली आहे.

शिक्षणाचा इतिहास हा देखील एक प्रकारचा पूर्व अनुभव आहे. तें शिक्षण कोणत्याही देशांतील असो, त्या अनुभवावर सर्व जगाचा म्हणजे प्रत्येक समाजाचा हक्क आहे. कोणत्याही देशाला आपल्या समाजांतील शिक्षणाची पुनर्घटना करावयाची असेल तर हा अनुभव आणि स्वतःच्या इतिहासाचा अनुभव असे दोन्ही विचार यांत जमेस धरले पाहिजेत. तसें न केलें तर दुसऱ्याचे अनुभवाला किमत नाहीं असेंच होईल. हें धोरण कांहीं व्यावहारिक शहाणपणाचें होणार नाहीं. हिंदी राष्ट्राला स्वतःच्या प्राचीन आणि अर्वाचीन शिक्षणेतिहासाचा अनुभव आहे. या शिक्षणाची आतां पुनर्घटना करावयाची आहे. अशा वेळीं जगांतील इतर राष्ट्रांचा शिक्षणे-तिहासही काय शिकवितो हें पाहणें जरूर आहे.

## पाश्चिमात्य शिक्षणाची उत्क्रांति

पाश्चिमात्य देशांत आज ज्या शिक्षणपद्धती दिसतात त्यांची हळुहळू उत्क्रांति झालेली आहे. शैक्षणिक तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, अध्यापनपद्धती या सर्वांना प्राचीन इतिहासापासून प्रारंभ आहे. आजचे शिक्षणाचे नवीन विचारांचा जन्म होण्यापूर्वी दोन हजार वर्षें मानवजातीचा एकसारखा शिक्षणसुधारणेचा प्रयत्न चालू आहे. कोणताही समाज विचारानें किंवा आचारानें एकदम भविष्य काळांत उडी मारूं शकत नाहीं. पूर्वेतिहास व सद्यःस्थिति जमेला धरूनच पूर्वीच्या पायावर नवीन प्रगति होते याचें हें एक उदाहरण आहे. प्रत्येक राष्ट्र निरनिराळ्या अवस्थांमधून गेलेलें आहे, त्याबरोबर त्या देशांतील शिक्षणाच्याही निरनिराळ्या अवस्था झालेल्या दिसून येतात. प्रत्येक राष्ट्राच्या शिक्षणाचा इतिहास निरनिराळा आहे.

तरी पण त्या सर्वांचें एकत्र अवलोकन केलें तर त्यांचे मुळांशीं कांहीं सामान्य प्रवृत्ती व तत्त्वें आपणांस दिसून येतील. या अनुभवात्मक तत्त्वांचा फायदा इतर राष्ट्रांनी आपल्या नवीन शिक्षणयोजनेंत घेतला पाहिजे. पाश्चिमात्यांच्या शिक्षणाकडे पाहण्याच्या अनेक दृष्टी आहेत. शिक्षणांत लोकशाही तत्त्वाची वाढ, राष्ट्रीयत्व भावनेचा विकास, औद्योगिक युगाचा शिक्षणावर परिणाम इत्यादि अनेक दृष्टिकोनांतून त्याचा विचार करितां येईल.

## धर्मपीठ व राजा यांचें नियंत्रण

शिक्षण आणि राष्ट्रीयत्व यांचा संबंध कसा आला तें पाहण्यासारखें आहे. या बाबतींत हिंदुस्थान आणि इतर देश यांत साम्य आहे. यूरोपियन देशांत मध्ययुगांत धर्मपीठाचा शिक्षणावर ताबा होता, सरकारचा नव्हता. तरुण पिढीच्या मनावर चिरस्थायी संस्कार करण्याकरितां शिक्षण हें एक अमोघ साधन आहे. म्हणून पाश्चात्य देशांत धर्मपीठ आणि राजसत्ता यांमध्यें शिक्षणाचा ताबा स्वतःकडे घेण्याबद्दल एक प्रकारची चुरस लागलेली दिसते. धर्मसुधारणेच्या चळवळीनंतर राजसत्ता आणि धर्मपीठ यांचा विरोध आला, आणि राजसत्तेनें शिक्षण आपल्या ताब्यांत घेण्याचा प्रयत्न केला. ही उत्क्रांति सर्वच देशांत पूर्ण झालेली नाहीं. अद्याप कांहीं देशांत धर्मपीठांनीं शिक्षण-संस्थांवर स्वतःचें स्वामित्व कायम ठेविलेलें आहे. रशिया, अमेरिका, आणि फरान्स या देशांनी धर्मपीठाची आणि शिक्षणाची फारकत केली आहे. इटलीनें धर्मपीठांशी तडजोड केली, आणि इंग्लंड व जर्मनीसारख्या देशांनी शिक्षणाचा अगदीं मर्यादित प्रांत धर्मपीठाला दिलेला आहे. धर्मपीठाचें नियंत्रण बदलल्यावरोबर शिक्षकवर्गात, शिक्षणाचे विषयांत आणि अध्यापनपद्धतींतही फेरबदल झाले. शिक्षणाला ऐहिक आणि राजकीय स्वरूप आलें. परलोकांतील जीवनापेक्षां ऐहिक जीवन सुखी आणि वैभवशाली करण्याकडे त्याचें लक्ष लागलें. शिक्षणाला राज-सत्तेनें आर्थिक साहाय्य करण्यास प्रारंभ केला त्या वेळेपासून धर्माचें वजन कमी होऊन राजकारणाचें वजन शिक्षणावर अधिक पडूं लागलें. आज सर्व देशांत शिक्षण हें धर्मपीठाचें कार्य नसून सरकारचें आवश्यक कर्तव्य आहे अशा स्वरूपाचें तत्त्व रूढ झालेलें आहे. कामाची विभागणी म्हणून शिक्षणाचा

कांहीं प्रांत जनतेकडे, म्हणजे सार्वजनिक मदतीवर चालणाऱ्या संस्थांकडे दिला जाईल. परंतु शिक्षण हें आद्य कर्तव्य राजकीय सत्तेचें आहे, ही कल्पना अनुभवानें सर्वत्र रूढ झालेली आहे.

## विद्यार्थीवर्गाचा सामाजिक दर्जा बदलला

पाश्चिमात्य देशांत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीवर्गाच्या सामाजिक परिस्थितींतही कशी उत्क्रांति झाली तें पाहण्यासारखें आहे. राजकीय आणि आर्थिक परिस्थितीमुळें हळुहळू शिक्षणाचा प्रवाह उच्च वर्गीय समाजाकडून सामान्य व खालच्या समाजाकडे वाहात चाललेला आहे. मध्ययुगांत यूरोपमध्यें शिक्षण फक्त श्रीमंत, सरदार, जमीनदार आणि धर्मोपाध्याय यांचे आटोक्यांत होतें. सामान्य जनांचे बालकांना उमेदवारीनें आणि अनुभवानें उद्योगधंद्यांचे व सामान्य ज्ञानाचे संस्कार होत असत तेंच शिक्षण. पुढें राजसत्तेच्या हातांत शिक्षणाचें नियंत्रण आल्यानंतर राष्ट्रीय उन्नतीकरितां सामान्य जनांना संघटित स्वरूपाचें शिक्षण देणें आवश्यक झालें. फरान्सनें जर्मनीचा १८०६ मध्यें पराभव केल्यानंतर जर्मनीनें आपल्या शिक्षणाची राष्ट्रीय दृष्टीनें पुनर्घटना केली. इंग्लंडमध्यें सामान्य जनतेला राजकीय मताधिकार मिळाल्या-बरोबर 'लेट अस् एज्युकेट् आवर मास्टर्स' असें म्हणून वरिष्ठ वर्गानें नाखुषीनें कां होईना परंतु सामान्य जनांचे शिक्षणाची सोय करण्यास प्रारंभ केला. हा फरक औद्योगिक प्रगतीनें घडवून आणला. कारखान्यांची व उद्योगधंद्यांची वाढ झाली, आणि कामगारांची संख्या वाढून त्यांच्यांत राज-कीय जागृति झाली, म्हणून त्यांनीं राजकीय हक्क व ते बजावण्यास लागणारें शिक्षण यांची मागणी केली. अशा रीतीनें शिक्षणांत सामान्य जनतेचे मुलांचा प्रवेश झाला. प्राथमिक शिक्षण आवश्यक आणि सक्तीचें झालें. हें शिक्षण घेतलेली एक पिढी तयार झाल्याबरोबर तिनें दुय्यम आणि उच्च शिक्षणाची मागणी केली. अशा रीतीनें प्राथमिक, दुय्यम आणि उच्च शिक्षणसंस्थांमधील विद्यार्थीवर्गाच्या सामाजिक दर्जामध्यें एक प्रकारची उत्क्रांति झालेली दिसून येते. जो इतिहास पाश्चिमात्य देशांत झाला त्याचीच आवृत्ति आपल्याही देशांत सध्यां होत आहे. मूठभर सुशिक्षित वर्गाच्या मुलांकरितां ज्या शिक्षणाची योजना होती त्यांत आतां समाजांतील खालच्या वर्गापर्यंतचे

सर्व लोक आलेले आहेत. म्हणूनच पुनर्घटना प्रश्न प्रामुख्यानें पुढें आला आहे. हिंदुस्थानमध्यें जो प्रश्न प्रारंभावस्थेंत आहे तोच आज इंग्लंड आणि फरान्स या दोन्ही देशांपुढेंही आहे. अमेरिका–रशियानें तो आधींच सोडवून टाकला.

## नवीन ज्ञानक्षेत्रांना विरोध व प्रवेश

अभ्यासक्रमाचे विषयांतही उत्क्रांति झालेली दिसून येईल. प्रारंभीं प्राथमिक शिक्षणाची कल्पना पवित्र ग्रंथ (बायबल) वाचण्याइतकीच मर्यादित होती, आणि उच्च शिक्षण हें प्राचीन भाषा, धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान या विषयांपुरतेंच मर्यादित होतें. परंतु पुढें हळुहळू भौतिक शास्त्रांची वाढ झाली त्याबरोबर मोठ्या शिकस्तीनें त्यांचा प्रवेश विद्यापीठांत झाला. तरी पण अर्वाचीन भाषांना मान्यता मिळेना, त्याकरितां पुष्कळ चळवळ झाली. आंतरराष्ट्रीय दळणवळण वाढल्यामुळें अर्वाचीन परकीय भाषांना महत्त्व प्राप्त झालें. म्हणून बराच विरोध झाल्यावर त्यांचाही प्रवेश विद्यापीठांत झाला. अशा रीतीनें विद्यापीठांचें धोरण एक-सारखें पुराणमतवादी, आणि नवीन विषयांना विरोध करून नाइलाजास्तव मान्यता देण्याचें असें होतें आणि अद्यापि आहे. आज उद्योगधंदे आणि ललितकला यांची वाढ पुष्कळ झालेली आहे. परंतु अनेक विद्यापीठांची या विषयांना मान्यता देण्यास नाखुषी आहे. सारांश, सामाजिक जीवनांत जसजशी वाढ होत आहे तसतसे अभ्यासाचे नवीन नवीन विषयही शिक्षणांत येत आहेत. शिक्षणाच्या इतिहासाचें खरें मर्म शिक्षणतज्ज्ञांना समजलें तर त्यांचा पुराणमतवादीपणा आणि नवीन ज्ञानक्षेत्रांना विरोध करण्याची प्रवृत्ति कमी होईल.

## सामाजिक शास्त्रें आणि भावना यांची वाढ

शिक्षणाच्या अनेक विभागांत जी प्रगति झाली तिच्या मुळाशी मानस-शास्त्र आणि समाजशास्त्र यांची अलीकडे झालेली वाढ आहे. शिक्षण हें आतां केवळ अनुमानाचें आणि वैयक्तिक लहरीचें काम राहिलेलें नाही. त्याला दिवसेंदिवस अधिक शास्त्रीय स्वरूप येत आहे. शिक्षण हें स्वतंत्र शास्त्र होऊं शकतें कीं नाहीं हा वादग्रस्त मुद्दा सोडून दिला तरी एवढी गोष्ट सत्य आहे कीं, शास्त्रीय पद्धतींचा अवलंब केल्याखेरीज शिक्षणाचे प्रश्न

सोडवूं पाहणें अडाणीपणाचें होईल. बालकांचें मानसशास्त्र आणि ज्या समाज-वर्गाला शिक्षण द्यावयाचें त्याचें समाजशास्त्र दृष्टचा निरीक्षण यांची मदत घेतल्याशिवाय शिक्षणाच्या नवीन योजना यशस्वी होणें शक्य नाहीं. केवळ खोलींत बसून, समाजापासून अलिप्त राहून शिक्षणपद्धतीची किंवा अभ्यास-क्रमाची योजना करण्याचे दिवस आतां गेले.

मानसशास्त्र आणि समाजशास्त्र यांच्या वाढीमुळें शिक्षणाला नवीन वळण मिळालें. त्याचप्रमाणें गेल्या एकदोन शतकांत कांहीं नवीन भावनांचा उदय झाला त्यांचाही शिक्षणावर फार महत्त्वाचा परिणाम झालेला आहे. समाजाकडे आणि जीवनाकडे पाहण्याची जगाची दृष्टि वदलत चाल्ली आहे. सामान्य जनतेच्या हिताबद्दल समाजांत वाढत असलेली सहानुभूति, आणि त्या वर्गांत स्वतःच्या भवितव्याविषयी झालेली जागृति, या भावनांचें प्रतिबिंब शिक्षणांत पडलेलें दिसतें. अमेरिका, रशिया व इंग्लंड या देशांत शिक्षणाचा प्रसार झाला तो या नवीन भावनांमुळें झाला. समाजांतील सर्व व्यक्ती सारख्या असतांना शिक्षणांतच दुजा भाव कां असावा या समतेच्या भावनेमुळें कांहीं देशांत शिक्षणपुनर्घटनेच्या चळवळी झाल्या आणि चालू आहेत. सर्वांना एकच प्रकारची शाळा व शिक्षणपद्धति ठेवा, प्रपंच करूं नका अशी मागणी ‘ एकोल यूनिक ’, ‘आईनहाईट शूल ’, ‘ सेकंडरी एज्युकेशन फॉर ऑल ’ या स्वरूपामध्यें फरान्स ,जर्मनी व इंग्लंड इत्यादि निरनिराळ्या देशांत होऊं लागली.

अर्वाचीन शिक्षणाला वळण लावणारी दुसरी प्रभावी भावना राष्ट्रीय-त्वाची आहे. यूरोपमधील विविध शिक्षणपद्धतींचा जन्म राष्ट्रीयत्वाचे भावनेंतच आहे. आज इटली, फरान्स, जर्मनी व जपान या देशांत ज्या शिक्षण-पुनर्घटना झालेल्या आहेत त्यांच्या मुळांशी मुख्यतः राष्ट्रीयत्वाचीच भावना आहे. शिक्षणाच्या साधनानें राष्ट्रामध्यें एकजूट घडवून आणून देशाला जगामध्यें उच्च आणि वैभवशाली स्थान प्राप्त करून द्यावें हा त्यांचा उद्देश आहे.

## पाश्चात्य व हिंदी शिक्षणांतील साम्य–विरोध

मनुष्यस्वभाव सर्वत्र सारखाच असल्यानें इतिहासांतही पुनरावृत्ति झालेली आढळते. हेंच तत्त्व शिक्षणाचे इतिहासालाही लागू पडतें. हिंदी

व पाश्चिमात्य शिक्षणाच्या इतिहासांत अशा प्रकारचें कांहीं साम्य आहे. त्याचबरोबर दोन्ही समाजांतील स्ववैशिष्टयामुळें कांहीं भेदही दिसून येतात. या साम्यभेदाच्या कांहीं गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत.

यूरोपमध्यें पूर्वी शिक्षणाला धार्मिक स्वरूप होतें आणि त्यांत प्राचीन भाषांना प्राधान्य दिलें जात असे. जर्मनी, फरान्स व इटली या देशांत अद्यापही अर्वाचीन भाषांपेक्षां प्राचीन भाषांनाच महत्त्व अधिक आहे. हिंदी शिक्षणाच्या इतिहासांतही हीच प्रवृत्ति दिसते. जुनी विद्या गीर्वाण भाषेंत होती. ती सामान्य जनांना मिळावी म्हणून साधुसंतांकडून चळवळ झाली. अखेर या संस्कृत ग्रंथांचीं देशी भाषांत रूपांतरें होऊन सामान्य जनांना ज्ञान व शिक्षण यांचें साधन उपलब्ध झालें. पुढें इंग्लिश राजवटींतही प्रारंभीं वरच्या समाजवर्गाचें शिक्षणक्षेत्रांत प्राधान्य होतें. आतां सामान्य लोकही शिक्षणाची अधिकाधिक मागणी करूं लागले आहेत. विशिष्ट वर्गाचे हातांतून आणि विशिष्ट भाषेंतून शिक्षण खालचे वर्गात आणि जिवंत भाषांत उतरण्याची क्रिया हिंदुस्थानांत व पाश्चात्य देशांत सारखीच आहे ; इकडे ही प्रवृत्ति जरा उशिरा सुरू झाली एवढेंच.

पाश्चिमात्य विद्यापीठांनी शिक्षणक्रमांत नवीन नवीन ज्ञानक्षेत्रांचा समावेश करण्याला विरोध केला. आजही ऑक्सफर्ड—केंब्रीजमधील असे अनेक जुने पदवीधर हयात आहेत कीं ज्यांना विज्ञान व भौतिक शास्त्रें यांसारखे विषय शिक्षणांत घेतल्यामुळें ग्रीक लॅटिन शिकणाऱ्या प्राचीन भाषापंडितां-कडून निरस्कार व उपहास सोसावा लागला. प्राचीन हिंदी शिक्षणांत सर्व प्रकारच्या ज्ञानशाखांचा समावेश अभ्यासक्रमांत करण्याइतका उदारपणा होता, हा पाश्चात्य व हिंदी शिक्षणांत फार मोठा फरक आहे. अर्वाचीन हिंदी शिक्षणानें मात्र यूरोपियन विद्यापीठांची पुराणप्रिय वृत्ति स्वीकारलेली असून नवीन विषयांचा स्वीकार करण्यांत तीं फार आकुंचित वृत्तीचीं बनलीं आहेत. उदाहरणार्थ, किती विद्यापीठांनीं उच्च संगीत व चित्रकला यांचा सन्मान केलेला आहे ? यापुढें हिंदी शिक्षणसुधारणेला विरोध होणार असेल तर तो पाश्चात्य पद्धतींत मुरलेल्या व त्यांचे अभिमानी बनलेल्या हिंदी लोकांकडूनच होणार आहे असें वाटूं लागतें ! प्रत्यक्ष उन्हाचा त्रास होत नाहीं इतका उन्हांत तापलेल्या वाळूचा ताप होतो.

## राजसत्तेचें दास्यत्व

पाश्चात्य देशांत शिक्षणानें धर्मपीठांचें जूं झुगारून दिलें आणि राजसत्तेचें स्वीकारलें. राजसत्तेनें शिक्षणाचें संरक्षण आणि पोषण करण्याचें काम घेतल्याबरोबर अभ्यासक्रमावर आणि बौद्धिक स्वातंत्र्यावर सरकारी नियंत्रणें घातलीं गेलीं. शिक्षणानें ज्ञानाची सेवा करण्याचें सोडून आकुंचित अशा राजकारणाचें दास्य स्वीकारलें. अध्यापक हे राजापुढें नम्र झाले, त्यांचे गुलाम बनले. या परिस्थितीशीं तुलना करितां प्राचीन हिंदी पद्धतींत अध्यापकांना बौद्धिक स्वातंत्र्य अधिक होतें. राजे लोक विद्यापीठांत नम्र भावानें हात जोडून जात. त्यांनीं शिक्षणाला मुक्तहस्तानें मदत केली, परंतु बौद्धिक स्वातंत्र्यावर बंधनें लादलीं नाहींत. बौद्ध किंवा हिंदू राज्यकर्त्यांनीं शिक्षणक्रमांत ढवळाढवळ केली नाहीं. अध्यापकांना आर्थिक मदत करूनही पूर्ण शैक्षणिक स्वातंत्र्य दिलें.

## गुणदोषांचें अनुकरण

अर्वाचीन हिंदी शिक्षणाची पाश्चिमात्य शिक्षणाशीं तुलना केली तर पाश्चिमात्यांचे गुण आणि दोष यांचें सरसकट अनुकरण आपण केलेलें आहे असें दिसून येईल. शिक्षणाचा व्याप कारखान्यासारख्या मोठ्या प्रमाणावर वाढल्यानें तें यांत्रिक आणि व्यक्तित्वमारक असें झालें आहे. हजारो विद्यार्थ्यांच्या एकदम परीक्षा आणि एकदम त्यांचे पासनापासाचे निकाल ! ही पद्धति शुद्ध पाश्चिमात्यांच्या गिरणीचें अनुकरण आहे ; देशी कल्पना नाहीं. शिक्षणाच्या मुळाशी शुद्ध ज्ञानार्जनाचा उद्देश पूर्वीं होता. आतां पाश्चात्य शिक्षणाप्रमाणें हिंदी शिक्षणाचाही उद्देश आर्थिक आणि सामाजिक दर्जा प्राप्त करून देऊन ऐहिक सुख मिळवून देण्याचा आहे. संस्कारांचें प्रामुख्य शिक्षणांत राहिलेलें नसून त्याला आर्थिक दृष्टीनें किंमत आली आहे. शिक्षणाला व्यापारी स्वरूप आलें असून जो द्रव्य देतो त्याची सेवा करावयाला तें तयार आहे ; जिज्ञासूची सेवा किंवा शिक्षणेच्छूला ज्ञानदान करणें हा गौण हेतु आहे. सरकारचें शिक्षणावर नियंत्रण आहे तें केवळ ज्ञानाचे व तात्त्विक संस्कारांचे प्रसाराकरितां नसून प्रस्थापित सत्ता चिरस्थायी करण्याकरितां आहे, हें तत्त्व युरोपियन शिक्षणापासूनच आपण घेतलें आहे. या दोषांबरोबर

पाश्चिमात्य गुणांचाही आपल्या शिक्षणास फायदा झालेला आहे. विशिष्ट धार्मिक किंवा सामाजिक वर्गाचेच आटोक्यांत आतां विद्या राहिली नाही. कोणत्याही समाजांतील श्रीमंतांची सेवा करण्यास ती तयार आहे ; सामाजिक बंधन नाहीसें झालें, परंतु आर्थिक बंधन आलें हा एक फरक झाला. सामान्य जनांचे शिक्षणाविषयीं आस्था हा गुणही अंशतः पाश्चिमात्य शिक्षणापासूनच आपण घेतला आहे. ज्ञानाच्या दृष्टीनें पूर्वीपेक्षां शिक्षणांतील विषयांचा व्याप अधिक वाढलेला आहे हा फायदा झाला आहे. त्याचबरोबर समाजाच्या स्वतःच्या संस्कृतीला या शिक्षणांत मुळीच स्थान मिळालेलें नाहीं हा अत्यंत मोठा तोटा झाला आहे.

## पाश्चात्यांचें आत्मनिरीक्षण

पाश्चिमात्य शिक्षणानें आज पुष्कळच प्रगति केली आहे ही गोष्ट खरी. परंतु शैक्षणिक तत्त्वज्ञान्यांच्या ध्येयांशी तुलना केली तर ही प्रगति फारच थोडी आहे असें वाटू लागतें. हिंदुस्थानसारख्या देशालाही अद्याप पुढें यायला पुष्कळ वाव आहे. जर्मनीनें दोन शतकें शिक्षणांत पुढाकार घेतला आणि त्यांतून काय निष्पन्न झाले ? महायुद्ध, असंतोष, आणि भावी युद्धाची भीति. मानवी सुधारणेचे दृष्टीने शिक्षणात अद्याप पुष्कळ प्रगति व्हावयास पाहिजे असें पाश्चिमात्य देशांतील पुढाऱ्यांनाही वाटत आहे. बर्नार्ड शॉ, एच्. जी. वेल्स्, बर्ट्रांड रसेल, रोमाँ रोलाँ, इत्यादि विचारी लोकांना अद्याप समाधान नाहीं. जीविताचें ध्येय आणि मानवी प्रगति या अंतिम दृष्टीनें पाश्चिमात्य शिक्षणाची परीक्षा घेतली तर तें नापास ठरतें. त्याचप्रमाणें व्यक्तिनिरपेक्ष आणि शास्त्रशुद्ध दृष्टि शिक्षणांत किती आहे आणि केवळ दुराग्रहाची दृष्टि किती आहे तें पाहिलें म्हणजे शिक्षणशास्त्राची अद्याप बरीच प्रगति व्हावयाची आहे असें वाटू लागतें. यूरोपमध्यें अद्याप शिक्षणाकडे शास्त्रीय दृष्टीनें पाहण्याची लोकांना संवय लागलेली नाहीं ; पूर्वग्रह आणि सांप्रदायिक मतें यांचाच पगडा अधिक आहे.

पाश्चिमात्य शिक्षणापासून घेण्यासारख्या कांहीं विधायक सूचना आहेत. त्याचप्रमाणें त्यांच्या कांहीं चुका टाळण्याची सावधगिरी घेणेंही जरूर आहे.

## नवीन युगाला नवीन शिक्षण पाहिजे

यूरोपमध्यें मध्ययुग संपून नवयुगाला (रेनेझान्स्) प्रारंभ झाला त्या वेळीं समाजाच्या प्रत्येक क्षेत्रांत क्रांति होत होती. धर्मसुधारणेमुळें (रेफर्मेशन्) अध्यात्मिक जीवनांत क्रांति झाली ; विज्ञानाचे जन्मामुळें बौद्धिक जीवनांत स्वातंत्र्य व चैतन्य आलें ; राज्यक्रांत्या होऊन लोकसत्तेचा उदय झाल्यामुळें राजकीय जीवनांत क्रांति झाली ; आणि औद्योगिक सुधारणेमुळें आर्थिक जीवनामध्यें घडामोड झाली. या परिस्थितीमुळें धार्मिक, राजकीय, बौद्धिक, आणि आर्थिक दृष्टीनें नवीन समाज निर्माण झाला. अशा समाजाला जुनी श्रद्धाप्रधान आणि वर्गनिष्ठ शिक्षणपद्धति काय कामाची ? म्हणून पाश्चिमात्य शिक्षणांत लोकसत्ता आणि शास्त्रशुद्धता हे दोन विचारप्रवाह शिरले. यूरोपमधील प्रत्येक देशाच्या शिक्षणाचा असाच इतिहास आहे. समाजांतील नवीन जीवनामुळें शिक्षणांतही नवजीवन उत्पन्न झालें. कैसरला नवीन जर्मनी निर्माण करावयाचा होता म्हणून त्यानें शिक्षणपंडितांना बोलावून सांगितलें—"जर्मनीला यापुढें ग्रीक आणि रोमन तरुण तयार करावयाचे नसून जर्मन युवक निर्माण करावयाचे आहेत." फरान्समध्यें राजकीय क्रांतीमुळें समतेचे तत्त्वाची घोषणा झाली आणि तें तत्त्व शिक्षणक्षेत्रांत शिरलें. सरदार उमरावांना जे शिक्षणाचे हक्क होते तेच सामान्य जनांनींही मागितले. इंग्लंडमध्यें औद्योगिक सुधारणेमुळें समाजाची नवीन घडी निर्माण झाली म्हणून, 'आपल्या मालकांना शिकवूं या' अशी उपरोधिक घोषणा होऊन सार्वत्रिक शिक्षण अंमलांत आलें. अमेरिकेनें राज्यक्रांति करून इंग्लंडपासून सवता सुभा स्थापन केल्याबरोबर आपल्या शिक्षणाचीही घडी उलगडून ती पुनः नवीन पद्धतीनें घातली ; लोकशाहींत लोक राज्य करणार तर त्यांना राज्य करायला शिकविलें पाहिजे या हेतूनें शिक्षणाची नवी उदार योजना अंमलांत आली. अगदीं अलीकडे रशिया, जर्मनी, आणि इटली या देशांत राजकीय क्रांत्या होऊन नवीन समाजपद्धती निर्माण झाल्याबरोबर शिक्षणाचीही पुनर्घटना झाली. यावरून कोणत्याही समाजांत नवीन जीवन येण्यापूर्वीं व नंतर शिक्षणांतही नवजीवन येतें हें तत्त्व सिद्ध होतें. हिंदुस्थानही सध्यां नवीन युगाच्या प्रारंभावस्थेंत आहे. आपलीं सामाजिक, राजकीय,

आर्थिक आणि शैक्षणिक ध्येयें यांची पुनर्घटना करण्याच्या विचारांत तो आहे. त्यानें पाश्चात्यांच्या संस्कृतीचें अंधानुकरण करण्याचें धोरण ठेविलें नाही, त्याचप्रमाणें स्वतःचे प्राचीन संस्कृतीला अंधपणें कवटाळून बसण्याचीही प्रवृत्ति ठेविलेली नाही. तो संस्कृतीच्या संधिकालांत आहे. न कळत नवीन समाजाचा जन्म होत आहे. या नवीन समाजाला सुसंगत अशा शैक्षणिक तत्त्वज्ञानाची व पद्धतीची आवश्यकता आहे.

## सुसंगत शिक्षणपद्धति

शिक्षण हें ज्ञानाचें तसेंच समाजप्रगतीचें एक साधन आहे. ही प्रगतीची दिशा ठरविली म्हणजे मग पाश्चिमात्य शिक्षणापासून काय घ्यावें याचा आपोआप निर्णय होईल. अमेरिकेनें यूरोपमधून शिक्षणपद्धति नेली तरी तेथें आपल्या सामाजिक व राजकीय ध्येयानुरूप तिला निराळेंच स्वरूप दिलें. यूरोपमध्येंही सर्व देशांच्या शिक्षणपद्धतीचा उगम सारखाच होता तरी प्रत्येक देशाच्या शिक्षणाला निराळें वळण लागलेलें आहे. त्याचें कारण एकेका राष्ट्राला स्वतःचें असें विशिष्ट ध्येय आणि सामाजिक तत्त्वज्ञान आहे; त्याला अनुरूप असें शिक्षण निर्माण करण्यांत आलें आहे.

हिंदुस्थानलाही स्वतःचें राजकीय, सामाजिक आणि सांस्कृतिक तत्त्वज्ञान निश्चित केलें पाहिजे. तसें झालें म्हणजे सुसंगत अशी शिक्षणाची पुनर्घटना करितां येईल. इकडून तिकडून एकाददुसरी सुधारणा केल्यानें ठिगळ जोडल्यासारखें होईल, पुनर्घटना होणार नाहीं. डाल्टनपद्धति, मॅाटेसोरी, किंडरगार्टन वगैरे सर्व साधनें आहेत. कोणती पद्धति स्वीकारावी तें ठरविण्याकरितां कसोटी पाहिजे. पाश्चात्य शिक्षणापासून तात्कालिक आणि स्थानिक महत्त्वाच्या अशा गोष्टी न घेतां अधिक शाश्वत, सर्वगामी, आणि टिकाऊ अशीं तत्त्वें आपण घेतलीं पाहिजेत. तत्त्वांचें बाह्य स्वरूप हें स्थानिक परिस्थितीवर अवलंबून असतें. समाजाची आर्थिक स्थिति, उपलब्ध साधन-सामुग्री, स्थानिक विद्या व कला आणि सामाजिक ध्येयें यांना अनुसरून तत्त्वांना व्यावहारिक स्वरूप दिलें पाहिजे. बालोद्यान (किंडरगार्टन), डाल्टन पद्धति, दुय्यम व उच्च शिक्षण, प्रौढ शिक्षण इत्यादि गोष्टी पाश्चिमात्य देशांतून मूळ स्वरूपांत इकडे आणणें अविचाराचें होईल. हिंदी साधनें,

गरजा, आणि शिक्षणतत्त्वें यांना अनुरूप असा पुष्कळ फेरबदल त्यांत करावा लागेल. यूरोपमध्येंच डॅनिश लोकांनीं आपल्या कृषिवल समाजाला अनुरूप अशी 'जानपद विद्यालयाची' (फोक्स् हायस्कूल) नवीन पद्धति निर्माण केली. मेक्सिकोनें अगदीं नवीन प्राथमिक शिक्षणाची प्रथा पाडली. रशियानें तर आमूलाग्र नवीन योजना केली. हिंदुस्थाननेंही आपला पूर्वींचा अनुभव, आजच्या गरजा,आणि भावी ध्येय यांच्या आधारावर नवीन पद्धति उभारली पाहिजे, तरच शिक्षण हें ध्येयांना पोषक होईल. समाजाचें तत्त्वज्ञान आणि शिक्षणपद्धति यांत सुसंगतता पाहिजे.

## राज्यसत्तेचें नियंत्रण व बौद्धिक स्वातंत्र्य

धर्मपीठ किंवा राजसत्ता यांचे नियंत्रणाखालीं शिक्षणपद्धति प्रगतीला किती अपायकारक ठरते याचें उदाहरण पाश्चिमात्य शिक्षणेतिहासांत सांपडतें. शिक्षणावर कोणत्याही सत्तेचें नियंत्रण पडलें कीं बौद्धिक विकासाला पायबंद बसलाच असें समजावें. याला युद्धापूर्वीच्या आणि प्रचलित जर्मन शिक्षणाचेंच उदाहरण आहे. जर्मन विद्यापीठांचा असा अभिमान असे कीं त्यांत अध्ययन-स्वातंत्र्य आणि अध्यापनस्वातंत्र्य (लेर ऊंड लेर्न फरायहाईट) आहे. प्रत्यक्ष वस्तुस्थिति अशी होती कीं विद्यमान सरकारला अनुकूल अशाच मतांना अध्यापकवर्गाचा अध्यापनांत पाठिंबा मिळे. इतिहास, राजकारण, अर्थशास्त्र इत्यादि विषयांत प्रस्थापित सत्तेला प्रतिकूल अशा विचारसरणीला वाव नव्हता. अमेरिकेंतील एका संस्थानांत डार्विनचा उत्क्रांतिवाद शिकविण्यास बंदी होती. कांहीं विद्यापीठांतून अध्यापकांना राज्यनिष्ठेची शपथ घेणें आवश्यक झालेलें आहे. अनेक चांगल्या अध्यापकांना त्यांच्या प्रामाणिक मतांकरितां विद्यापीठें सोडावीं लागलीं. क्रांतीच्या पूर्वी आणि नंतर रशिया-मध्यें हीच वस्तुस्थिति आहे.

सार्वत्रिक शिक्षणप्रसाराकरितां राजसत्तेची मदत तर पाहिजे, परंतु त्या मदतीबरोबर अनिष्ट, स्वातंत्र्यप्रतिकूल, आणि प्रगतिविरोधक असें नियंत्रण येतें तें कसें टाळावें हा प्रश्न आहे. राजसत्तेचें शिक्षणावर पूर्ण नियंत्रण पडलें म्हणजे शिक्षणपद्धतीचें स्वरूप त्या राजसत्तेप्रमाणें उदार किंवा आकुंचित

असें होतें. सरकारी नियंत्रण बौद्धिक स्वातंत्र्याला मारक ठरतें, हें तत्त्व पाश्चिमात्य शिक्षणपद्धतीवरून स्पष्टपणें सिद्ध होतें.

शिक्षणांत एकाद्या विशिष्ट वर्गाची, संस्थांची किंवा विषयांची मिरास उत्पन्न झाली म्हणजे शिक्षणसुधारणा होणें फार कठिण पडतें. उच्च वर्गाचे हातांतून कनिष्ठ वर्गाचे हातांत शिक्षण जाण्यास अनेक कष्ट पडले. धर्मपीठ आणि राजसत्ता यांच्यांत शिक्षणाच्या स्वामित्वाविषयीं भांडणें झाली. प्राचीन भाषांनी अर्वाचीन भाषा आणि भौतिक शास्त्रें यांना विरोध केला. अशी कायम मिरास उत्पन्न होऊं नये असें वाटत असेल तर शिक्षणांत नेहमी नवीन प्रयोग आणि नवीन विचार यांचा जन्म झाला पाहिजे, आणि नवीन कल्पना स्वीकारण्याची पात्रता शिक्षणाधिकाऱ्यांच्या ठिकाणीं आणणें जरूर आहे.

## शास्त्रशुद्ध शिक्षणदृष्टीची वाढ

पाश्चिमात्य देशांत शास्त्रीय ज्ञानाची वाढ झाली तिचा परिणाम शिक्षणावर दोन तऱ्हेनें झाला. अभ्यासक्रमांत भौतिक शास्त्रांचा प्रवेश होऊन विद्यापीठें आणि दुय्यम शाळा यांचे शिक्षणक्रमांत नवीन ज्ञानशाखा निर्माण झाल्या. यापेक्षां महत्त्वाचा परिणाम शिक्षणावर झाला तो पद्धतीचे दृष्टीनें. शास्त्रीय संशोधनांत ज्या प्रायोगिक पद्धतीनें काम केलें जातें ती पद्धति शिक्षणक्षेत्रांत उपयोगांत आणण्याचा प्रयत्न अलीकडे झालेला आहे. शास्त्रीय क्षेत्रांत काम करतांना पूर्वग्रह बाजूला ठेवून स्वतःच्या मतांचा अभिनिवेश न धरितां, प्रत्यक्ष प्रयोगांत जें सिद्ध होईल तेंच सत्य मानावयाचें अशी पद्धति आहे. या पद्धतीलाच शास्त्रीय पद्धति असें नांव आहे. तिचा उपयोग शिक्षणक्षेत्रांत झाल्यापासून पुष्कळ जुन्या कल्पना असिद्ध अतएव त्याज्य ठरल्या आहेत. काय शिकवावें, कसें शिकवावें इत्यादि गोष्टी आजपर्यंत अंधश्रद्धा, वैयक्तिक मत, आणि पूर्वग्रह यांवरच अवलंबून होत्या व अद्याप आहेत. परंतु पाश्चिमात्य शिक्षणांत व मनोविज्ञानांत शास्त्रीय पद्धतीचा उपयोग झाल्यापासून पूर्वग्रह आणि वैयक्तिक मतें यांना गौण स्थान देण्यांत येऊं लागलें आहे.

विशिष्ट विषयांचा अभ्यास केला म्हणजे बुद्धि वाढते, स्मरण, धारणा

इत्यादि अंगांचा विकास होतो व त्याचा इतर क्षेत्रांतही उपयोग होतो. अशी पूर्वीची कल्पना होती. अशा प्रकारनें संस्कारसंक्रमण होतें किंवा नाहीं यावर पाश्चात्य शास्त्रज्ञांनी अनेक प्रयोग करून पाहिले आणि जुनी संस्कारसंक्रमणा-वरील श्रद्धा डळमळीत केली. त्यामुळें लॅटिन, ग्रीक, बीजगणित यांसारख्या विषयांना पूर्वी आवश्यक स्थान होतें तें वैकल्पिक झालें. व्यक्तीव्यक्तींच्या बुद्धींत आणि शारीरिक वाढींत किती प्रमाणांत फरक आहे तें मानसशास्त्रज्ञांनीं शोधून काढल्यामुळें सर्वांना एकाच शिक्षणाचे सांच्यांत घालण्याची प्रवृत्ति सदोष ठरूं लागली. अशा रीतीनें जुन्या पद्धतीच्या शिक्षणांत जे दृढमूल पूर्वग्रह होते त्या सर्वांना शास्त्रीय पद्धतीची कसोटी लावली गेली. त्यामुळें शिक्षणाची प्रगति आतां शास्त्रशुद्ध पायावर होत आहे. नवीन शिक्षणाची योजना करितांना या शास्त्रीय शैक्षणिक दृष्टीची अत्यंत आवश्यकता आहे. अंध श्रद्धेनें व केवळ अधिकारांतील व्यक्तींच्या लहरीखातर विशिष्ट पद्धति अमलांत आणण्यापेक्षां शास्त्रसिद्ध शिक्षणाचे आधारावर त्यांची योजना करणें हें विशेष टिकाऊ होईल.

## धार्मिक शिक्षणाचा अनिर्णित प्रश्न

अनेक धर्म आणि धार्मिक शिक्षणाची मागणी यांची सांगड कशी घालावी हा हिंदुस्थानांत आज प्रश्न आहे. पाश्चात्य राष्ट्रांनीं हा समाधान-कारक रीतीनें सोडविला असेल म्हणून त्यांचेकडे पाहिलें तर या बाबतींत निराशाच होते. धर्मपीठाकडून शिक्षण राजसत्तेचे हातांत गेल्यापासून त्याचें धार्मिक स्वरूप नष्ट होऊन त्याला ऐहिक स्वरूप आलेलें आहे. त्यांतील धार्मिक शिक्षणाचा भाग आतां सरकारी नियंत्रणावर अवलंबून आहे. या बाबतींत प्रत्येक राष्ट्रानें निरनिराळ्या मार्गांचें अवलंबन केलें आहे ; त्याची माहिती अन्यत्र आलेली आहेच. त्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं उदार आणि सर्वमान्य अशा धार्मिक शिक्षणाची पद्धति एकधर्मीय अशा ख्रिस्ती राष्ट्रांना देखील निर्माण करतां आलेली नाहीं. या बाबतींत विविध प्रकारची प्रवृत्ति दिसते. रशिया व फ्रान्समध्यें निश्चित विरोध, अमेरिकेमध्यें औदासीन्य, इंग्लंड जर्मनीमध्यें तटस्थपणा, किंवा इटलीमध्यें विशिष्ट पंथीय तत्त्वांचें

बीजारोपण. सार्वजनिक शिक्षणाचे कर भरून देखील अनेक पालक जादा फीचा खर्च करूनही धर्मपंथीय शाळांत आपलीं मुलें पाठवितात, याचा असा स्पष्ट अर्थ दिसतो की धार्मिक शिक्षण कांही लोकांना पाहिजे आहे. सरकारी नियमांनींच त्याला बंदी केली तर नाइलाज आहे. धार्मिक शिक्षणाला अजीबात बंदी केल्यानें, किंवा संकुचित स्वरूपाचें पंथीय शिक्षण दिल्यानें हा प्रश्न सुटणार नाहीं. व्यापक, सार्वत्रिक आणि सर्वमान्य अशा पायावर या शिक्षणाची उभारणी झाली पाहिजे. त्यायोगानें आजपर्यंत मानव जातीनें मानवी जीविताविषयीं आणि विश्वरचनेविषयीं जे उदात्त विचार केले आहेत त्यांचें ज्ञान व्यक्तीला होईल. त्यांचे मदतीनें प्रत्येक व्यक्ति आपल्या स्वतःच्या जीवनाचें तत्त्वज्ञान निश्चित करील. अशा प्रकारचें कार्य पाश्चिमात्य देशांनीं केलेलें नाहीं. अनेक धर्मांची व तत्त्वज्ञानाची भूमि जी हिंदुस्थान त्याकडेच हें कार्य आहे असें दिसतें.

## आदर्श नियंत्रणपद्धतीचा अभाव

शिक्षणाचा इतिहास पाहिला तर त्यांत असें दिसतें कीं पुराणमतवादी लोकांचा आणि दृढमूल झालेल्या मिराशीचा शिक्षणप्रसाराला नेहमीं विरोध झालेला आहे. म्हणून लोकसत्ताक राज्यपद्धतींत जेथें जनतेच्या लहरीवर शिक्षण अवलंबून आहे तेथें त्याची वाढ अगदीं सावकाश झाली आहे; उदाहरणार्थ इंग्लंड. पण शिक्षणानुकूल सर्वसत्ताक सरकारच्या आश्रयानें जेथें शिक्षण चालू आहे तेथें ही वाढ शीघ्र गतीनें झाली आहे. परंतु राजसत्तेनें केलेल्या वाढींत एकदम फेरबदल झालेलेही दिसून येतात. राजसत्ता स्थिर आहे तोंपर्यंत ती शिक्षणपद्धति स्थिर राहते. सत्तेनें मनांत आणलें तरच प्रगति होऊं शकते. फरान्समध्यें १९२३।२४ सालीं एका वर्षांत दोन वेळां शिक्षणामध्यें फेरफार केले गेले. असें जरी असलें तरी तांतडीचे आणि महत्त्वाचे प्रश्न सोडवून सार्वत्रिक शिक्षणाचा अगदीं थोड्या काळांत प्रसार करण्याला अनुकूल राजसत्तेचा चांगला उपयोग होतो. एकोणिसाव्या शतकांत जर्मनींत (प्रशियांत) राजानें शिक्षणपुनर्घटना करण्याचे मनांत आणलें त्या कारणानें शिक्षणांत वेगानें प्रगति होऊं शकली. फरान्समध्यें लोकसत्तात्मक सरकारनें शिक्षणप्रसार आपल्या सत्तेच्या जोरावर घडवून आणला. अमेरिकेंत सार्वत्रिक शिक्षणाचे

प्रसाराकरितां कायद्याचा आश्रय घेण्यांत आला, म्हणून सार्वत्रिक शिक्षण सर्वत्र लौकर अंमलांत आलें. उलट इंग्लंडमध्यें शिक्षणाचा प्रसार सावकाश झाला, कारण सरकारनें तें यदृच्छेवर सोंपवून दिलें होतें, आणि राज्यसत्ते-सारख्या दुसऱ्या कोणत्याच सत्तेनें तें आपल्या हातांत घेतलें नाहीं. देशांतील निरनिराळ्या समाजवर्गामध्यें अनेक प्रकारच्या चळवळी होऊन त्यांच्यांतील परस्परांच्या तडजोडीमुळें शिक्षणाची प्रगति झाली. सारांश काय कीं तांतडीनें थोड्या वेळांत सार्वत्रिक शिक्षणप्रसाराचें काम अनुकूल व जागृत राज्यसत्ताच लौकर करूं शकते. जनतेवर ही गोष्ट सोंपवून दिल्यास फार दिरंगाईनें प्रगति होते. परंतु त्याबरोबर या पद्धतींत दोष काय येतात तेंही पाहिलें पाहिजे. सरकारी नियंत्रण शिक्षणावर आलें म्हणजे अभ्यासक्रमाचे दृष्टीनें पुराणमतवादी धोरण राहतें व प्रगतीला विरोध होतो. फरोबेलनें जर्मनींतच बालोद्यानपद्धति निर्माण केली, परंतु जर्मन राजांनीं तिच्या प्रसाराला बंदी केली. मॅाँटेसोरी पद्धति इटलींत जन्मास आली तरी तिचा प्रसार इटलीपेक्षां इतर देशांतच अधिक आहे. फरान्समध्यें शिक्षणाचीं सर्व सूत्रें मध्यवर्ती सरकारचे हातांत आहेत, त्यामुळें नवीन शिक्षणप्रयोगांचा जन्म कधीं फरान्समध्यें झालेला नाहीं. शिक्षणावर नियंत्रण कशा स्वरूपाचें असावें हा प्रश्न अद्याप समाधानकारक रीतीनें पाश्चिमात्य देशांतही सुटलेला नाहीं. सार्वत्रिक शिक्षणप्रसाराचे कामीं राजसत्तेच्या अधिकाराचा उपयोग तर व्हावा, परंतु त्याबरोबर शिक्षणावर सरकारी नियंत्रण न येतां प्रायोगिक व बौद्धिक स्वातंत्र्य कायम राहावें अशा दोन तत्त्वांची एकत्र सांगड होणें जरूर आहे. प्राचीन हिंदी शिक्षणपद्धतींत राजसत्ता आर्थिक साहाय्य देत असे आणि विद्वान् अध्यापकवर्गाचें त्यावर नियंत्रण असे. आर्थिक मदतीबरोबर नियंत्रण न येतां शैक्षणिक स्वातंत्र्य कायम राहिलें. परंतु लोकमताला हें शिक्षण जबाबदार न राहिल्यामुळें दिवसेंदिवस त्याची आणि सामाजिक जीवनाची फारकत झाली. राजसत्तेची नियंत्रणरहित मदत, अध्यापकवर्गाचें ज्ञान, आणि वाढत्या समाजाशीं निकट संबंध अशा तिन्ही गोष्टींची एकत्र सांगड घालणारी नियंत्रणपद्धति निर्माण होणें जरूर आहे. शिक्षणनियंत्रणाचे बाबतींत अद्याप पाश्चिमात्य शिक्षणपद्धतीही सदोष आहेत.

## हिंदी दृष्टीनें पाश्चिमात्य शिक्षणाची किंमत

अमेरिकेनें व यूरोपनें शिक्षणाचें यंत्र तयार करून त्यांतून असंख्य व्यक्ती बाहेर पडण्याची योजना केलेली आहे ही गोष्ट सत्य असली तरी अद्याप एक महत्त्वाचा प्रश्न त्यांनी सोडविलेला नाही. स्पेन्सरनें शिक्षणाचा विचार करितांना 'अधिक महत्त्वाचें ज्ञान कोणते'? (व्हॉट् नॉलेज् इज् ऑफ मोस्ट वर्थ ? ) असा प्रश्न विचारला होता. त्याचें उत्तर अद्याप पाश्चात्यांनाही सांपडलेलें दिसत नाहीं. आध्यात्मिक, बौद्धिक, भावनिक, शारीरिक अशा सर्व दृष्टीनीं व्यक्तीचें शिक्षण करून तिला खरी सुसंस्कृतता देणाऱ्या शिक्षणाचा आदर्श अद्याप पाश्चिमात्यांनींही निर्माण केलेला नाही. साक्षरतेचा प्रसार पाश्चिमात्य राष्ट्रांत पुष्कळ झालेला आहे व ज्ञानाचे दृष्टीनेंही अनेक विद्वान् माणसें निर्माण होत आहेत. परंतु केवळ साक्षरता आणि विद्वत्ता म्हणजे संस्कृति नाहीं; तें संस्कृतीचें एक अंग आहे. आकुंचित असहिष्णु राष्ट्रीयत्व आणि दुसऱ्याचें स्वातंत्र्य अपहरण करणारें साम्राज्यत्व यांच्या हातांतील बाहुलें म्हणून जोंपर्यंत शिक्षणाचा उपयोग होत आहे तोंपर्यंत त्याची आणि खऱ्या संस्कृतीची फारकतच राहणार. म्हणून हिंदुस्थाननें पाश्चिमात्य शिक्षणाचें अनुकरण करितांना विवेचक दृष्टि ठेविली पाहिजे. इतर देशांपासून कांही शैक्षणिक तत्त्वें व तंत्रें घेण्यास हरकत नाही. परंतु तसें करण्यापूर्वी सुसंस्कृत राष्ट्रीयत्वाची आणि वैयक्तिक जीवनाची आपली स्वतःची कल्पना स्पष्ट करावी. व्यक्ति आणि राष्ट्र या दृष्टीनें संस्कृति म्हणजे काय याचें सुसंगत तत्त्वज्ञान निश्चित झालें म्हणजे त्याला पोषक अशा कोणत्या गोष्टी पाश्चिमात्यांकडून घ्याव्यात तें निवडणें फारसें कठिण नाहीं. शिक्षणाचा इतका खोल विचार होण्यास अवधि लागेल. त्यापूर्वी आजच पाश्चात्य शिक्षणापासून काय गोष्टी घेण्यासारख्या आहेत याचा विचार करणें शक्य आहे.

समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या शिक्षणाची तिच्या कमाल वाढीला व नैसर्गिक गुणविकासाला संधि देण्याकरितां शिक्षणक्षेत्रांत लोकशाहीचें तत्त्व येणें आतां अपरिहार्य आहे. सामान्य जनांच्या प्राथमिक शिक्षणाची सार्वत्रिक सोय न करणें म्हणजे आजच्या सुधारलेल्या जगांत देश बुद्धिपुरःसर अडाणी ठेवण्यासारखें आहे. इतर राष्ट्रांत सामान्य जनांना उच्च शिक्षण

देण्याचा प्रयत्न चाललेला आहे. ही जगांतील प्रवृत्ति लक्षांत घेऊन हिंदुस्थानांत सामान्य जनांना शिक्षणाची अधिक संधि निर्माण करणें यापुढें अपरिहार्य आहे.

शिक्षणाला समाजोन्मुख करणेंही आतां अगदीं आवश्यक झालेलें आहे. आजपर्यंत आपल्या शिक्षणसंस्था एकाद्या हिमालयांतील गुहेप्रमाणें समाजांत जीवन कंठीत होत्या व आहेत. सामाजिक, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय प्रश्नांची उत्कटता वाढलेली नव्हती व शिक्षणांत गुंतलेल्या व्यक्तींची संख्याही फार थोडी होती तोंपर्यंत संन्यस्त वृत्तीच्या शिक्षणानें झालेला तोटा फार जाणवला नाहीं. आज भौतिक आणि वैचारिक दृष्टीनें जग पुढें जात आहे. परंतु शिक्षण मात्र मागें राहात आहे. शिक्षण आणि समाजप्रगति यांमधील हें अंतर दिवसेंदिवस कमी करून शिक्षणाला समाजोन्मुख करणें जरूर आहे. समाजाच्या उत्कर्षाला शिक्षणसाधनाची मदत झाली पाहिजे.

पाश्चिमात्यांनी वाढविलेली शास्त्रीय दृष्टि हिंदी शिक्षणालाही लावली पाहिजे. विचार आणि पद्धती या दृष्टींनी, आपल्या व पाश्चात्यांच्या, प्राचीन व अर्वाचीन शिक्षणांत इतकी साहित्यसामुग्री आहे कीं त्या सर्वच मालमसाल्याचा उपयोग करतां येणें शक्य नाहीं व युक्तही नाहीं. सर्वच तत्त्वें व पद्धती यांचा समावेश एकाद्या शिक्षणांत केल्यास ती पद्धति विसंगत व परस्परविरोधी तत्त्वांचें व तंत्रांचें एक मिश्रणच होईल. म्हणून या साहित्य-सामुग्रीमधील कोणती द्रव्यें आपणाला उपयुक्त आहेत आणि कोणतीं नाहींत हें ठरविण्याकरितां पाश्चिमात्यांनी वाढविलेली, परंतु तिकडेही अद्याप सर्वत्र प्रचारांत न आलेली, शास्त्रशुद्ध दृष्टि आपण घेऊन हिंदी शिक्षणाची योजना केली पाहिजे.

कोणत्याही राष्ट्राचे विचार किंवा पद्धति यांना दत्तक घेऊन भागत नाहीं. आपल्या गृहसंस्कृतीच्या चौकटींत त्या गोष्टी सुसंगत रीतीनें कशा बसतील हें पाहणें आवश्यक आहे.

## प्रकरण तिसावें

# हिंदी शिक्षणाची सुधारणा व पुनर्घटना

### पुनर्घटनेचें वातावरण

हें पुनर्घटनेचें युग आहे. आज जगांत जिकडेतिकडे पुनर्घटना आणि योजना चाललेल्या आहेत. प्रत्येक देशांतील समाजांत आणि जीवनांतील इतर क्षेत्रांत असे कांहीं प्रश्न उपस्थित झाले आहेत कीं, त्यामुळें विचारवंतांना पुनर्घटनेची जरूरी भासूं लागली आहे. यदृच्छेनें होणाऱ्या वाढीचें युग आतां गेलें असून योजनापुर:सर वाढ करण्याचें नवीन युग आलेलें आहे. बहुतेक राजकीय व सामाजिक क्षेत्रांमध्यें ही परिस्थिति दिसून येत आहे. शिक्षण हें सामाजिक जीवनाचें एक महत्त्वाचें अंग असल्यामुळें याही क्षेत्रांत विचार-क्रांति होत आहे. इटली, जर्मनी, रशिया इत्यादि राष्ट्रांनीं आपापल्या शिक्षणपद्धतीमध्यें आमूलाग्र पुनर्घटना केलेली आहे. इंग्लंड, फरान्स, अमेरिका इत्यादि देशांतील शिक्षणांतही महत्त्वाच्या सुधारणा घडून येत आहेत. शिक्षणपद्धतीचें बाह्यस्वरूप आणि अंत:स्वरूप अशा दोन्ही विभागांत सुधारणा आणि पुनर्घटना चाललेल्या आहेत. नवीन युगाला व नवीन समाजाला जुन्या शिक्षणपद्धती पुरेनाशा होतात म्हणून शिक्षणांतही फेरबदल करावा लागतो. तशीच परिस्थिति आज हिंदुस्थानांत आलेली आहे. त्यामुळें सरकार आणि जनता या दोघांनाही शिक्षणसुधारणेची जरूरी भासूं लागली असून जिकडेतिकडे पुनर्घटनेच्या कल्पना आणि योजना ऐकूं येऊं लागल्या आहेत.

### सरकारी औदासीन्य

शिक्षणांत सुधारणा व्हावी व ती समाजाच्या गरजांना धरून व्हावी, ही जनतेची मागणी नवीन नाहीं. १८७५ सालापासून आतांपर्यंत अधूनमधून शिक्षणसुधारणेच्या व राष्ट्रीय शिक्षणाच्या अनेक लाटा उसळलेल्या आहेत. त्या सर्वांच्या मुळांशीं प्रचलित शिक्षणपद्धतीबद्दलचा असंतोष हाच होता. विद्यमान शिक्षण आजच्या समाजाला उपयोगी पडूं शकत नाहीं, हिंदी जीवनाचा

विचार करून त्याची योजना झालेली नाहीं, राष्ट्रसंवर्धनाच्या कामीं तें प्रायः निरुपयोगी आहे, याच भावनेनें जनतेनें आपली स्वतंत्र शिक्षणपद्धति स्थापण्याचा प्रयत्न केला ; व त्याचा अप्रत्यक्ष परिणाम सरकारमान्य शिक्षण-पद्धतीवरही कांही प्रमाणांत झाला. परंतु एकंदरीत सरकार या बाबतींत उदासीनच होतें ; फारसा फेरबदल न करतां व मूळ पद्धतीला विशेष धक्का न लावतां बाह्यतः ज्या थोड्या सुधारणा होऊं शकल्या तेवढ्यावरच तें तृप्त होतें. कधीं कधी सुधारणेच्या योजना करण्याकरितां कमिशनें व कमिटचा नेमल्या गेलेल्या असल्या तरी त्यांचे सर्व अहवाल धूळ खात पडले ; त्यांची अंमलबजावणी झाली नाहीं. दरवर्षी सरकारी अहवालांत शिक्षणप्रगति दाखविण्यांत येत असे. पण ही प्रगति संख्येच्या दृष्टीनें होती, गुणाच्या दृष्टीनें नव्हती. शिक्षणसंस्थांची संख्या वाढली, विद्यार्थ्यांची संख्या फुगली, मुलींच्या शिक्षणांत प्रगति झाली, मागसलेले वर्ग अधिकाधिक शाळेंत येऊं लागले, व त्या प्रमाणांत जनतेचा आणि सरकारचा पैसा शिक्षणावर अधिक खर्च होऊं लागला. तीसचाळीस वर्षांपूर्वी व आजकाल शाळेंत येणाऱ्या विद्यार्थीवर्गाच्या बौद्धिक आणि सामाजिक दर्जामध्यें महत्त्वाचा फरक घडून आला. या नवीन विद्यार्थीवर्गाच्या बौद्धिक आवडीनिवडी व आर्थिक गरजा अगदी निराळ्या प्रकारच्या होत्या व आहेत. परंतु शिक्षणखातीं व विद्यापीठें यांनीं या बदललेल्या परिस्थितीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. त्यांचे पूर्वीचे अभ्यासक्रम जसेच्या तसे चालू राहिले. कांही प्रांतांत तर १९१४ सालीं केलेल्या अभ्यासक्रमांत अधूनमधून थोड्याफार डागडुजीपलीकडे वीस पंचवीस वर्षांत कांहीं फेरबदल केला गेला नाही. काळ बदलला, एक पिढी जाऊन दुसरी पिढी आली, आणि नवीन पिढीच्या गरजा बदलल्या ; परंतु आमच्या शिक्षणक्रमाने या गोष्टी मुळीच लक्षांत घेतल्या नाहीत. या परि-स्थितीचा केव्हां तरी स्फोट होणें साहजिकच होतें. तो समय आज आलेला आहे.

इकडे आपल्या देशांतील शिक्षणाचे सूत्रचालक गेल्या पिढीमध्यें उदासीन होते त्याच वेळी पाश्चिमात्य देशांत महत्त्वाच्या शैक्षणिक घडामोडी झाल्या. इंग्लंडमध्यें फिशर अॅक्टमुळें सर्व देश जागा झाला ; फ्रान्समध्यें पुराणमतवादी शिक्षणांतही सुधारणेचें वारें शिरलें, आणि इटली, जर्मनी व रशिया या देशांतील शिक्षणाचें अंतर्बाह्य स्वरूप बदलून गेलें. पाश्चिमात्य देशांतील

राजकीय व सामाजिक घडामोडीकडे आपलें जितकें लक्ष जातें तितकें शैक्षणिक घडामोडींकडे जात नाहीं.

## सुधारणा कीं पुनर्घटना ?

शिक्षणाचा विचार करतांना सुधारणा आणि पुनर्घटना या दोन गोष्टींत फरक करणें जरूर आहे. सुधारणा तावडतोब करणें शक्य आहे, पण पुनर्घटने-बद्दल अधिक विचार केला पाहिजे. आज जे तात्कालिक व जुजबी दोष शिक्षणांत दिसतात त्यांचें निराकरण करणें याला सुधारणा म्हणतां येईल. ही करण्यास फारसा विलंब लागू नये. परंतु पुनर्घटना करतांना मात्र शिक्षणाच्या ध्येयांचा व समाजाच्या आकांक्षांचा दूरवर विचार करून नंतर योजना केली पाहिजे. पुनर्घटना करते वेळी जरूर तर समाजाच्या भावी ध्येयाप्रमाणें शिक्षणाचा पूर्वीचा पायादेखील आमूलाग्र बदलावा लागेल. आपल्या समाजाचा व देशस्थितीचा खोल विचार करून आणि हिंदी शिक्षणाचें ध्येय निश्चित करून त्या ध्येयास सुसंगत अशा शिक्षणपद्धतींची योजना करण्यांत आली तरच तिला शैक्षणिक पुनर्घटना म्हणतां येईल.

आज आपल्या शिक्षणांत जे दोष उत्पन्न झाले आहेत ते दूर करतांना भावी कालास लागणाऱ्या पुनर्घटनेकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. सांप्रत काळी सुशिक्षितांची बेकारी, एकांगी पुस्तकी शिक्षण, परीक्षेंतील नापासांचें प्रमाण, व अभ्यासाचा कमी झालेला दर्जा, या दोषांकडे आपलें लक्ष लागलेलें आहे. परंतु शिक्षणाची पुनर्घटना करतांना केवळ याच गोष्टींकडे लक्ष देऊन भागणार नाही. यापेक्षां व्यापक दृष्टीनें विचार करणें जरूर आहे.

राजकीय, सामाजिक आणि आर्थिक दृष्टीनें आपण नव्या युगांत प्रवेश करीत आहोंत. लोकशाही पद्धतीच्या संस्था देशांत वाढून जनतेवर राजकीय विचाराची जबाबदारी पूर्वीचिपेक्षां अधिक पडणार आहे. सामाजिक आणि आर्थिक आंदोलनापूर्वीची अस्वस्थता समाजांत भासमान होऊं लागली आहे. अशा वेळीं भावी काळाकडे नजर देऊन शिक्षणपद्धति आंखणें जरूर आहे. शिक्षणाचा उद्देश केवळ भाषा आणि गणित शिकविणें हा राहिलेला नाही. सामाजिक प्रगतीकरितां नवीन पिढी तयार करावयाची आहे. अशा व्यापक दृष्टीनें विचार करणारे शिक्षणपुढारी निर्माण झाले तर ते काळाला

योग्य अशी नवीन शिक्षणयोजना आंखूं शकतील. आपापल्या विषयांचा आकुंचित दृष्टीनें अभिनिवेश बाळगणाऱ्या तज्ज्ञांच्या हातून हें काम होणार नाहीं. समाजाचा आणि ज्ञानक्षेत्रांचा व्यापक विचार करणाऱ्या तत्त्वज्ञांची या कार्याकरितां जरूरी आहे. अमेरिकेंत जॉन ड्यूईनें, इंग्लंडमध्यें लॉर्ड फिशरनें, इटलीत जेंटिलीनें, जर्मनींत क्रीकनें, आपल्या समाजाकरितां अशा रीतीनें व्यापक विचार करून शैक्षणिक तत्त्वज्ञान निश्चित केलें व सुधारणेचा तात्त्विक पाया घातला. अशा प्रकारचें कार्य हिंदुस्थानांत होणें जरूर आहे.

## आकुंचित आणि व्यापक दृष्टि

शिक्षणाबद्दल विचार करतांना जनतेला आज धंदेशिक्षणाची आवश्यकता अधिक भासत आहे. त्यामुळें औद्योगिक शिक्षणाच्या संस्था निघाल्यानें लोकांचें समाधान होणें शक्य आहे. शिक्षक, प्रोफेसर व विद्वान् या लोकांचा जो वर्ग आहे त्याला असें वाटतें कीं, अभ्यासाचा दर्जा वाढला पाहिजे, बौद्धिक विषयांची आवड आहे असेच विद्यार्थी शाळा–कॉलेजांतून आले पाहिजेत व इतरांना धंदेशिक्षणाकडे लाविले पाहिजे, म्हणजे शिक्षण सुधारेल. अशा रीतीनें धंदेशिक्षण आणि अभ्यासाचा दर्जा या दोन गोष्टींवर आजच्या शिक्षणसुधारणेचा विशेष भर आहे. परंतु या दोन्ही सुधारणा झाल्या तरी देखील त्यांना शिक्षणाची पुनर्घटना असें म्हणतां येणार नाही. गेलीं शंभर वर्षे पाश्चात्य पद्धतीचें हे शिक्षण आपण घेत आलों आहों. आजच्या शिक्षणाचा पाया जसा शंभर वर्षांपूर्वी घातला गेला तसा पुढच्या शंभर वर्षांच्या शिक्षणाचा पाया आज घातला पाहिजे. त्याकरितां केवळ आजकालच्या बेकारीचा व व अभ्यासाच्या दर्जाचा विचार करून भागणार नाही. आपल्या समाजाचा साकल्यानें विचार करणें आवश्यक आहे. आपल्या समाजाच्या आजच्या व भावी गरजा, आपली राजकीय महत्त्वाकांक्षा, संस्कृतीबद्दलची आपली कल्पना, आणि राष्ट्र या दृष्टीनें आपलें भावी जगांतील स्थान या दृष्टीनें विचार करून त्या विचारांना सुसंगत अशा शिक्षणाचा पाया आपण घातला पाहिजे. त्याकरितां आजचा समाज व आजचे शिक्षणदोष यांबरोबरच भावी पिढीच्या गरजा या दृष्टीनेंही शिक्षणाचा विचार होणें अवश्य आहे.

## आजच्या शिक्षणांतील महत्त्वाचे दोष

आज जी शिक्षणपद्धति अस्तित्वांत आहे तिचा तात्त्विक दृष्टीनें मेकॉले-प्रभृतींनीं प्रारंभीं विचार केला होता. पाश्चात्य संस्कृतीचें हिंदी मनावर आरोपण करण्याच्या दृष्टीनें ही शिक्षणपद्धति अंमलांत आली ; परंतु प्रत्यक्ष व्यवहार पाहतां असें अनुभवास आलें की, अभ्यासक्रमाचे व शिक्षणपद्धतीचे तपशील आंखतांना तात्त्विक ध्येयापेक्षां विवक्षित राजकीय गरजांनाच अधिक महत्त्व दिलें गेलें. ब्रिटिश राज्यकारभार चालविण्याकरितां कांहीं माणसें निर्माण करण्याच्या दृष्टीनें शिक्षणपद्धति आंखली गेली व हेंच ध्येय पुढें कायम राहिलें. परंतु अलीकडे परिस्थिति फार बदलल्यामुळें याच शिक्षणपद्धतींतून असंतुष्ट व बेकार शिक्षित बाहेर पडूं लागले. इकडेही कोणीं फारसें लक्ष दिलें नसतें. पण हे सुशिक्षित बेकार असेच असंतुष्ट व निकामी राहिले तर देशांत अस्वस्थता माजेल अशी भीति वाटूं लागल्यामुळें आज शिक्षणसुधारणेची आंच सर्वांना लागलेली दिसते. सारांश, सध्यां शिक्षणाच्या सुधारणेविषयीं जो विचार चाललेला आहे त्याचे मुळाशीं विवक्षित ध्येयवाद किंवा सुसंगत असें शैक्षणिक तत्त्वज्ञान नाहीं. विद्यमान परिस्थितीतील आपद्धर्म म्हणून जुजबी सुधारणा करण्याचा प्रयत्न चालू आहे.

हल्लीं ज्या दोषांचें निराकरण व्हावे असें सरकारला व लोकांना वाटतें ते दोष सामान्यतः असे आहेत—

सुशिक्षित तरुणांमधील बेकारी व असंतोष.

ज्यांना बौद्धिक अभ्यासाची आवड व पात्रता नाही अशा विद्यार्थ्यांची शाळा–कॉलेजांमधून झालेली गर्दी.

बौद्धिक अभ्यासाचा घसरत चाललेला दर्जा.

शिक्षणकारभारविषयक कांहीं अडीअडचणी—उदाहरणार्थ माध्यमिक शिक्षणांतील दुहेरी कारभार.

समाजांतील निरक्षरता

सध्यांच्या शिक्षणसुधारणेच्या चर्चेमध्यें वरील दोषांचाच विशेष विचार केला जात आहे. यांपेक्षां व्यापक असे जे शिक्षणाचे व समाजाचे प्रश्न आहेत त्यांचा विचार केला जात नाहीं. तो झाल्याशिवाय खरी शिक्षण-पुनर्घटना होणार नाहीं असा इषारा देणें जरूर आहे.

## दोषपरिहारार्थ सुचविलेले उपाय

शिक्षणपद्धतीमधील हे दोष सर्व प्रांतांमध्यें सारखेच आहेत. त्यामुळें ते दूर करण्याकरितां ज्या सूचना केल्या आहेत, त्यांतही पुष्कळ अंशीं साम्य आहे. अशा सूचना व योजना निरनिराळ्या प्रांतांत केल्या गेल्या आहेत. पंजाबमधील युनिव्हर्सिटी इन्क्वायरी कमिटीचा अहवाल, संयुक्त प्रांताच्या व बंगाल सरकारनें केलेल्या योजना, १९३४ मध्यें भारतीय विद्यापीठ परिषदेनें (इंडियन् युनिव्हर्सिटीज् कॉन्फरन्स) सुचविलेली योजना, व मुंबई इलाख्यांतील हेस्केथ कमिटीचा अहवाल, या सर्वांचें परीक्षण केलें तर त्यांत पुढील सामान्य सूचना केलेल्या आढळून येतील--

प्राथमिक, माध्यमिक, दुय्यम व कॉलेज-शिक्षण यांच्या वर्गांची आणि कालमर्यादेची नवीन विभागणी; उदाहरणार्थ, सध्यां मुंबई इलाख्यांत शिक्षणाची ५+३+४+४ अशी वर्गांची किंवा वर्षांची जी योजना आहे तिच्याऐवजीं ४+३+३+२+४ अशी किंवा अन्य विभागणी.

हायस्कूलमधून अथवा स्वतंत्र शिक्षणसंस्थांमधून हस्तव्यवसायात्मक किंवा औद्योगिक शिक्षणाची आवश्यक वा ऐच्छिक सोय.

प्राथमिक शिक्षणानंतर माध्यमिक शिक्षणांत अभ्यासक्रमाची विविधता (उदाहरणार्थ, शेतकी, व्यापारी, औद्योगिक आणि बौद्धिक शाखा) व बौद्धिक शिक्षणाकडे जाणाऱ्यांची बुद्धीच्या दृष्टीनें दक्षतापूर्वक निवड.

बौद्धिक विषयांखेरीज इतर व्यावहारिक विषयांकडेही विद्यार्थ्यांनीं जावें, अशा हेतूनें परीक्षा व प्रमाणपत्रपद्धति यांची पुनर्घटना.

## न झालेला विचार

वरील सूचना या व्यावहारिक व जरूरीच्या आहेत ही गोष्ट सर्वांच्या तेव्हांच लक्षांत येईल. परंतु या सुधारणा अगदी वरवर आणि तांत्रिक स्वरूपाच्या आहेत हें सूक्ष्म दृष्टीनें पाहणारास दिसेल. अशा तात्कालिक सुधारणा झाल्या तरी त्यांमुळें शिक्षणाच्या पुनर्घटनेचा प्रश्न सुटेल असें म्हणवत नाही. तात्कालिक जरूरीकडे पाहिल्यामुळें जुन्या पद्धतींत आज दिसणारे दोष जसे उत्पन्न झाले तसेच या नव्या सुधारणांतून पुढें उत्पन्न होतील याचा विचार झालेला नाहीं. धंदेशिक्षणामुळें लगेच बेकारी नाहींशी

होईल असें कांही नाहीं. कारण पाश्चात्य देशांत उत्कृष्ट औद्योगिक शिक्षण असूनहि बेकारी थोडीबहुत आहेच. शिक्षणाची कालमर्यादा कमजारत करणें व कांहीं नवीन विषयांचा समावेश अभ्यासक्रमांत करणें या सुधारणांचा विचार झाला असला तरी एकंदर शिक्षणाची दिशा काय असावी व बौद्धिक विषय कोणत्या ध्येयानें शिकवावेत या गोष्टींचा विचार फारसा झालेला नाहीं. राष्ट्राची भावी काळांतील राजकीय, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक परिस्थिति आणि महत्त्वाकांक्षा दृष्टीपुढें ठेवून शिक्षणाची पुनर्घटना केली तर त्या शिक्षणाचा उपयोग राष्ट्रसंवर्धनाकडे होईल. या दिशेनें शिक्षणाचा समाजहिताकडे उपयोग करून घेण्याचें धोरण अमेरिका रशिया, जर्मनी, इटली इत्यादि राष्ट्रांनी ठेविलेले आहे. ज्या ज्या राष्ट्राना राजकीय, सामाजिक व आर्थिक दृष्टीने लौकर प्रगति करणें जरूर होतें त्या त्या राष्ट्रांनीं आपल्या शिक्षणाचा उपयोग समाजध्येय गांठण्याकडे करून घेतला आहे. आज हिंदुस्थान त्याच स्थितीमध्यें आहे. त्याला सर्व बाजूनी प्रगति करावयाची आहे ; परंतु ती करण्यास साधने मात्र अगदी मर्यादित आहेत. अशा परिस्थितींत शिक्षणाचा उपयोग आपल्या भावी ध्येयपूर्तीच्या दृष्टीनें करून घेणें अगदीं आवश्यक आहे.

## समाजप्रगतीचें एक साधन

शिक्षणाचा उपयोग सामाजिक प्रश्न सोडविण्याच्या कामी व समाजध्येयें साध्य करण्याच्या कामी करून घेतला पाहिजे, या तत्त्वाची कांहींशी जाणीव सध्यां पुढें येत असलेल्या शिक्षणसुधारणेच्या योजनेवरूनही दिसून येते. बेकारी–निवारणार्थ शिक्षणपद्धति बदलली पाहिजे या सूचनेच्या मुळाशीं असें तत्त्व आहे की, देशाची आर्थिक परिस्थिति बदलून घेण्याच्या कामीं शिक्षणाचा उपयोग करून घेतां येतो. परंतु याच तत्त्वाची व्याप्ति थोडीशी अधिक करून समाजाच्या सर्वांगीण प्रगतीला धरून शिक्षणपुनर्घटना झाली पाहिजे, या धोरणाचा पुरस्कार हिंदुस्थानांत अद्यापि कोणी केलेला नाही. पूर्वी निर्दिष्ट केलेल्या ज्या अनेक योजना आहेत त्यांत तरी या शैक्षणिक तत्त्वज्ञानाची छाया पडलेली दिसत नाही. त्यामुळें पुढें आलेल्या सूचना व योजना या केवळ तांत्रिक स्वरूपाच्या वाटतात. त्यांत तात्कालिक सुधारणा आहेत,

आमूलाग्र पुनर्घटना नाहीं. तात्पुरती अडचण दूर करण्याच्या दृष्टीनें या सुधारणांचा विचार करावा ; परंतु त्यामुळें शिक्षणपुनर्घटनेचें काम संपलें असें मात्र समजूं नये. हें काम शिल्लक राहतेंच. तें दीर्घश्रमाचें, खोल विचाराचें, व अनेक तज्ज्ञ आणि तत्त्वज्ञ यांच्या सहकारितेनें होण्यासारखें आहे. तथापि भावी राष्ट्रीय प्रगतीकडे शिक्षणाचा उपयोग करून घ्यावयाचा असेल तर या स्वरूपाच्या पुनर्घटनेसंबंधीं विचार व योजना आजपासूनच होणें अवश्य आहे.

## वैयक्तिक व सामाजिक जीवनाच्या गरजा

शिक्षणसुधारणेचा विचार करतांना कांहीं पूर्वग्रह आडवे येण्याचा फार संभव असतो. विद्यमान शिक्षणक्रमांतील विषय आज आहेत तसेच कायम ठेविले पाहिजेत, अशा प्रकारची शिक्षणतज्ज्ञांची वृत्ति झालेली आहे. अभ्यासक्रमांतील विषय हे साधन आहे. साध्य नव्हे. व्यक्तिजीवन, समाजजीवन आणि अभ्यासाचे विषय या तीन गोष्टींपैकीं तिसऱ्या गोष्टीला आपल्याकडे फाजील महत्त्व देण्यांत येत आहे. वैयक्तिक व सामाजिक जीवनाच्या गरजा काय आहेत त्या पाहून त्याप्रमाणें विषयांची योजना करण्याच्या ऐवजीं आज शाळा–कॉलेजांमध्यें असलेले विषय कायम समजून त्यांच्या द्वारें आपण समाजाच्या व व्यक्तींच्या गरजा भागविण्याचा प्रयत्न करितों; परंतु तें साधत नाहीं. त्यामुळें जीवन व शिक्षण यांत तफावत पडते. ही परिस्थिति नाहींशी करावयाची असेल तर प्रथम व्यक्ति व समाज यांचा विचार केला पाहिजे आणि नंतर त्यांच्या अनुरोधानें शिक्षणाच्या योजनेचा विचार झाला पाहिजे. असें झालें तरच ती शिक्षणपद्धति त्या समाजाच्या विशिष्ट गरजा भागवूं शकेल. राष्ट्राच्या शिक्षणपद्धतींत वैशिष्टय उत्पन्न होतें तें यामुळेंच. हिंदी जीवनाचा शिक्षणाच्या दृष्टीनें विचार करतां कांहीं सिद्धांत सुचतात ते असे—

देशांतील विविध धर्मांचे, जातींचे व हितसंबंधांचे जनसमूह अथवा वर्ग देशांत एकोप्यानें व एकनिष्ठेनें राहतील अशा प्रकारची राष्ट्रीय मनोवृत्ति त्यांच्यांत निर्माण केली पाहिजे.

राजकीय दृष्टया लोकशाही हें हिंदुस्थानचें ध्येय असेल तर राजकीय जबाबदारी स्वीकारण्याची प्रवृत्ति प्रत्येक नागरिकांत उत्पन्न केली पाहिजे.

संस्कृतीच्या दृष्टीनें हिंदुस्थानला आपलें वैशिष्टय राखलें पाहिजे.

राष्ट्राचें आरोग्य आणि संरक्षण हा समाजपुनर्घटनेंतील महत्त्वाचा भाग असून त्याचा विचार शिक्षणयोजनेंत झाला पाहिजे.

देशांतील प्रत्येक व्यक्तीला आर्थिक स्थैर्याच्या व सुस्थितीच्या दृष्टीनें कांहीं तरी उद्योगधंदा शिकविणें अवश्य आहे.

प्रत्येक व्यक्तीला आपली प्रवृत्ति व लायकी यांप्रमाणें शाळा, विषय व अभ्यासक्रम निवडण्याची संधि असावी.

आपल्या सामाजिक व वैयक्तिक जीवनाच्या गरजा काय आहेत यांचा अगदी स्थूल निर्देश वर केला आहे. या गरजा व हे प्रश्न लक्षांत घेऊन शिक्षण-पुनर्घटना केली पाहिजे. या दिशेने विचार केल्यास शिक्षणाच्या पुनर्घटनेचीं कांहीं तत्त्वें निश्चित करतां येणें शक्य आहे. हीं तत्त्वें निश्चित करून त्यांना धरून जर शिक्षणयोजनेचा तपशील आंखला तर समाजाचें ध्येय आणि शिक्षणपद्धति यांत सुसंगतता येईल.

## पुनर्घटनेचीं नवीं तत्त्वें

सामाजिक व वैयक्तिक जीवनाच्या गरजा लक्षांत घेतल्यानंतर शिक्षणाच्या पुनर्घटनेकरितां जीं कांही तत्त्वें सुचतात त्यांचा स्थूल निर्देश पुढें केला आहे.

सर्व समाजांत एकराष्ट्रीयत्वाची व लोकसत्तेची भावना निर्माण करील असें नागरिक-शिक्षण, प्राथमिक माध्यमिक व उच्च अभ्यासक्रमांत आवश्यक असावें.

भारतीय संस्कृतीचा (तत्त्वज्ञान, धर्म, वाङ्मय आणि ललितकला) पद्धतशीर अभ्यासक्रम शिक्षणांत समाविष्ट झाला पाहिजे.

सर्व विद्यार्थ्यांना सुदृढ करणारें शारीरिक शिक्षण आणि सोळा वर्षांच्या सुमारास त्यांना राष्ट्रीय संरक्षणाची पूर्व तयारी करून देणारें सक्तीचें निमलष्करी शिक्षण देणें अवश्य आहे.

प्रत्येक शिक्षणसंस्थेनें आपल्या भोंवतालच्या समाजाच्या गरजा लक्षांत घेऊन अभ्यासक्रमांत फेरबदल करावा. त्यामुळें शहर व खेडें, कृषिप्रधान

समाज व इतर व्यवसाय करणारा समाज यांच्या ज्या अडचणी आहेत त्या दूर होतील.

माध्यमिक शिक्षणांतील अभ्यासक्रमांत आवश्यक व ऐच्छिक असे विषय असावेत. आवश्यक विषयांत सांस्कृतिक व नागरिक शिक्षणाचा, आणि ऐच्छिक शिक्षणांत हस्तव्यवसायात्मक व व्यक्तिविकासात्मक विषयांचा समावेश व्हावा.

प्राथमिक, माध्यमिक व उच्च दर्जाच्या केवळ औद्योगिक शिक्षण देणाऱ्या संस्थांची सोय तात्काल होणें जरूर आहे.

व्यक्तीला आपल्या नैसर्गिक प्रवृत्तींचा विकास करतां यावा याकरितां देशांत विविध प्रकारच्या शिक्षणसंस्था असाव्यात, व प्रत्येक शिक्षणसंस्थेंत व्यक्तीला आपल्या आवडीप्रमाणें विषय निवडण्याची सोय असावी; सर्व व्यक्तींना एकाच पद्धतीच्या शिक्षणाची सक्ति असूं नये.

## तात्त्विक दृष्टीनंतर तांत्रिक विचार

शैक्षणिक पुनर्घटना करतांना स्थूल मानानें कोणत्या तत्त्वांचा कोणत्या दिशेनें विचार केला पाहिजे याचा येथें अगदीं स्थूल निर्देश केला आहे. याच पद्धतीनें विचार करून आणखी कांहीं तत्त्वें निष्पन्न होतील. हीं तत्त्वें निश्चित केल्यानंतर मग इतर तपशील ठरविणें व शैक्षणिक कारभाराच्या दृष्टीनें योजना करणें फारसें कठिण नाहीं. सध्यांच्या शिक्षणसुधारणेच्या विचारांत या कारभारविषक गोष्टीनाच जास्त महत्त्व दिलें जात आहे. काय शिकवावें व कशाकरितां शिकवावें या दृष्टीनें विचार फार कमी आहे. हिंदी शिक्षणाची खरी पुनर्घटना करावयाची असेल तर प्रथम सामाजिक व वैयक्तिक जीवनाच्या गरजा लक्षांत घेऊन शैक्षणिक ध्येयें व तत्त्वें निश्चित केलीं पाहिजेत; व तो पाया पक्का केल्यानंतर मग अभ्यासक्रमाच्या व कारभाराच्या तपशिलांचा विचार झाला पाहिजे. अशा प्रकारच्या पुनर्घटनेच्या विचाराला अद्याप प्रारंभ झालेला नाहीं. सांप्रत पुढें आलेल्या सुधारणा व योजना अगदीं जुजबी आहेत.

## पाश्चिमात्य अनुभवाचा उपयोग करा

आजपर्यंत आपल्या शिक्षणानें इंग्लंडच्याच शिक्षणपद्धतीचें अर्धवट

अनुकरण केलें. त्यामुळें या पद्धतीपासून होणारे सर्व फायदे तर मिळाले नाहीतच, उलट दोष मात्र उत्पन्न झाले. आतां एवींतेवीं आपण प्राचीन शिक्षणपरंपरेच्या बंधनांतून मुक्त झालों आहोंत. मग इतर देशांच्या शैक्षणिक परंपरांचें बंधन तरी कां स्वीकारावें? जगांतील सर्व शिक्षणपद्धतीचें मंथन करून त्यांतून आपणांस योग्य व आपल्या ध्येयांशी सुसंगत दिसतील त्या तत्त्वांचा व तंत्रांचा स्वीकार करण्यास आपण आतां स्वतंत्र आहोंत. जगांतील अनुभवाचा उत्कृष्ट भाग आज आपणांस उपलब्ध झालेला आहे. मेकॉलेच्या वेळीं जी शिक्षण–पुनर्घटना झाली त्या वेळीं इतकी विचार व अनुभव सामुग्री आपल्या हाताशी नव्हती. आज शंभर वर्षांनी पुनः शिक्षण सुधारणेची संधि आलेली आहे. अशा वेळीं जागतिक अनुभवाचा उपयोग करून दूरदर्शीपणानें व व्यापक धोरणानें पुढच्या शंभर वर्षांचें धोरण आपण आंखलें तर हिंदी शिक्षणाच्या इतिहासांत आजचे शिक्षणपुढारी अजरामर होतील.

---

# पाश्चिमात्य शिक्षणपद्धती

## संदर्भग्रंथांची सूचि

पाश्चिमात्य शिक्षणाची चर्चा करणारीं अनेक पुस्तकें इंग्रजी, जर्मन, फ्रेंच वगैरे भाषांतून आहेत. त्यांपैकीं कांही महत्त्वाच्या ग्रंथांची यादी पुढें दिली आहे. मराठी भाषेंत, किंबहुना देशी भाषांमध्यें या विषयावर पुस्तकें नाहींत, म्हणूनच प्रस्तुत पुस्तकाचें प्रकाशन केलें आहे.


अकबर, अली एस.

—The German School System.
Longmans green & Co., 1932.

इंटरनॅशनल इन्स्टिटयूट ऑफ् टीचर्स कॉलेज्, कोलंबिया युनिव्हर्सिटी.

—Year books, 1926—1928. New York.

इंटरनॅशनल ब्यूरो ऑफ् एज्युकेशन, जिनीव्हा.

—Quarterly Bulletins, 1934 to 1936.

कबर्ले, एलवूड पी.

—Public School Administration.
Houghton Mifflin Co., New York, 1936.

कल्प, डॅनियल.

—Educational sociology.
Longmans green & Co., 1932.

कँडेल, आय्. एल्.

—Comparative Education.
Houghton Mifflin Co. 1933.

—History of Secondary Education.
Houghton Mifflin Co. 1930.

कूस, लिओनार्ड व्ही.

—The American Secondary School.

—The Junior High School.
Ginn & Co. New York, 1927.

क्रीक्, अर्नस्ट्.

—National Political Education.

ग्रेव्ह्ज्, फ्रॅंक पी.

—A Student's History of Education.
Macmillan and Co. 1919

—A History of Education in Modern Times.
Macmillan and Co. 1928.

जेंटिली, गिओव्हानी.

—The Reform of Education.
Harcourt, Brace and Co. New York 1922.

झियाउद्दीन अहमद.

—Systems of education.
Longmans green & sons, 1929.

टागोर, रवीन्द्रनाथ.

—Nationalism;. Macmillan & Co. 1927.

पार्कहर्स्ट, हेलेन.

—Education on the Dalton Plan.
G. Bell & Sons. Ltd., London, 1930.

पिंकेविच, ए.

—Science & Education in the U. S. S. R.
Victor Gollanz Ltd. London., 1935.

फिने, आर्. एल्.

—Sociological Philosophy of Education.
Macmillan & Co. 1926.

मन्रो, पॉल.

—History of Education.
Macmillan & co. 1913.

मेयर, ए. ई.

—Public Education in Modern Europe.
The Avon Press, New York, 1927.

मेरियम्, चार्लस् ए.

—The Making of Citizens.
Chicago University Press, chicago, 1931.

रीझनर्, ई. एच्.

—The Evolution of the Common School.
Macmillan & Co. 1930.

लजपतराय, लाला.

—The Problem of National Education.
in India.
Allen & Unwin, London, 1920.

लर्नेड, विल्यम् एस.

—The Quality of the Educational Process in the United States and in Europe.
The Carnegie Foundation, New York, 1927.

स्मिथ, हेन्री एल्. व इतर

—A Brief Survey of Present Day Religious anp Moral Education etc.

Indiana University Bulletin, vol. XI No 3, 1935
Bloomington, Indiana, U. S. A.

हॅडो, डब्ल्यू. एच. व इतर
—The Education of the Adolescent.
H. M. Stationary Office, London, 1926.

हार्ट, जे. जे.
—A Social Interpretation of Education.
Henry Holt Co. New York, 1929.

यांशिवाय अनेक विद्याखात्यांनीं, शिक्षणसंस्थांनीं, व संशोधन-संस्थांनीं प्रसिद्ध केलेल्या वाङ्मयाचा उपयोग प्रस्तुत ग्रंथाकरितां झालेला आहे. त्या सर्व वाङ्मयाची यादी देणें अशक्य आहे म्हणून तो प्रयत्न केलेला नाहीं.

# विषयांची सूचि

